भारत-गौरव-ग्रंथमाला-पुष्प ११५ वें.

# श्रीमन्महाभारतार्थ

## ( महाभारताचें सुबोध मराठी भाषांतर )



## नवम खंड.

**कर्णपर्व, अ० ७५–९६. शल्यपर्व, अ० १–६५. सौप्तिकपर्व, अ० १–१८. स्त्रीपर्व, अ० १–२७. शांतिपर्व, अ० १–३१.**




न हि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते ।

—भ. गी. अ. ४, ३८.

लेखक

**भालचंद्र शंकर देवस्थळी.**

शोकस्थानसहस्राणि भयस्थानशतानि च ।
दिवसे दिवसे मूढमाविशन्ति न पंडितम् ॥ पृ. ३४९.

अर्थेभ्यो हि विवृद्धेभ्यः संभृतेभ्यस्ततस्ततः ।
क्रियाः सर्वाः प्रवर्तन्ते पर्वतेभ्य इवापगाः ॥ पृ. ४१६.

शके १८५६ ] किंमत ~~साडेतीन~~ रुपये. [ सन १९३४

चार

## वाचकास

—०—

भगवान् श्रीकृष्णाच्या कृपेनें ह्या नवम खंड वाचकांच्या हातीं आज पडत आहे. अष्टम खंड प्रसिद्ध होऊन ह्या नवम खंडास बराच कालावधि लागला, त्यामुळें आमचे वाचक आम्हांवर रुष्ट झाले आहेत, हें आम्हीं जाणून आहों. विलंब केव्हांहि क्षम्य नाहीं; तथापि महाभारतासारख्या महाकार्यांत संकटें व अडचणी ह्या अकल्पित रीतीनें कशा उद्भवतात, त्याचा थोडासा विचार केला असतां, ते आम्हांवर रोष करणार नाहींत, असा विश्वास आहे.

यापुढील भाग वाचकांच्या हातीं वेळच्यावेळीं पडण्याविषयीं शक्य ते सर्व प्रयत्न करूं, एवढेंच तूर्त आश्वासन देतों.

प्रकाशक.

# विषयानुक्रमणिका.



## ८. कर्णपर्व—( पुढें चालू )



### कर्णवधपर्व ८. पृष्ठें १–८२.


**अध्याय ७५ वा**—धृतराष्ट्राचा संजयाला प्रश्न १; संजयकृत संकुलद्वंद्वयुद्ध-कथन १.

**अध्याय ७६ वा**—भीम-विशोकसंवाद ३.

**अध्याय ७७ वा**—अर्जुनपराक्रम ६; भीमाचें कौरवसेनेशीं युद्ध ८; शकुनीचा पराभव ९.

**अध्याय ७८ वा**—धृतराष्ट्रप्रश्न ११; कर्णाचा पराक्रम ११.

**अध्याय ७९ वा**—कर्णवधोत्सुक अर्जुनानें निर्माण केलेली रक्तनदी १४; कर्ण-वधाविषयीं अर्जुनाची तत्परता १४; शल्याचें कर्णाला प्रोत्साहनपर भाषण १५; संकुलयुद्ध १८.

**अध्याय ८० वा**—संकुलयुद्ध २०.

**अध्याय ८१ वा**—संकुलयुद्ध २२; भीमार्जुनांचा मोठा पराक्रम २३.

**अध्याय ८२ वा**—संकुलयुद्ध २५; भीम-दुःशासनयुद्ध २८.

**अध्याय ८३ वा**—दुःशासनवध २८; भीमसेनप्रतिज्ञा ३२.

**अध्याय ८४ वा**—दुःशासनाचे दहा बंधूंचा वध ३२; नकुल-वृषसेनयुद्ध ३३; नकुलपराजय ३४.

**अध्याय ८५ वा**—संकुलयुद्ध ३५; वृषसेनाचा वध ३६.

**अध्याय ८६ वा**—श्रीकृष्णार्जुनभाषण ३८.

**अध्याय ८७ वा**—कर्णार्जुनांची भेट ३९; कर्णार्जुनयुद्धवर्णन ४०; युद्ध पाहण्याकरितां शंकर, ब्रह्मदेव यांचें आगमन ४२; अर्जुनाचा जय होईल म्हणून शंकराचें इंद्रास आश्वासन ४२; देव-गंधर्वादिकांस झालेला आनंद व पुनः युद्धारंभ ४३; कर्णवधसंबंधीं अर्जुनप्रतिज्ञा ४४.

**अध्याय ८८ वा**—कर्णार्जुन यांचें भयंकर युद्ध ४५; दुर्योधनास अश्वत्थाम्याचा उपदेश ४६.

**अध्याय ८९ वा**—कर्णार्जुनांचें द्वैरथयुद्धवर्णन ४८; अर्जुनाकडून आग्नेयास्त्राची योजना व कर्णाकडून वारुणास्त्रानें त्याचा संहार ४९; अर्जुनाकडून वज्रास्त्र व कर्णाकडून त्याचा भार्गवास्त्रानें प्रतिकार ५०; भीम व कृष्ण यांकडून अर्जुनाला प्रोत्साहन ५०; कृष्णाचें भाषण श्रवण करून अर्जुनाचा कर्णवधनिश्चय ५१; युद्धवर्णन ५२.

**अध्याय ९० वा**—कर्णार्जुनयुद्ध ५५; कर्णाच्या अस्त्राघातानें अर्जुनकिरीटाचें पतन ५७; नागाचें कर्णाला सोडून गमन व नागराजाचा अर्जुनाकडून वध ५८; कर्णाची मूर्च्छा ६०; कर्णवध करण्याविषयीं अर्जुनाला कृष्णाची प्रेरणा ६०; रथचक्र वर काढीपर्यंत आपल्यावर बाण सोडूं नकोस म्हणून अर्जुनाला कर्णप्रार्थना ६३.

**अध्याय ९१ वा**—मागील आठवण देऊन कर्णाला ‘ तेव्हां तुझा धर्म कोठें होता ’ म्हणून कृष्ण विचारितो ६३; कर्णार्जुनांचें युद्ध व अर्जुनाची मूर्च्छा ६५; कर्णवध ६६; कौरवांनीं केलेला हाहाकार ६७.

**अध्याय ९२ वा**—शल्यप्रत्याभिगमन ६८; शल्य दुर्योधनाला कर्णवध झाल्याचें सांगतो ६९.

**अध्याय ९३ वा**—धृतराष्ट्रप्रश्न ७०; संजयानें केलेलें कौरवांच्या दुर्दशेचें वर्णन ७०; दुर्योधनाचा कौरवसैनिकांस धारातीर्थी मरून जाणेंच श्रेयस्कर असा उपदेश ७२.

**अध्याय ९४ वा**—शल्यानें केलेलें रणभूमिवर्णन ७३; कर्णवधाची वार्ता ऐकून दुर्योधनाची मूर्च्छा ७५; कर्णस्वरूपवर्णन ७५; देव-गंधर्वांनीं केलेलें कृष्णार्जुनांचें स्तवन ७७.

**अध्याय ९५ वा**—शिबिरप्रयाण ७७.

**अध्याय ९६ वा**—कृष्णार्जुन युधिष्ठिराकडे जाऊन कर्णवधवृत्तानें त्याला हर्षवितात ७८; धर्मराजाचें रणभूमिदर्शनाकरितां गमन व कृष्णप्रशंसा ८०; धृतराष्ट्राचा शोक ८१; कर्णवधकथाश्रवणमाहात्म्य ८१.

# ९. शल्यपर्व.

—:०:—

## शल्याभिषेकपर्व १. पृ. ८५–१७५.

**अध्याय १ ला**—जनमेजयाचा युद्धविषयक प्रश्न ८५; त्याला वैशंपायनाचें उत्तर—शल्याला सैनापत्याचा अभिषेक करून दुर्योधनाचें युद्धार्थ गमन ८६; संजयाच्या तोंडून दुर्योधनवध ऐकून धृतराष्ट्राची मूर्च्छा व त्याचें संजयाकडून शांतवन ८६.

**अध्याय २ रा**—धृतराष्ट्रविलाप ८८; धृतराष्ट्राचा संजयाला युद्धविषयक प्रश्न ९१.

**अध्याय ३ रा**—कौरवसैन्यपलायन ९२; आपल्या सैन्यास प्रोत्साहनपूर्वक पुनः दुर्योधनाचा युद्धोद्योग ९३; दुर्योधनाचें पांडवांस युद्धार्थ आव्हान ९४.

**अध्याय ४ था**—पांडवांशीं सख्य करणेंच श्रेयस्कर होय, असें कृपाचार्यांचें भाषण ९६.

**अध्याय ५ वा**—दुर्योधनाकडून कृपाचार्यांच्या उपदेशाचा अनंगीकार ९९.

**अध्याय ६ वा**—सेनापति निवडण्याविषयीं दुर्योधनाला सर्व वीरांचा आग्रह १०३; शल्याला सेनापति करण्याविषयीं अश्वत्थाम्याची सूचना १०३; शल्याकडून सैनापत्यस्वीकार १०४, दुर्योधनाकडून शल्याचें अभिनंदन १०५.

**अध्याय ७ वा**—शल्याला सैनापत्याधिकार १०५; मद्रकांनीं केलेला शल्याचा जयजयकार १०५; कृष्णाचें युधिष्ठिराला प्रोत्साहन १०६.

**अध्याय ८ वा**—व्यूहरचना करून उभय सैन्यांचें युद्धार्थ निर्गमन १०८.

**अध्याय ९ वा**—अष्टादश दिवसयुद्धारंभ ११०; संकुलयुद्ध १११; भीमार्जुनांचा पराक्रम ११२.

**अध्याय १० वा**—संकुलयुद्ध ११३; कर्णपुत्र चित्रसेनाचा नकुलहस्तें वध ११४; सुषेण व सत्यसेन यांशीं नकुलाचें युद्ध व त्यांत त्यांचा वध ११४; शल्य व पांडव यांचें युद्ध ११६.

**अध्याय ११ वा**—शल्य व धर्म यांचें युद्ध ११६; शल्य-भीमसेनांचें गदायुद्ध ११९.

**अध्याय १२ वा**—भीम व शल्य यांचें युद्ध १२०; चेकितानाचा वध १२१; शल्य-युधिष्ठिरयुद्ध १२३.

**अध्याय १३ वा**—शल्यपराक्रमवर्णन १२३.

**अध्याय १४ वा**—अर्जुन व अश्वत्थामा यांचें युद्ध १२६; अर्जुनपराक्रम १२७; अश्वत्थाम्याच्या हातून सुरथवध १२८.

**अध्याय १५ वा**—संकुलयुद्ध १२९.

**अध्याय १६ वा**—संकुलयुद्ध १३१; शल्य-युधिष्ठिरयुद्ध १३१; शल्यपराभव १३४.

**अध्याय १७ वा**—शल्यवध १३५.

**अध्याय १८ वा**—संकुलयुद्ध १४१.

**अध्याय १९ वा**—संकुलयुद्ध १४३; शल्यवधानंतर पांचाल आणि पांडव यांचें भाषण १४४; दुर्योधनाचें पांडवांशीं युद्ध १४५; दुर्योधनाचें कौरवांस प्रोत्साहनपर भाषण १४६; पुनः युद्धारंभ १४७.

**अध्याय २० वा**—म्लेंच्छाधिपति शाल्वाशीं युद्ध १४७; शाल्वगजपराक्रम १४८; सात्यकीच्या हस्तें शाल्ववध १४९.

**अध्याय २१ वा**—सात्यकि-कृतवर्मा यांचें युद्ध १४९; कृतवर्म्याचा पराजय १५०.

**अध्याय २२ वा**—दुर्योधनपराक्रम १५१; दुर्योधनसंकुलयुद्ध १५२.

**अध्याय २३ वा**—संकुलयुद्ध १५४; शकुनि—सहदेवांचें भयंकर युद्ध १५६; शकुनि व धृष्टद्युम्न यांचें युद्ध १५७.

**अध्याय २४ वा**—संकुलयुद्ध १५९; अर्जुनपराक्रम १५९.

**अध्याय २५ वा**—कौरवसैन्याची दुर्धर अवस्था १६३; धृष्टद्युम्नानें पराजित दुर्योधनाचें पलायन व अश्वत्थामादि कौरववीरांनीं चालविलेला त्याचा शोध १६५.

**अध्याय २६ वा**—भीमाकडून दुर्योधनाच्या अकरा बंधूंचा वध १६६.

**अध्याय २७ वा**—कृष्णार्जुनांचें संभाषण १६९; संकुलयुद्ध १७०; भीमाकडून सुदर्शन व सुशर्मा नांवांच्या दुर्योधनाच्या कनिष्ठ बंधूंचा वध १७१.

**अध्याय २८ वा**—युद्धभूमिवर्णन १७२; शकुनीचा वध १७४.

---

## ऱ्हदप्रवेशपर्व २. पृ. १७६–१८२.

**अध्याय २९ वा**—शकुनिसैन्याचा पांडवांनीं केलेला संहार १७६; दुःखग्रस्त दुर्योधनानें पळून जाण्याचा केलेला निर्धार १७६; धृष्टद्युम्नाच्या

हातून संजयाची सुटका १७८; संजय हस्तिनापुराला निघाला असतां वाटेंत दुर्योधनाशीं भेट १७८; दुर्योधन आपला ऱ्हदप्रवेश धृतराष्ट्राला कळवितो १७९; कृप, अश्वत्थामा व कृतवर्मा यांना दुर्योधनाचा शोध १७९; वृद्ध लोक व संजय राजस्त्रियांस नगराकडे घेऊन जातात १७९; राजवाड्यांत सर्वत्र हाहाकार १८१.

---

## गदापर्व ३. पृ. १८२–२८७.

**अध्याय ३० वा**—धृतराष्ट्रप्रश्न १८२; कृपाचार्य, कृतवर्मा व अश्वत्थामा हे दुर्योधनाला युद्धाला प्रवृत्त करितात १८२; कांहीं व्याधांनीं त्याचें भाषण ऐकून ते दुर्योधनाला ओळखतात व धर्मराजाला कळवितात १८३; धर्मराज कृष्णादिकांना घेऊन डोहाकडे जातो १८४.

**अध्याय ३१ वा**—दुर्योधन-युधिष्ठिरसंवाद १८६.

**अध्याय ३२ वा**—युधिष्ठिराच्या कटु भाषणानें संतप्त दुर्योधन गदा घेऊन ऱ्हदाबाहेर येतो १९०; युधिष्ठिर व दुर्योधन यांचें भाषण १९२.

**अध्याय ३३ वा**—'आमच्यांशीं वाटेल त्याशीं युद्ध कर' या बोलण्याबद्दल कृष्ण युधिष्ठिराला दोष देतो १९४; भीम गदा उचलून युद्धाला सज्ज होतो १९६; भीम-दुर्योधनांचीं वीरत्वदर्शक भाषणें १९६.

**अध्याय ३४ वा**—बलभद्राचें आगमन १९८; बलरामाची आपल्या शिष्यांचें गदायुद्धनैपुण्य पाहण्याची उत्सुकता १९८.

**अध्याय ३५ वा**—जनमेजयाचा बलरामाच्या तीर्थयात्रेसंबंधीं वैशंपायनाला प्रश्न १९९; प्रभासोत्पत्तिकथन २०१.

**अध्याय ३६ वा**—त्रिताख्यान २०४.

**अध्याय ३७ वा**—सरस्वतीतीरावरील त्या त्या तीर्थांचा महिमा आणि गुण यांचें वर्णन २०७.

**अध्याय ३८ वा**—सरस्वतीनदीचे सात विभाग होऊन त्यांचीं पडलेलीं सात नांवें २१०; मंकणकमुनिचरित २११.

**अध्याय ३९ वा**—बलरामाचें औशसनतीर्थावर आगमन २१३; औशसन-तीर्थास कपालमोचन नांव कसें मिळालें २१३; उषंगूच्या आश्रमास बळरामाचें गमन २१४.

**अध्याय ४० वा**—आर्ष्टिषेणाला तपश्चर्येच्या योगानें सर्ववेदविद्याप्राप्ति २१५; विश्वामित्राला तपश्चर्येच्या योगानें ब्राह्मण्यप्राप्ति २१५; बलभद्राचें स्नानादिपूर्वक पृथूदरतीर्थाहून बकाश्रमाला गमन २१७.

**अध्याय ४१ वा**—बकमुनिचरित्रकथन २१७; बलभद्राचें यायात तीर्थावर गमन २१८; वसिष्ठापवाहतीर्थगमन २१९.

**अध्याय ४२ वा**—त्या तीर्थास वसिष्ठापवाह नांव पडण्याचें कारण २१९.

**अध्याय ४३ वा**—विश्वामित्राच्या शापानें रक्तवाही सरस्वतीच्या परित्राणार्थ ऋषींचे प्रयत्न २२१; इंद्रानें सरस्वती व अरुणा यांच्या संगमावर यजनादि कृत्यांनीं केलेला ब्रह्महत्यापरिहार २२३; बलरामाचें तेथून सोमतीर्थाला गमन २२४.

**अध्याय ४४ वा**—कुमारोत्पत्तिवर्णन २२४; कार्तिकेयाला देवसैनापत्याधिकार २२५.

**अध्याय ४५ वा**—कुमाराभिषेकवर्णन २२७.

**अध्याय ४६ वा**—तारकासुराचा वध २३०; सरस्वतीतीर्थमाहात्म्य २३४.

**अध्याय ४७ वा**—देवांनीं जलपति म्हणून वरुणाला केलेला अभिषेक २३५; बलभद्राचें तीर्थयात्रागमन व त्या त्या तीर्थाचें माहात्म्यवर्णन २३५.

**अध्याय ४८ वा**—बलभद्राचें बदरपाचनतीर्थाला गमन २३६; श्रुतावती व अरुंधती यांच्या महिम्याचें वर्णन २३७.

**अध्याय ४९ वा**—बलरामाचें इंद्रतीर्थादिकांवर गमन २४०; त्या त्या तीर्थाचें माहात्म्यवर्णन २४०.

**अध्याय ५० वा**—देवल-जैगीषव्यचरित्रकथन २४१; बलभद्राचें आदित्य-तीर्था-वरून सोमतीर्थावर गमन २४५.

**अध्याय ५१ वा**—दधीचि-सारस्वतांचें चरित्र २४५.

**अध्याय ५२ वा**—वृद्धकन्याचरित्रकथन २४८.

**अध्याय ५३ वा**—कुरुक्षेत्रमाहात्म्यवर्णन २४९.

**अध्याय ५४ वा**—मित्रावरुणाश्रमांत भीम-दुर्योधनांमध्यें गदायुद्ध चाललयाचें नारदमुखें ऐकून तें पाहण्याला बलरामाचें कुरुक्षेत्राला गमन २५१.

**अध्याय ५५ वा**—गदायुद्धार्थ सिद्ध झालेल्या भीम-दुर्योधनांचें वर्णन २५४.

**अध्याय ५६ वा**—भीम-दुर्योधनांचें गदायुद्ध २५६.

**अध्याय ५७ वा**—भीम-दुर्योधनांचें गदायुद्ध २५९.

**अध्याय ५८ वा**—दुर्योधनाचें ऊरुभेदन २६२.

**अध्याय ५९ वा**—भीमाकडून डाव्या पायानें दुर्योधनाचें शिरस्ताडन २६६; युधिष्ठिराचा विलाप २६६.

**अध्याय ६० वा**—भीमसेनानें अधर्मानें दुर्योधनाला मारिलें हें पाहून बलराम क्रोधसंतप्त होतो २६८; कृष्णाकडून त्याचें सांत्वन २६८; बलराम द्वारकेला जातो २७०; श्रीकृष्ण धर्माला दोष देतो २७०; श्रीकृष्णाचें भीमाच्या कृतीला मोठ्या संकटाचें अनुमोदन २७०.

**अध्याय ६१ वा**—धृतराष्ट्रप्रश्न २७१; संजयकृत युद्धवर्णन २७१; पांडव, कृष्ण आणि दुर्योधन यांचा संवाद २७२.

**अध्याय ६२ वा**—पार्थरथज्वलन २७५; कृष्णाकडून निःशत्रु झालेल्या युधिष्ठिराचें अभिनंदन २७६; युधिष्ठिर गांधारीच्या सांत्वनार्थ श्रीकृष्णाला पाठवितो २७७.

**अध्याय ६३ वा**—धृतराष्ट्र आणि गांधारी यांचें सांत्वन २७८.

**अध्याय ६४ वा**—दुर्योधनविलाप २८२; गदायुद्धांतून परतलेल्या लोकांनीं द्रोणपुत्रास केलेलें सर्व गोष्टींचें निवेदन २८५.

**अध्याय ६५ वा**—अश्वत्थाम्यास सैनापत्याभिषेक २८५.

---

## १०. सौप्तिकपर्व.

—:०:—

### सौप्तिकपर्व १. पृष्ठें २९१–३२४.

**अध्याय १ ला**—संजय-धृतराष्ट्रांचा संलाप २९१; अश्वत्थामा, कृपाचार्य आणि कृतवर्मा यांची वनमध्यभागीं एका न्यग्रोधवृक्षाखालीं बैठक २९२; कावळ्यांचा उलूकानें केलेला वध पाहून आपणहि तसाच पांडवांचा करावा, असा अश्वत्थाम्यानें केलेला निश्चय २९३; अश्वत्थाम्याकडून कृपाचार्य व कृतवर्मा यांस स्वकर्तव्यकथन २९४.

**अध्याय २ रा**—कृपाचार्यांचा अश्वत्थाम्यास कर्तव्योपदेश २९५.

**अध्याय ३ रा**—कृपाचार्यांच्या वचनाचा अनादर करून कृप आणि कृतवर्मा यांपुढें झोंपीं गेलेल्या पांडवांचा आणि पांचालांचा वध करण्याची अश्वत्थाम्याची प्रतिज्ञा २९८.

**अध्याय ४ था**—अश्वत्थामा व कृतवर्मा यांचा संवाद ३००.

**अध्याय ५ वा**—कृपाचार्य व अश्वत्थामा यांचा संवाद ३०२; अश्वत्थाम्याचें शत्रूच्या शिबिरद्वारीं आगमन ३०४; सौहार्दामुळें कृप व कृतवर्मा अश्वत्थाम्याच्या मागून जातात ३०४.

**अध्याय ६ वा**—अश्वत्थाम्यास शिबिरद्वारीं महद्भूतदर्शन ३०५; अश्वत्थाम्यानें टाकलेल्या शस्त्रास्त्रांचें त्याकडून ग्रसन ३०५; पश्चात्तापानें अश्वत्थाम्यानें केलेली महादेवोपासना ३०६.

**अध्याय ७ वा**—अश्वत्थाम्याचें शिवस्तवन ३०७; अश्वत्थाम्यापुढें कांचनवेदीमध्यें अग्नीचा उद्भव ३०८; अश्वत्थाम्यास शिवदर्शन व खड्गप्राप्ति ३११.

**अध्याय ८ वा**—शिबिरद्वारीं कृप-कृतवर्मा यांस ठेवून अश्वत्थामा धृष्टद्युम्नादि पांचाल आणि द्रौपदेय यांचा नाश करितो ३१२; भयानें बाहेर पडलेल्यांचा कृप-कृतवर्मा यांच्या हातीं वध ३१८.

**अध्याय ९ वा**—द्रौणि-कृप-कृतवर्म्यांकडून दुर्योधनाचें सांत्वन ३२१; दुर्योधनाला अश्वत्थाम्याकडून सुप्तजनवधकथन ३२३; दुर्योधनाचा प्राणत्याग ३२४; अश्वत्थाम्यादिकांचें नगरगमन ३२४; संजयाला व्यासानुग्रहानें प्राप्त झालेल्या दिव्यदृष्टीचा नाश ३२४.

---

## ऐषीकपर्व २. पृष्ठें ३२५–३४१.

**अध्याय १० वा**—धृष्टद्युम्नाच्या सारथ्याकडून युधिष्ठिराला शिबिरवृत्तांतकथन ३२५; युधिष्ठिराचा शोक ३२५.

**अध्याय ११ वा**—नकुलाचें द्रौपदीसह युधिष्ठिराकडे आगमन ३२७; भीमाचें अश्वत्थाम्याच्या मस्तकावरील मणिहरणार्थ गमन ३२९.

**अध्याय १२ वा**—अश्वत्थाम्याचा अविचार ३२९; भीम निघून गेला असतां श्रीकृष्ण धर्मराजाला भीमाचें रक्षण करण्याला सांगतो ३३१.

**अध्याय १३ वा**—भागीरथीतीरावर व्याससंनिध बसलेल्या अश्वत्थाम्याचें कृष्णादिकांस दर्शन ३३१; अश्वत्थाम्याकडून अस्त्रप्रयोग ३३२.

**अध्याय १४ वा**—कृष्णाज्ञेनें अर्जुनानें अश्वत्थाम्यावर केलेला अस्त्रप्रयोग ३३३.

**अध्याय १५ वा**—अर्जुनकृत अस्त्रोपसंहार ३३४.

**अध्याय १६ वा**—कृष्णानें अश्वत्थाम्याला दिलेला शाप ३३६; भीमसेनानें द्रौपदीला मणि देऊन तिचें केलेलें सांत्वन ३३७; युधिष्ठिरानें द्रौपदीच्या वचनावरून मस्तकीं केलेलें मणिधारण ३३७.

**अध्याय १७ वा**—युधिष्ठिराला कृष्णाकडून रुद्रमाहात्म्यकथन ३३८.

**अध्याय १८ वा**—कृष्णकथित शिवमाहात्म्य ३४०.

---

## ११. स्त्रीपर्व.

—:०:—

### जलप्रदानिकपर्व १. पृष्ठें ३४५–३७२.

**अध्याय १ ला**—धृतराष्ट्राचा शोक ३४५; संजयकृत धृतराष्ट्रसांत्वन ३४६.

**अध्याय २ वा**—विदुराकडून धृतराष्ट्राचें सांत्वन ३४८; युद्धाशिवाय क्षत्रियांस दुसरा स्वर्गदायक मार्ग नाहीं ३४९.

**अध्याय ३ रा**—विदुराकडून शास्त्रार्थकथनानें धृतराष्ट्र शोकहरण ३५०.

**अध्याय ४ था**—विदुराकडून धृतराष्ट्राला गर्भवासप्रकारकथन ३५२.

**अध्याय ५ वा**—संसाराचें रूपक ३५३.

**अध्याय ६ वा**—संसाररूपकाचें प्रतिपादन ३५४.

**अध्याय ७ वा**—विदुराकडून धृतराष्ट्राला तत्त्वकथन ३५५.

**अध्याय ८ वा**—द्वैपायनव्यासाकडून धृतराष्ट्रशोकापहरण ३५७.

**अध्याय ९ वा**—विदुराचें धृतराष्ट्राला सांत्वनपर भाषण ३६०.

**अध्याय १० वा**—धृतराष्ट्रनिर्गमन ३६२; गांधारीप्रभृति स्त्रियांचा विलाप ३६२.

**अध्याय ११ वा**—रणांगणाकडे धृतराष्ट्र निघाला असतां मार्गांत कृप-कृतवर्म-द्रौणींशीं भेट ३६३; धृतराष्ट्राचें सांत्वन करून त्या तिघांचें आपल्या ठिकाणीं गमन ३६३.

**अध्याय १२ वा**—युधिष्ठिराचें धृतराष्ट्राकडे आगमन ३६५; लोहभीमाचा भंग ३६५.

**अध्याय १३ वा**—धृतराष्ट्रकोपविमोचन ३६६.

**अध्याय १४ वा**—युधिष्ठिरादिकांचें गांधारीकडे गमन ३६८; व्यासकृत गांधारीसांत्वन ३६८.

**अध्याय १५ वा**—भीमगांधारीसंवाद ३६९; पांडवांची कुंतीला भेट ३७१; गांधारीचें कोपशमन ३७२.

## स्त्रीविलासपर्व २. पृ. ३७२–३९८.

**अध्याय १६ वा**—व्यासप्रसादामुळें गांधारीला दिव्यदृष्टि प्राप्त होऊन रणभूमिदर्शन ३७२; धृतराष्ट्र-युधिष्ठिरांचा स्त्रियांसह रणभूमिप्रवेश ३७३; स्त्रियांचा विलाप ३७५; गांधारी आपल्या विलाप करणाऱ्या स्नुषा कृष्णाला दाखविते ३७६.

**अध्याय १७ वा**—गांधारीचा दुर्योधनासंबंधीं विलाप ३७६; भानुमतीविषयीं गांधारीचा शोक ३७८.

**अध्याय १८ वा**—गांधारीचा स्नुषाविषयक शोक ३७८; दुःशासन-शकुनि-प्रभृतींविषयीं विलाप ३७९.

**अध्याय १९ वा**—विकर्ण, दुर्मुख इत्यादिकांबद्दल गांधारीचा शोक ३८०.

**अध्याय २० वा**—गांधारी, उत्तरा व इतर स्त्रियांचा विलाप ३८१.

**अध्याय २१ वा**—गांधारीचा कर्णविषयक शोक ३८४.

**अध्याय २२ वा**—गांधारीचा अवंतिनाथ, बाल्हीक आणि जयद्रथ यांबद्दल शोक ३८५.

**अध्याय २३ वा**—गांधारीचा शल्य-भगदत्तविषयक शोक ३८६; गांधारीचें कृष्णाजवळ भीष्म-द्रोणांचें गुणकथन ३८६.

**अध्याय २४ वा**—गांधारीचा भूरिश्रव्याविषयीं शोक ३८८; शकुनीविषयीं गांधारीचे निंदोद्गार ३९०.

**अध्याय २५ वा**—गांधारीचा कांबोजादिकांबद्दल विलाप ३९०; तिचा श्रीकृष्णाला शाप ३९३.

## श्राद्धपर्व ३. पृ. ३९४–३९८.

**अध्याय २६ वा**—जमिनीवर पडलेल्या गांधारीचें कृष्णाकडून आश्वासन ३९४; युधिष्ठिराज्ञेनें विदुर-संजयांकडून मृतांचें दहनक्रियाकरण ३९५.

**अध्याय २७ वा**—गंगातीरावर मृतांना उदकदान ३९६; कुंती कर्ण हा आपला पुत्र असल्यामुळें त्याला युधिष्ठिराकडून जलांजलि देवविते ३९७; धृतराष्ट्र-युधिष्ठिरांकडून बांधवांना जलदान ३९८.

---

# १२. शांतिपर्व.

—:०:—

## राजधर्मपर्व १. पृ. ४०१–४८०.

**अध्याय १ ला**—नारदकृत युधिष्ठिरसांत्वन ४०१; युधिष्ठिराचा कर्णविषयक विलाप ४०२; कर्णाला शाप होऊन त्याचें रथचक्र पृथ्वीनें कां गिळिलें, असा युधिष्ठिराचा नारदाला प्रश्न ४०४.

**अध्याय २ रा**—ब्रह्मास्त्रप्राप्त्यर्थ कर्ण द्रोणाकडे जातो ४०४; कर्ण-शाप-वृत्तांत ४०५.

**अध्याय ३ रा**—कर्णाला ब्रह्मास्त्राची प्राप्ति ४०६; अलर्कनामक कीटकाकडून कर्णाच्या ऊरूला दंश ४०६; परशुरामाचा कर्णाला शाप ४०८.

**अध्याय ४ था**—स्वयंवरार्थ दुर्योधन कलिंग देशाला कर्णासह जातो ४०८; दुर्योधनकृत कन्याहरण ४०९.

**अध्याय ५ वा**—कर्णपराक्रम ४१०; जरासंधाकडून कर्णाला मालिनी नगरीचें अर्पण ४१०; कर्णवध होण्याचीं कारणें ४१०.

**अध्याय ६ वा**—युधिष्ठिराचा शोक ४११; युधिष्ठिराचा स्त्रीशाप ४११.

**अध्याय ७ वा**—युधिष्ठिराचा शोक व पश्चात्ताप ४१२; दुर्योधन-धृतराष्ट्रादिकांच्या दुष्कृत्यांचें स्मरण ४१३; समस्त परिवाराचा त्याग करून वनवासाला जाण्याची युधिष्ठिराची इच्छा ४१४.

**अध्याय ८ वा**—अर्जुनाचें भाषण ४१५; धनाची महती ४१५.

**अध्याय ९ वा**—धर्मराजाचें निवृत्तिपर भाषण ४१७.

**अध्याय १० वा**—भीमानें केलेला धर्माचा उपहास ४२०; संन्यास आचरिल्यानें धर्मव्यतिक्रम होतो ४२१.

**अध्याय ११ वा**—इंद्र आणि ऋषि यांच्या संवादरूप अर्जुनाचें भाषण ४२२.

**अध्याय १२ वा**—नकुलानें धर्माला वर्णन करून सांगितलेलें गृहस्थाश्रम-माहात्म्य ४२५; तिन्ही आश्रम एकीकडे व गृहस्थाश्रम एकीकडे ४२५.

**अध्याय १३ वा**—सहदेवाचें भाषण ४२७.

**अध्याय १४ वा**—द्रौपदीचें सामोपचाराचें भाषण ४२८; द्रौपदी युधिष्ठिराला त्याच्या पूर्वीच्या भाषणाची आठवण देते ४२९; द्रौपदीचें राज्याचा उपभोग घेणें हाच क्षत्रियाचा धर्म असें प्रतिपादन ४२९.

**अध्याय १५ वा**—शासनदंड हाच धर्मार्थकामांचें संरक्षण करणारा आहे, असें अर्जुनाचें भाषण ४३१; हिंसेशिवाय कोणाचीहि उपजीविका चालत नाहीं ४३२; उत्कृष्ट चालविलेला दंड प्रजेचें रक्षण करितो ४३३; दंड निर्माण करण्याचें कारण ४३३.

**अध्याय १६ वा**—भीमसेनाचें भाषण ४३५.

**अध्याय १७ वा**—युधिष्ठिर संभाषण—आशात्याग हेंच मुक्तीचें कारण होय ४३७.

**अध्याय १८ वा**—जनक राजा व त्याची पत्नी यांचा संवाद ४३९.

**अध्याय १९ वा**—युधिष्ठिराचें भाषण—त्यागानेंच सुख मिळतें ४४२.

**अध्याय २० वा**—देवस्थान ऋषीचा युधिष्ठिराला उपदेश—सर्व द्रव्याचा यज्ञाकडे उपयोग करावा ४४४.

**अध्याय २१ वा**—देवस्थानाकडून इंद्राच्या प्रश्नाला बृहस्पतीनें दिलेल्या उत्तराचा उल्लेख ४४६.

**अध्याय २२ वा**—दैवगति अलंघनीय, असें अर्जुनाचें भाषण ४४७.

**अध्याय २३ वा**—व्यासकृत गृहस्थाश्रमाची प्रशंसा ४४८; शंखलिखित-वृत्तांत.

**अध्याय २४ वा**—राजधर्मोपदेश ४५१; हयग्रीवकथा ४५३.

**अध्याय २५ वा**—व्यास-युधिष्ठिरसंवाद ४५४.

**अध्याय २६ वा**—युधिष्ठिरार्जुनसंवाद ४५७.

**अध्याय २७ वा**—व्यास-युधिष्ठिरसंवाद ४५९.

**अध्याय २८ वा**—अश्म-जनकसंवाद ४६४.

**अध्याय २९ वा**—षोडशराजोपाख्यान ४६६.

**अध्याय ३० वा**—नारद-पर्वतोपाख्यान ४७५.

**अध्याय ३१ वा**—सुवर्णष्ठीवीचा वृत्तांत ४७७.

---

*

# श्रीमन्महाभारतार्थ

## ( महाभारताचें मराठी सुबोध भाषांतर. )



### नवम खंड.



## ८ कर्णपर्व—( पुढें चालू )



### कर्णवधपर्व ८.



### अध्याय ७५ वा.

[ १ धृतराष्ट्राचा संजयाला प्रश्न. २ संजयकृत संकुलद्वंद्वयुद्धवर्णन. ]

( १ ) धृतराष्ट्र—संजया, याप्रमाणें पांडवांशीं व सृंजयांशीं माझ्या पुत्रांची त्या भयंकर रणांत गांठ पडून त्यांचें दारुण व अगाध युद्ध चाललें असतां, अर्जुन युद्धभूमीवर आला; तो आल्यावर कर्णाचें व त्याचें कशा प्रकारचें युद्ध झालें ? त्या युद्धाचें सविस्तर वर्णन कर !

( २ ) संजय—राजा धृतराष्ट्रा, मोठमोठ्या ध्वजांनीं शोभिवंत झालेलीं तीं प्रचंड सैन्यें जेव्हां एकमेकांशीं भिडून युद्ध करूं लागलीं, तेव्हां तीं ग्रीष्मकालाच्या अंतीं मेघसमुदाय ज्याप्रमाणें भयंकर गर्जना करतात, त्याप्रमाणें दुंदुभिध्वनींनीं भयंकर गर्जना करूं लागलीं. त्यावेळीं त्या दोन्ही सैन्यांतील प्रचंड गज हे जणुंकाय मेघजाल, शस्त्रास्त्रें ह्या जलधारा, वाद्यें, रथध्वनि व करटाळ्या हे मेघनाद, सुवर्णभूषित आयुधें ही वीज आणि शर, खड्ग व नाराच बाण ह्या जणुंकाय पर्जन्यधाराच असें वाटत होतें ! राजा, त्या सैन्यांनीं समरभूमीवर

खड्गादिकांनीं क्षत्रियांचा संहार चालविल्यामुळें रणांगणांत रक्ताचे प्रवाह मोठ्या वेगानें वाहत होते! अकालीं अनिष्ट व भयंकर पर्जन्यवृष्टि होऊन जसा प्राण्यांचा नाश होतो, त्याप्रमाणें त्यासमयीं उभय सैन्यांत वीरांचा मोठा क्षय झाला! कोठें अनेक रथी एकत्र होऊन एका रथ्याला चोहोंकडून वेढीत व त्याचा वध करीत, तर कोठें एकटा रथी एकाच रथ्याशीं युद्ध करून त्याला यमलोकीं पाठवी! कोठें एकटा रथी अनेक बलसंपन्न रथ्यांना मृत्युमुखांत ढकलीत असे, तर कोठें एकच रथी दुसऱ्या रथ्यावर चाल करून त्याचा, त्याच्या सारथ्याचा व अश्वांचा संहार करी! कोठें एकटा गजयोद्धा अनेक रथ्यांना व अश्वसादींना यमसदनीं पाठवीत असे! अशा विविध प्रकारांनीं तो घनघोर संग्राम चालला असतां अर्जुन तेथें आला आणि कौरवांवर एकसारखा बाणांचा वर्षाव करून अश्व, गज, सारथि, अश्वसादी, रथी व पदाती इत्यादि सर्व शत्रूंचा त्यानें संहार आरंभिला! त्या घनघोर संग्रामांत कृप व शिखंडी एकमेकांशीं युद्ध करूं लागले; सात्यकी दुर्योधनाशीं, श्रुतश्रवा अश्वत्थाम्याशीं व युधामन्यु चित्रसेनाशीं भिडला; महारथी सृंजयवीर उत्तमौजा हा कर्णपुत्र सुषेणावर चाल करून गेला व क्षुधार्त सिंहानें ज्याप्रमाणें मोठ्या वृषभावर चालून जावें, त्याप्रमाणें सहदेवानें गांधारराज शकुनीवर चाल केली! नकुलपुत्र शतानीक व कर्णपुत्र वृषसेन हे दोघे तरुण एकमेकांवर बाणांचा वर्षाव करूं लागले! विचित्र युद्ध करणारा रथश्रेष्ठ माद्रीपुत्र नकुल ह्यानें कृतवर्म्याला गांठलें! पांचालांचा अधिप सेनापति धृष्टद्युम्न यानें कर्ण व त्याचें सैन्य यांशीं युद्ध सुरू केलें!

धृतराष्ट्रा, इकडे संशप्तकांच्या समृद्ध भारतीय सैन्यासहवर्तमान दुःशासनानें त्या युद्धांत अतिवेगवान् व शस्त्रधरांमध्यें श्रेष्ठ अशा प्रतापवान् दुर्धर भीमसेनावर चाल केली! वीर उत्तमौजानें त्याप्रसंगीं मोठ्या आवेशानें कर्णाच्या पुत्राचा वध केला; तेव्हां त्याचें मस्तक भूतलावर पडलें आणि पृथ्वी व अंतरिक्ष यांत मोठा ध्वनि उत्पन्न झाला! सुषेणाचें मस्तक पृथ्वीवर पडलेलें पाहून कर्णाला अत्यंत दुःख झालें व क्रोधाविष्ट होऊन त्यानें आपल्या तीक्ष्ण बाणांनीं उत्तमौजाचा रथ, अश्व आणि ध्वज यांचा नाश केला! नंतर उत्तमौजानें तीक्ष्ण बाण सोडून कृपाचार्यांवर चाल केली व आपल्या तेजस्वी खड्गानें त्याच्या पृष्ठरक्षकांचा वध करून लागलाच तो शिखंडीच्या रथावर चढला! कृपाला विरथ झालेला पाहून शिखंडीला त्याच्यावर बाणांचा प्रहार करण्याची इच्छा झाली नाहीं! इतक्यांत अश्वत्थाम्यानें कृपाचार्यांच्या रथाजवळ

येऊन, चिखलांत रुतलेल्या गाईला वर काढावें, त्याप्रमाणें त्या कृपाचार्याला त्या संकटांतून सोडविलें! राजा धृतराष्ट्रा, इकडे सुवर्णकवच धारण करणाऱ्या वायुपुत्र भीमसेनानें तीक्ष्ण बाण सोडून कौरवांच्या सैन्याची अतिशय दाणादाण केली व ग्रीष्मकालच्या माध्यान्हसूर्याप्रमाणें पराक्रम करून त्या सैन्याला अगदीं त्रस्त केलें! ८. ७५.

## अध्याय ७६ वा.

[ १ भीम–विशोकसंवाद. ]

( १ ) **संजय**—राजा धृतराष्ट्रा, नंतर त्या तुमुल रणसंग्रामांत कौरवसेनेंतील अनेक वीरांनीं भीमसेनेला वेढून टाकलें! तेव्हां तो आपल्या सारथ्याला म्हणाला, 'सूता, ज्या ठिकाणीं धृतराष्ट्रपुत्रांची सेना असेल, तिकडे माझा रथ वेगानें घेऊन चल! म्हणजे त्या सर्व धृतराष्ट्रपुत्रांना मी यमलोकीं पाठवून देतों!' त्याप्रमाणें भीमाची आज्ञा होतांच त्या सारथ्यानें तो रथ तुझ्या पुत्रांच्या सेनेसमीप नेला. तें पाहून कौरववीरांनीं गज, रथ, अश्व व पदाति यांसहवर्तमान भीमावर चोहों बाजूंनीं निकरानें चाल करून त्याच्या महावेगवान् श्रेष्ठ रथावर असंख्य बाणांचा वर्षाव सुरू केला! तेव्हां त्या महात्म्या भीमसेनानें उलट सुवर्णपुंख बाण सोडून आपल्यावर येणारे बाण छेदिले! भीमसेनाच्या त्या बाणांनीं कौरवबाणांचे तुकडे तुकडे होऊन ते सर्व बाण भूमितलावर पडले! नंतर हे राजेंद्रा, भीमानें रथ, गज, अश्व व पदाति यांचा संहार सुरू करतांच वज्रप्रहारानें जणुंकाय पर्वतच खालीं कोसळून पडत आहेत, अशा प्रकारचा त्या सैन्यांत भयंकर कल्लोळ उडाला! याप्रमाणें भीमानें बाणांचा वर्षाव करून त्या कौरववीरांचा निःपात केल्यावर ते सर्व कौरववीर, फुलांतील मध चाखण्याकरितां पक्षी ज्याप्रमाणें वृक्षावर धांवून येतात, त्याप्रमाणें भीमावर तुटून पडले! याप्रमाणें तुझ्या सैन्यानें भीमावर निकराची चाल केली असतां, त्या अनंतवीर्य भीमानें पराक्रमाची अत्यंत शर्थ केली; तेव्हां प्रलयकालीं दंडधारी यमच सर्व प्राण्यांना जाळण्याला उद्युक्त झाला आहे, असें सर्वांस वाटलें! जीवमात्राच्या नाशार्थ येणाऱ्या काळाच्या मुखांत ज्याप्रमाणें प्राणी प्रवेश करतात, त्याप्रमाणें भीमसेनाच्या त्या प्रबळ वेगापुढें तुझ्या सैनिकांची अतिदीन अवस्था होऊन त्यांचा टिकाव लागेना! धृतराष्ट्रा, याप्रमाणें त्या महात्म्या

भीमसेनानें तुझ्या सैन्याचा संहार सुरू करतांच झंझावातानें उधळून दिलेल्या मेघजालाप्रमाणें तें सैन्य भीतीनें दाही दिशांस पळूं लागलें !

कौरवसैन्य सैरावैरा दश दिशांस पळत आहे हें पाहून आनंदित होत्साता बलवान् व बुद्धिमान् भीमसेन पुनः आपल्या सारथ्याला म्हणाला, "सूता, एकत्रित होऊन आपणावर चालून येणारे रथ व ध्वज आपले आहेत किंवा शत्रूंचे आहेत याचें निरीक्षण कर ! मी युद्ध करीत असल्यामुळें मला त्याचा निर्णय करतां येत नाहीं; माझ्याच बाणांनीं माझ्या सैनिकांचा संहार होईल, याकरितां विशोका, शत्रूंकडील वीरांना न्याहाळून पहा ! सूता, सर्वत्र शत्रूंचे रथ व ध्वजाग्रें पाहून मला फार भय वाटत आहे ! धर्मराज दुःखार्त झाला असून अर्जुन अद्यापि आला नाहीं; म्हणून मी फारच काळजींत पडलों आहें ! सारथे, मला अत्यंत दुःख होत आहे कीं मला येथें सोडून धर्मराज एकटाच शत्रूंवर चाल करून गेला आहे ! तो जीवंत आहे कीं नाहीं हें समजत नाहीं ! त्याचप्रमाणें अर्जुनाच्या जीविताबद्दलहि मी साशंक असल्यामुळें मला फारच चिंता वाटत आहे ! असें जरी आहे तरी रणांगणांत शत्रूंच्या ह्या भयंकर व बलाढ्य सैन्याचा मीं नाश केला तर तुला व मलाहि आनंद होईल ! सूता, यासाठीं तूं माझ्या रथांतील सर्व बाण पहा व कोणत्या जातीचे व कोणत्या प्रमाणाचे बाण आतां अवशिष्ट आहेत तें मला सांग !"

विशोक—वीरा भीमा, आज आपल्या रथांत साठ सहस्र मार्गण बाण, दश दश सहस्र क्षुर व भल्ल बाण, दोन सहस्र नाराच बाण व तीन सहस्र प्रदर बाण आहेत ! रथावर जीं आयुधें अवशिष्ट आहेत तीं वाहून नेण्याला सहांहून अधिक वृषभांचा शकट जोडावा लागेल ! प्राज्ञ भीमसेना, गदा, खड्ग, प्रास, मुद्गर, शक्ति, तोमर इत्यादि जीं तुझीं आयुधें आहेत, त्यांपैकीं सहस्रशः जरी तूं शत्रूंवर सोडिलींस, तरी तीं क्षय पावतील, अशी भीति तूं किमपि बाळगूं नकोस !

भीमसेन—सूता, तूं आज संग्रामांत माझा पराक्रम पहा ! मी आज शत्रूंवर अत्यंत वेगवान् शरांचा वर्षाव करून ही रणभूमि आच्छादीन व अंतरिक्षांत बाणांचें छत पसरीन आणि हें भयंकर रणांगण सूर्यरहित व यमलोकाप्रमाणें भयाण करीन ! सारथे विशोका, आज सर्व पार्थिवांना हा भीमसेन युद्धांत पडला किंवा त्यानें एकट्यानें सर्व कौरवांना जिंकलें असें दिसून येईल ! सर्व कौरव युद्धांत नष्ट होतील किंवा सर्व माझ्या बाळपणापासूनचीं

माझीं पराक्रमाचीं कृत्यें आठवून माझी स्तुति करितील! आज मी सर्व कौरवांचा वध करीन किंवा ते तरी माझा वध करतील! सूता, माझ्या ह्या उत्तम कृत्याला आशीर्वाद देऊन देवांनीं तें माझ्या हातून सिद्धीस न्यावें! यज्ञांत इंद्राला आवाहन केलें असतां तो जसा सत्वर प्रकट होतो, तसा आज या समयीं अर्जुन येथें प्राप्त होवो! विशोका, ही भारती सेना पलायन करीत आहे पहा! हे राजे कां बरें पळून जात आहेत? हा बुद्धिमान् नरश्रेष्ठ सव्यसाची अर्जुनच ह्या सैन्यावर बाणांचा वर्षाव करून त्यास आच्छादून टाकीत असला पाहिजे! विशोका, हे ध्वज, गज, अश्व आणि पत्तिसंघ पळून जात असलेले पहा! हे रथ व त्यांतील रथी शर व शक्ति यांनीं हत होऊन सैरावैरा पळत सुटले आहेत पहा! ही पहा कौरवसेना पार्थाच्या कांचनभूषित, मयूरपुंख, वज्रतुल्य व वेगवान् बाणांनीं विद्ध होऊन मृत्युमुखीं पडत आहे आणि तिच्या साहाय्यार्थ अधिक कौरवसेना येत आहे! वणव्यांत सांपडल्यामुळें भीतीनें दशदिशांना पळणाऱ्या गजांप्रमाणें हे रथ अश्व, गज, पदातींना तुडवीत चालले आहेत व त्यामुळें कौरवसेना मोहित होऊन पळत सुटली आहे! विशोका, रणांगणांत हे गजेंद्र हाहाकार करीत कशी महागर्जना करीत आहेत, ती अवलोकन कर!

विशोक—भीमसेना, अर्जुन इकडे येत आहे यांत संशय नाहीं. तुला त्या क्षुब्ध झालेल्या अर्जुनाच्या गांडीवाचा ध्वनि ऐकूं येत नाहीं काय? तुझे कर्ण नष्ट झाले नाहींतना? भीमा, आज तुझे सर्व मनोरथ पूर्ण होतील! कारण गजसैन्यांत तो मारुति दिसत आहे पहा! नीलवर्ण मेघापासून उद्भूत होणाऱ्या विद्युल्लतेप्रमाणें तेजस्वी अर्जुनाच्या गांडीवाची प्रत्यंचा स्फुरण पावत आहे, ती अवलोकन कर! धनंजयाच्या ध्वजाग्रावर बसलेला तो मारुति आसमंतात् पहात रणांत शत्रुसैन्याला त्रास देत आहे पहा! त्याला पाहून मला सुद्धां फार भीति वाटत आहे! धनंजयाचा तो विचित्र किरीट अतिशय तेजानें प्रकाशत आहे व त्यावरील दिव्य मणि सूर्याप्रमाणें शोभत आहे! अर्जुनाच्या संनिध असणारा, भयंकर शब्द करणारा, शुभ्र मेघाप्रमाणें तेजस्वी तो देवदत्त शंख पहा! पहा तो प्रतोदधारी जनार्दन शत्रूंच्या सैन्यांत घुसून आपला रथ हांकीत आहे! भीमा, त्याच्या पार्श्वभागीं सूर्याप्रमाणें तेजस्वी, वज्राप्रमाणें दृढ, क्षुराप्रमाणें तीक्ष्ण, कृष्णाची कीर्ति वाढविणारें व यादवांना नेहमीं अर्चनीय असें तें दिव्य सुदर्शन चक्र पहा!

भीमसेना, किरीटीनें क्षुर बाण सोडून वृक्षांप्रमाणें सरळ महागजांच्या शुंडा छेदून टाकल्यामुळें त्या भूमीवर पडत आहेत! आणखी अर्जुनाच्या शरांनीं विद्ध झालेले मोठमोठे गज व गजसादी वज्रप्रहार केलेल्या पर्वतांप्रमाणें भूमीवर कोसळून पडत आहेत! त्याचप्रमाणें हे भीमसेना, चंद्रासमान शुभ्र वर्ण असलेला कृष्णाचा श्रेष्ठ पांचजन्य शंख, वक्षःस्थलावर शोभणारा कौस्तुभमणि व कंठस्थित विजयी वनमाला हीं सर्व अवलोकन कर! भीमसेना, कौरवांच्या सैन्याचा संहार करीत सारथि कृष्णानें शुभ्र अश्व जोडलेला महारथी अर्जुनाचा श्रेष्ठ रथ निःसंशय ह्याच बाजूनें येत आहे पहा! भीमा, गरुडाच्या पंखांपासून उद्भूत झालेल्या वायूनें ज्याप्रमाणें महारण्यें नष्ट होतात, त्याप्रमाणें तुझ्या इंद्रतुल्य पराक्रमी कनिष्ठ बंधूनें बाण सोडून उध्वस्त केलेले हे रथ, अश्व व पत्तिगण रणभूमीवर कोसळत आहेत पहा! अर्जुनानें महाबाणांच्या वृष्टीनें हे चारशें रथी, अश्व आणि सूत नष्ट केले आहेत पहा! त्याप्रमाणें त्यानें सातशें गज, पदाति व अश्वसादी आणि अनेक रथ यांचा नाश चालविला आहे तोहि अवलोकून घे! भीमसेना, चित्रग्रहाप्रमाणें कौरवांचा वध करीत हा बलिष्ठ अर्जुन तुझ्या समीप आला आहे! आतां तुझे सर्व मनोरथ पूर्ण होतील, तुझ्या सर्व शत्रूंचा नाश होईल, यांत संदेह नाहीं! तूं दीर्घायुषी हो आणि तुझें सामर्थ्य असेंच वृद्धिंगत होवो!

**भीमसेन**—सूता विशोका, अर्जुन समरांगणांत प्राप्त झाल्याची प्रिय वार्ता सांगितल्याबद्दल मी तुझ्यावर अत्यंत प्रसन्न झालों आहें! म्हणून मी तुला चौदा उत्कृष्ट गांव, वीस रथ व शंभर दासी देईन! ८. ७६.

---

## अध्याय ७७ वा.

[ १ अर्जुनपराक्रम. २ भीमाचें कौरवसेनेशीं युद्ध. ३ शकुनीचा पराजय. ]

( १ ) **संजय**—राजा धृतराष्ट्रा, इकडे रथांच्या गतीमुळें होणारा ध्वनि व युद्धार्थ जमलेल्या वीरांची सिंहगर्जना ऐकून अर्जुन कृष्णाला म्हणाला, 'कृष्णा, आतां अश्वांना सत्वर हांक!' अर्जुनाचें हें भाषण ऐकून कृष्ण त्याला म्हणाला, 'जेथें भीमसेन आहे त्या ठिकाणीं मी रथ त्वरित नेतों.' नंतर कृष्णानें सुवर्ण, मौक्तिकें व रत्नें यांनीं उत्तम शृंगारित, हिम व शंख यांप्रमाणें शुभ्रवर्णाचे अश्व जोडलेला, तो अर्जुनाचा रथ शीघ्र चालविला. तेव्हां जणुंकाय

देवेंद्र हातांत वज्र घेऊन क्रोधानें जंभासुराचा वध करण्याच्या इच्छेनें निघाला आहे असें वाटलें ! धृतराष्ट्रा, जेव्हां तो रथ कौरवसैन्यासमीप आला तेव्हां शत्रुपक्षाकडील रथ, अश्व, गज, पदाति यांच्या अनेक संघांनीं आपल्या बाणांच्या टणत्कारांनीं, रथांच्या घोषणेनें व अश्वांच्या खुरस्वनांनीं, दाही दिशा दुमदुमून टाकीत अत्यंत क्रोधानें अर्जुनावर चाल केली ! त्यासमयीं अर्जुनाचें व त्या वीरांचें मोठें भयंकर युद्ध होऊन त्यांत अनेक वीरांच्या देहांचा, प्राणांचा व पापांचा नाश झाला ! तेव्हां प्रत्यक्ष विजयिश्रेष्ठ विष्णु त्रैलोक्याच्या प्राप्तीस्तव असुरांशीं युद्ध करीत आहे असें दिसलें ! त्या शत्रूंनीं जीं आयुधें अर्जुनावर सोडिलीं, तीं सर्व त्या किरीटधारी अर्जुनानें छेदून टाकिलीं ! त्यानें उलट आपले क्षुर, अर्धचंद्र व तीक्ष्ण भल्ल बाण शत्रूंवर सोडून त्यांचे बाहु व शिरें छेदिलीं ! राजा, अर्जुनानें छत्रें, चामरें, ध्वज, अश्व, रथि, गज व पदाति यांचा भयंकर संहार चालविल्यामुळें ते सर्व अनेक प्रकारांनीं विद्रूप होऊन भूमीवर पडले व जणुंकाय प्रचंड झंझावातानें वृक्षच कोसळून पडत आहेत असा भास झाला !

धृतराष्ट्रा, ज्यांच्या पाठीवर सुवर्णाच्या झाली घातल्या आहेत व ज्यांवर वैजयंती माला, ध्वज, पताका व वीर विराजत आहेत, असे ते महागज सुवर्णपुंख शरांनीं विद्ध झाले, तेव्हां जणुंकाय महापर्वतच प्रज्वलित झाले आहेत असें दिसलें ! याप्रमाणें इंद्रवज्रसमान उत्तम बाणांनीं गज, अश्व आणि रथ यांचा संहार करून जेव्हां अर्जुन कर्णवधार्थ त्याजवर त्वरित चालून गेला, तेव्हां प्रत्यक्ष इंद्रच बलदैत्याचा वध करण्याकरितां निघाला आहे असें वाटलें ! त्यासमयीं मकर सागरांत प्रवेश करितो त्याप्रमाणें त्या महाबाहु, अरिंदम, पुरुषव्याघ्र अर्जुनानें तुझ्या सैन्यांत प्रवेश केला ! राजा, त्या वेळीं तुझ्या सैन्यानें मोठ्या वीर्यानें रथ, पत्ति, गज, अश्व या चतुरंगसेनेसह त्या धनंजयावर चाल केली ! ज्याप्रमाणें समुद्र क्षुब्ध झाला असतां लाटा उसळून मोठी गर्जना होते, त्याप्रमाणें त्या कौरववीरांनीं पार्थावर चाल केली असतां तेथें मोठा भयंकर ध्वनि ऐकूं येऊं लागला ! तेव्हां तुझ्या सैन्यांतले व्याघ्रांप्रमाणें शूर असे ते पराक्रमी योद्धे आपल्या प्राणांची पर्वा न करितां अर्जुनावर चाल करून गेले व त्यांनीं त्याच्यावर एकसारखा शरवर्षाव सुरू केला ! आणि महावात जसा मेघांची दाणादाण उडवितो त्याप्रमाणें अर्जुनानें त्या सैन्याचा शीघ्र संहार केला ! नंतर ते सर्व महाधनुर्धर वीर एकवटून

रथांतून बाणांचा वर्षाव करीत अर्जुनावर धांवून गेले व त्यांनीं त्याला तीक्ष्ण बाणांनीं विद्ध केलें ! तेव्हां अर्जुनाला त्वेष चढून त्यानें हजारों रथ, गज आणि अश्व यांवर शरवृष्टि करून त्यांना यमसदनीं पाठविलें ! युद्धांत अर्जुनाच्या गांडीव धनुष्यापासून सुटलेल्या बाणांनीं हत झाल्यामुळें ते वीर भयभीत होऊन जिकडेतिकडे लपूं लागले ! कौरवसैन्यापैकीं चारशें महारथी वीर मोठ्या निकरानें अर्जुनाशीं युद्ध करीत असतांना त्यानें त्यांच्यावर निशित बाण सोडून त्यांचा वध केला ! याप्रमाणें अर्जुनानें कौरवांकडील महारथ वीरांचा नानाप्रकारचे तीक्ष्ण बाण सोडून संहार चालविल्यामुळें ते गर्भगळित होऊन दशदिशांस पळत सुटले ! ज्याप्रमाणें पर्वतावर समुद्राचा मोठा ओघ आपटून भयंकर शब्द होतो, त्याप्रमाणें सैन्याच्या आघाडीवरील वीर पळूं लागतांच त्या सैन्यांत महान् कोलाहल होऊं लागला !

( २ ) राजा धृतराष्ट्रा, याप्रमाणें त्या कौरवसेनेवर भयंकर शरवर्षाव करून अर्जुनानें त्या वीरांना रणांगणांतून पळविलें व तो कर्णाच्या सैन्यासमोर प्राप्त झाला ! सर्पावर चालून जाण्यापूर्वी ज्याप्रमाणें गरुडानें महागर्जना करावी त्याप्रमाणें शत्रूंवर चाल करतांना त्या अर्जुनानें भयंकर गर्जना केली ! तो त्याचा शब्द ऐकून महाबल भीमसेनाला अत्यंत आनंद झाला व अर्जुनाला भेटण्याची त्याला तीव्र इच्छा उत्पन्न झाली. पार्थ रणभूमीवर आला हें ऐकतांच त्या प्रतापी भीमसेनानें आपल्या प्राणांचीहि पर्वा न करतां तुझ्या सेनेचा संहार करण्यास प्रारंभ केला. तेव्हां तो वायुपुत्र भीमसेन मोठ्या वेगानें वायूसारखा शत्रूंमध्यें संचार करूं लागला व त्यामुळें तुझें सैन्य जर्जर होऊन समुद्रांतील फुटक्या नौकेप्रमाणें नाश पावलें ! त्या रणांत भीमानें आपलें हस्तलाघव प्रकट करून त्या सैन्यावर उग्रशरांचा वर्षाव केला व त्याला यमलोकीं पाठविलें ! त्या वेळीं भीमसेनाचें तें अतिमानुष बल अवलोकन करून सर्वांना तो प्रलयकालच्या यमाप्रमाणें भयंकर वाटून भीतीनें ते सर्व इकडेतिकडे धांवूं लागले ! धृतराष्ट्रा, याप्रमाणें आपल्या बलिष्ठ सैन्याची ती दुर्दशा पाहून दुर्योधन सर्व धनुर्धरांना व सैनिकांना उद्देशून म्हणाला, ' तुम्ही सर्वांनीं मिळून भीमाचा वध करा, म्हणजे सर्व पांडवसैन्य नष्ट झालें असें मी समजेन !'

धृतराष्ट्रा, तुझ्या पुत्राची आज्ञा ऐकून त्यांनीं चोहोंकडून बाणांचा वर्षाव करून भीमसेनाला आच्छादून टाकलें ! राजा, त्यावेळीं अनेक गज, नर व जयेच्छु रथी यांनीं वृकोदराला वेढून टाकलें ! त्यासमयीं तो भीमसेन

नक्षत्रांनीं परिवेष्टित चंद्राप्रमाणें किंवा सभोंवार खळें पडलेल्या पूर्णचंद्राप्रमाणें शोभूं लागला! तेव्हां तो नरश्रेष्ठ अर्जुन नव्हे, तर साक्षात् विजयच रणांत युद्ध करीत आहे असें वाटलें ! त्यावेळीं कौरवपांडवांचें निकराचें युद्ध होऊन भीमसेनाचा वध करण्याच्या इच्छेनें त्या शूर कौरववीरांनीं त्यावर क्रोधानें डोळे लाल करून शरवर्षाव केला ! परंतु जाळ्यांतून बाहेर पडणाऱ्या मत्स्याप्रमाणें तो भीमसेन संनतपर्व बाणांचा त्या शत्रूंवर वर्षाव करून व त्यांच्या सैनिकांचा संहार करून रणांतून बाहेर निघाला ! त्यासमयीं भीमानें रणांतून. कधींहि पराङ्मुख न होणारे दहा हजार गज, दोन लक्ष दोनशें नर, पांच हजार अश्व व शंभर रथी ह्यांचा वध करून रक्ताची [1]नदी वाहविली ! ती नदी त्या पुरुषश्रेष्ठ भीमानें एका क्षणांत उत्पन्न केली ! ज्याप्रमाणें उग्र वैतरणी नदी अज्ञ जनांना दुस्तर आहे, त्याप्रमाणें ती अति घोर व भिऱ्या लोकांची भीतिवर्धक रुधिररूपी नदी होती ! तिच्यामध्यें जेव्हां रथिश्रेष्ठ पांडव भीमसेन शिरला तेव्हां त्यानें लाखों योद्ध्यांचा वध केला ! याप्रमाणें रणांतील भीमसेनाचा अद्भुत पराक्रम पाहून दुर्योधन शकुनीला म्हणाला, ‘युद्धांत महाबल भीमसेनाला कसेंतरी जिंका; एकदां तो जिंकला गेला म्हणजे पांडवांचें महाबलवान् सैन्य आम्हीं जिंकलें असें मी समजतों ! ’

( ३ ) राजा धृतराष्ट्रा, नंतर तो शकुनि बंधूंसह महायुद्ध करण्यासाठीं सज्ज होऊन महापराक्रमी भीमसेनावर चाल करून गेला व समुद्राची सीमा ज्याप्रमाणें लाटांना थोपवून धरते, त्याप्रमाणें शकुनीनें त्याला अडविलें. भीमसेनानें आपले तीक्ष्ण बाण सोडून शकुनीला मागें हटविलें, तेव्हां शकुनीनें त्या भीमसेनाच्या वामकुक्षींत व वक्षःस्थलावर अत्यंत तीक्ष्ण सुवर्णपुंख बाण मारले ! त्या कंकपिच्छ व मयूरपिच्छ बाणांनीं भीमसेनाचें कवच भेदून त्याचें अंग अतिविद्ध केलें ! नंतर त्या भीमसेनानें शकुनीवर क्रोधानें एक सुवर्णपुंख बाण सोडला, परंतु तो आपल्यावर येणारा बाण पाहून त्या शत्रुतापन महाबल शकुनीनें उलट बाण सोडून त्या भीमसेनाच्या बाणाचे तुकडेतुकडे केले !

राजा, आपला बाण निरर्थक ठरून भूमीवर पडला असें पाहून भीमसेनाला अत्यंत क्रोध आला व हंसतहंसतच त्यानें शकुनीचें धनुष्य तोडून टाकलें !

---

१ अशा प्रकारचीं नदीवर्णनें मागें अनेकदां आलीं असल्यामुळें तें वर्णन येथें गाळलें आहे.

तेव्हां तें भग्न धनुष्य फेंकून देऊन त्या प्रतापी सौबलानें तत्काळ दुसरें धनुष्य हातांत घेतलें व सोळा सन्नतपर्व बाण भीमसेनावर टाकले! त्यांपैकीं दोन बाण त्यानें सारथ्यावर व सात भीमसेनावर टाकले; एका बाणानें ध्वज व दोन बाणांनीं त्याचें छत्र यांचा नाश केला व चार बाणांनीं चारी अश्वांना विद्ध केलें! हें दृष्टीस पडतांच त्या क्रुद्ध भीमसेनानें शकुनीवर सुवर्णदंडाची आपली पोलादी शक्ति फेंकली. ती नागजिह्वेप्रमाणें चंचल शक्ति आपल्यावर चालून येत आहे असें पाहून, शकुनीनें उलट त्वेषानें तीच शक्ति भीमसेनावर फेंकली! त्या शक्तिप्रहारानें महात्म्या भीमसेनाचा वाम बाहु विदीर्ण झाल्यावर ती शक्ति आकाशांतून पडणाऱ्या विद्युल्लतेप्रमाणें, भूमींत शिरली! त्याकालीं कौरवांनीं सर्वत्र हर्षानें गर्जना केली; तें भीमसेनाला सहन न होऊन आपला जीव धोक्यांत घालून त्यानें तत्काळ दुसरें धनुष्य सज्ज केलें आणि शकुनीच्या सैन्यावर जोराचा शरवर्षाव चालविला! क्षणांत तें सर्व सैन्य त्यानें आच्छादून टाकून शकुनीचे चारहि अश्व, सारथी आणि ध्वज यांचा भल्ल बाणांनीं विध्वंस केला! तेव्हां सौबलानें त्वरेनें त्या अश्वहीन झालेल्या रथांतून खालीं उडी टाकली. तो क्रोधानें डोळे लाल करून व सुस्कारे टाकूं लागून भीमसेनावर चोहों बाजूंनीं बाणांचा वर्षाव करूं लागला! परंतु प्रतापशाली भीमसेनानें उलट बाण सोडून त्याचें धनुष्य तोडून टाकलें व त्याला तीक्ष्ण बाणांनीं विद्ध केलें! तेव्हां भीमसेनाचा भयंकर शरप्रहार सहन न होऊन तो शत्रुतापन शकुनि भूमीवर मूर्च्छित पडला!

राजा धृतराष्ट्रा, सौबलाची ती विह्वल अवस्था पाहून तुझ्या दुर्योधन पुत्रानें भीमसेनाच्या समक्ष त्याला रथांत घालून बाजूला नेलें! शकुनीचा पराभव धनुर्धर भीमसेनानें केलेला पाहून त्याच्या भीतीनें तुझें सैन्य पराङ्मुख होऊन दशदिशांस सैरावैरा पळत सुटलें! या प्रकारें दुर्योधन राजा शकुनीच्या रक्षणाकरितां वेगवान् अश्व जोडलेल्या रथांतून रणांगण सोडून जातांना पाहून तुझ्या सैन्यांतील इतर योद्धेहि प्रतिपक्ष्याशीं युद्ध करावयाचें टाकून इतस्ततः पळत सुटले! तें सर्व सैन्य पराङ्मुख होऊन पळत सुटलेलें पाहून भीम अनेक बाण सोडून त्याच्यावर वेगानें चालून गेला! नंतर त्या सैनिकांनीं कर्णाचा आश्रय करून ते पुनः युद्धासाठीं समरांगणांत येऊन युद्धार्थ सज्ज झाले! राजा धृतराष्ट्रा, फुटक्या नौकेंतील लोक द्वीपाप्रत जाऊन ज्याप्रमाणें सुखी होतात, त्याप्रमाणें कर्णाची गांठ पडतांच तुझ्या सैन्याला

मोठा हुरूप येऊन तें प्रसन्न मनानें पुनः पांडवांशीं निकरानें लढण्यासाठीं सिद्ध झालें !

---

## अध्याय ७८ वा.

[ १ धृतराष्ट्रप्रश्न. २ कर्णाचा पराक्रम. ]

( १ ) **धृतराष्ट्र**—संजया, युद्धांत भीमसेनानें कौरवसैन्याचा पराभव केलेला पाहून दुर्योधन, शकुनि, विजयशील कर्ण, कृप, कृतवर्मा, अश्वत्थामा, दुःशासन आणि माझ्या पक्षाचे इतर योद्धे काय म्हणाले ? भीमसेनानें माझ्या सर्व योद्धयांशीं एकट्यानें युद्ध केलें, हें मला फारच अद्भुत वाटतें ! संजया, राधेय कर्णानें शत्रूंशीं युद्ध करितांना आपली प्रतिज्ञा पाळलीना ? कारण तो शत्रुनिषूदन कर्ण सर्व कौरवांचें कल्याण, आश्रय, प्रतिष्ठा व जीविताची आशा होता ! यासाठीं त्या अमितवीर्यवान् भीमसेनानें कौरवसैन्य भग्न केलेलें पाहून अधिरथपुत्र कर्णानें रणांत काय केलें ? त्याचप्रमाणें माझ्या पराक्रमी पुत्रांनीं व इतर महारथ राजांनीं काय केलें तें सर्व तूं सविस्तर सांग. कारण हे संजया, युद्धवृत्तकथन करण्यांत तूं अत्यंत कुशल आहेस !

( २ ) **संजय**—राजा धृतराष्ट्रा, तिसरे प्रहरीं त्या महाप्रतापी सूतपुत्रानें भीमसेनाच्या देखत सर्व सोमकांचा वध केला ! तें पाहून उलट भीमसेनानेंहि कौरवांच्या अत्यंत बलवान् सैन्याचा संहार आरंभिला ! याप्रमाणें बुद्धिमान् भीमसेन कौरवसेनेची दाणादाण करीत आहे हें पाहून कर्ण शल्याला म्हणाला, 'मद्रराजा, माझा रथ पांचालांजवळ ने !' तेव्हां त्या महाबल मद्रराजानें कर्णाच्या रथाचे वेगवान् श्वेत अश्व शीघ्रगतीनें चालवून तो रथ चेदि, करुष व पांचाल यांच्या सैन्यासमीप नेला ! त्या प्रचंड पांडवसेनेंत प्रवेश करून त्या शत्रुसंहारक शल्यानें कर्णाच्या इच्छेनुरूप मोठ्या आनंदानें ते अश्व चालविले ! राजा, त्यासमयीं तो मेघवर्ण, व्याघ्रचर्मावगुंठित कर्णाचा रथ आपल्या सैन्यांत घुसलेला पाहून त्या पांडव-पांचालांना मोठी भीति वाटली ! कारण पर्वताचा कडा पडतांना मेघगर्जनेप्रमाणें जसा भयंकर ध्वनि उत्पन्न होतो, तसा त्या रणांत कर्णाचा रथ भ्रमण करतांना भयंकर आवाज होत होता !

नंतर कर्णानें प्रत्यंचा आकर्ण ओढून व तीक्ष्ण शर सोडून पांडवसैन्याचा संहार चालविला. तेव्हां पांडवांच्या महारथ धनुर्धर वीरांनीं राधेयाचा वध

करण्याच्या इच्छेनें चोहोंकडून त्यास वेढा दिला ! शिखंडी, भीम, धृष्टद्युम्न, नकुल, सहदेव, सात्यकि व द्रौपदीचे पुत्र हेहि त्याजवर चालून गेले व त्यांनीं त्याच्यावर शरवृष्टि करून त्याला जर्जर केलें ! त्यावेळीं शूर नरश्रेष्ठ सात्यकीनें वीस तीक्ष्ण बाण कर्णाच्या जत्रुप्रदेशीं मारले; शिखंडीनें पंचवीस, धृष्टद्युम्नानें सात, द्रौपदीच्या पुत्रांनीं चौसष्ट, सहदेवानें सात व नकुलानें शंभर बाण मारून कर्णाला समरांगणांत विद्ध केलें; त्याप्रमाणेंच त्या क्रुद्ध बलवान् भीमसेनानें नव्वद नतपर्व बाण त्या राधेय कर्णावर मारिले ! राजा, त्यासमयीं कर्णानें हंसतहंसतच धनुष्याच्या टणत्कारांत शत्रूंवर भयंकर शरवर्षाव सुरू केला ! प्रत्येक वीरावर पांच पांच बाण सोडून त्यानें सात्यकीच्या ध्वजाचा व धनुष्याचा नाश केला व नऊ बाण त्याच्या वक्षःस्थलीं मारिले ! नंतर अत्यंत क्रोधाविष्ट होऊन त्या शत्रुतापन कर्णानें तीस बाण भीमावर टाकले, एका भल्ल बाणानें सहदेवाचा ध्वज छेदून टाकला व तीन बाणांनीं त्याच्या सारथ्याचा वध केला ! नंतर निमिषावधींत त्यानें द्रुपदपुत्रांना विरथ केलें ! हें त्याचें कृत्य सर्वांना अत्यंत आश्चर्यकारक वाटलें ! शिखंडी आदिकरून सर्व वीरांवर संनतपर्व बाणांचा वर्षाव करून त्यानें त्यांना युद्धपराङ्मुख केलें व शूर पांचाल आणि महारथ चेदि यांना विव्हल केलें ! राजा धृतराष्ट्रा, नंतर कर्णानें चेदि-मत्स्यांचा वध चालविला असतां ते सर्व एकट्या कर्णावर चालून येऊन त्याच्यावर शरवर्षाव करूं लागले ! कर्णानें उलट त्यांच्यावर तीक्ष्ण बाण सोडल्यामुळें त्यांचा धीर सुटून सिंहाला भ्यालेल्या मृगांप्रमाणें ते भीतीनें दश दिशांना सैरावैरा पळत सुटले ! समरांत त्या प्रतापी एकट्या सूतपुत्रानें विजयार्थ पराकाष्ठा करणाऱ्या पांडवपक्षीय धनुर्धर वीरांवर शरवर्षाव करून त्यांना चित केलें आणि आपलें हस्तलाघव दाखविलें ! महात्म्या कर्णाचें तें युद्धकौशल्य पाहून सर्व देव, सिद्ध व चारण यांना मोठा संतोष होऊन धनुर्धर कौरवांनीं त्या नरोत्तम व रथश्रेष्ठ कर्णाचा बहुमान केला ! नंतर निदाघकालांतील प्रज्वलित अग्नि ज्याप्रमाणें तृणाला क्षणांत दग्ध करून टाकतो, तसें त्या कर्णानें शत्रुसैन्याला दग्ध केलें ! तेव्हां त्या महारथ कर्णाच्या भीतीनें तें सैन्य पळूं लागलें ! पांचालांचा धीर सुटून ते मोठ्यानें आक्रंदन करूं लागले व अशा रीतीनें पांडवांचें तें प्रचंड सैन्य अतिशय भयभीत होऊन गेलें !

राजा, त्यासमयीं रणांत कर्णच तेवढा एक वीर असें पांडवांना वाटूं लागलें ! त्या शत्रुकर्शन राधेयानें पुनः असा अलौकिक पराक्रम केला कीं, त्यामुळें पांडव

त्याच्याकडे पहाण्यालाहि समर्थ झाले नाहींत ! प्रचंड पर्वताच्या कड्यावर जलौघ आपटून तो विदीर्ण होतो, त्याप्रमाणें कर्णाशीं युद्धांत गांठ पडल्यामुळें त्या पांडवसेनेचें विदारण झालें ! राजा, कर्ण धूमरहित अग्नीप्रमाणें रणांत पांडवांच्या प्रचंड सैन्याला दग्ध करूं लागला ! त्या वीरांवर महारथ कर्णानें बाणांचा वर्षाव करून शत्रुसैन्यांतील वीरांचीं मस्तकें, सकुंडल कर्ण, बाहु, खड्ग, ध्वज, शक्ति, अश्व, गज, यांचा मोठ्या शौर्यानें विध्वंस केला ! राजा धृतराष्ट्रा, त्यासमयीं कर्णानें वधिलेले गज व अश्व इत्यादिकांच्या मांस-शोणिताचा कर्दम होऊन पृथ्वीचा पृष्ठभाग अदृश्य झाला आणि अश्व, रथ, गज व पदाति जिकडेतिकडे हत होऊन पसरल्यामुळें सर्व युद्धभूमि उंच-सखल दिसूं लागली व त्यामुळें सृष्टि अगम्यरूप भासूं लागली ! त्या रणसंग्रामांत कर्णानें आपल्या अस्त्रकौशल्यानें इतके बाण निर्माण केले कीं, योद्ध्यांना स्वकीय परकीय हा भेदहि करतां येईना ! कर्णानें असा पराक्रम करून पांडवांच्या महारथांना आच्छादून टाकलें आणि जरी त्यांनीं पुनः पुनः पराकाष्ठा करून युद्धाचा नेटानें प्रयत्न केला, तरी वनांत ज्याप्रमाणें सिंह हरिणांचा पाठलाग करून त्यांना हुसकावून लावतो, त्याप्रमाणें कर्णानें त्यांच्यावर शरवर्षाव करून त्यांना पळण्यास भाग पाडलें ! ह्याप्रमाणें कर्णानें रथश्रेष्ठ पांचालांना व इतर शत्रुपक्षाच्या योद्ध्यांना हतवीर्य केल्यावर लांडग्याप्रमाणें त्यानें त्या पांडव-सेनेचा वध केला !

राजा धृतराष्ट्रा, याप्रमाणें पांडवसैन्याची ती दुर्दशा पाहून महाधनुर्धर धार्तराष्ट्र गर्जना करीत तेथें येऊन पोंचले ! राजा, त्यावेळीं दुर्योधनाला कर्णाचा हा अलौकिक पराक्रम पाहून फारच आनंद झाला व त्याच्या आज्ञेनें जिकडेतिकडे वाद्यें वाजूं लागलीं ! पराभूत झालेले ते पांचाल वीर जिवावर उदार होऊन कर्णाशीं पुनः युद्ध करण्यास प्रवृत्त झाले; परंतु त्या शत्रुतापन राधेय कर्णानें पुनः पुनः त्यांचा पराभव केला ! त्यावेळीं हे भारता, कर्णानें पांचालांचे वीस व चेदींचे शंभर रथी यांवर क्रोधानें तीक्ष्ण शर सोडून त्यांचा वध केला आणि वीरस्थानें, वाजिपृष्ठ व गजांचे स्कंधप्रदेश निर्मनुष्य करून पदातींना पळवून लाविलें ! तेव्हां तो शूर सूतपुत्र मध्याह्नींच्या प्रखर सूर्याप्रमाणें तळपूं लागला आणि त्याच्याकडे कोणाच्यानेंहि पाहवेना ! राजा धृतराष्ट्रा, ज्याप्रमाणें भूतगणांचा वध करून बलवान् यम शोभतो, त्याप्रमाणें तो धनुर्धर व शत्रुसंहारक कर्ण पांडवांच्या

चतुरंग सैन्याचा वध करून शोभूं लागला ! कर्णानें मोठ्या शौर्यानें सोमकांचा असा वध केल्यावर पांचालांनींहि केलेला अद्भुत पराक्रम मीं पाहिला ! कर्णानें त्यांचा वध करण्याचा क्रम चालू ठेवला असतांनाहि ते कर्णाशीं युद्ध करण्याचें सोडून मागें मुळींच परतले नाहींत !

राजा धृतराष्ट्रा, दुर्योधन, दुःशासन, कृप, अश्वत्थामा, कृतवर्मा व बलिष्ठ शकुनि यांनीं पांडवसैन्यांतील लक्षावधि वीरांचा वध केला ! राजेंद्रा, त्यासमयीं कर्णाचे उभय पुत्र युद्ध करीत होते ! त्या सत्यविक्रम बंधूंनीं मोठ्या त्वेषानें पांडवांच्या सैन्याचा अतिसंहार केला ! तेव्हां कौरवांच्या व पांडवांच्या सैन्यांचा भयंकर संग्राम होऊन फार प्राणहानि झाली ! त्या घनघोर युद्धांत शूर पांडव, धृष्टद्युम्न, शिखंडी व द्रौपदीपुत्र यांनीं अत्यंत क्रुद्ध होऊन तुझ्या सैन्याचा मोठा नाश केला ! याप्रमाणें युद्धांत महाबल भीमाकडून तुझ्या सैन्याचा व कर्णाकडून पांडवांच्या सैन्याचा मोठा नाश झाला ! ८. ७८.

## अध्याय ७९ वा.

[ १ कर्णवधोत्सुक अर्जुनानें निर्माण केलेली रक्तनदी. २ कर्णवधाविषयीं अर्जुनाची तत्परता. ३ शल्याचें कर्णाला प्रोत्साहनपर भाषण. ४ संकुलयुद्ध. ]

( १ ) **संजय**—राजा धृतराष्ट्रा, दुसऱ्या बाजूस अर्जुनानेंहि कौरवांच्या चतुरंग सैन्याचा वध करून व त्या महारणामध्यें सूतपुत्र कर्णाला क्रोधाविष्ट झालेला पाहून शत्रुसैन्याशीं दारुण संग्राम आरंभिला व रणभूमीवर शोणिताची नदी निर्माण केली !

( २ ) **अर्जुन**—कृष्णा, हा पहा रणांत सूतपुत्राचा केतु दिसत आहे ! भीमसेनादि योद्धे त्या महारथ कर्णाशीं युद्ध करीत आहेत पहा ! पांचालवीर कर्णाला भिऊन पळूं लागले आहेत ! हा दुर्योधन राजा कर्णानें पराजित केलेल्या पांचालांची दाणादाण करीत असतांना श्वेत छत्रामुळें फारच शोभत आहे ! हे कृप, कृतवर्मा व महारथ अश्वत्थामा वीर कर्णाच्या साहाय्यानें राजा दुर्योधनाचें रक्षण करीत आहेत ! कृष्णा, जर आपण त्यांचा वध केला नाहीं, तर ते खचित सोमकांचा नाश करतील ! हा मोठ्या कौशल्यानें सारथ्य करणारा शल्य कर्णाच्या रथावर कसा शोभत आहे पहा! मला अशी इच्छा उत्पन्न झाली

आहे कीं, आतां कर्णाशीं युद्ध करावें ! यासाठीं कृष्णा, तूं मला महारथ कर्णाकडे घेऊन चल, आज युद्धांत कर्णाचा वध केल्याशिवाय मी कधींहि मागें फिरणार नाहीं ! जनार्दना, जर कर्णाचा वध माझ्या हातून होणार नाहीं, तर तो कर्ण आमच्या समक्ष सर्व पांडवांचा व महारथ सृंजयांचा निःसंशय नाश करील !

(३) **संजय**—राजा धृतराष्ट्रा, अर्जुनाचें हें भाषण ऐकून त्या महाबाहु कृष्णानें अर्जुनाचा रथ तत्काळ तुझ्या सैन्याकडे चालविला आणि सव्यसाची अर्जुनानें कर्णाशीं द्वैरथयुद्ध करण्याचें योजिल्यामुळें अर्जुनाच्या सांगण्यावरून तो रथ त्या महारथ कर्णाच्या रथाशीं भिडविला ! त्यावेळीं अर्जुनाचा रथ दृष्टीस पडतांच सर्व पांडवसैन्याला मोठा धीर उत्पन्न झाला ! धृतराष्ट्रा, रणांगणांत चाललेला तो अर्जुनाच्या रथाचा घोष इंद्रवज्राच्या किंवा मेघांच्या गर्जनेप्रमाणें वाटला ! तो सत्यविक्रम, महात्मा अर्जुन आपल्या रथाचा घोष करीत जेव्हां कौरवसेनेवर चाल करून गेला, तेव्हां त्याच्या रथाचे ते श्वेत अश्व, कृष्ण सारथि व ध्वज पाहून मद्रराज शल्य कर्णाला म्हणाला, "कर्णा, ज्याचा तूं शोध करीत आहेस, तो हा अर्जुन शत्रूंचा संहार करीत इकडेच येत आहे पहा! हा कौंतेय गांडीव धनुष्याची गर्जना करीत रणांत उभा आहे; आज जर तूं याचा वध करशील, तर आमचें सर्वांचें कल्याण होईल ! कर्णा, चंद्र व तारकांनीं प्रकाशणारी, किंकिणी व पताकांनीं युक्त, अशी ती अर्जुनाच्या गांडीवाची प्रत्यंचा अंतरिक्षांतील विद्युल्लतेसमान कशी चकाकत आहे पहा ! अर्जुनाच्या ध्वजाग्रावर सर्वत्र निरीक्षण करीत मारुति आहे व त्यामुळें क्षणोक्षणीं वीरांची भीति वाढत आहे ! तसेंच अर्जुनरथावर कृष्ण सारथि असून त्याचें सुदर्शन चक्र, गदा, शंख व शार्ङ्ग धनुष्य हीं आयुधें दिसत आहेत, तीं अवलोकन कर ! हा ध्वनि सव्यसाची अर्जुनाच्या गांडीवाचा ऐकूं येत आहे व त्यानें सोडलेले तीक्ष्ण बाण शत्रूंचा वध करीत आहेत पहा ! हीं रणांतून कधींहि पराङ्मुख न होणाऱ्या वीरांचीं मस्तकें विशाल, दीर्घ व आरक्त नेत्रांनीं व पूर्णचंद्र मुखांनीं महीतल आच्छादून कशीं शोभत आहेत पहा ! हे रणशूर वीरांचे परिघतुल्य, पुण्यगंधानुलिप्त बाहु आयुधांसहित वर उभारले जाऊन खालीं पडत आहेत ! कित्येक अश्व जिह्वा तुटून व नेत्र फुटून अश्वसादींसह भूतलावर मरून पडले आहेत व कित्येक पडत आहेत ! हे पहा सुवर्णालंकृत पर्वतशिखरांसमान प्रचंड गज अर्जुनाच्या शरांनीं गंडस्थलें भिन्न होऊन पर्वतांप्रमाणें एकाएकीं भूतलावर कोसळून पडत आहेत ! तसेच हे

मोठमोठे राजे क्षीणपुण्य होऊन स्वर्गस्थ देव जसे विमानांतून खालीं पडतात, तसे गजांवरून खालीं पडत आहेत ! कर्णा, सिंह ज्याप्रमाणें नानाविध पशूंचा संहार करितो, त्याप्रमाणें पार्थानें शत्रुसैन्याची अतिशय दाणादाण उडवून त्यांना व्याकुळ केलें आहे ! राधेया, मोठमोठ्या वीरांचा वध करून हा अर्जुन आतां तुझ्यावर येत आहे ! तर त्याच्यावर तूं आतां निकरानें धांवून जा ! पुष्कळ शत्रुपक्षीय वीरांचा नाश करणाऱ्या अर्जुनाच्या भीतीमुळें ही कौरवसेना सैरावैरा पळत आहे ! यासाठीं सर्व सैन्याला सोडून तुझा वध करण्यासाठींच अर्जुन इकडे त्वरेनें चाल करून येत आहे असें त्याच्या शरीराकारावरून मला वाटतें ! कर्णा, तूं वृकोदराला पीडिलेंस, त्यामुळें संतप्त अर्जुन तुझ्यावांचून दुसऱ्या कोणाशींहि युद्धाची इच्छा करणार नाहीं ! धर्मराजाला तूं विरथ व अत्यंत व्याकुळ केलेंस व शिखंडी, सात्यकि, धृष्टद्युम्न, द्रौपदेय, युधामन्यु, उत्तमौजा, नकुल आणि सहदेव यांना तूं युद्धांत विह्वल केलेलें ऐकून तो बलवान् शत्रुसंहारक एकरथ अर्जुन तुझ्यावर चालून येईल !

"राधेया, तुझ्याशिवाय त्याच्याशीं युद्ध करण्याला अन्य धनुर्धर वीर समर्थ नाहीं! अर्जुनाचा पृष्ठरक्षक किंवा पार्श्वरक्षक म्हणून त्याचा संरक्षणकर्ता अन्य वीर कोणी नाहीं, तो एकटाच तुझ्यावर चाल करून येत आहे, तर तूं त्याचा वध करून कृतार्थ हो ! या कृष्णार्जुनांशीं युद्ध करण्याला तूंच एक समर्थ आहेस ! अर्जुनाचा वध हेंच तुझें आतां उद्दिष्ट कार्य आहे, याकरितां त्याच्यावर चाल करून जा ! कर्णा, पराक्रमानें तूं भीष्म, द्रोण, अश्वत्थामा व कृप यांच्या बरोबरीचा आहेस; याकरितां या महारणांत तुझ्यावर चालून येणाऱ्या अर्जुनाचें तूं निवारण कर ! राधेया, अर्जुन हा जिभल्या चाटणाऱ्या सर्पाप्रमाणें किंवा हंबरणाऱ्या वृषभाप्रमाणें किंवा वनस्थित व्याघ्राप्रमाणें अतिभयंकर आहे ! यासाठीं त्याचा तूं वध कर ! अर्जुनाच्या भयामुळें हे महारथ कौरव व आपल्या जीविताविषयीं निराश झालेले राजे इतस्ततः पळत आहेत ! सूतनंदना, त्यांचें भय निवारण करण्याला तुझ्याशिवाय कोणीहि समर्थ नाहीं ! हे कौरव रणांत तुझ्यावर विश्वासून युद्ध करीत आहेत ! प्रसंगीं तूंच त्यांचें संरक्षण करशील असा त्यांना तुझा भरंवसा आहे ! कर्णा, वैदेह, अंबष्ठ, कांबोज, नग्नजित् व गांधार या अजिंक्य वीरांना जें धैर्य प्रकट करून तूं जिंकिलेंस, त्याच धैर्याचा अवलंब करून तूं अर्जुनावर चाल करून जा ! कर्णा, तूं आतां मोठ्या पौरुषानें कृष्णार्जुनांवर चाल करून त्यांचें निवारण कर !"

कर्ण—शल्या, तुझें भाषण नेहमींप्रमाणेंच आहे, तरी तें यासमयीं मला मान्य आहे! अर्जुनाची भीति तूं बाळगूं नकोस! तूं शस्त्रास्त्रांत निपुण अशा माझ्या बाहूंचें सामर्थ्य आज पहा! पुरुषश्रेष्ठा, आज मी एकटा पांडवांची महासेना व कृष्णार्जुन यांचा वध करीन, हें खचित जाण! युद्धांत त्या दोन वीरांचा वध माझ्या हातून आज जर झाला नाहीं, तर मी रणांतून परत मागें फिरणार नाहीं! युद्धांत जय कोणत्या पक्षाला प्राप्त होईल हें अनिश्चित असतें. यासाठीं, त्यांचा वध करून मी कृतार्थ तरी होईन किंवा त्यांच्या हस्तें मरण पावून मी या रणभूमीवर पडेन!

शल्य—कर्णा, रथश्रेष्ठ अर्जुन एकटा असतांहि युद्धांत अजिंक्य आहे, असें सर्व महारथ म्हणतात; मग कृष्ण साहाय्यकर्ता असल्यावर त्याला जिंकण्याला येथें कोण समर्थ आहे?

कर्ण—शल्या, मीं असें ऐकिलें आहे कीं, अर्जुनासारखा रथश्रेष्ठ वीर आजपर्यंत जगांत झाला नाहीं! अशा त्या रथोत्तम वीराशीं महान् संग्राम करून मी आज तुला माझें रणकौशल्य दाखवीन तें अवलोकन कर! हा पांडुपुत्र रथश्रेष्ठ अर्जुन शुभ्र अश्व जोडलेल्या रथांतून समरभूमीवर संचार करीत आहे; तो आज माझा युद्धांत वध करील किंवा मी त्याचा करीन! जर त्यानें मला वधिलें, तर माझ्या अंताबरोबर हे सर्व कौरवहि अंत पावले असें समजलें पाहिजे! शल्या, ह्या अर्जुनाच्या हातांना कधींहि घाम किंवा कंप येत नाहीं; त्यांच्यावर मोठमोठे मौर्वीकिण दिसत आहेत! त्याचीं आयुधें दृढ असून तो मोठा समर्थ व शीघ्र बाण सोडणारा आहे; त्याची बरोबरी करणारा अन्य योद्धा नाहीं! हा अर्जुन अनेक कंकपत्र बाण हातांत घेऊन शत्रूंवर सोडतो व ते कोसावरील शत्रूंवर जाऊन पडतात; त्याच्यासारखा पराक्रमी अन्य वीर पृथ्वीतलावर कोण आहे? खांडववनांत त्या अतिरथ वीरानें कृष्णसाहाय्यानें अग्नीला संतुष्ट करून त्यापासून गांडीव धनुष्य, श्वेत अश्व व घोष करणारा उग्र रथ, दोन दिव्य अक्षय तूणीर व दिव्य आयुधें प्राप्त करून घेतलीं व महात्म्या कृष्णानें सुदर्शन चक्र मिळविलें!

त्याप्रमाणेंच अर्जुनानें इंद्रलोकीं असंख्य कालकेय दैत्यांचा वध करून देवदत्त शंख संपादन केला! अशा त्या लोकोत्तर वीरापेक्षां दुसरा श्रेष्ठ ह्या पृथ्वीवर कोण आहे? त्या महानुभाव वीरानें त्या घोर युद्धांत आपला अस्त्रप्रभाव दाखवून प्रत्यक्ष शंकराला संतुष्ट करून त्यापासून त्रैलोक्यसंहारक असें घोर

पाशुपतास्त्र मिळविलें ! निरनिराळया लोकपालांनीं एकत्र होऊन युद्धामध्यें अप्रमेय शक्तीचीं महास्त्रें अर्जुनाला दिलीं व त्यांच्या साहाय्यानें त्यानें तत्काळ कालकेयादि सर्व असुरांचा वध रणांत केला ! त्याचप्रमाणें विराटनगरींत त्या एकट्या एकरथानें आम्हां सर्वांना जिंकून गोधनें हरण केलीं व महारथांपासून त्यांचीं वस्त्रें हिरावून घेतलीं ! शल्या, त्या वीर्यवान् व गुणवान् कृष्णासह रणांगणांत युद्धार्थ सज्ज असलेल्या राजश्रेष्ठ अर्जुनाला युद्धार्थ आह्वान करून मी सर्व लोकांना माझें विलक्षण सामर्थ्य दाखवीन ! त्या अनंतवीर्य केशवानें ज्याचें संरक्षण केलें आहे, अशा त्या अर्जुनाचे गुण अयुतावधि वर्षेपर्यंत लोकांना वर्णन करणें शक्य नाहीं ! शंख, चक्र व खड्ग हातांत धारण करणाऱ्या महासामर्थ्यवान् कृष्णाला व अर्जुनाला एका रथावर बसलेले पाहून मला मोठी भीति वाटत आहे ! शल्या, युद्धांत सर्व धनुर्धरांपेक्षां पार्थ श्रेष्ठ आहे व कृष्ण चक्रयुद्धांत अनुपमेय आहे ! ह्यांपुढें प्रत्यक्ष हिमवान् पर्वत देखील स्वस्थानापासून ढळेल ! मद्राधीशा, कृष्णार्जुन हे दोघेहि बलवान् शूर व महारथ असून त्यांचीं आयुधेंहि दृढ आहेत. माझ्याशिवाय त्यांच्यावर अन्य कोणता वीर चाल करून जाईल ? अर्जुनाशीं युद्ध करण्याचा माझा मनोरथ आतां लवकरच पूर्ण होईल ! मी तत्काळ त्यांच्याशीं अतुल्य व विचित्र युद्ध करीन ! आजच्या युद्धांत मी त्यांचा वध करीन किंवा ते माझा करतील हें निश्चित जाण !

( ४ ) संजय—याप्रमाणें त्या शत्रुसंहारक कर्णानें शल्याला बोलून मेघाप्रमाणें मोठी गर्जना केली ! तेव्हां राजा धृतराष्ट्रा, तुझ्या दुर्योधन पुत्रानें तेथें येऊन कर्णाचें अभिनंदन केलें ! त्यासमयीं कर्ण हा दुर्योधन, कृप, कृतवर्मा, सहानुज गांधारपति, अश्वत्थामा, पदाति व गजसादी या सर्वांना उद्देशून म्हणाला, ‘ वीरहो ! तुम्ही सर्व कृष्णार्जुनांवर चाल करून त्यांना घेरून टाका, व त्यांच्यावर सर्व बाजूंनीं सारखी शरवृष्टि करा ! म्हणजे तुमच्या प्रहारांनीं अत्यंत विद्ध झालेल्या त्या उभय वीरांचा मी सहज वध करीन !’ त्यावर ‘ ठीक ’ आहे असें म्हणून ते सर्व राजे अर्जुनावर शीघ्र धांवून गेले व कर्णाच्या आज्ञेनुसार त्यांनीं त्यावर शरवृष्टि सुरू केली ! राजा, तेव्हां महार्णव ज्याप्रमाणें नदी-नदांना ग्रस्त करितो, त्याप्रमाणें अर्जुनानें त्यांना युद्धांत ग्रस्त केलें ! त्यावेळीं अर्जुन धनुष्याला बाण केव्हां जोडीत असे व तो केव्हां सोडीत असे, हें शत्रूंना कळत नसे; परंतु धनंजयाच्या अस्त्रांनीं छिन्न होऊन कौरवांचे

सैन्यांतील अश्व, पदाति आणि गज रणभूमीवर तत्काल मरून पडत असत! राजा धृतराष्ट्रा, ज्याप्रमाणें नेत्रपीडा असलेल्या लोकांना सूर्याकडे पाहवत नाहीं, त्याप्रमाणें कल्पांतींच्या सूर्याप्रमाणें देदीप्यमान अर्जुनाकडे व शरवर्षाव करणाऱ्या त्याच्या त्या गांडीव धनुष्याकडेहि पहाणें कौरवांना शक्य झालें नाहीं!

कौरवसैन्यांतील महारथांनीं सोडलेले तीक्ष्ण बाण तो अर्जुन उलट आपल्या बाणांनीं छेदीत असे! पार्थिवेंद्रा, ज्याप्रमाणें ज्येष्ठ-आषाढ महिन्यांतील सूर्य सर्व जलौघांचें उदक हरण करितो, त्याप्रमाणें अर्जुन कौरवांचे सर्व बाण आकर्षण करून तुझ्या सैन्याला दग्ध करूं लागला! तेव्हां कृप, कृतवर्मा, तुझा पुत्र दुर्योधन व महारथ अश्वत्थामा हे पर्वतावर वृष्टि करणाऱ्या पर्जन्याप्रमाणें अर्जुनावर बाणांचा वर्षाव करीत चालून गेले! परंतु अर्जुनाचा वध करण्याकरितां त्यांनीं मोठ्या कुशलतेनें त्याच्यावर जे तीक्ष्ण बाण सोडले, त्या सर्वांचा अर्जुनानें आपल्या शरांनीं नाश केला व प्रत्येकावर तीन बाण सोडून त्यानें त्यांच्या वक्षःस्थलांवर प्रहार केला! त्या समयीं तो अर्जुन परिवेषयुक्त (खळें पडलेल्या) सूर्याप्रमाणें भासला! तेव्हां अश्वत्थाम्यानें धनंजयावर दहा, श्रीकृष्णावर तीन व अश्वांवर चार बाण सोडले आणि ध्वजाधिष्ठित कपीला नाराच बाणांनीं आच्छादिलें! तेव्हां अर्जुनानें उलट एका क्षुर बाणानें त्याच्या सारथ्याचें मस्तक, चार बाणांनीं चार अश्व, तीन बाणांनीं ध्वज यांचा संहार करून त्याचें धनुष्यहि तीन बाण सोडून रथांतून खालीं पाडलें! त्यामुळें अश्वत्थामा अति क्षुब्ध झाला आणि त्यानें मणि, वज्र व सुवर्ण यांनीं अलंकृत व तक्षक सर्पाप्रमाणें तेजस्वी दुसरें धनुष्य उचलून घेतलें व त्याला प्रत्यंचा जोडून तें सज्ज केलें! नंतर त्या द्रोणपुत्रानें कृष्णार्जुनांना अगदीं भिडून त्यांच्यावर मोठा भयंकर शरवर्षाव केला! तेव्हां कृप, भोज व दुर्योधन या महारथांनीं कृष्णार्जुनांच्या समोर उभें राहून अर्जुनावर शरवृष्टि सुरू केली व मेघ सूर्याला आच्छादून टाकतात, त्याप्रमाणें त्यांनीं अर्जुनाला आच्छादून टाकलें!

राजा, त्यासमयीं दुसरा कार्तवीर्यच कीं काय अशा त्या उग्रप्रतापी अर्जुनानें कृपाचें धनुष्य आणि बाण छेदून टाकले व त्याचे अश्व, ध्वज आणि सारथि यांचा संहार केला! पूर्वीं इंद्रानें बलीला जर्जर केलें होतें, त्याप्रमाणें त्यानें कृपाला शरवर्षावानें त्रस्त केलें! कृपाला निःशस्त्र

करून त्याचा ध्वज रणांगणांत पाडल्यावर अर्जुनानें पूर्वीं जशी भीष्मावर वृष्टि करून त्याला विह्वल केलें होतें, त्याचप्रमाणें त्यानें आतां कृपाला विद्ध केलें! नंतर त्या प्रतापी पांडुपुत्रानें गर्जना करणाऱ्या दुर्योधनाचा ध्वज आणि धनुष्य आपल्या बाणांनीं तोडून टाकलीं व कृतवर्म्याच्या उत्तम अश्वांना वधून त्याचाहि ध्वज तोडून टाकला! नंतर त्यानें त्वरेनें कौरवसैन्यांतले गज, अश्व, रथ यांचा त्यांवरील वीर, सारथि व ध्वज यांसह संहार केला! तेव्हां बांध फुटून पाणी जसें इतस्ततः वहातें, त्याप्रमाणें तुझें प्रबळ सैन्य भीतीनें सैरावैरा पळूं लागलें! त्या अर्जुनावर पुनः युद्धार्थ सज्ज झालेल्या कौरवसैनिकांनीं आपल्या रथांतून चाल केली! परंतु धनंजयावर समोरून चाल करणाऱ्या त्या शत्रूंचा शिखंडी, शैनेय, नकुल व सहदेव यांनीं निःपात केला व तीक्ष्ण शरांनीं त्यांना जर्जर करून मोठ्या जोरानें त्यांना मागें हटविलें व विजयानंदानें मोठी गर्जना केली! राजा धृतराष्ट्रा, त्या समयीं रणांगणांत कौरवांचें सृंजयांशीं घनघोर युद्ध सुरू होऊन त्या दोन्ही सैन्यांतील क्रुद्ध वीरांनीं एकमेकांवर तेजस्वी बाणांचा वर्षाव सुरू केला, त्यावेळीं देवदानवांचेंच युद्ध सुरू आहे असा भास झाला! हे परंतप धृतराष्ट्रा, जयोत्सुक व स्वर्गप्राप्त्यर्थ अत्युत्कंठ अशीं तीं कौरव-पांडवांचीं चतुरंग सैन्यें गर्जना करीत एकमेकांवर चाल करून गेलीं व शरवर्षाव करून एकमेकांचा संहार करूं लागलीं; तेव्हां त्या महात्म्या शूर योद्ध्यांनीं परस्परांवर इतकी बाणवृष्टि केली कीं, सर्व रणांगणांत त्या वृष्टीनें चोहोंकडे अंधकार पडला आणि दिशा, उपदिशा व सूर्यप्रभा ह्या सर्व त्या अंधकारांत लुप्त झाल्या! ८. ७९.

---

## अध्याय ८० वा.

[ १ संकुलयुद्ध. ]

(१) संजय—राजा धृतराष्ट्रा, त्या बलवान् कौरववीरांनीं भीमावर चाल करून त्याला संकटांत आणलें असतां त्यांतून त्याला मुक्त करण्याकरितां अर्जुन कर्णाचें सैन्य सोडून तिकडे गेला व बाणांचा वर्षाव करून शत्रुपक्षांतील वीरांना त्यानें यमलोकीं पाठविलें! त्यावेळीं अर्जुनाच्या बाणसमूहांनीं नभोमंडळ अदृश्य होऊन गेलें आणि तुझ्या सैन्याचा संहार सुरू झाला! पक्षिगणांनीं व्याप्त अंतरिक्ष बाणांनीं भरून महाबाहु अर्जुन कौरवसैन्याचा वध करीत

असतां प्रत्यक्ष यमाप्रमाणें भासूं लागला ! राजा, त्या समयीं अर्जुनानें भल्ल, क्षुरप्र व तीक्ष्ण नाराच बाण सोडून कौरवांचीं गात्रें व मस्तकें छेदिलीं ! आणि त्या छिन्नगात्र, कवचहीन व मस्तकहीन झालेल्या वीरांच्या पडलेल्या कलेवरांनीं ती सर्व रणभूमि आच्छादून टाकली !

राजा, त्यावेळीं पार्थाच्या शरांनीं अनेक रथ, अश्व, शकट व गज हे छिन्न-भिन्न होऊन सर्वत्र प्रसृत झाले होते; त्यामुळें ती रणभूमि महावैतरणी नदीप्रमाणें अतिदुर्गम, उंचसखल व अत्यंत घोर दिसूं लागली ! राजा, तेव्हां ईषा (रथभाग), चक्रें, अक्ष व भल्ल, अश्वहीन व अश्वारूढ योद्धे आणि ससूत व हतसूत असे रथ, या सर्वांनीं ती भूमि आच्छादित झाली ! सुवर्णकवचें घातलेले व अंगावर कनकालंकार धारण करणारे वीर ज्यांवर आरूढ झाले होते व माहूतांनीं ताडन केल्यामुळें जे क्रुद्ध झाले होते असे कवचें घातलेले व नित्य मदोन्मत्त असणारे चारशें गज अर्जुनानें बाणांचा वर्षाव करून त्या रणसंग्रामांत वधिले ! अर्जुनाच्या शरांनीं विद्ध होऊन ते गज जेव्हां मरून भूमीवर पडले, तेव्हां जणुंकाय ती रणभूमि पर्वतांचीं मोठमोठालीं शिखरें चोहोंकडे पडून आच्छादित झाली आहे असें वाटूं लागलें ! सूर्य ज्याप्रमाणें मेघांतून आपला मार्ग काढतो, त्याप्रमाणें तो अर्जुनरथ त्या सभोंवार पतन पावलेल्या मदस्रावी मेघतुल्य गजांमधून आपला मार्ग काढीत होता ! राजा, ह्याप्रमाणें गज, मनुष्यें, अश्व व रथ यांचा अनेक प्रकारांनीं विध्वंस करून त्यायोगें आणि वीरांचे देह, शस्त्रें, कवचें, यंत्रें व आयुधें यांनीं अर्जुनानें रणांगणांतील मार्ग बंद केला ! नंतर गांडीव धनुष्याचा भयंकर टणत्कार त्यानें सुरू केला ! त्यावेळीं अंतरिक्षांत भयप्रद मेघगर्जनाच सुरू झाली असें वाटलें ! तेव्हां अर्जुनाच्या तीक्ष्ण शरप्रहारांनीं जर्जर झालेल्या त्या कौरवसेनेची वाताहत होऊन समुद्रावर वादळांत सांपडलेल्या नौकेप्रमाणें तिची स्थिति झाली !

राजा, त्यावेळीं अर्जुनाच्या गांडीव धनुष्यापासून सुटलेल्या अनेकविध प्राणघातक बाणांनीं अलात, उल्का किंवा वीज ह्यांप्रमाणें तुझ्या सैन्याचा विध्वंस केला ! ज्याप्रमाणें रात्रीच्या वेळीं महावनांत वेळूंच्या वनाला अग्नि दग्ध करून टाकितो, त्याप्रमाणें अर्जुनाच्या शरांनीं तुझें सैन्य दग्ध होऊन मोठ्या अरण्यांत दावाग्नींत सांपडलेल्या मृगगणांप्रमाणें दशदिशांस पळून गेलें !

ह्याप्रकारें अर्जुनानें दग्ध केल्यावर कौरवसैन्यानें भीमसेनाला रणांगणांत सोडून पलायन केलें! नंतर अर्जुन भीमसेनाजवळ गेला आणि तेथें क्षणभर उभा राहिला! त्यानें भीमाला युधिष्ठिराचें कुशलवृत्त व स्वास्थ्य निवेदन करून पुढील कार्याबद्दल त्याचा विचार घेतला आणि नंतर भीमसेनाची अनुज्ञा घेऊन आपल्या रथाच्या आवाजानें अंतरिक्ष व पृथ्वी दुमदुमवीत तो पुनः युद्धार्थ निघाला! इतक्यांत दुःशासनापेक्षां कनिष्ठ अशा तुझ्या दहा शूर बलिष्ठ पुत्रांनीं अर्जुनाला वेढिलें व उल्का जशा गजाला जर्जर करितात, त्याप्रमाणें त्यांनीं अर्जुनाला बाणांनीं विद्ध करून सोडलें; नंतर आपलीं धनुष्यें आकर्ण ओढून ते शूर कौरववीर जणुंकाय नाचूं लागले! धृतराष्ट्रा, कृष्णानें त्यासमयीं आपला रथ एका बाजूला वळवून त्यांना आपल्या उजवीकडे घेतलें व अर्जुनानें त्यांचा तत्काळ वध केलाच असें त्याला वाटलें! राजा, त्यासमयीं त्या धार्तराष्ट्रांना अर्जुन माघारा गेला असें वाटलें व ते त्याच्यावर निकरानें धांवून गेले; परंतु अर्जुनानें त्यांचे ध्वज, अश्व, चाप व बाण आपल्या अर्धचंद्र व नाराच बाणांनीं तोडून टाकले व दुसरे दहा भल्ल बाण सोडून क्रोधानें आरक्तनेत्र व दांतओंठ खाणारीं तीं त्यांचीं मस्तकें तोडून भूमीवर पाडलीं! त्यावेळीं जमिनीवर पुष्कळ कमळेंच पसरलीं आहेत असें सर्वांना वाटलें! राजा धृतराष्ट्रा, ह्याप्रमाणें सुवर्णाचीं बाहुभूषणें धारण करणाऱ्या त्या दहा कौरवांचा दहा भल्ल बाणांनीं वध करून तो शत्रुनिषूदन अर्जुन पुढें निघाला! ८. ८०.

---

## अध्याय ८१ वा.

[ १ संकुलयुद्ध. २ भीमार्जुनांचा मोठा पराक्रम. ]

( १ ) **संजय**—धृतराष्ट्रा, तो अर्जुन मोठ्या वेगानें रथांतून पुढें जात असतां कौरवपक्षीय नव्वद वीर त्याजवर धांवून गेले आणि आम्ही युद्धविमुख झाल्यास आम्हांला परलोकगति मिळणार नाहीं अशी घोर प्रतिज्ञा करून नरव्याघ्र अर्जुनाला त्यांनीं घेरलें! कृष्णानें अर्जुनरथाचे वेगवान् व मुक्ताजालकांनीं आच्छादित शुभ्र अश्व कर्णाच्या रथाकडे चालविले! तेव्हां कर्णरथावर चालून येणाऱ्या त्या धनंजयावर संशप्तकांनीं सारखा बाणवर्षाव केला! अर्जुनानें त्या नव्वद संशप्तकांवर तीक्ष्ण शरवृष्टि करून त्यांचे सारथि,

धनुष्यें आणि ध्वज छेदून टाकिले आणि नंतर त्यांचाहि वध केला! अर्जुनाच्या नानाविध बाणांनीं हत झालेले ते संशप्तक वीर भूतलावर पडले असतां पुण्यक्षय होऊन स्वर्गांतील सिद्धच विमानांतून भूमीवर पडले आहेत, असें वाटलें! नंतर कौरवांनीं रथ, गज, अश्व व पदाति यांसह अर्जुनाला पुनः वेष्टिलें आणि त्याच्यावर शक्ति, ऋष्टि, तोमर, प्रास, गदा, खड्ग व बाण यांची सारखी वृष्टि करून तुझ्या पुत्राच्या सैन्यानें पांडवांचे पदाति, अश्व आणि मोठमोठे गज यांचा संहार करून अर्जुनाला अडवून ठेविलें! त्यावेळीं कौरवांनीं अंतरिक्षांत टाकलेल्या बाणजालांवर शरांचा वर्षाव करून सूर्य जसा किरणांनीं अंधकाराचा नाश करितो, त्याप्रमाणें त्यांचा अर्जुनानें नाश केला! तेव्हां तुझ्या पुत्राच्या आज्ञेवरून म्लेच्छांनीं तेराशें मदोन्मत्त गज अर्जुनावर घातले आणि कर्णी, नालीक, नाराच, तोमर, प्रास, शक्ति, मुसळें, भिंदिपाल इत्यादि आयुधें त्या रथस्थ अर्जुनावर टाकून त्याला विद्ध केलें! त्या म्लेच्छांनीं गजशुंडांनीं व स्वतः केलेल्या शरवृष्टीचा विनाश अर्जुनानें अर्धचंद्र व भल्ल बाणांनीं केला! तसाच वज्रप्रहारांनीं जसे पर्वत भग्न करून टाकावे, त्याप्रमाणें त्या सर्व गजांचाहि वरील आरूढ वीर व ध्वजपताका यांसह त्यानें नाश केला! अर्जुनाच्या हेमपुंख शरांनीं पीडित होऊन अग्निज्वाला टाकणाऱ्या प्रज्वलित पर्वतांसमान ते सुवर्णहारांनीं विभूषित गज भूमीवर मरून पडले! त्याकालीं हे राजा, अर्जुनाच्या गांडीवाचा घोष मोठ्यानें होऊं लागला आणि त्याबरोबरच मनुष्यें, गज व अश्व यांच्याहि गर्जना ऐकूं येऊं लागल्या! बाणांनीं पीडित झालेले गज आणि सारथिहीन झालेले अश्व चोहोंकडे पळत सुटले! वीर व अश्व हत झाल्यामुळें हजारों रथ मेघांसारखे सर्वत्र दिसूं लागले! चोहोंकडे पळत सुटलेले अश्वसादी तेथल्या तेथें अर्जुनाच्या बाणांनीं मरून पडले!

( २ ) राजा, यावेळीं एकट्या अर्जुनानें सादी, गज आणि रथ यांना जिंकून आपलें बाहुबल उत्तम प्रकारें व्यक्त करून दाखविलें! हे भरतर्षभा, नंतर कौरवांनीं गज, अश्व आणि रथ अशा तीन सैन्यविभागांनीं अर्जुनाला वेष्टिलें आहे असें भीमसेनानें पाहून आपल्याशीं युद्ध करणाऱ्या कित्येक वीरांना सोडून तो मोठ्या वेगानें अर्जुनरथाजवळ गेला व त्यानें अवशिष्ट राहिलेल्या प्रबल अश्वांस गदाप्रहारांनीं मारून टाकिलें! शत्रूंकडील नर, गज व अश्व यांचा असा संहार करून भीमानें अनेक कवचधारी अश्व व अश्वसादी यांवर गदा चालविली, तेव्हां ते रक्तदिग्ध होऊन मोठ्यानें आक्रोश करीत भूतलावर

पडले! त्यांचीं मस्तकें, अस्थि व चरण भंग पावून मांसभक्षक प्राण्यांस उत्तम भोजन मिळालें! आणि रक्त, मांस व वसा यांच्या सेवनानें ती गदाहि तृप्त झाली! त्यासमयीं नर, गज आणि अश्व यांचें भोजन करणारी ही भयंकर कालरात्रीच आहे, असें वाटूं लागलें!

राजा, अशाप्रकारें तो गदापाणि भीमसेन दशसहस्र अश्व आणि अगणित पत्तींचा नाश करून सर्वत्र संचार करीत असतां कालदंड हातांत घेऊन प्रत्यक्ष यमच आपल्यावर चालून येत आहे, असें तुझ्या वीरांस वाटलें! नंतर मदोन्मत्त गजाप्रमाणें क्षुब्ध झालेल्या पांडुनंदन भीमसेनानें मकरानें सागरांत प्रवेश करावा, त्याप्रमाणें शत्रूंच्या गजसैन्यांत प्रवेश केला आणि आपल्या प्रचंड गदेनें त्या सर्व सैन्याचा एका क्षणांत संहार केला! तेव्हां ते बाणपीडित मत्त गज आपणांवरील सादी व पताका यांसह रणांत पडूं लागले! तें पाहून सपक्ष पर्वतच भूतलावर पडत आहेत असें आम्हांस भासलें! त्या गजसेनेचा असा नाश करून भीमसेन पुनः रथारूढ झाला आणि अर्जुनाच्या पाठीमागून जाऊं लागला. तें कौरवसैन्य अत्यंत निरुत्साह होऊन युद्धपराङ्मुख झालें, परंतु चारी बाजूंनीं शस्त्रांचा प्रहार होऊं लागल्यामुळें तें थांबलें. त्या सैन्याची दुरवस्था पाहून अर्जुनानें त्यावर प्राणतापन बाणांचा वर्षाव करून त्यास आच्छादून टाकिलें. तेव्हां केसरांनीं जसे कदंब शोभतात, तसें तें कौरवांचें चतुरंग सैन्य शोभूं लागलें! हे राजा, अर्जुनाच्या शरांनीं पीडित होऊन त्या कौरवसैन्यांत हाहाकार उडाला आणि तें अलातचक्राप्रमाणें इतस्ततः संचार करूं लागलें!

नंतर कौरवांच्या प्रचंड सैन्याशीं अर्जुनाचें तुमुल युद्ध होऊन त्यांत कौरवांकडील सर्व रथ, सादी, अश्व आणि गज शरपीडित झाले! त्यांचीं कवचें बाणांनीं भग्न होऊन त्यांच्या शरीरांतून रुधिरस्राव होऊं लागून तें फुललेलें अशोकवनच आहे कीं काय, असें भासूं लागलें! त्या पराक्रमी अर्जुनाला रणांगणावर पाहून कर्णाच्या जीविताविषयीं कौरव निराश झाले आणि पार्थाचे शरसंपात आपणांस केवळ असह्य आहेत, असें पाहून आणि गांडीवधारी अर्जुनानें आतां आपणांला जिंकलेंच असें मानून त्यांनीं कर्णाला सोडलें आणि अर्जुनाच्या बाणांचे प्रहार सोशीत व मोठा आक्रोश करीत भयभीत होत्साते दाही दिशांना पळून गेले! अर्जुनानें त्यांवर शेंकडो बाण टाकून त्यांचा पाठलाग

केला, तेव्हां भीमसेनादिक सर्व पांडववीरांना मोठा आनंद झाला ! हे महाराजा, नंतर तुझे पुत्र कर्णरथाजवळ गेले; ते अगाध संकटसमुद्रांत बुडून मरत असल्याचें पाहून कर्ण त्यांना द्वीपासारखा आश्रयदायक झाला ! राजा, गांडीवधारी अर्जुनाच्या भीतीनें कर्णाच्या आश्रयास गेलेले ते वीर निर्विष सर्पाप्रमाणें लोकांस भासले ! मारिषा, कर्में करणारे जीव मृत्यूला भिऊन धर्माचा आश्रय करीत असतात, त्याप्रमाणें त्या कौरववीरांनीं अर्जुनाला भिऊन महाधनुर्धर कर्णाचा आश्रय केला आणि कर्णानेंहि त्या शरपीडित, रक्तपरिक्लिन्न व संकटावस्थेंत असलेल्या योद्ध्यांना 'वीरहो, भिऊं नका, मी निर्भय आहें, मजजवळ या,' असें सांगितलें !

राजा, तुझे सैन्याचा अर्जुनानें भंग केल्यावर तें पळत सुटल्याचें पाहून कर्ण दीर्घ निश्वास टाकूं लागला आणि त्यानें अर्जुनाचा वध करण्याचें निश्चित ठरविलें ! आपल्या प्रचंड धनुष्याची दोरी आकर्ण ओढून अधिरथपुत्र कर्ण पुनः पांचालांवर धांवून गेला ! तें पाहून त्या पांचालांनीं लाल डोळे करून मेघ पर्वताला जलवृष्टीनें झांकून टाकितात, त्याप्रमाणें शरवर्षावानें त्यांनीं त्या कर्णाला आच्छादून टाकिलें ! राजा धृतराष्ट्रा, तेव्हां कर्णानें सहस्रावधि बाण टाकून त्या पांचालांचा वध केला ! त्यासमयीं मित्रकार्याकरितां झटणारा सूतपुत्र पांचालांचा वध करूं लागला, तेव्हां त्यांच्या सैन्यांत मोठा हाहाकार उडाला ! ८. ८१.

---

## अध्याय ८२ वा.

[ १ संकुलयुद्ध. २ भीमदुःशासनयुद्ध. ]

( १ ) **संजय**—राजा धृतराष्ट्रा, त्या कवचधारी अर्जुनानें कौरवसैन्याचा पराभव केल्यावर वायु मेघपटलांना जसा उडवून टाकितो, त्याप्रमाणें त्या पळत सुटलेल्या पांचालांचा कर्णानें मोठी शरवृष्टि करून नाश केला ! कर्णानें अंजलिक बाण मारून पांचालांच्या सारथ्याला रथाखालीं पाडलें आणि त्याचे अश्व मारिले ! नंतर त्या कर्णानें शतानीक व सुतसोम यांवर भल्ल बाणांचा वर्षाव करून त्यांचीं धनुष्यें तोडून टाकिलीं ! त्यानें सहा बाण मारून धृष्टद्युम्नाला विंधिलें आणि रणांत मोठ्या वेगानें त्याच्या अश्वांना मारिलें ! त्यानंतर त्यानें सात्यकीच्या अश्वांचा वध केला आणि कैकेयराजपुत्र विशोक याला यमलोकीं पाठविलें ! राजपुत्र विशोक याचा कर्णानें वध केल्याचें पाहून

कैकेयाचा सेनापति उग्रकर्मा आवेशानें कर्णावर धांवून गेला आणि त्यानें उग्र वेगाचे बाण टाकून कर्णपुत्र प्रसेन याला विद्ध केलें ! तेव्हां कर्णानें तीन अर्धचंद्र बाण टाकून हंसतहंसतच त्या उग्रकर्म्याचे बाहू व मस्तक तोडून टाकिलीं ! त्याकाळीं कुन्हाडींनीं छेदलेला शालवृक्ष जसा एकदम पृथ्वीवर पडतो, त्याप्रमाणें उग्रकर्मा गतप्राण होऊन रथांतून खालीं कोसळला ! कर्णपुत्र प्रसेनानें त्या हताश्व सात्यकीवर तीक्ष्ण बाणांची वृष्टि करून त्यास आच्छादून टाकिलें व मोठ्या आनंदानें नृत्य करूं लागला; इतक्यांत सात्यकीच्याच बाणांनीं हत होऊन प्रसेन भूतलावर पडला !

पुत्रवध झाल्याचें पाहून कर्ण संतप्त झाला आणि सात्यकीचा वध करण्याच्या इच्छेनें 'शैनेया, हा पहा मेलास !' असें बोलून त्यावर त्यानें एक तीक्ष्ण बाण सोडला ! त्या बाणाचा शिखंडीनें तीन बाणांनीं छेद केला व दुसऱ्या तीन बाणांनीं त्यानें कर्णाला विद्ध केलें ! कर्णानें शिखंडीचें धनुष्य व ध्वज यांचा दोन बाण टाकून छेद केला आणि शिखंडीवर सहा बाण टाकून त्याला विद्ध केलें ! नंतर त्या संतप्त कर्णानें धृष्टद्युम्नपुत्राचें मस्तक छेदून टाकिलें ! तसेंच त्यानें सुतसोमावर एक तीक्ष्ण बाण टाकून त्याला विद्ध केलें ! अशाप्रकारें भयंकर संग्राम सुरू होऊन त्यांत धृष्टद्युम्नपुत्राचा वध झाला असतां श्रीकृष्ण अर्जुनाला म्हणाला, 'अर्जुना, आज कर्णाच्या हातून सर्व पांचालांचा वध होणार आहे ! तरी हे राजसिंहा, आतां त्वरा करून कर्णावर धांवून जा आणि त्याचा वध कर !' कृष्णाचें भाषण श्रवण करून अर्जुन हंसला आणि कर्णाच्या रथाकडे आपला रथ नेण्याविषयीं त्यानें कृष्णाला सांगितलें. नंतर गांडीवाचें आस्फालन करून व प्रत्यंचेचे टणत्कार करून अर्जुनानें बाणवृष्टीनें जिकडेतिकडे अंधकार केला आणि शत्रूचे नाग, अश्व, रथ आणि ध्वज यांचा विध्वंस केला ! त्या गांडीवाचा प्रतिध्वनि अंतरिक्षांत सर्वत्र होऊन सर्व पक्षी भीतीनें गिरिगुहांत लपून बसले ! त्यावेळीं भीमसेन अर्जुनाच्या पृष्ठभागाचें रक्षण करीत रथांतून त्यामागून येत होता. ते दोघे राजपुत्र नंतर कर्णावर धांवून गेले आणि त्यांनीं त्याशीं युद्ध आरंभिलें !

मध्यंतरीं त्या बलवान् सूतपुत्रानें सोमकांना गांठलें आणि त्यांच्यांशीं युद्ध आरंभिलें ! त्यानें सोमकांचे रथ, अश्व आणि गज यांचा वध करून सर्व दिशा बाणाच्छादित केल्या ! तें पाहून उत्तमौजा, जनमेजय आणि क्रोधाविष्ट झालेले

युधामन्यु व शिखंडी हे धृष्टद्युम्नासह गर्जना करीत आले व त्यांनीं बाणवृष्टि करून कर्णाला विद्ध केलें ! तथापि ते पांच पांचालवीर पंचेंद्रियार्थ जसे आत्मज्ञानी मनुष्याला निग्रहापासून ढळवूं शकत नाहींत, त्याप्रमाणें त्या वैकर्तन कर्णाला आपल्या रथापासून ढळवूं शकले नाहींत ! कर्णानें त्यांवर उलट शरवृष्टि करून त्यांचीं धनुष्यें, ध्वज, अश्व, सारथि आणि पताका यांचा विध्वंस केला आणि त्या पांचांना पांच बाणांनीं विद्ध करून सिंहासारखी मोठी गर्जना केली ! कर्ण बाणवृष्टी करीत असतां त्याच्या धनुष्याच्या टणत्काराच्या योगानें वृक्ष व पर्वत यांसह सर्व पृथ्वी विदीर्ण होऊन गेली असें पाहून सर्व लोक ग्रस्त झाले ! इंद्रधनुष्याप्रमाणें धनुष्य हातांत घेऊन जेव्हां कर्ण शत्रूंवर बाण सोडूं लागला, तेव्हां हा परिवेषवान् दुसरा सूर्यच शोभत आहे, असें लोकांस वाटलें ! तेव्हां कर्णानें बारा तीक्ष्ण बाण शिखंडीवर, सहा बाण उत्तमौजावर, तीन बाण युधामन्यूवर आणि सोमक व धृष्टद्युम्न यांवर तीन तीन बाण टाकून त्यांना विद्ध केलें !

हे मारिषा, त्या भयंकर संग्रामांत सूतपुत्र कर्णानें त्या पांचहि महारथांचा पराभव केला आणि आत्मवान् पुरुषापुढें जसे इंद्रियार्थ पराभूत होऊन जातात, त्याप्रमाणें कर्णापुढें ते हतवीर्य झाले. अशाप्रकारें कर्णसागरामध्यें ते पांच महारथ बुडाले आणि नावा समुद्रांत फुटून गेल्यामुळें व्यापाऱ्यांचा जसा सर्वतोपरी नाश होतो, त्याप्रमाणें त्यांचा संहार होत असतां नूतन नौकांप्रमाणें द्रौपदीपुत्र आपल्या मातुलांच्या साहाय्यार्थ रथांतून धांवून आले ! तेव्हां शनिप्रमुख सात्यकीनें तीक्ष्ण बाणांचा वर्षाव करून कर्णाचे बाणांचा भंग केला आणि तीक्ष्ण लोहबाणांनीं कर्णाला विद्ध करून तुझ्या ज्येष्ठ पुत्रावरहि आठ बाण टाकले ! तेव्हां सात्यकीवर कृप, कृतवर्मा, दुर्योधन आणि कर्ण ह्यांनीं तीक्ष्ण बाण टाकले ! त्यावेळीं सात्यकी आणि हे चार योद्धे यांमध्यें जें भयंकर युद्ध झालें, तें दिक्पाल आणि दैत्यपति यांमधील युद्धाप्रमाणेंच लोकांना अत्यंत दारुण वाटलें ! त्यासमयीं सात्यकीनें आपलें धनुष्य आकर्ण ओढून शत्रूंवर इतकी अमित बाणवृष्टि केली कीं शरत्कालाच्या माध्याह्नसूर्याप्रमाणें त्याजकडे कोणाच्यानेंहि नजर टाकवेना ! तेव्हां अंगांत कवचें घालून शिखंडिप्रभृति पांचाल वीर पुनः त्या सात्यकीच्या संरक्षणार्थ धांवून आले, आणि मरुद्गण इंद्राच्या साहाय्यार्थ येऊन जसा शत्रूंचा निग्रह करितात, त्याप्रमाणें त्यांनीं कौरवसैन्याशीं युद्ध आरंभिलें ! पूर्वीं देवदैत्यांमध्यें जसें दारुण

युद्ध झालें, त्याप्रमाणेंच कौरवपांडवांचें भयंकर युद्ध होऊन त्यांत रथ, गज आणि अश्व यांचा मोठा नाश झाला !

( २ ) राजा धृतराष्ट्रा, अशाप्रकारें युद्ध चाललें असतां तुझा पुत्र दुःशासन हा बाणवृष्टि करीत भीमावर धांवून गेला; तेव्हां महारुरूवर ज्याप्रमाणें सिंह उडी घालून जातो, त्याप्रमाणें वृकोदर ( भीम ) त्यावर चालून आला ! नंतर शंबर–शक्रांप्रमाणें परस्परांवर क्रोधाविष्ट होऊन ते प्राणांचा पण लावून द्यूत खेळूं लागले ! त्यानीं परस्परांवर उग्र शर टाकिले आणि मोठ्या आवेशानें युद्ध करूं लागले ! भीमसेनानें दोन क्षुर बाण टाकून दुःशासनाचें धनुष्य व ध्वज छेदून टाकिला आणि एक बाण त्याच्या ललाटप्रदेशीं मारिला ! त्यानें तुझ्या पुत्राच्या सारथ्याचें मस्तकहि उडवून टाकिलें ! मग दुःशासनानें दुसरें धनुष्य घेतलें आणि भीमसेनावर बाण मारले ! त्यानें स्वतः रथ चालविला आणि भीमावर मोठा शरवर्षाव करून त्याला आच्छादून टाकिलें ! मग सूर्य-किरणांप्रमाणें उज्ज्वल, सुवर्ण, हीरक इत्यादि रत्नांनीं विभूषित, इंद्रवज्राप्रमाणें सुदुःसह आणि भीमसेनाचें अंग विदारण करण्यास समर्थ असा एक बाण घेऊन त्यानें तो भीमावर टाकिला ! भीमसेन त्या बाणानें अतिविद्ध झाला आणि वीर्यहीन होऊन तो मृतवत् हात पसरून रथांतच मूर्च्छित पडला ! थोड्या वेळानें तो सावध झाला व मोठ्यानें गर्जना करूं लागला ! ८. ८२.

---

## अध्याय ८३ वा.

[ १ दुःशासनवध. २ भीमसेनप्रतिज्ञा. ]

( १ ) **संजय**—अशा रीतीनें भीमसेन व दुःशासन यांमध्यें तुमुल युद्धाला प्रारंभ होऊन त्यांत दुःशासनानें एक बाण सोडून भीमाचें धनुष्य छेदून टाकलें आणि साठ बाणांनीं त्याच्या सारथ्याचा वध केला ! नंतर त्यानें भीम-सेनावर तीक्ष्ण बाणांची सारखी वृष्टि सुरू केली. त्यामुळें भीमसेन क्रुद्ध होऊन त्यानें तुझ्या पुत्रावर आपली उग्रशक्ति सोडली ! ती अतिघोर शक्ति प्रज्वलित उल्केप्रमाणें आपल्यावर येत आहे, असें पाहून दुःशासनानें धनुष्याची दोरी आकर्ण ओढून व दहा बाण टाकून तिचा नाश केला. तें तुझ्या पुत्रानें केलेलें दुष्कर्म पाहून सर्व योद्धयांना मोठा आनंद होऊन त्यांनीं त्याची प्रशंसा केली !

नंतर तुझ्या पुत्रानें भीमावर एक तीक्ष्ण बाण सोडून त्याला विद्ध केलें. तेव्हां भीमसेन अत्यंत क्षुब्ध झाला आणि क्रोधानें दुःशासनाकडे पाहून त्याला म्हणाला, 'हे वीरा, तूं आज मला अत्यंत विद्ध केलेंस खरें, तरी माझा गदा-प्रहार तूं आतां सोस!' असें मोठ्यानें बोलून त्या भीमसेनानें दुःशासनाच्या वधाकरितां आपली गदा हातांत घेतली आणि तो पुनः बोलला, 'हे दुरात्मन्, तुझ्या रक्ताचें प्राशन मी आज युद्धामध्यें करणार आहें!' तें भाषण श्रवण करून तुझ्या पुत्रानें मूर्तिमंत मृत्युच अशी उग्र शक्ति मोठ्या वेगानें भीमसेना-वर सोडली! तेव्हां भीमानें मोठ्या क्रोधानें आपली अत्यंत घोर गदा तिजवर टाकली! त्या गदेनें शक्तीचें तत्काळ विदारण केलें आणि दुःशासनाच्या मस्तका-वर जाऊन ती आदळली! त्यावेळीं गजाच्या गंडस्थळांतून जसा मदस्राव होतो, त्याप्रमाणें त्या दुःशासनाच्या मस्तकांतून रुधिरस्राव होण्यास सुरवात झाली!

त्या तुमुल युद्धांत भीमसेनानें दुःशासनावर पुनः एकदां दुसरा वेगाचा गदा-प्रहार केला! त्यायोगानें दुःशासन दहा धनुष्यांच्या अंतरावर जाऊन पडला! गदेच्या वेगानें तो विह्वल होऊन कांपूं लागला! त्याचें कवच, आभरणें, वस्त्रें आणि माळा ह्यांचा चुराडा होऊन गेला आणि वेदनांनीं अत्यंत विह्वल होऊन तो तळमळूं लागला! हे राजा, त्या घनघोर युद्धांत भीमाच्या गदाप्रहारानें दुःशासनाचे अश्व व सारथि मारले जाऊन त्याच्या रथाचेंहि अगदीं चूर्ण होऊन गेलें! दुःशासनाची ती अवस्था पाहून सर्व पांचाल हृष्ट होऊन मोठमोठ्यानें सिंहनाद करूं लागले! त्या दुःशासनाला अशा रीतीनें पाडल्यावर दाही दिशा दुमदुमून जातील, अशी मोठी गर्जना भीमसेनानें केली. तिच्या योगानें समीप-भागीं युद्ध करणारे सर्व योद्धे मूर्च्छित झाले! नंतर भीमसेन आपल्या रथांतून तत्काल उतरून दुःशासनावर मोठ्या वेगानें धांवून गेला! त्या समयीं दुःशास-नाला आपल्या समोर पाहून रजस्वला द्रौपदीचें त्यानें केलेलें केशग्रहण व वस्त्रहरण ह्या गोष्टींची त्याला आठवण झाली; तसेंच कौरवांनीं तिला अनेकवार दिलेलीं दुःखें यांचीहि त्याला स्मृति होऊन अग्नींत घृत टाकलें असतां तो जसा जोरानें पेटतो त्याप्रमाणें भीम क्रोधानें अतिसंतप्त झाला! आणि तो कर्ण, दुर्योधन, कृप, अश्वत्थामा आणि कृतवर्मा ह्यांस म्हणाला, 'आज मी ह्या पापी दुःशासनाचा वध करीत आहें, तर हे समस्त वीरहो, तुमच्या कोणाच्या अंगांत ह्याला सोडविण्याचें सामर्थ्य असल्यास ह्याचें मज-पासून रक्षण करा!'

असें बोलून दुःशासनाचा वध करण्याच्या इच्छेनें तो बलवान् भीमसेन त्यावर मोठ्या वेगानें धांवून गेला आणि सिंह जसा महागजाला हांहां म्हणतां पकडतो, त्याप्रमाणें कर्ण व दुर्योधन यांच्यासमक्ष त्या दुःशासनाला त्यानें धरलें व जमिनीवर पाडलें! नंतर त्यानें आपला खड्ग हातांत घेऊन त्याच्या कंठावर पाय ठेवला! तेव्हां दुःशासन थरथर कांपत होता! तेव्हां भीमसेन त्याला म्हणाला, ' हे दुरात्मन्, कर्ण-दुर्योधनांदेखत मोठ्या आनंदानें आम्हांला ' गाय ' म्हणणारा तूंच ना? राजसूय यज्ञामध्यें अवभृथस्नानानें पवित्र झालेले याज्ञसेनी द्रौपदीचे केश तूं कोणत्या हातानें ओढलेस, तें सांग पाहूं! हा भीमसेन तुला विचारीत आहे!'

भीमसेनाचें तें कठोर भाषण ऐकून दुःशासनानें भीमसेनाकडे पाहिलें आणि मोठ्या संतापानें कौरव-सोमकांसमक्ष डोळे गरगर फिरवून भीमाला म्हटलें, ' भीमा, हाच तो गजशुंडेप्रमाणें पुष्ट, हजारों गाईंचें दान करणारा आणि क्षत्रियांचा विनाशक असा हात; ह्यानेंच हे भीमा, मी याज्ञसेनीचे केश मुख्य-मुख्य कौरव आणि तुमचे सभासद यांच्यासमक्ष ओढले!' ह्याप्रमाणें राजपुत्र दुःशासनाचें भाषण श्रवण करतांच भीमानें दुःशासनाच्या वक्षःस्थलावर जोराचा आघात करून आणि आपल्या दोन्ही हातांनीं त्याला घट्ट धरून मोठी गर्जना केली आणि सर्व योद्धयांना उद्देशून म्हणाला, ' वीरहो, मी आतां ह्या दुःशासनाचा हात उपटून काढीत आहें, तर ज्याला सामर्थ्य असेल, त्यानें येऊन ह्याचें संरक्षण करावें!'

राजा धृतराष्ट्रा, असें बोलून प्राण सोडण्याच्या बेतांत आलेल्या त्या दुःशासनाला मोठ्या वेगानें जमिनीवर आपटून आपल्या वज्रसदृश हातानें भीमानें त्याचा भुज उपटून काढला आणि त्याचा वध केला! त्यावेळीं समरांगणावर पडलेल्या त्या वीराचें वक्षःस्थल त्यानें विदारून त्यांतील कोमट रक्ताचें प्राशन केलें आणि नंतर हे राजा, त्यानें खड्गाचा प्रहार करून तुझ्या पुत्राचें मस्तक तोडून टाकलें! आपली प्रतिज्ञा सत्य करून दाखविणारा तो भीमसेन वारंवार दुःशासनाच्या रक्ताचा स्वाद घेऊन क्रोधानें त्याजकडे पाहत म्हणाला, ' मातेचें दुग्ध, मधु, घृत, उत्तम माध्वीक मद्य, दिव्य उदक, दुग्ध-दधि घुसळून काढलेलें लोणी किंवा पृथ्वीतलावर सुधा, अमृत यांप्रमाणें जीं जीं दुसरीं गोड पेयें आहेत, त्या सर्वांहून या शत्रुरुधिराची गोडी कितीतरी अधिक आहे म्हणून

सांगूं ?' नंतर तो उग्रकर्म करणारा भीमसेन क्रोधसंतप्त होऊन त्या गतप्राण झालेल्या दुःशासनाकडे पाहून स्मित करून पुनः म्हणाला, 'काय करूं रे ! मृत्यूनें तुझें रक्षण केलें म्हणून सुटलास !' असें बोलून दुःशासनाचें रक्त प्राशन करण्याकरितां मोठ्या आनंदानें धांवून जाणाऱ्या त्या भीमसेनाला ज्यांनीं ज्यांनीं पाहिलें, ते सर्व भयानें व्यथित होऊन तेथें भूतलावर धाडकन् पडले ! जे कित्येक पडले नाहींत, त्यांच्या हस्तांतून शस्त्रें गळून पडलीं; ते मोठ्या भयानें ओरडूं लागले आणि डोळे अर्धोन्मीलित करून सभोंवतीं पाहूं लागले ! ज्यांनीं ज्यांनीं भीमसेनाला दुःशासनाचें रक्त प्राशन करतांना पाहिलें ते सर्व 'हा भीम मनुष्य नव्हे' असें म्हणून भयानें व्याकुल होऊन तेथून पळून गेले ! भीमाचें तें भयंकर स्वरूप व त्यानें केलेलें दुःशासनाचें रुधिरप्राशन अवलोकन करून चित्रसेनासह सर्व लोक भयार्त झाले व हा खरोखर राक्षस असला पाहिजे, असें म्हणत त्यांनीं तेथून पलायन केलें !

चित्रसेन राजपुत्र पळून जात आहे, असें पाहून युधामन्यु सैन्यासह त्याजवर धांवून गेला आणि त्यानें त्याजवर सात तीक्ष्ण बाण टाकले ! चित्रसेनानें सर्पा-प्रमाणें क्रुद्ध होऊन त्या पांचाल वीरांवर तीन व त्याच्या सारथ्यावर सहा बाण टाकून त्यांना विद्ध केलें ! तेव्हां युधामन्यु क्षुब्ध होऊन त्यानें एक तीक्ष्ण बाण आकर्ण ओढून चित्रसेनावर टाकला व त्याचें शीर्ष छेदून टाकिलें ! चित्रसेन अशाप्रकारें वध पावला असतां त्याचा बंधु कर्ण हा क्रोधाविष्ट होऊन पांडव-सेनेवर चालून आला, परंतु अमितपराक्रमी नकुलानें त्याचा प्रतिकार केला !

इकडे त्या दुःशासनाला मारून व त्याच्या रक्ताची ओंजळ भरून सर्व वीरां-च्यासमक्ष भीम मोठ्यानें म्हणाला, "हे पुरुषाधमा, हें पहा तुझ्या कंठांतील रुधिराचें प्राशन मी करीत आहें ! अरे, पुनः एकदां 'गाय रे गाय' असें म्हण पाहूं ! तेव्हां 'गाय रे गाय' असें आम्हांला म्हणून जे नाचले, त्यांच्यापुढें तेच शब्द बोलून आज आम्ही नाचत आहों ! प्रमाणकोटींत माझें शयन, कालकूटाचें मला घातलेलें भोजन, सर्पांकडून मला करविलेला दंश, लाक्षागृहांत आमचा केलेला दाह, द्यूत करून आमचा राज्यापहार, अरण्यांतील आमची वसति, द्रौपदीचें केशग्रहण, रणांतील बाणप्रहार, गृहीं भोगावीं लागलेलीं दुःखें, विराट-नगरींतील नानाविध क्लेश, यांना कारण शकुनि, दुर्योधन आणि राधेय कर्ण हे होत. आणि त्या सर्वांना मसलत देणारा तूंच आहेस ! दुःशासना, पुत्रांच्या

सांगण्यावरून धृतराष्ट्रानें आमच्याशीं जो दुष्टपणा दाखविला त्यामुळें आम्हांला नानाविध दुःखें भोगावीं लागलीं व सुखाचा कधीं लवलेशहि प्राप्त झाला नाहीं!"

(२) असें बोलून तो विजयी भीमसेन जेथें कृष्णार्जुन होते, तेथें आला आणि पुनः त्यानें मोठ्या आनंदानें तेंच भाषण त्यांसमोर केलें. त्यासमयीं त्याचें सर्व अंग रक्तानें माखलें असून त्याच्या मुखांतून रुधिरस्राव होत होता! नंतर तो क्रोधसंतप्त भीम म्हणाला, 'कृष्णार्जुनहो, दुःशासनाच्या वधासंबंधी केलेली प्रतिज्ञा मीं आज सत्य करून दाखविली आहे! आतां राहिलेला दुसरा यज्ञपशु जो दुर्योधन त्यालाहि मी लवकरच वधीन आणि त्याचें मस्तक सर्व कौरवांच्या समक्ष पायांखालीं रगडीन तेव्हांच माझें समाधान होईल!' असें भाषण करून तो रक्तानें माखलेला भीमसेन मोठ्या आनंदानें गर्जना करूं लागला! तेव्हां वृत्रासुराचा वध करून महात्मा इंद्रच गर्जना करीत आहे कीं काय असें सर्वांस वाटलें! ८. ८३.

---

## अध्याय ८४ वा.

[ १ दुःशासनाचे दहा बंधूंचा वध. २ नकुल-वृषसेनयुद्ध. ३ नकुलपराजय. ]

( १ ) संजय—राजा धृतराष्ट्रा, दुःशासनाचा वध झाला असतां, कधींहि युद्धपराङ्मुख न होणारे तुझे दहा महारथपुत्र निषंगी, कवची, पाशी, दंडधार, धनुर्धर, अलोलुप, सह, षंढ, वातवेग व सुवर्चस् हे अत्यंत क्रोधाविष्ट झाले आणि बंधूवरील संकटानें एकत्रित होऊन त्यांनीं भीमावर बाणवृष्टि केली व त्याला मागें हटविलें. त्यामुळें भीम अत्यंत क्षुब्ध झाला आणि क्रोधाग्नीनें आरक्तनेत्र होऊन अंतकाप्रमाणें शोभूं लागला! नंतर त्यानें सुवर्णपुंख दहा भल्लबाण टाकून त्या दहा धार्तराष्ट्रांस यमलोकीं पाठविलें! तेव्हां कर्णादेखत तुझें सैन्य पांडवांच्या भीतीनें पळून गेलें! महाराजा, तेव्हां प्राण्यांचा संहार करणाऱ्या अंतकाप्रमाणें भीमाचा पराक्रम पाहून कर्णहि भयभीत होऊन गेला! तें पाहून रणशाली शल्य कालाला अनुसरून कर्णाला बोलला कीं, "कर्णा, असा भिऊन जाऊं नकोस! हें तुला शोभत नाहीं! हे पहा राजे भीमाच्या भीतीनें आर्त होऊन पळून जात आहेत! हा पहा दुर्योधन बंधूंच्या वधानें व्याकुल होऊन मूर्च्छित झाला

आहे ! महात्मा भीमसेन दुःशासनाचें रक्त प्राशन करूं लागतांच शोकाकुल झालेले कृपप्रभृति वीर व अवशिष्ट बंधु दुर्योधनासभोंवतीं गोळा होऊन त्याचें समाधान करीत आहेत ! पांडवांना आपलें लक्ष्य साध्य झाल्यासारखें वाटत आहे ! त्यामुळें अर्जुनप्रभृति शूर वीर तुझ्याशीं युद्ध करण्याकरितां उपस्थित झाले आहेत ! म्हणून हे पुरुषश्रेष्ठा, तूं पौरुषाचा आश्रय कर आणि क्षात्रधर्माला अनुसरून अर्जुनाला सामोरा जा ! आतां दुर्योधनानें सर्व भार तुजवर टाकिला आहे; तरी हे महाबाहो, तूं यथाशक्ति व यथासामर्थ्य तो धारण कर ! जय मिळाल्यास तुझी मोठी कीर्ति होईल व पराजय झाला असतां स्वर्गप्राप्ति होईल ! हा तुझा पुत्र वृषसेन पहा, तूं मोहित झाल्याचें पाहून संतप्त होऊन तो पांडवांवर चालून जात आहे !"

( २ ) राजा धृतराष्ट्रा, शल्याचें असें भाषण श्रवण करून कर्णानें पांडवांशीं युद्ध करण्याचा निश्चय केला. इतक्यांत क्रोधाविष्ट झालेला वृषसेन यमदंडाप्रमाणें हातांत गदा घेऊन तुझ्या वीरांशीं युद्ध करणाऱ्या भीमावर चालून गेला. तेव्हां नकुलानें त्याला गांठून पूर्वी जंभासुराच्या वधाकरितां इंद्रानें त्यावर जशी बाणांची वृष्टि केली, तशी वृष्टि करून एका क्षुर बाणानें त्याचा स्फटिकध्वज छेदून टाकिला आणि एका भल्लानें त्याचें सुवर्णभूषित धनुष्यष्टि तोडिलें ! तेव्हां त्या अस्त्रकुशल कर्णपुत्र वृषसेनानें दुसरें धनुष्य घेतलें आणि त्या नकुलावर दिव्यास्त्रांची वृष्टि चालविली ! त्यासमयीं हे राजा, तो शरवृष्टि करणारा वृषसेन क्रोधानें इतका संतप्त झाला कीं, जणुंकाय आज्याहुतींनीं अग्निच भडकला आहे असें वाटूं लागलें ! नंतर वृषसेनानें श्वेतवर्ण नकुलाचे सर्व सुवर्णविभूषित वनायुज अश्व मारून टाकिले, त्यामुळें तो पांडुपुत्र नकुल अश्वहीन यानांतून खालीं उतरला आणि ज्यावर सुवर्णचंद्रिका बसविल्या आहेत असें चर्म ( ढाल ) व आकाशसदृश खड्ग धारण करून तो अंतरिक्षांतून पक्ष्यासारख्या घिरट्या घालूं लागला. अशा रीतीनें त्या चित्रयोधी नकुलानें कौरवांचे रथ, अश्व व गज यांना अश्वमेधांतील पशूंप्रमाणें खड्गानें मारून टाकिलें ! एकट्या त्या जयेच्छु नकुलानें त्या युद्धांत दोन हजार युद्धनिपुण वीरांचा वध केला ! तेव्हां वृषसेनानें त्या नकुलावर चारी बाजूंनीं बाणवृष्टि केली. त्या बाणांनीं नकुल विद्ध झाला; तथापि आपणाला बंधु भीमसेनाचें साहाय्य आहे, ही गोष्ट लक्ष्यांत आणून त्यानें युद्ध करून मोठा पराक्रम गाजविला ! नकुल कौरवांचे अनेक पदाति, अश्व, गज व रथ यांचा संहार

करीत असतांना पाहून कर्णपुत्रानें मोठ्या संतापानें अठरा बाण टाकून त्याला विद्ध केलें !

( ३ ) राजा धृतराष्ट्रा, त्यासमयीं आमिषाचा लोभ धरून श्येन पक्षी जसा पंख पसरून वेगानें धांवून येतो, त्याप्रमाणें पांडुपुत्र नकुल रणांत वृषसेनावर एकाएकीं चालून आला ! तेव्हां वृषसेनानें तीक्ष्ण बाणांची वृष्टि नकुलावर केली, परंतु नकुलानें ते त्याचे सर्व बाण व्यर्थ घालविले व खड्ग-चर्म धारण करून तो रणांत संचार करूं लागला. हे राजा, तेव्हां वृषसेनानें भयंकर शर-वृष्टि करून नकुलाच्या हातांतील चर्म छेदून टाकिलें आणि नंतर सहा तीक्ष्ण बाणांनीं त्याचें तें उग्र, तीक्ष्ण धारेचें, भारक्षम, शत्रुप्राणहारक, सर्पाप्रमाणें उग्ररूपी विकोश खड्ग तोडून टाकिलें ! पुनः दीप्त बाण टाकून त्यानें त्याचें वक्षःस्थलहि विद्ध केलें ! अशाप्रकारें त्या वृषसेनानें रणांगणांत इतरांना दुष्कर व आर्यांस मान्य असें कर्म करून दाखविलें, तेव्हां तो शरपीडित नकुल मोठ्या त्वरेनें सिंह जसा पर्वतशिखरावर उडी मारून जातो, तसा भीम-सेनाच्या रथावर चढून बसला ! तें पाहून त्या वृषसेनानें क्रोधसंतप्त होऊन एकाच रथांत बसलेल्या त्या दोघांहि भीमसेन-नकुलांवर सारखी बाणवृष्टि केली ! अशाप्रकारें त्या नकुलाचा रथ भग्न करून वृषसेनानें बाणांनीं त्याचें खड्गहि छेदून टाकिलें ! नंतर दुसऱ्या कौरववीरांनीं एकत्र होऊन त्या पांडव-वीरांवर मोठा शरवर्षाव केला ! नंतर आह्वान केलेल्या अग्नीप्रमाणें भीमार्जु-नांनीं सभोंवतीं जमलेल्या कौरवसेनेवर व वृषसेनावर मोठी भयंकर शरवृष्टि केली ! तेव्हां अर्जुनाच्या ध्वजावरील मारुति त्याला म्हणाला, ‘ अर्जुना, ह्या नकुलाला वृषसेनानें कशी पीडा दिली आहे तें आधीं पहा ! हा कर्णपुत्र आम्हांला अत्यंत पीडा देत आहे, तर प्रथम त्याजवर धांवून जा ! ’ तें भाषण श्रवण करून अर्जुनानें आपला रथ भीमाच्या रथाजवळ नेला ! नकुलानें अर्जुन आपल्याजवळ आल्याचें पाहून म्हटलें ‘ अर्जुना, त्या कर्णपुत्राचा प्रथम वध कर ! ’ असें नकुलानें सांगतांच अर्जुनानें आपला रथ वृषसेनाकडे त्वरित चालव, म्हणून कृष्णाला सांगितलें ! ८. ८४.

## अध्याय ८५ वा.

[ १ संकुलयुद्ध. २ वृषसेनाचा वध. ]

( १ ) **संजय**—राजा धृतराष्ट्रा, नकुलाचें खड्ग व धनुष्य भग्न झालीं, तो विरथ झाला, शत्रूच्या बाणप्रहारांनीं त्याला विह्वल करून सोडलें, कर्णपुत्राच्या अस्त्रांनीं त्याला पराजित केलें, हें वृत्त समजतांच द्रुपदराजाचे पांच प्रबळ पुत्र, सात्यकी व द्रौपदीचे पांच पुत्र रथांत बसून वृषसेनावर त्वरेनें धांवून आले. त्यांच्या रथचक्रांचा निर्घोष मोठा होत असून त्यावरील पताका वायूनें फडकत होत्या. त्यांनीं विषारी सर्पांप्रमाणें प्राणहारक बाण सोडून तुझ्या चतुरंग सैन्याचा संहार आरंभिला ! तेव्हां तुझ्या सैन्यांतील प्रमुख वीर कृप, हार्दिक्य, अश्वत्थामा, दुर्योधन, शकुनिसुत, वृक, क्राथ व देवावृध यांनीं गज किंवा मेघ यांप्रमाणें गर्जना करणाऱ्या रथांतून तीक्ष्ण बाणांचा त्यांवर वर्षाव करून त्या अकरा वीरांना जागच्याजागीं अडवून ठेविलें ! तेव्हां पांडवपक्षीय कुलिंदांनीं गिरिशिखरांप्रमाणें आपले प्रचंड गज त्यांवर सोडले ! त्या गजांवर रणेच्छु योद्धे अधिष्ठित झाले असून त्यांच्या पृष्ठभागीं सुवर्णाचीं जाळीं घातलीं होतीं, त्यामुळें ते आकाशांत शोभणाऱ्या सविद्युत् मेघांप्रमाणें दिसत होते ! नंतर कुलिंदराजपुत्रानें दहा बाण टाकून कृप, त्याचा सारथि व पुत्र यांना विद्ध केलें ! तें पाहून कृपानें त्याजवर शरवृष्टि करून त्याचा गजासह वध केला; मग कुलिंदपुत्राचा धाकटा बंधु सूर्यकिरणाप्रमाणें तेजस्वी तोमरांचा प्रहार करीत कृपाच्या रथावर चालून गेला आणि मोठ्यानें तो गर्जना करीत असतां गांधारपतीनें त्याचें मस्तक उडविलें ! याप्रमाणें कुलिंदांचा नाश झाला असतां तुझ्या महारथांना मोठा आनंद होऊन ते शंख वाजवूं लागले व आपापलीं धनुष्यें घेऊन शत्रूवर चालून गेले ! नंतर पुनः कौरव आणि पांडु-सृंजय ह्यांचें मोठें दारुण युद्ध जुंपलें ! त्यांत शर, खड्ग, शक्ति, गदा, ऋष्टि, परश्वध, इत्यादि आयुधांचे प्रहार होऊं लागून दोन्ही सैन्यांत अश्व, गज व पदाति यांची भयंकर प्राणहानि झाली व दोहोंकडील चतुरंग सैन्य नाश पावून भूतलावर पडलें ! तेव्हां विद्युद्युक्त मेघसमुदाय सोसाट्याच्या वाऱ्यानें दिशांस उधळून लावल्यासारखें लोकांस वाटलें ! नंतर भोजाधिपतीनें शतानीकाच्या मोठमोठ्या गजांवर, रथांवर, अश्वांवर व पदातींवर चालून जाऊन मोठी बाणवृष्टि केली, त्यायोगें ते क्षणांत गतप्राण होऊन पडले !

राजा धृतराष्ट्रा, इतक्यांत द्रोणपुत्र अश्वत्थाम्यानें आयुधें, पताका आणि योद्धे

यांनीं युक्त अशा तीन गजांवर बाणवर्षाव करून इंद्र जसा वज्राघातानें महा-पर्वताला पाडतो, त्याप्रमाणें त्यांना भूतलावर पाडिलें ! तेव्हां कुलिंदपुत्राच्या कनिष्ठ बंधूनें तुझ्या पुत्राच्या वक्षःस्थळीं तीक्ष्ण बाण मारले ! तुझ्या पुत्रानेंहि तत्काळ तीक्ष्ण शरवृष्टि करून त्याचा व त्याच्या गजाचा वध केला ! त्यामुळें तो राजपुत्र व त्याचा गज ह्यांच्या शरीरांतून रक्तस्राव होऊन, वर्षाकाळाच्या प्रारंभीं गैरिक पर्वतांतून जसें आरक्त उदक वाहत असतें, त्याप्रमाणें रुधिरप्रवाह वाहूं लागले ! त्यासमयीं कुलिंदपुत्राचा दुसरा एक गज क्राथ, त्याचा सारथि, अश्व आणि रथ यांवर चालून गेला ! तें पाहून क्राथानें त्याजवर शरवृष्टि केली, तेव्हां तो गज अधिपतीसह हत होऊन पडला !

राजा धृतराष्ट्रा, इकडे एका पर्वतवासी गजारूढ वीरानें त्या क्राथाधि-पतीवर शरवृष्टि केली ! तीमुळें महावातानें प्रचंड वृक्ष भूमीवर कोसळून पडतो, त्याप्रमाणें तो क्राथराज अश्व आणि रथ यांसह भूमीवर पडला ! वृकानें त्या वीरावर बारा बाण मारून त्याला विद्ध केलें ! तेव्हां त्या गजारूढ वीरानें आपला गज त्या वृकावर घातला. त्या गजानें वृकाला, अश्व आणि रथ यांसह आपल्या चार पायांखालीं तुडवून त्यांना मारलें ! त्या नागराजाला व त्याजवरील वीराला बभ्रुसुतानें भयंकर बाणवृष्टि करून खालीं पाडलें ! त्यालाहि सहदेवपुत्रानें बाण मारून भूतलावर लोळविलें ! नंतर त्या कुलिंदज वीरानें दंतादिकांनीं मोठमोठ्या प्रबल योद्धांचा नाश कर-ण्यास समर्थ असा आपला गज शकुनीच्या वधाकरितां त्यावर घातला ! त्यानें शकुनीवर चालून येऊन त्याला पीडित केलें; परंतु त्या गांधारपति शकुनीनें त्याचें मस्तक छेदून टाकिलें ! तें पाहून शतानीकानें तुझे मोठमोठे गज, अश्व, रथ आणि पदातिसमूह यांचा नाश केला ! तेव्हां गरुडाला पाहतांच जशी सर्पांची तारांबळ उडून जाते, तसा तुझ्या सैन्याचा संहार उडून ते रणभूमीवर पतन पावले ! तुझ्या सैन्याची ती दुर्दशा पाहून तुझ्या पक्षांतील कलिंगपुत्रानें नकुलपुत्रावर स्मितपूर्वक बाण सोडून त्याला विद्ध केलें; परंतु त्या नाकुलानें एका क्षुर बाणानें त्याचेंच कमलसदृश मुख छेदून टाकिलें !

( २ ) नंतर कर्णसुतानें शतानीकावर, अर्जुनावर आणि भीमावर प्रत्येकीं तीन, नकुलावर सात व जनार्दनावर बारा बाण सोडले ! तें त्याचें अमानुष कर्म पाहून कौरव हर्षभरित होऊन त्याचे गुण गाऊं लागले ! परंतु धनंजयाच्या शौर्याचें ज्यांना ज्ञान होतें, त्यांना मात्र ‘ हा आतां अग्निकुंडांत पडला ’ असें वाटूं लागलें !

नंतर त्या शत्रुविनाशक अर्जुनानें माद्रीसुत नकुल हा अश्वहीन व कृष्ण अत्यंत विद्ध झाल्याचें पाहून कर्णाच्या अग्रभागीं असलेल्या वृषसेनावर चालून जाऊन त्यावर सहस्रावधि बाणांची वृष्टि केली ! तें पाहून वृषसेन पूर्वी नमुचि जसा महेंद्रावर धांवून गेला, त्याप्रमाणें अर्जुनावर धांवून गेला आणि त्यानें त्याला एक तीक्ष्ण बाण मारून विद्ध केलें ! यावेळीं पूर्वी नमुचीनें इंद्राला विद्ध करून जशी मोठी गर्जना केली होती, तशी वृषसेनानें गर्जना केली ! आणि अर्जुनाच्या डाव्या खांद्यावर उग्र बाण सोडून कृष्णावरहि नऊ बाण टाकले ! आणखी पुनः त्यानें दहा बाण टाकून अर्जुनाला विद्ध केलें ! तेव्हां अर्जुनानें क्रोधाविष्ट होऊन वृषसेनाचा वध करण्याचा निश्चय केला !

राजा धृतराष्ट्रा, नंतर त्या महात्म्या अर्जुनानें वृषसेनाचा वध योजून रणाग्रभागीं त्यावर तीक्ष्ण बाणवृष्टि चालविली. डोळे आरक्त करून प्रत्यक्ष यमाचाहि नाश करण्याविषयीं समर्थ त्या अर्जुनानें मोठ्यानें हंसून दुर्योधन व अश्वत्थामादिक योद्धे यांसमक्ष कर्णाला म्हटलें, "कर्णा, तुझ्यादेखत मी आज रणांत तीक्ष्ण बाणांनीं वृषसेनाचा वध करणार आहें ! तुम्हीं सर्वांनीं मिळून माझ्या पुत्राचा वध केला, ही अनुचित गोष्ट तुम्हीं केली, असें सर्व लोक म्हणत आहेत; कारण तो त्यावेळीं एकटा असून मीहि जवळ नव्हतों ! वृषसेनाचा वध मी तुम्हां सर्वांसमक्ष करणार आहें ! वीरहो, मी ह्या वृषसेनाचा वध करितों, तुम्ही सामर्थ्य असल्यास त्याचें रक्षण करा ! वृषसेनाच्या वधानंतर हे मूढ कर्णा, तुझाहि वध मी रणांत करणार ! कर्णा, सर्व कलहाचें कारण तूंच असून दुर्योधनाच्या आश्रयानें तुला मोठा गर्व झाला आहे ! आज तुझा वध मी करीन, आणि ज्याच्या अनयानें हा एवढा मोठा क्षय झाला, त्या दुर्योधनाचा वध भीमसेन करील !"

राजा, असें बोलून अर्जुनानें आपल्या धनुष्यावरून हात फिरविला आणि वृषसेनावर नेम धरून त्याच्या वधाकरितां त्याजवर सारखा शरवर्षाव सुरू केला ! अर्जुनानें दहा बाण वृषसेनाच्या मर्मस्थलीं मारून आणखी चार क्षुर बाण टाकून त्याचें धनुष्य, भुज आणि मस्तक हीं छेदून टाकलीं ! त्यासमयीं पर्वताग्रावरून वाऱ्यानें सुपुष्पित शालवृक्ष जसा कोसळून पडावा, त्याप्रमाणें तो विबाहु व मस्तकहीन वृषसेन रथांतून भूमीवर एकदम पडला ! राजा, आपल्या डोळ्यांदेखत झालेल्या पुत्राच्या वधानें कर्ण संतप्त होऊन कृष्णार्जुनांवर एकदम धांवून गेला ! ८. ८५.

---

## अध्याय ८६ वा.

[ १ श्रीकृष्णार्जुनभाषण. ]

( १ ) **संजय**—राजा धृतराष्ट्रा, क्षुब्ध सागर जसा मर्यादेवर धांवून जातो, त्याप्रमाणें देवांनाहि अनिवार असा कर्ण आपल्यावर धांवून येत असल्याचें पाहून दाशार्ह कृष्ण हंसून अर्जुनाला म्हणाला, "अर्जुना, ज्याचे अश्व शुभ्र आहेत, ज्याचा सारथि शल्य आहे, असा हा कर्ण रथांत बसून आपल्यावर चालून येत आहे, तर आतां त्याच्याशीं तुला युद्ध करावयाचें आहे, हें ध्यानांत आणून चित्त स्थिर ठेव ! अर्जुना, कर्णानें आपल्या रथावर युद्धसामुग्री कशी सिद्ध करून ठेवली आहे ती पहा ! हा राधासुत रथांत बसला असून त्या रथाला शुभ्र अश्व जोडले आहेत, नानाप्रकारच्या पताकांनीं तो शोभत आहे, घागऱ्यांच्या माळा रथाभोंवतीं सर्वत्र लोंबत आहेत आणि जणुंकाय आकाशांतून विमानच जात आहे कीं काय असें लोकांस वाटावें अशा रीतीनें ते श्वेत अश्व रथ चालवीत आहेत !

"त्या महात्म्या कर्णाचा आकाशांतील इंद्रधनुष्याप्रमाणें शोभणारा हा नागकक्ष ध्वज पहा ! दुर्योधनाचें प्रिय करण्याची इच्छा करणारा हा कर्ण अगदीं आपल्या जवळ आला पहा ! पर्जन्यधारांप्रमाणें आमच्यावर हा शरधारा सोडीत आहे पहा ! हा पहा मद्रराज शल्य त्याच्या रथाग्रीं सारथ्यकर्म करीत आहे ! त्या अतुलविक्रमी राधेयाच्या अश्वांचें नियमन त्यानें कसें केलें आहे पहा ! त्याच्या दुंदुभीचा निर्घोष आणि भयंकर शंखाचा शब्द ऐकूं येत आहे पहा ! अर्जुना, हे सर्वत्र होणारे सिंहनाद ऐक ! हा पहा कर्णाच्या धनुष्याच्या प्रत्यंचेचा ध्वनि ऐकूं येत आहे ! हे पहा पांचालमहारथ आपापल्या वीरांसह पळून जात आहेत ! तें पाहून महावनांत क्रुद्ध झालेल्या सिंहापुढें पळत सुटणाऱ्या मृगांची आठवण होते ! कौंतेया, तुझ्या अंगीं जें सामर्थ्य असेल, तें सर्व खर्ची घालून ह्या सूतपुत्र कर्णाला आधीं मारून टाक ! कर्णाची शरवृष्टि सहन करणारा तुझ्याशिवाय दुसरा कोणी दिसत नाहीं ! अर्जुना, देव, असुर, गंधर्व यांसह चराचर तीनहि लोक जरी तुझ्याशीं युद्ध करण्यास आले, तरी त्यांनाहि जिंकण्याला तूं समर्थ आहेस, हें मला विदित आहे ! भयंकर, उग्र, त्रिनेत्र, कपर्दी, महात्म्या शंकराकडे नुसतें पहाणेंहि ज्यांना कठीण, ते लोक त्याच्याशीं युद्ध करण्याला कसे बरें समर्थ होतील ? परंतु सर्व प्राणिवर्गांचें

कल्याण करणाऱ्या त्या प्रत्यक्ष महादेवाशीं युद्ध करून तूं त्याची आराधना केलीस! त्यामुळें सर्व देवांनीं प्रसन्न होऊन तुला वर दिले आहेत! तरी तूं नमुचीला जसें इंद्रानें वधिलें, त्याप्रमाणें कर्णाचा वध कर! पार्था, तुझें सर्वदा कल्याण असो आणि समरांत तुला जयप्राप्ति होवो!"

अर्जुन—कृष्णा, जय हा मला मिळणार, यांत संशय नाहीं. कारण हे मधुसूदना, सर्वलोकगुरु अशा तुझी प्रसन्नदृष्टि मजवर आहे! महारथा, आतां माझे अश्व चालव! आज हा अर्जुन समरांत कर्णाचा वध केल्याशिवाय कधींहि मागें फिरणार नाहीं! माझ्या शरांनीं कर्णाच्या शरीराचे झालेले तुकडे तुझ्या दृष्टीस पडतील किंवा कर्णशरांनीं मी तरी हत झालेला तुला दिसेन! ह्या उपस्थित झालेल्या त्रैलोक्यमोहन व घनघोर युद्धाचें वर्णन पृथ्वी आहे, तोंपर्यंत सर्व लोक करीत राहतील!

राजा, कृष्णाला असें सांगितल्यावर तो अर्जुन गजावर जसा दुसरा गज धांवून जातो, त्याप्रमाणें कर्णावर तत्काल चालून गेला! तेव्हां अर्जुन श्रीकृष्णाला बोलला, 'हे अरिंदम कृष्णा, अश्व शीघ्र चालव, विलंब होत आहे!' नंतर श्रीकृष्णानें अर्जुनाला जयाशीर्वाद देऊन रथाचे अश्व मनोवेगानें हांकिले आणि तो रथ कर्णरथाच्या अग्रभागीं आणून उभा केला! ८. ८६.

## अध्याय ८७ वा.

[ १ कर्णार्जुनांची भेट. २ कर्णार्जुनयुद्धवर्णन. ३ युद्ध पाहण्याकरितां शंकर, ब्रह्मदेव यांचें आगमन. ४ अर्जुनाचा जय होईल, म्हणून शंकराचें इंद्रास आश्वासन. ५ देव-गंधर्वादिकांस झालेला आनंद व पुनः युद्धारंभ. ६ कर्णवधसंबंधीं अर्जुनप्रतिज्ञा. ]

( १ ) संजय—राजा, वृषसेनाचा वध झालेला पाहून कर्णाचा शोक व क्रोध अनावर झाला आणि पुत्रशोकानें नयनांतून वाहणारे अश्रू त्यानें पुसून काढले! तो तेजस्वी कर्ण तत्काल अर्जुनासमोर येऊन उभा राहिला आणि मोठ्या क्रोधानें त्यानें त्याला युद्धार्थ आह्वान केलें! त्या दोन्ही महावीरांचे ते सूर्यसदृश व व्याघ्रचर्मवेष्टित रथ एके ठिकाणीं पाहून जणुंकाय ते दोन सूर्यच एकत्र झाले आहेत, असें सर्वांस वाटलें! ते शत्रुसंहारक दिव्य वीर आकाशां-

तील एकत्रित झालेल्या चंद्रसूर्यांप्रमाणें शोभूं लागले ! हे मारिषा, अशा त्या कर्णार्जुनांस पाहून सर्व सैन्यें अत्यंत आश्चर्यचकित होऊन गेलीं ! त्यांना पाहून सर्वांना त्रैलोक्यविजयाकरितां युद्ध करणाऱ्या इंद्र व वैरोचन बली यांची आठवण झाली ! रथांचे निर्घोष, प्रत्यंचांचें आस्फालन, तलत्राणप्रहार, बाणध्वनि आणि वीरांचे सिंहरव ऐकून आणि त्या कर्णार्जुनांचे ध्वज एकमेकांशीं अगदीं भिडलेले पाहून सर्व राजांना मोठा विस्मय वाटला ! सर्व पार्थिवांनीं सिंहनाद केला व त्यांनीं दोन्ही वीरांचे धन्यवाद गाइले ! त्या दोघां वीरांचें द्वैरथयुद्ध पाहून सहस्रावधि योद्ध्यांनीं आपले बाहु हर्षानें थोपटिले, आणि टाळ्या वाजविल्या ! कर्णाच्या उत्तेजनार्थ कौरवांनीं चारी बाजूंनीं वाद्यघोष केले आणि सर्वत्र शंक फुंकले ! पांडवांनींहि अर्जुनाच्या प्रोत्साहनार्थ रणवाद्यें व शंख यांच्या निनादानें दशदिशा दणदणावून सोडल्या !

(२) रथाधिष्ठित ते रथिश्रेष्ठ प्रचंड धनुष्यें, शर, शक्ति इत्यादि आयुधें घेऊन एकमेकांचा वध करण्याविषयीं अत्यंत उत्सुक दिसत होते; त्यांनीं अंगांत कवचें घातलीं असून त्यांच्या कमरेला खड्ग बांधले होते ! त्यांच्या रथांचे अश्व शुभ्र असून त्यांनीं सुंदर शंख धारण केले होते; त्यांचे तूणीर उत्कृष्ट होते; शरीराला रक्तचंदनाची उटी दिली असून ते दोघे मत्त वृषभांप्रमाणें दिसत होते; नानाप्रकारचीं शस्त्रें घेऊन ते युद्ध करीत होते; त्यांच्या मस्तकांवर शुभ्रछत्रें झळकत असून त्यांवर चामरें ढाळलीं जात होतीं; कर्णार्जुनांच्या रथांवर शल्य व कृष्ण हे सारथ्य करीत होते; त्या दोघांहि वीरांचे स्कंध सिंहस्कंधांप्रमाणें पुष्ट असून त्यांचे बाहु दीर्घ होते; त्यांचीं रूपें समान असून त्यांनीं आपले डोळे क्रोधानें लाल केले होते; त्यांच्या गळयांत सुवर्णमाला शोभत असून वक्षःस्थल विशाल होतें; ते अत्यंत बलवान् असून गोष्ठांतील वृषभांप्रमाणें एकमेकांवर धांवून जात होते; मदस्राव करणाऱ्या गजांप्रमाणें ते क्षुब्ध झाले असून पर्वताप्रमाणें भव्य दिसत होते; ते सर्पशावकांप्रमाणें चपल असून यमाप्रमाणें भयंकर होते; इंद्रवृत्राप्रमाणें ते परस्परांवर क्रुद्ध झालेले होते; ते चंद्रसूर्यांप्रमाणें कांतिमान् दिसत होते; महाग्रहांप्रमाणें ते अत्यंत खवळून जाऊन जणुंकाय जगताच्या प्रलयाकरितांच उद्युक्त झाले आहेत, असें भासत होतें; ते दोघे योद्धे एकमेकांशीं भिडून व्याघ्राप्रमाणें युद्ध करीत आहेत, असें तुझ्या वीरांनीं पाहिलें, तेव्हां त्यांना मोठा आनंद झाला, परंतु युद्धांत जय कोणाचा होईल हें कोणालाच सांगतां येणें शक्य नव्हतें. दोघेहि कर्णार्जुन

वीर उत्कृष्ट आयुधें धारण करून रणांगणावर पराक्रम गाजवीत होते. दोघेहि आपल्या बाहुशब्दानें नभस्तल व्याप्त करून टाकीत होते. शंबर व इंद्र यांप्रमाणें ते रणांत आपलें बल व युद्धसामर्थ्य प्रकट करीत होते. दोघेहि कार्तवीर्याप्रमाणें किंवा दाशरथि रामाप्रमाणें अतुल शौर्य दाखवीत होते. ते विष्णूप्रमाणें किंवा शंकराप्रमाणें युद्धांत आपलें वीर्य व्यक्त करीत होते. अशा त्या वीरांना पाहून सिद्ध-चारणसंघांना मोठा विस्मय वाटला !

राजा धृतराष्ट्रा, त्यासमयीं तुझे पुत्र त्या रणभूषण कर्णाला वेढून राहिले; तसेच धृष्टद्युम्नादि पांडववीरहि मोठ्या आनंदानें त्या अद्वितीय अर्जुनवीराच्या सभोंवतीं मंडलाकार उभे राहिले ! हे राजेंद्रा, तेव्हां कौरव-पांडव कर्णार्जुनांस पणास लावून जणुंकाय द्यूतच खेळत आहेत, असें वाटलें ! तीं दोन्हीं कौरवपांडवसैन्यें प्रेक्षक होऊन कोणाचा जय होतो व कोणाचा पराजय होतो हें पहात होतीं ! रणाग्रभागीं स्थित असणाऱ्या त्या दोघां वीरांपैकीं कोणीतरी एकाचा जय होणार असून दुसऱ्याचा पराजय होणार होता ! तरी ते युद्धशाली कर्णार्जुन युद्धांत स्थिरतेनें परस्परांच्या वधाची इच्छा करून इंद्रवृत्रांप्रमाणें युद्ध करीत होते ! धूमकेतूंप्रमाणें भयंकर रूपें धारण करून ते युद्ध करीत होते ! हे राजा, त्यावेळीं अंतरिक्षांत जमलेल्या भूतगणांमध्यें कर्णार्जुनासंबंधीं बोलणीं निघून कोणी कर्णाच्या बाजूचें तर कोणी अर्जुनाच्या बाजूचें बोलत असत. आकाश हें कर्णजयाकरितां व पृथ्वी अर्जुनजयाकरितां मातेप्रमाणें अत्युत्सुक होऊन बसलीं होतीं; तसेंच गिरि, समुद्र, नद्या, वृक्ष, ओषधि हीं सर्व अर्जुनाच्या जयाची इच्छा करीत होतीं, तर असुर, यातुधान व गुह्यक हे मोठ्या आनंदानें कर्णाचें यश चिंतीत होते ! ऐरावत, कामधेनु आणि भोगी ( सर्प ) हे अर्जुनाच्या पक्षाचे होते, तर क्षुद्र सर्प हे कर्णपक्षाचे होते. ईडामृग ( लांडगे ), वन्यपशु, मृग व पक्षी, तसेच वसु, मरुत्, साध्य, रुद्र, विश्वेदेव, अश्विनीकुमार, अग्नि, सोम, इंद्र, पवन व दश दिशा हीं सर्व अर्जुनजयाची इच्छा करीत असून सर्व आदित्य आणि वैश्य, शूद्र, सूत आणि संकरजाति कर्णाच्या बाजूच्या होत्या. देव, पितर, यम, कुबेर, वरुण, ब्राह्मण, क्षत्रिय व यज्ञ यांनीं अर्जुनाचा आश्रय केला होता, तर प्रेत, पिशाच्च, हिंस्र प्राणी, जलजंतु, कस्तूरीमृग, राक्षस, कुत्रीं, कोल्हे यांनीं कर्णपक्ष स्वीकारला होता. देवर्षि, ब्रह्मर्षि व राजर्षि आणि तुंबुरुप्रमुख गंधर्व हे अर्जुनाचें यश चिंतीत होते.

( ३ ) राजा, कर्णार्जुनांचें तें युद्ध पाहण्याकरितां देव, दानव, गंधर्व आणि अप्सरा यांचे समूह, त्याचप्रमाणें मोठमोठे वेदवेत्ते ऋषि कौतुकानें तेथें जमले होते. ब्रह्मदेव, ब्रह्मर्षि व प्रजापति यांसह तेथें आला असून शंकरहि आपल्या दिव्य यानांतून प्राप्त झाला होता. कर्णार्जुनांचें परस्परांशीं युद्ध चाललें असतां 'अर्जुन कर्णाला जिंको,' असे इंद्राच्या तोंडून व 'अर्जुनाला युद्धांत जिंकून कर्ण विजयी होवो,' असे सूर्याचे तोंडून उद्गार निघाले. त्यावर 'माझा पुत्र अर्जुनाचा वध करून युद्धांत विजयी होणार,' व 'माझा पुत्र धनंजय हा रणांगणावर कर्णाला मारून यशस्वी होवो' अशा प्रकारचा संवाद त्या देवश्रेष्ठ सूर्य व इंद्र यांमध्यें सुरू झाला. कर्णार्जुन परस्परांशीं युद्धार्थ भिडले असतां देवर्षि, चारण, सर्व देवगण व सर्व भूतें यांसह निखिल त्रैलोक्य कांपूं लागलें ! सर्व देव अर्जुनाच्या बाजूचे व सर्व असुर कर्णाच्या पक्षाचे होते. त्यावेळीं कर्णार्जुन ह्यांपैकीं अखेर विजयी कोण होणार, ह्यासंबंधीं मोठा निकराचा विवाद उत्पन्न होऊन देवांनीं प्रार्थनापूर्वक स्वयंभू प्रजापतीला विचारिलें, "ह्या कुरुपांडव वीरांपैकीं कोण बरें विजयी होईल ? ह्या दोघांहि पुरुषश्रेष्ठांची बरोबरी होवो ! ह्या कर्णार्जुनांच्या युद्धांत कोणाचा विजय होणार ह्यासंबंधानें सर्व जगत् संशयित झालें आहे. ह्यास्तव ह्या दोघांपैकीं खरोखर कोणाचा विजय होणार हें तूं आम्हांला सांग ! स्वयंभो, हे दोघे समान पराक्रम करून दाखवितील असें होवो !"

( ४ ) राजा, तें देवांचें भाषण ऐकून इंद्रानें ब्रह्मदेवाला नमस्कार करून म्हटलें, 'भगवन् , कृष्णार्जुनांचाच सर्वदा जय होणार असल्याचें आपण पूर्वीं सांगितलें आहे; तर आतां तसें घडो, आपली कृपा मजवर असावी, आपणांला माझा नमस्कार असो !' तेव्हां ब्रह्मदेव व शंकर त्या त्रिदशेश्वर इंद्राला म्हणाले, "त्यानें खांडववनांत अग्नीला संतुष्ट केलें आणि हे शक्रा, स्वर्गीं येऊन तुला साहाय्य केलें, तेव्हां जय त्या अर्जुनालाच निःसंशय मिळणार आहे ! शिवाय इंद्रा, कर्ण हा दानवपक्षाचा असल्यामुळें त्याचा पराजय अवश्य झाला पाहिजे ! असें केल्यानें देवांचें कार्य निश्चित होणार आहे ! त्रिदशेश्वरा, प्रत्येकाला आत्मकार्य साधणें महत्वाचें आहे आणि धनंजय हा सर्वदा सत्य व धर्म यांचे पालनांत अत्यंत तत्पर असतो, म्हणून त्यालाच जय मिळेल, यांत संशय नाहीं. हे शतलोचना, ज्यानें भगवान् शंकराला संतुष्ट केलें असून ज्याचें सारथ्य जगत्प्रभु विष्णु स्वतः करीत आहे, त्याला जय मिळणार नाहीं, असे कसें होईल ?

इंद्रा, अर्जुन हा अत्यंत बलवान् असून शूर आहे; तो महात्मा तपोनिष्ठ असून अस्त्रविद्याप्रवीण आहे; तो महातेजस्वी असून त्याचे अंगीं सर्व गुण वसत आहेत; तसाच तो धनुर्वेदपारंगत आहे! त्यानें केलेलें कार्य देवकार्य आहे, कर्तव्य करीत असतां वनवासादि अनेक प्रकारचे क्लेश पांडवांनीं सोशिले आहेत; तसाच हा अर्जुन आपल्या अंगच्या तपःसामर्थ्यामुळें कोणतेंहि कार्य करण्यास योग्य आहे. प्रतिकूल दैवाचीहि तो पर्वा करणार नाहीं! हे कृष्णार्जुन कोणत्याहि कारणावरून क्षुब्ध झाले तर जगाची मर्यादा नाहींशी होईल! कारण हे दोघे पुरुषश्रेष्ठच सर्व जगताचे उत्पत्तिकर्ते आहेत! नरनारायण म्हणून प्रसिद्ध जे पुरातन ऋषिसत्तम ते हेच होत! ह्या परंतप पुरुषश्रेष्ठांचें नियमन कोणीहि करूं शकणार नाहीं. स्वर्गांत काय किंवा मृत्युलोकांत काय, ह्यांसमान दुसरा कोणी सांपडणार नाहीं. देवर्षि व चारण ह्यांसह तिन्ही लोक ह्या दोघांनाच अनुसरतात. सर्व देव आणि सर्व भूतें त्यांच्याच तंत्रानें चालत असतात, इतकेंच नव्हे, तर अखिल जगत् यांच्याच प्रभावानें चालत असतें. पुरुषश्रेष्ठ कर्ण हा उत्तम लोकाला जावो! वैकर्तन कर्ण हा शूर आहे, तरी विजय हा कृष्णार्जुनांसच मिळणें योग्य आहे! कर्णानें वसुलोकीं, मरुलोकीं किंवा द्रोण-भीष्मांबरोबर स्वर्गलोकीं रहावें!

(५) अशाप्रकारचें ब्रह्मदेव व शंकर यांचें भाषण झाल्यावर इंद्रानें सर्व भूतगणांना म्हटलें, 'ब्रह्मदेव व शंकर ह्यांनीं सांगितलेलें तुम्हीं ऐकलेंच आहे, त्यांच्या सांगण्याप्रमाणें सर्व कांहीं घडून येईल व त्यांतच जगताचें हित घडून येईल. तुम्ही सर्व निर्धास्त रहा!' ह्याप्रमाणें देवेंद्राचें भाषण श्रवण करून सर्व भूतगणांना मोठा विस्मय वाटला आणि त्यांनीं त्याचा मोठा आदर केला. देवांनीं हर्षभरानें त्याजवर सुगंधी पुष्पांची वृष्टि केली आणि ते नानाप्रकारचीं वाद्यें वाजवूं लागले. देव, दानव आणि गंधर्व इत्यादि सर्व त्या नरसिंहांचें—अर्जुन-कर्णांचें—द्वैरथयुद्ध पाहण्यासाठीं तेथें राहिले. त्या दोघांहि वीरांचे रथांना शुभ्र अश्व जोडले होते आणि ते प्रहृष्ट दिसत होते. त्यावेळीं कृष्णार्जुनांकडील योद्ध्यांनीं, तसेंच कर्ण-शल्यांच्या वीरांनीं पृथक्पृथक् शंखनाद केले. नंतर त्या कर्णार्जुनांमध्यें भीरुजनांची भीति वृद्धिंगत करणारें शक्र-शंबरांप्रमाणें भयंकर युद्ध सुरू झालें! प्रलयकालीं आकाशांत दिसणाऱ्या राहु-केतूंप्रमाणें त्या दोघां वीरांचे रथस्थित निर्मल ध्वज शोभूं लागले. कर्णाच्या ध्वजावरील सर्पसदृश, इंद्रधनुष्याप्रमाणें भासमान होणारी रत्नखचित हस्तिकक्षा (सांखळ-

दंड) भयंकर दिसत होती, तर अर्जुनाचा ध्वजस्थित मारुति अंतकाप्रमाणें मुख पसरून बसला होता. आपल्या दंष्ट्रांनीं आणि उग्र कांतीनें सूर्याप्रमाणें तो दुर्निरीक्ष्य होऊन लोकांना भिववीत होता! तो वेगवान् कपि युद्धोत्सुक होऊन कर्णाच्या ध्वजावर जाऊन बसला आणि गरुड जसा सर्पाचें विदारण करितो, त्याप्रमाणें त्यानें ती दृढ हस्तिकक्षा नखांनीं आणि दंतांनीं विदीर्ण केली. तेव्हां ती हस्तिकक्षा कालपाशाप्रमाणें क्षुब्ध होऊन त्या कपीवर धांवून गेली आणि कर्णार्जुनांचे द्वैरथयुद्धापूर्वी त्या ध्वजांचेंच युद्ध सुरू झालें!

राजा धृतराष्ट्रा, त्या दोन्ही दळांतील वीरांचे अश्व परस्परांशीं स्पर्धा करून खिंकाळूं लागले. कृष्ण व शल्य हे दोघे परस्परांकडे क्रोधदृष्टीनें पाहूं लागले. शेवटीं कृष्णाच्याचनयन बाणांनीं शल्याला जिंकून टाकिलें. तेव्हां कर्ण हंसत हंसत शल्याला म्हणाला, 'शल्या, या युद्धांत यदाकदाचित् अर्जुनाच्या हातून माझा वध झाला, तर तूं पुढें काय करशील?' त्यावर शल्य बोलला, 'कर्णा, जर अर्जुनाच्या हातून तुझा वध झाला, तर मी एकरथानेंच त्या दोघांहि कृष्णार्जुनांचा वध करीन!'

(६) संजय—राजा, अर्जुनानेंहि तसाच प्रश्न कृष्णाला विचारला असतां कृष्ण हंसत बोलला, 'पार्था, मी तुला खरें सांगतों. कर्णानें तुला वधणें ही गोष्ट म्हणजे सूर्य स्वस्थानापासून च्युत होणें किंवा महासागरानें सुकून जाणें किंवा अग्नीनें शैत्य धारण करणें यांसारखीच होय. इतकें असूनहि तसें घडलें, तर सर्व त्रैलोक्याचा नाश होईल. तसें झाल्यास मीच कर्ण व शल्य यांचा बाहुबलानें वध करीन!' श्रीकृष्णाचें हें भाषण ऐकून अर्जुन हंसला आणि कृष्णाला म्हणाला, "जनार्दना, कर्ण व शल्य या दोघांचाहि वध करण्याला मी समर्थ आहें. आज पताका, ध्वज, रथ, अश्व, छत्र, कवच, शक्ति, बाण, धनुष्य आणि शल्य या सर्वांसह कर्णाचे माझ्या बाणप्रहारांनीं झालेले तुकडे तूं पहाशील! हे गोविंदा, मदोन्मत्त गज जसा अरण्यांत वृक्ष विध्वंसून टाकितो, त्याप्रमाणें मी आज कर्णाचा वध करणार यांत संशय नाहीं! आज कर्णाच्या स्त्रियांना वैधव्याची प्राप्ती होणार आहे आणि हे माधवा, तशाप्रकारचीं अनिष्ट स्वप्नेंहि त्यांना पडलीं असतील! आज कर्णाच्या विधवा झालेल्या स्त्रिया तुझ्या दृष्टीस पडतील! अरे, ह्या मूर्ख व अदूरदृष्टि कर्णानें द्रौपदीला सभेंत आणली आणि आमचा पुनः पुनः उपहास केला ह्या पूर्व गोष्टींनीं माझ्या मनांत उत्पन्न

केलेला क्रोध कांहीं केल्यानें जात नाहीं ! माझ्या हातून त्याचा संहार झालेला आज तुझ्या दृष्टीस पडेल ! हे वार्ष्णेया, ‘ कर्णाचा वध करून तूं जय मिळविलास ही मोठी भाग्याची गोष्ट होय ’ असे गोड शब्द आज तुझ्या कानांवर येतील ! जनार्दना, आज तुला मोठ्या हर्षानें अभिमन्यूच्या मातेचें व आपल्या आतेचें–कुंतीचें–सांत्वन करितां येईल ! तसेंच हे माधवा, तूं आपल्या अमृततुल्य वाणीनें त्या धर्मराज युधिष्ठिराचें आणि बाष्पमुखी द्रौपदीचें समाधान करूं शकशील.” ८. ८७.

## अध्याय ८८ वा.

[ १ कर्णार्जुन यांचें भयंकर युद्ध. २ दुर्योधनास अश्वत्थाम्याचा उपदेश. ]

( १ ) **संजय**—राजा, तें कर्णार्जुनांचें युद्ध पाहाण्याची इच्छा करून देव, नाग, असुर, सिद्ध, यक्ष, गंधर्व, राक्षस, अप्सरा, ब्रह्मर्षि, राजर्षि, गरुड, इत्यादिकांची एकच गर्दी होऊन आकाशाला अपूर्व शोभा आली होती. तेव्हां वादन, गायन, स्तुति, नृत्य, हास्य इत्यादिकांच्या गोड आवाजानें सर्व आकाश व्याप्त होऊन मनुष्यप्राण्यांना तो विस्मयकारक चमत्कार वाटला ! कौरव-पांडवांच्या योद्ध्यांना मोठा आनंद होऊन त्यांनीं मृदंग, शंख यांचे आवाज काढिले, त्यामुळें पृथ्वी दुमदुमून गेली. तसेंच सिंहनादहि होत होते, त्यायोगें सर्व दिशा व्याप्त होऊन गेल्या. तीं दोन्ही सैन्यें परस्परांवर धांवून येऊन अन्योन्यांच्या नाशास प्रवृत्त झालीं ! तेव्हां नर, अश्व, गज, रथ हे परस्परांवर खड्ग, शर, शक्ति व ऋष्टि यांचे दुःसह प्रहार करूं लागले ! वीरांना मोठा हर्ष झाला, जिकडेतिकडे हतसैनिकांचे देहांनीं भूमि व्याप्त झाली आणि समरांगणावर रक्ताचे पूर वाहूं लागले ! अशाप्रकारें तें तुमुल आणि दारुण युद्ध धनंजय आणि कर्ण या दोघांमध्यें प्रवृत्त झालें असतां परस्परांनीं सरलगामी निशित बाणांनीं इतकी भयंकर वृष्टि केली कीं त्या दोन्ही सैन्यांत अंधकार पडून कांहींच दिसेनासें झालें ! सर्व वीर भयभीत होऊन कोणी कर्णाचा तर कोणी अर्जुनाचा आश्रय केला.

राजा, इतक्यांत कर्णार्जुनांनीं पूर्वपश्चिम वायूंप्रमाणें परस्परांचीं अस्त्रें अस्त्रांनीं नाहींशीं करून टाकिलीं, त्यामुळें घन अंधकार पडला आणि सूर्यचंद्रांचा उदय होऊन जसे ते शोभतात, त्याप्रमाणें ते दोघे वीर अत्यंत शोभूं लागले ! नतर त्या

उभय दळांतील वीरांनीं ' आपापल्या स्थानापासून यत्किंचितहि ढळूं नका ' म्हणून सैनिकांना सांगितलें आणि मग तुझे व पांडववीरहि कर्णार्जुनांच्या सभोंवतीं जमून युद्ध करूं लागले ! त्यावेळीं सुर व असुर हे जणुंकाय वासव व शंबर यांच्या सभोंवार उभे राहून युद्ध करीत आहेत, असा भास झाला. ते दोघेहि वीर धनुर्मंडळाच्या मध्यभागीं राहून हजारों तीक्ष्ण बाण शत्रूंवर सोडीत असत. त्यामुळें जणुंकाय ते दोन प्रलयकालीन दुःसह सूर्यच सर्व चराचर जगताला जाळून टाकीत आहेत, असा भास झाला ! दोघेहि अजेय, दोघेहि यमाप्रमाणें शत्रुसंहारक, दोघेहि परस्परांचा वध करण्याविषयीं उत्सुक आणि दोघेहि निर्भय असे ते कर्णार्जुन परस्परांवर धांवून युद्ध करूं लागले, तेव्हां महेंद्र आणि जंभासुरच परस्परांशीं युद्ध करीत आहेत, असें वाटलें ! त्यांनीं परस्परांवर मोठमोठ्या अस्त्रांचा वर्षाव करून अमित नर, अश्व आणि गज यांचा नाश केला ! तेव्हां सिंहानें प्रलय मांडला असतां वनपशु जसे सर्वत्र पळत सुटतात, त्याप्रमाणें तीं चतुरंग सैन्यें भयग्रस्त होऊन दश दिशांना पळत सुटलीं !

राजा धृतराष्ट्रा, दुर्योधन, कृतवर्मा, शकुनि, कृप व अश्वत्थामा हे महारथी तीक्ष्ण शरवृष्टि करीत कृष्णार्जुनांवर धांवून गेले तेव्हां धनंजयानेंहि त्यांजवर उलट बाणवर्षाव करून त्यांचीं धनुष्यें, त्यांचे तूणीर आणि त्यांचे हय, रथ आणि सारथि यांचा संहार करून त्या कर्णावर बारा तीक्ष्ण बाण टाकले ! इतक्यांत तुझ्या सैन्यांतील शभर रथी आणि शक, तुषार आणि यवन यांचे अश्वसादी कांबोज वीरांसह अर्जुनाचा वध करण्याच्या उद्देशानें त्यावर चालून आले ! परंतु अर्जुनानें त्यांवर क्षुर बाणांची सारखी वृष्टि चालवून त्यांचीं मस्तकें छेदून टाकिलीं ! त्यासमयीं अर्जुनानें आपल्याबरोबर युद्ध करणाऱ्या कौरवपक्षीय हय, गज, रथ व नर यांना पृथ्वीतलावर लोळविलें ! तेव्हां अंतरिक्षांत देवांनीं मंगलवाद्यें वाजविलीं व मोठ्या आनंदानें धन्योद्गार काढिले ! आकाशांतून वायुप्रेरित उत्तम सुगंधी पुष्पांची वृष्टि होऊं लागली ! तो देव व मनुष्यें यांसमोर घडलेला अद्भुत प्रकार पाहून सर्व भूतगणांस मोठें आश्चर्य वाटलें ! तुझा पुत्र दुर्योधन व सूतपुत्र कर्ण यांस त्या प्रकारानें कांहीं विस्मयहि वाटला नाहीं किंवा खेदहि झाला नाहीं; त्यांचा निश्चय कायम होता !

( २ ) राजा, त्यावेळीं द्रोणपुत्र अश्वत्थाम्यानें तुझ्या पुत्राचा हात धरून त्याचें सांत्वन करण्याच्या उद्देशानें म्हटलें, " दुर्योधना, कृपा कर ! शांत हो, पांड-

वांशीं चाललेला हा तुमचा विरोध आतां पुरे! अरे, महास्त्रवेत्ता ब्रह्मदेवासमान गुरु द्रोणाचार्य, तसेच भीष्मादिक महारथी जेथें हत झाले, त्या विग्रहाला धिक्कार असो! मी आणि माझा मातुल हे केवळ अवध्य आहों. राजा दुर्योधना, तूं आतां पांडवांशीं मैत्री करून त्यांसह राज्य कर! अर्जुनाचें मीं निवारण केल्यास तो युद्ध थांबवील आणि कृष्णाला तर विरोधाची कधींच इच्छा नाहीं. भूतमात्राचें हित करण्यांत युधिष्ठिर सर्वदा तत्पर असून भीम, नकुल आणि सहदेव हे त्याच्या आज्ञेप्रमाणें वागणारे आहेत. ह्यावेळीं तूं जर पांडवांशीं सख्य करशील, तर तुझ्या इच्छेनेंच सर्व प्रजेचें कल्याण होणार आहे! आतां जे तुझे बांधव अवशिष्ट असतील, ते आपापल्या नगराला जावोत आणि तुझे सैनिक युद्धापासून निवृत्त होवोत! हे राजा, जर तूं हें माझें म्हणणें मान्य केलें नाहींस, तर युद्धांत पतन पावशील आणि मग पश्चात्ताप करशील! एकट्या अर्जुनानें केवढा पराक्रम केला हें तूं व सर्व जगानें पाहिलें आहे! अशा प्रकारचा पराक्रम इंद्र, यम, भगवान् विधाता किंवा यक्षराज कुबेर यांच्या हातूनहि होणें शक्य नाहीं. अर्जुन ह्या इंद्रादि देवांपेक्षांहि सद्गुणांत वरिष्ठ आहे. दुर्योधना, माझ्या वचनाचा अर्जुनाकडून कधीं अनादर होणार नाहीं. तो नित्य तुझ्या सांगण्याप्रमाणें वागेल. म्हणून तूं कृपा कर आणि पांडवांशीं सख्य कर! दुर्योधना, तुझ्याविषयीं माझ्या मनांत मोठी आदरबुद्धि वसत आहे, म्हणून मी तुला हें मोठ्या प्रेमानें सांगत आहें. तूं माझ्या म्हणण्याला अनुकूल झालास, म्हणजे मी कर्णाचेंहि मन वळवून त्याला युद्धनिवृत्त करीन. ज्ञाते लोक मित्रांचे चार प्रकार करीत असतात. पहिल्या प्रकारचे मित्र म्हणजे सहज—निसर्गानें—झालेले मित्र होत. दुसऱ्या प्रकारचे मित्र म्हणजे सामानें—प्रेमानें—झालेले मित्र होत. तिसरा प्रकार धनादिकांच्या दानानें झालेले मित्र आणि चौथा प्रकार म्हणजे शौर्यानें अभिभूत झालेले मित्र हे होत. दुर्योधना, पांडवांशीं सख्य करण्यास तुला ह्या चारी प्रकारांतून कोणताहि आज योजतां येण्यासारखा आहे. हे वीरा, पांडव हे स्वभावतःच तुझे बांधव आहेत. त्यांशीं प्रेमानें वाग, म्हणजे तुझें कार्य होईल. तूं प्रसन्न होऊन त्यांची मैत्री संपादन केलीस, म्हणजे सर्व जगताचें तूं अमित कल्याण केल्यासारखें होईल!"

अश्वत्थाम्याचें हें हितप्रद भाषण श्रवण करून दुर्योधनानें त्याचा विचार केला. नंतर दीर्घ निश्वास टाकून मोठ्या दुःखानें तो म्हणाला, "मित्रा, तूं म्हणतोस तें खरें आहे. तथापि माझेंहि म्हणणें तूं ऐकून घे. त्या दुष्ट भीमसेनानें

व्याघ्राप्रमाणें दुःशासनाचा वध केल्यावर जे शब्द त्यानें मला ऐकविले, ते तूंहि ऐकिले आहेस. ते शब्द माझ्या मनांत अजून घोळत आहेत. तर आतां सख्य कसें होणार ? तसेंच उग्र वारा कितीहि जोरानें वाहूं लागला तरी तो जसा महागिरी मेरूपुढें कांहीं करूं शकत नाहीं, त्याप्रमाणें अर्जुनाचें कर्णापुढें कांहीं चालणार नाहीं. पांडवहि माझ्याविषयीं वैरभाव सदोदित लक्ष्यांत आणून मजवर आतां कधींहि विश्वास ठेवणार नाहींत. आणि तूंहि आतां कर्णाला युद्धापासून निवृत्त हो म्हणून सांगणें हेंहि मला योग्य दिसत नाहीं. आज अर्जुन युद्धांत अत्यंत श्रांत झाला शाहे, त्याअर्थी कर्ण त्याचा सहज वध करील !" राजा, तुझ्या पुत्रानें अश्वत्थाम्याला असें सांगून व त्याचें अनेक प्रकारें मन वळवून आपल्या सैनिकांना म्हटलें ' वीरहो, शांत चित्तानें शत्रूंवर चालून जा आणि त्यांवर जोराची बाणवृष्टि करा; स्वस्थ बसून असे कां राहिलां आहां !' ८. ८८.

---

## अध्याय ८९ वा.

[ १ कर्णार्जुनांचें द्वैरथयुद्धवर्णन. २ अर्जुनाकडून आग्नेयास्त्राची योजना व कर्णाकडून वारुणास्त्रानें त्याचा संहार. ३ अर्जुनाकडून वज्रास्त्र व त्याचा कर्णाकडून भार्गवास्त्रानें प्रतिकार. ४ भीम व कृष्ण यांकडून अर्जुनाला प्रोत्साहन. ५ कृष्णाचें भाषण श्रवण करून कर्णवधाचा अर्जुनाचा निश्चय. ६ युद्धवर्णन. ]

( १ ) **संजय**—राजा धृतराष्ट्रा, नंतर तुझ्या पुत्राच्या दुर्मंत्रितानें शंख-भेरी इत्यादि रणवाद्यांचा प्रचंड घोष होऊं लागला. त्याबरोबर ते दोघे नरवीर कर्णार्जुन परस्परांवर धांवून गेले आणि पुनः निकरानें युद्ध सुरू झालें. तें पाहून हिमालय पर्वतावरील दोन मदोन्मत्त गज हत्तिणीकरितां आपल्या दीर्घ शुंडांनीं परस्परांवर प्रहारच करीत आहेत, असें वाटूं लागलें ! ज्याप्रमाणें एका मेघानें दुसऱ्या मेघावर धांवून जावें किंवा पर्वतानें पर्वतावर चालून जावें, त्याप्रमाणें ते वीर धनुष्यांचा टणत्कार करीत रथघोषांत एकमेकांशीं भिडले ! ती त्यांची दारुण बाणवृष्टि पाहून प्रचंड शिखरें, वृक्ष, लता, वनस्पति आणि अनेक प्रकारचे निर्झर यांनीं युक्त महापर्वतच एकमेकांवर आदळून परस्परांचा नाश करीत आहेत, असें भासूं लागलें ! पूर्वी इंद्र व बलि यांमध्यें जसा भयंकर रणसंग्राम झाला, तसेंच यावेळींहि कर्णार्जुनांमध्यें दारुण युद्ध झालें ! त्या युद्धांत बाणवर्षावानें त्यांचे सारथि आणि अश्व यांचे देहांतून सारखे

रुधिरप्रवाह वाहूं लागले! त्यावेळची ती बाणवृष्टि दुसऱ्या कोणाच्यानेंहि सोसवली नसती!

राजा, याप्रमाणें ध्वजपताकांनीं सुशोभित उभय वीरांचे ते रथ एकमेकांशीं भिडले आणि महेंद्र-वृत्रांप्रमाणें परस्परांमध्यें भयंकर संग्राम सुरू झाला. तें पाहून कवचें, आभरणें, वस्त्रें आणि आयुधें धारण करणारीं तीं उभय पक्षांतील चतुरंग सैन्यें आणि अंतरिक्षांतील देवदानव आश्चर्यचकित झाले व त्यांना कंप सुटला! मत्त गजाप्रमाणें अर्जुन कर्णाचा वध करण्याच्या उद्देशानें जेव्हां त्यावर चालून गेला, तेव्हां आकाशस्थ प्रेक्षकांनीं आपलीं करवस्त्रें फडकावून व मोठ्यानें सिंहनाद करून आनंद प्रदर्शित केला! तेव्हां सोमकांनीं पुढें होऊन अर्जुनाला मोठ्यानें सांगितलें 'अर्जुना, कर्णाचा वध कर; त्याचें मस्तक शीघ्र छेदून टाक आणि त्याबरोबरच धृतराष्ट्रपुत्राची राज्यतृष्णाहि नष्ट कर!' तें पाहून आपल्याकडीलहि बहुत वीर पुढें सरसावले आणि ते कर्णाला म्हणाले 'कर्णा, अर्जुनावर धांवून जा, जा; त्या अर्जुनाचा तीक्ष्ण शरांनीं वध कर आणि ते पांडव कायमचे वनांत जाऊन राहोत!'

नंतर कर्णानें प्रथम दहा तीक्ष्ण बाण टाकून अर्जुनाला विद्ध केलें! त्यावर अर्जुनानेंहि शिताग्रांच्या दहा बाणांनीं कर्णाला वक्षःस्थळीं विद्ध केलें! नंतर ते दोघे परस्परांवर सुपुंख बाण टाकून एकमेकांचीं शरीरें विदीर्ण करीत युद्ध करूं लागले! तेव्हां अर्जुनानें आपल्या गांडीवावर हात फिरवून नाराच, नालीक, वराहकर्ण, क्षुर, आंजलिक, अर्धचंद्र इत्यादि अनेक बाण कर्णावर सोडले. ते पार्थाचे बाण सर्वत्र पसरले आणि सायंकाळीं पक्षिसमूह जसे आपल्या वृक्षावरील घरट्यांत शिरतात त्याप्रमाणें ते कर्णाच्या शरीरांत शिरूं लागले; परंतु कर्णानें उलट बाणांनीं त्यांचा तत्काल नाश केला! नंतर त्या इंद्रसूनु अर्जुनानें शत्रुसंहारक आग्नेयास्त्र टाकिलें! त्यायोगानें भूमि, आकाश, दिशा व सूर्यमार्ग हीं सर्व अग्नीनें प्रदीप्त होऊन कर्णाचा देहहि दीप्त होऊन गेला! रणांगणांत सर्व कौरवयोद्ध्यांचीं वस्त्रें प्रज्वलित होऊन वेळूंचें वन पेटलें असतां जसा घोर शब्द होतो, तसा होऊं लागला आणि ते सर्व वीर भीतीनें सर्वत्र पळून जाऊं लागले! तें पाहून त्या कर्णानें आग्नेयास्त्राच्या शमनार्थ तत्काल वारुणास्त्राची योजना केली; त्यायोगानें तो अग्नि शांत होऊं लागला! तेव्हां आकाशांत मेघसमूह येऊन त्यांनीं सर्व दिशा व्याप्त केल्या, त्यामुळें जिकडे-

तिकडे अंधकार पडला. नंतर त्या पर्वतासमान मेघांतून चोहोंकडे वेगानें पर्जन्य पडूं लागून तो अग्नि तत्काल विझून गेला !

( ३ ) राजा, त्या वारुणास्त्रावर अर्जुनानें वायव्यास्त्राची योजना करून ते सर्व मेघसमूह उधळून लाविले ! मग अर्जुनानें आपलें गांडीव, त्याची प्रत्यंचा आणि बाण यांवर वज्रास्त्राचें अभिमंत्रण करून तें महेंद्रप्रिय अस्त्र कर्णावर सोडलें ! त्या गांडीवापासून क्षुर, आंजलिक, अर्धचंद्र, नालीक, नाराच व वराहकर्ण बाण सहस्रावधि बाहेर पडून त्यांनीं कर्णाचीं गात्रें, हय, धनुष्य, रथचक्रें आणि ध्वज यांचा संहार करून गरुडत्रस्त सर्पाप्रमाणें ते बाण मोठ्या वेगानें भूमींत शिरले ! कर्ण बाणांनीं विद्ध झाला, त्याचीं गात्रें रुधिरार्द्र होऊन गेलीं, त्यामुळें त्याचा क्रोध अनावर झाला व डोळे लाल दिसूं लागले ! त्यानें अर्जुनाच्या वज्रास्त्राच्या प्रतिकारार्थ आपलें दृढप्रत्यंचेचें धनुष्य वांकविलें आणि भार्गवास्त्राची योजना करून अर्जुनाचे बाण छेदून टाकिले ! आपल्या अस्त्रानें अर्जुनाच्या अस्त्राचा संहार करून त्यानें रणांत पांडवांचे रथ, नाग आणि पदाति यांचा संहार केला ! नंतर त्यानें रुक्मपुंख बाणांची वृष्टि करून पांचालांचे व सोमकांचे प्रमुख योद्ध्यांना विद्ध केलें ! तेव्हां पांचाल व सोमक वीरांनीं क्रोधानें एकत्रित होऊन त्या कर्णावर चोहों बाजूंनीं शरवर्षाव केला, परंतु त्या सूतपुत्र कर्णानें हर्षानें त्यांजवर तीक्ष्ण बाण सोडून त्यांचा आणि पांचालांचे अनेक रथ, गज आणि अश्व यांचा संहार उडविला ! त्या समयीं ते भिन्नदेह होऊन रणांगणांत आर्तस्वर काढून मरून पडले ! तें पाहून महाबलवान् सिंहानें अरण्यांत गजांचे समूह मारून टाकावे, तशा प्रकारचा भास होऊं लागला ! त्या शूर कर्णानें अशाप्रकारें पांचालांच्या प्रमुख वीरांचा नाश केला, तेव्हां तो आकाशांतील उग्ररश्मि भास्कराप्रमाणें विशेषच शोभूं लागला ! तुझ्या सैनिकांना कर्णाचा जय झाल्याचें वाटून त्यांनीं हर्षभरित होऊन सिंहनाद केले ! हे कौरवेंद्रा, कर्णानें त्या कृष्णार्जुनांला मारलें, असेंच त्या सैनिकांना त्यावेळीं वाटलें !

( ४ ) शत्रुवर्गाला असह्य होणारें तें कर्णाचें शौर्य आणि त्याबरोबरच अर्जुनाच्या अस्त्राचा कर्णानें केलेला संहार पाहून भीम क्रोधसंतप्त होऊन गेला; त्याचे नेत्र क्रोधानें दीप्त दिसूं लागले; तो हात चोळीत आणि निश्वास टाकीत अर्जुनाला बोलला, " जिष्णो, हा पापी आणि धर्महीन सूतपुत्र कर्ण तुझ्यासमक्ष

पांचालांच्या प्रमुख वीरांना मारूं शकला हें कसें? जो तूं पूर्वी देवांना आणि कालकेयांना अजिंक्य होतास, ज्या त्वां प्रत्यक्ष शंकराशींहि बाहुयुद्ध केलें, त्या तुला हे किरीटी, दहा बाणांनीं सूतपुत्रानें विद्ध केलें आणि तूं सोडलेल्या तीक्ष्ण बाणांचा त्यानें नाश करावा, ही गोष्ट मला अत्यंत आश्चर्याची वाटत आहे! कृष्णेला त्यानें अनेक प्रकारें क्लेश देऊन आम्हां पांडवांना षंढ म्हटलें, तें सर्व लक्ष्यांत आण! तो पापबुद्धि, दुरात्मा, सूतपुत्र ते कठोर व तीक्ष्ण शब्द बोलला तेव्हां त्याला कसलीच भीति वाटूं नयेना? हे सव्यसाचिन्, तें सर्व लक्ष्यांत घे आणि त्या पापी कर्णाचा आज शीघ्र वध करून टाक! हे किरीटिन्, तूं कर्णाची काय म्हणून उपेक्षा करीत आहेस? हा उपेक्षेचा काल नाहीं! ज्या धैर्यानें तूं सर्व भूतगणांना जिंकून अग्नीला खांडववन भक्ष्य म्हणून दिलेंस, त्याच धैर्यानें तूं सूतपुत्र कर्णाचा आज वध कर! मीहि माझ्या गदेनें त्याचा संहार करितों!"

राजा धृतराष्ट्रा, भीमाचें भाषण ऐकून कृष्णहि अर्जुनाला म्हणाला, "आज तुझ्या रथ्यांची कर्णानें कशी दुर्दशा केली आहे ती पाहिलीसना? अरे, त्यानें आज तुझ्या अस्त्रांचा आपल्या अस्त्रांनीं नाश करावाना? तूं एवढा मोठा वीर असून तुला आज मोह कसा प्राप्त व्हावा? तुझ्या हातून कर्णाचा वध न झाल्यामुळें हे कौरव प्रहृष्ट होऊन गर्जना करीत आहेत! कर्णाच्या अस्त्रांपुढें तुझ्या अस्त्रांचें कांहीं चालत नाहीं, असें ते समजत आहेत! अर्जुना, ज्या धैर्यानें युगायुगांत तूं तामसास्त्रांचा संहार केलास आणि घोर राक्षसांस वधिलेंस, त्याच धैर्यानें तूं आज कर्णाचा वध कर! इंद्रानें ज्याप्रमाणें आपल्या नमुचि शत्रूचें मस्तक वज्रानें तोडिलें, त्याप्रमाणें ह्या माझ्या सुदर्शन चक्राच्या क्षुर धारेनें कर्णाचें मस्तक तूं वेगानें तोडून टाक! अर्जुना, तूं आपल्या शौर्यानें किरातरूपी शंकराला प्रसन्न केलेंस तेंच शौर्य पुनः एकदां प्रकट करून तूं कर्णाचा त्याच्या अनुयायांसह वध कर! नंतर शत्रुगणांचा वध करून ही समग्र समुद्रवलयांकित पृथ्वी, तींतील ग्राम व पत्तनें यांसह धर्माला अर्पण कर आणि मग तूं दिव्य यश संपादन कर!"

(५) कृष्णाचें अशाप्रकारचें भाषण ऐकून त्या महात्म्या अर्जुनानें कर्णाचा वध करण्याचा निश्चय ठरविला! भीम व कृष्ण यांनीं जें जें सांगितलें त्या सर्वांचा आणि भूभारहरणाकरितां आपला जन्म आहे, ह्याहि गोष्टीचा विचार

करून त्यानें कृष्णाला म्हटलें, 'मी आतां महास्त्राची योजना करीत आहें, जेणेंकरून सर्व जगताचें कल्याण होऊन त्या सूतपुत्राचा वध होईल! तरी ह्या कामीं मला तूं, सर्व देव, ब्रह्मदेव, शंकर आणि सर्व वेदवेत्ते ऋषि यांनीं अनुज्ञा द्यावी!' असें म्हणून त्या सव्यसाची अर्जुनानें ब्रह्मदेवाला नमस्कार केला आणि तें श्रेष्ठ व दुर्धर ब्रह्मास्त्र कर्णावर सोडलें! कर्णानें त्या ब्रह्मास्त्राचा नाश केला आणि तो पर्जन्यधारांप्रमाणें त्या अर्जुनावर एकसारखी बाणवृष्टि करूं लागला! तें पाहून भीमसेन क्रोधसंतप्त झाला आणि अर्जुनाला म्हणाला, 'अर्जुना, सर्व लोक तुला मोठा ब्रह्मास्त्रवेत्ता म्हणतात, तर आणखी एकवार दुसऱ्या अस्त्राची योजना कर पाहूं!' भीमसेनाचें तें भाषण ऐकून अर्जुनानें दुसरें अस्त्र अभिमंत्रित करून सोडलें, तों त्यांतून सूर्यकरांप्रमाणें तेजस्वी व सर्पांप्रमाणें प्राणहारक बाणांची वृष्टि होऊन तिच्या योगानें सर्व दिशा आणि उपदिशा व्याप्त होऊन गेल्या. ते सुवर्णपुंख बाण तत्काल कर्णरथावर आले आणि त्यांनीं तो रथ आच्छादून टाकिला! नंतर शूल, परश्वध (कुऱ्हाडी), चक्रें आणि शतशः नाराच बाण यांची अर्जुनानें कौरवसैन्यावर वृष्टि करून त्यांच्या अनेक वीरांना भूतलावर पाडिलें!

(६) राजा धृतराष्ट्रा, त्यासमयीं समरभूमीवर झालेली कौरवसेनेची दुर्दशा काय वर्णावी? कोणा योद्ध्याचें मस्तक छिन्न होऊन खालीं पडतांच दुसऱ्या योद्ध्याच्या पोटांत धडकी भरून तो तत्काल मरून पडला! कोणा वीराचा गजशुंडेसमान सखड्ग बाहु तुटून खालीं पडला, तर दुसऱ्या वीराच्या अंगांतील कवच व डावा बाहु क्षुरप्रहारानें तुटला! अशाप्रकारें त्या किरीटधारी अर्जुनानें सर्व प्रमुख कौरववीरांचा संहार केला आणि त्या दुर्योधनाचे सर्व सैन्याचा विध्वंस उडविला! कर्णानेंहि हजारों बाण रणांगणावर शत्रूंवर टाकिले, ते गर्जना करीत पर्जन्यधारांप्रमाणें पांडवांवर आले! त्या अतुलविक्रमी कर्णानें नंतर कृष्ण, अर्जुन आणि भीमसेन यांवर प्रत्येकीं तीन तीन बाण मारले आणि मोठ्यानें गर्जना केली! कर्णाच्या बाणानें विद्ध झालेल्या अर्जुनानें भीमाकडे व कृष्णाकडे पाहिलें तों तेहि आपल्याप्रमाणेंच विद्ध झालेले त्याला आढळून आले! त्याला ती गोष्ट असह्य होऊन त्यानें उलट अठरा बाण शत्रूवर मारले! एका बाणानें त्यानें कर्णाचा ध्वज छिन्न केला, चार बाणांनीं शल्याला आणि तीन बाणांनीं कर्णाला विद्ध केलें! अवशिष्ट राहिलेल्या दहा बाणांनीं त्यानें सुवर्णकवच धारण करून राहिलेल्या सभापतीचें मस्तक तोडलें! तेव्हां

तो मस्तकहीन व बाहुहीन राजपुत्र रथांतून पृथ्वीवर पडला. त्याचे वाजि, सारथि, धनुष्य आणि ध्वज यांचा संहार होऊन कुऱ्हाडीनें तोडलेल्या शाल-वृक्षाप्रमाणें त्याची स्थिति झाली.

राजा धृतराष्ट्रा, नंतर अर्जुनानें पुनः कर्णावर बाणवृष्टि केली आणि कौरवांचे सायुध गज, आठशें रथ, हजारों सादींसह अश्व आणि आठ हजार पदातींचा वध केला! अर्जुनानें सरलगामी बाणांचा प्रहार करून रथ, सारथि आणि ध्वज यांसह कर्णाला अदृश्य करून सोडलें! तेव्हां ते मारले जाणारे कौरववीर मोठ्यानें म्हणाले, ‘कर्णा, अर्जुनावर बाणवृष्टि करून त्याला आधीं विद्ध कर; नाहींतर तो सर्व कौरवांचा वध केल्याशिवाय रहाणार नाहीं!’ याप्रमाणें सर्वांचें गाऱ्हाणें ऐकून कर्णानें अर्जुनावर एकसारखी बाणवृष्टि केली. त्या बाणांनीं पांडव-पांचालगणांच्या मर्मस्थलांचा भेद करून त्यांना गतप्राण केलें! अशाप्रकारें त्या दोन धनुर्धरश्रेष्ठ नरवीरांनीं परस्परांवर महास्त्रांचा वर्षाव करून शत्रुसैन्यांचा संहार चालविला! इतक्यांत सुहृदांनीं दिलेल्या मंत्रौषधींनीं शल्यहीन झालेला धर्मराज युद्ध पाहण्याकरितां सुवर्णकवच धारण करून तेथें प्राप्त झाला. त्याला तेथें पाहतांच सर्व भूतगणांना राहूपासून मुक्त झालेल्या विमल चंद्राला पाहून जसा आनंद होतो, तसा आनंद झाला! ते शत्रुसंहारक शूरवीर कर्णार्जुन एकमेकांशीं युद्ध करीत असतां त्यांकडे अंतरिक्षांतून देव व भूमीवरून लोक मोठ्या कौतुकानें युद्ध पाहत होते!

राजा धृतराष्ट्रा, अशाप्रकारें तें युद्ध प्रवृत्त होऊन अर्जुन प्रत्यंचा ओढीत असतां ती एकाएकीं तुटून मोठा आवाज झाला! तें पाहून कर्णानें अर्जुनावर शंभर क्षुद्र बाण टाकिले. तसेच त्यानें कात टाकलेल्या सर्पाप्रमाणें भयंकर साठ तीक्ष्ण बाण कृष्णावर टाकिले! आणि पुनः आठ बाण अर्जुनावर सोडले! त्या सूर्यपुत्र कर्णानें नंतर भीमसेनावरहि सहस्रावधि बाणांचा वर्षाव करून त्याला मर्मस्थलीं विद्ध केलें! याप्रमाणें कर्णानें अर्जुन व कृष्ण यांवर बाणवृष्टि करून अर्जुनाचा ध्वज शरविद्ध केला! नंतर पार्थानुयायी आणि सोमक यांवर त्यानें बाणवृष्टि केली! त्यांनींहि उलट बाणवृष्टि करून आकाशांत सूर्याला जसे मेघ आच्छादित करितात, त्याप्रमाणें त्या कर्णाला झांकून टाकिलें! अशा रीतीनें ते बाणवृष्टि करीत आपल्यावर येतांना पाहून त्या अस्त्रवेत्त्या कर्णानें त्या पांडववीरांवर सारखी बाणवृष्टि करून त्यांस तेथेंच

खिळून टाकिलें आणि त्यांच्या सर्व अस्त्रांचा आणि त्यांबरोबर त्यांचे रथी, अश्व व गज यांचाहि नाश केला ! नंतर त्या सूतपुत्र कर्णानें आपल्यावर धांवून आलेल्या दुसऱ्याहि सैन्यांचा असा संहार केला कीं त्याच्या शरवर्षावानें शत्रुसैन्यांतील सैनिकांचीं शरीरें विदीर्ण होऊन मोठा आक्रोश करीत त्यांनीं आपले देह रणभूमीवर ठेविले ! ज्याप्रमाणें क्रोधाविष्ट झालेल्या सिंहानें मोठमोठे अश्व वध करून टाकावे, त्याप्रमाणें कर्णानें पांडवसैन्याचा वध केला ! नंतर दोन्ही सैन्यांत भयंकर युद्ध होऊन पुनः कर्णार्जुनांनीं अन्योन्यांच्या प्रमुख सैनिकांचा वध केला !

राजा धृतराष्ट्रा, तें पाहून कर्णाचा विजयच झाला असें वाटून तुझ्या सैनिकांनीं टाळया वाजवून मोठ्यानें सिंहनाद केले ! तेव्हां कृष्णार्जुन कर्णाच्या हातांत सांपडले असेंच सर्वांना वाटलें ! तेव्हां अर्जुन आपली प्रत्यंचा ओढून आणि कर्णाच्या बाणांचा विध्वंस करून मोठा शरवर्षाव करीत कौरवांवर चालून गेला ! त्याच्या बाणवृष्टीनें सर्वत्र अंधकार पडला ! कर्ण, शल्य आणि सर्व कौरव यांवर अर्जुनानें मोठी बाणवृष्टि केली आणि त्यांना विद्ध केलें ! त्या महास्त्रानें आकाशांत सर्वत्र अंधकार झाल्यानें पक्ष्यांचा संचारहि बंद झाला ! दिव्यगंधी वायु मात्र अंतरिक्षांतील भूतगणांच्या अंगावरून येत होता. पार्थानें शल्यावर दहा बाण टाकिले, त्यांनीं त्याच्या कवचाचा भेद केला ! नंतर अर्जुनानें प्रथम बारा व नंतर सात बाण कर्णावर टाकून त्यास विद्ध केलें ! त्यायोगानें कर्णाचीं सर्व गात्रें भिन्न होऊन त्यांतून रुधिरस्राव होऊं लागला ! तें पाहून प्रत्यक्ष रुधिरार्द्र शंकरच स्मशानांत रौद्रमुहूर्तावर ( संध्याकाळीं ) क्रीडा करीत आहे, असा भास झाला ! नंतर त्या इंद्रतुल्य अर्जुनावर कर्णानें तीन बाण सोडून त्याला विद्ध केलें ! कृष्णाचाहि वध करण्याच्या उद्देशानें त्यानें त्यावर सर्पसमान पांच बाण मारिले ! त्या बाणांनीं कृष्णाच्या कवचाचें विदारण करून ते त्याच्या शरीरांत शिरले. तेथून ते बाहेर पडून पृथ्वींत घुसले व पाताळगंगेंतील उदकांत स्नान करून पुनः परत आले. इतक्यांत अर्जुनानें त्या प्रत्येकावर दहा भल्ल बाण मारून त्यांचे तीन तीन तुकडे केले व त्यांना पृथ्वीवर पाडलें !

राजा, नंतर अर्जुनानें कृष्णाकडे पाहिलें तों कर्णाच्या बाणांनीं कृष्णाचा देह विदीर्ण झाल्याचें त्याच्या लक्षांत आलें ! तेव्हां तृणराशीला जसा अग्नि

तत्काल पेटवितो, त्याप्रमाणें अर्जुनाचा देह क्रोधानें संतप्त झाला आणि त्यानें प्राणघातक प्रज्वलित बाण कर्णाच्या मर्मस्थळीं मारले ! त्या व्यथेनें कर्ण कांपूं लागला; परंतु तो धैर्यबुद्धि असल्यामुळें रथांतच बसून राहिला ! त्या वेळीं अर्जुनाचा संताप अनावर होऊन त्यानें बाणांचा इतका भयंकर वर्षाव केला कीं, दिशा, प्रदिशा, रविप्रभा आणि कर्णरथ हीं सर्व त्या बाणांनीं व्याप्त होऊन गेलीं आणि सर्व नभस्तल दाट धुकें पडून आच्छादित झालें आहे असें दिसूं लागलें ! नंतर त्या क्रुद्ध अर्जुनानें कर्णाचे रथचक्ररक्षक, अग्रभागरक्षक व पृष्ठरक्षक म्हणून ज्यांना दुर्योधनानें नेमिलें होतें, त्या सर्व प्रमुख कौरववीरांचा वध केला ! अशा रीतीनें त्या सव्यसाची अर्जुनानें कौरवांचे दोन हजार महावीर त्यांचे रथ, अश्व आणि सारथि ह्यांसह रणांगणावर मारले ! तेव्हां तुझे पुत्र व अवशिष्ट कौरवयोद्धे कर्णाला, हत व विद्ध झालेल्या आपल्या सुतांना आणि पितरांना तेथें तसेच टाकून पळून गेले ! कर्णानें सर्वत्र नजर टाकून पाहिलें तों कौरव पळून गेल्यामुळें सर्व दिशा त्याला भयाण दिसल्या ! तरी त्यामुळें त्याला किंचितहि भय न वाटतां तो प्रहृष्ट मनानें अर्जुनावर धांवून गेला ! ८. ८९.

---

## अध्याय ९० वा.

[ १ कर्णार्जुनयुद्ध. २ कर्णाच्या अस्त्राघातानें अर्जुनकिरीटाचें पतन. ३ नागाचें कर्णाला सोडून गमन व नागराजाचा अर्जुनाकडून वध. ४ कर्णाची मूर्च्छा. ५ कर्णवध करण्याविषयीं कृष्णाची अर्जुनाला प्रेरणा. ६ रथचक्र वर काढीपर्यंत आपल्यावर बाण सोडूं नकोस म्हणून अर्जुनाला कर्णप्रार्थना. ]

( १ ) संजय—धृतराष्ट्रा, अर्जुनाच्या शरपातानें पीडित होऊन पळून गेलेले कौरव त्याच्या बाणांचा मारा चुकवून निर्भय स्थळीं जाऊन राहिले; इतक्यांत अर्जुनानें सोडलेलें अस्त्र विद्युत्प्रकाशासारखें प्रज्वलित होऊन सर्वत्र पसरत असल्याचें त्यांनीं पाहिलें ! कर्णाचा वध करण्याच्या इच्छेनें सोडलेल्या त्या अस्त्राचा कर्णानें सुवर्णपुंख बाणांचा मारा करून संहार केला ! कर्णानें आपल्या प्रत्यंचेचें आस्फालन करून परशुरामापासून संपादन केलेलें अरिसंहारक आथर्वण अस्त्र अभिमंत्रित केलें आणि निशित बाणांचा अर्जुनावर वर्षाव करून त्या अस्त्राचा भंग केला ! तेव्हां कर्णार्जुन ह्या दोघां वीरांमध्यें अतिभयंकर

युद्ध प्रवृत्त झालें ! ते परस्परांशीं युद्ध करीत असतां दोन मदोन्मत्त वारण आपल्या विषाणांच्या आघातांनीं एकमेकांना मारीत असतां जसे दिसतात, त्याप्रमाणें ते दिसले ! त्या कर्णार्जुन वीरांनीं त्यासमयीं सर्व आकाश बाणांनीं व्याप्त करून टाकलें. आकाशांत सर्वत्र बाणमय जालच पसरलेलें कौरवसोमकांस दिसलें आणि चोहों बाजूंला पडलेल्या बाणांधकारानें एकहि प्राणी अंतरिक्षांत संचार करितांना त्यांना दिसला नाहीं ! त्या युद्धांत त्या दोघांहि अस्त्रप्रवीण वीरांनीं विविध बाण सोडून नानाप्रकारें आपल्या अंगचें समरकौशल्य उत्तम प्रकारें दाखविलें ! वीर्य, अस्त्रज्ञान, बल आणि पौरुष या गुणांत केव्हां अर्जुनाची तर केव्हां कर्णाची सरशी दिसून येत असे ! अन्यांना दुःसह असा त्यांचा तो पराक्रम पाहून सर्व योद्धे विस्मयचकित होऊन गेले !

राजा, त्यासमयीं अंतरिक्षांत युद्ध पाहण्याकरितां जमलेल्या भूतगणांनाहि मोठें आश्चर्य वाटलें आणि त्यांनीं 'हे कर्णा, हे अर्जुना, धन्य आहे तुमची,' म्हणून गाइलेले धन्यवाद आकाशांत सर्वत्र ऐकूं येऊं लागले ! त्या रणसंग्रामांत उभयतांचें तुमुल युद्ध होऊन रथ, अश्व आणि गज यांच्या आघातांनीं भूमितल विदीर्ण होऊन गेलें ! त्यावेळीं अर्जुनाचा शत्रु अश्वसेन नांवाचा एक नाग खांडवदाहांतून मुक्त होऊन पाताळांत जाऊन राहिला होता, तो कर्णार्जुनयुद्ध चाललेलें पाहून मोठ्या वेगानें ऊर्ध्व गतीनें वर आला आणि त्यानें अर्जुनाचा सूड घेण्यास हाच योग्य काळ आहे, असें जाणून शररूप धारण केलें आणि कर्णाच्या तूणीरांत प्रवेश केला ! त्यावेळीं अस्त्रांच्या प्रहारांनीं सर्व रणांगण व्याप्त झालें आणि त्या कर्ण-पार्थांनीं बाणांची वृष्टि करून सर्व नभस्तलहि भरून टाकिल्यामुळें जिकडेतिकडे बाणजालमय झालेलें पाहून कौरव आणि सोमक हे अत्यंत भयभीत होऊन गेले ! त्या तुमुल बाणांधकारांत कांहींहि दिसेनासें झालें ! ते दोघे पुरुषव्याघ्र प्राणांचीहि पर्वा न करितां युद्ध करीत असतां श्रांत होऊन गेले आणि परस्परांकडे क्रोधदृष्टीनें पाहत तटस्थ उभे राहिले ! तें पाहून आकाशांत जमलेल्या अप्सरागणांनीं त्यांजवर चंदनाचें सिंचन केलें आणि दिव्य चामरें आणि व्यजनें त्यांच्या मस्तकांवर उधळिलीं. सूर्य आणि इंद्र यांनींहि आपल्या करकमलांनीं त्यांचीं मुखें पुसून त्यांचा श्रम नाहींसा केला !

धृतराष्ट्रा, नंतर अर्जुनानें कर्णावर सारखा शरप्रहार करून त्याला विह्वल करून सोडलें ! तेव्हां त्या शरविद्ध झालेल्या कर्णानें अर्जुनाच्या वधाकरितां

एक रौद्र, शत्रुविनाशक, सर्पमुख आणि प्रज्वलित बाण चिरकाल सुवर्णाच्या भात्यामध्यें चंदनचूर्णांत नित्य अर्चा करून ठेविला होता, तो प्रत्यंचा आकर्ण ओढून अर्जुनावर रोंखला ! तेव्हां दिशा आणि नभस्तल हीं प्रज्वलित झालीं आणि शेंकडो भयंकर उल्का पतन पावल्या ! त्याकालीं धनुष्याला नाग जोडलेला पाहून शक्रादिक लोकपालांनीं हाहाकार केला ! कर्णानें धनुष्याला बाण लाविला, त्यावेळीं योगबलानें अश्वसेन नाग आंत प्रविष्ट झाल्याचें त्याला ठाऊक नव्हतें; परंतु सहस्रनेत्र इंद्रानें बाणाच्या ठिकाणीं सर्प आहे हें जाणून आपला पुत्र हत. झाला, असें मानिलें, त्यामुळें त्याचीं सर्व गात्रें गलित होऊन गेलीं ! इतक्यांत जितात्मा कमलोद्भव ब्रह्मदेव इंद्राला म्हणाला, 'इंद्रा, भिऊं नकोस, अर्जुनाचाच विजय होणार आहे !'

(२) राजा, इतक्यांत मद्रराज शल्य कर्णाला म्हणाला, 'कर्णा, हा बाण अर्जुनाचें मस्तक छेदून जाणार नाहीं, तर त्याचें मस्तक छिन्न होईल, असें जपून बाणसंधान कर !' हें ऐकून क्रोधानें डोळे लाल करून कर्ण शल्याला म्हणाला, 'हे शल्या, हा कर्ण दोन वेळां बाणाची योजना कधीं करीत नसतो; अशा रीतीनें माझ्यासारखे वीर कुटिल योद्ध्यांत गणिले जातील !' असें म्हणून कर्णानें अनेक वर्षें संरक्षण करून ठेवलेला तो बाण अर्जुनावर सोडला, आणि 'अर्जुना, तूं आतां खरोखर हत झालास !' असें धिक्कारपूर्वक गर्जना करून बोलला ! अग्नि किंवा सूर्य यांप्रमाणें कर्णाचा तो घोर बाण अर्जुनावर येत असल्याचें पाहून कृष्णानें अर्जुनाचा रथ सहज आपल्या पायानें दाबून भूमींत शिरकविला ! त्यामुळें अर्जुनरथाचे अश्व गुडघे टेंकून राहिले ! तेव्हां आकाशांत सर्वत्र कृष्णाचा मोठा जयजयकार झाला ! त्यानें अर्जुनाचा रथ भूमींत रोंविल्यामुळें जिकडेतिकडे कृष्णावर दिव्य पुष्पवृष्टि झाली आणि मोठमोठ्यानें सिंहनादहि होऊं लागले ! कर्णानें टाकिलेला तो बाण मधुसूदनाच्या प्रयत्नानें इंद्रदत्त अशा बळकट किरीटाला मात्र लागला; त्यामुळें पृथ्वी, स्वर्ग, अंतरिक्ष आणि जल या सर्वांमध्यें प्रसिद्ध असें तें अर्जुनाचें शिरोभूषण--किरीट--एकदम खालीं पडलें !

राजा, याप्रकारें सर्पास्त्र, उत्कृष्ट यत्न आणि क्रोध हीं सर्व एकत्रित होऊन तो अर्जुनमुकुट पतन पावला ! त्याचें तेज सूर्य, चंद्र व अग्नि यांप्रमाणें होतें आणि त्यावर सुवर्ण, मौक्तिकें आणि वज्र यांचें जडाव काम केलें होतें. तो

मुकुट स्वयंभू ब्रह्मदेवानें इंद्राकरितां निर्माण केला होता. तो अतिसुंदर, शत्रूंना भीति उत्पन्न करणारा व मस्तकीं धारण करणाऱ्याला अत्यंत सुखदायक असा होता. त्याचा सुगंध लांबवर जात असून तो देवशत्रूंचा वध करण्याविषयीं उत्सुक अशा अर्जुनाला इंद्रानें अर्पण केला होता. शंकर, वरुण, इंद्र, कुबेरादि देव यांनाहि पिनाक, पाश, वज्र आणि उत्तमोत्तम बाण यांच्या योगानें त्याचा भंग करणें अशक्य होतें. असा तो किरीट कर्णानें नागशरानें पाडिला ! त्या दुष्टाशय व असत्यप्रतिज्ञ नागानें तो मूल्यवान्, सुवर्णभूषित व आश्चर्यकारक किरीट अर्जुनाच्या मस्तकावरून हरण केला, तेव्हां रक्तमंडल दिवाकर अस्ताचलावरून खालीं पडतो, त्याप्रमाणें तो पार्थाच्या मस्तकावरून पृथ्वीतलावर पडला ! पुष्पांकुरांनीं भूषित अशा वृक्षांनीं भरलेल्या गिरिशिखराला महेंद्राचें वज्र जसें छिन्न करून खालीं पाडितें, त्याप्रमाणें त्या नागानें अर्जुनाच्या मस्तकावरून तो रत्नभूषित किरीट भूमीवर पाडला ! राजा, तो किरीट पृथ्वीवर पडला आणि सोसाट्याच्या वायूनें आकाश, स्वर्ग, पृथ्वी आणि सलिल यांचा संक्षोभ होऊन भयंकर आवाज होतो, तसा मोठा उग्र व घोर शब्द भुवनत्रयांत होऊन सर्व लोक भयभीत झाले ! त्या वेळीं उच्च पर्वताचे नील शृंगाप्रमाणें तो किरीटहीन श्यामवर्ण तरुण शोभला ! नंतर त्यानें आपलें शुभ्र वस्त्र केंसांसभोंवतीं गुंडाळलें, त्यामुळें उदयपर्वत जसा सूर्यकिरणांनीं शोभतो, तसा तो अर्जुन त्या शिरोगत भूषणानें शोभूं लागला !

राजा, कर्णानें सोडलेला नागशर अर्जुनाच्या किरीटाला खालीं पाडल्यावर त्यानें पुनः कर्णाच्या तूणीरांत येऊन राहण्याची इच्छा प्रदर्शित केली. तो कर्णाला म्हणाला, ‘ कर्णा, तूं न ओळखून मला शत्रूवर सोडलें होतेंस, त्यामुळें मला अर्जुनाचें मस्तक छिन्न करतां आलें नाहीं ! आतां ओळखून तूं मला शत्रूवर सोड म्हणजे मी तुझ्या व माझ्याहि शत्रूचा तत्काळ नाश करीन !’ अश्वसेनाचें भाषण श्रवण करून कर्णानें त्याला विचारिलें, ‘ असें उग्ररूप धारण करणारा तूं आहेस तरी कोण ?’ त्यावर तो सर्प बोलला, ‘कर्णा, अर्जुनानें माझ्या मातेचा वध केल्यामुळें मी त्याचा शत्रु झालों आहें ! जरी वज्रधर इंद्र स्वतः त्याचे रक्षणाकरितां धांवून आला, तरी त्यासहि मी यमसदनीं पाठवीन !’

( ३ ) कर्ण—नागा, दुसऱ्याच्या बलाचा आश्रय करून कर्ण जयाची कधीं आशा करीत नसतो. जरी शेंकडो अर्जुनांचा वध करण्याचा प्रसंग आला, तरी

हा कर्ण एका बाणाचें दोनदां संधान कधींहि करीत नसतो ! माझ्याजवळ दुसरे पुष्कळ व्यालशर आहेत, ते मी अर्जुनावर सोडून त्याचा वध करीन ! तूं खुशाल जा !

त्या नागराजाला कर्णानें असें सांगतांच तो क्रोधाविष्ट झाला. त्याला कर्णाचें भाषण सहन झालें नाहीं आणि उग्ररूप धारण करून तो अर्जुनावर त्याच्या वधाची इच्छा करून धांवून गेला ! तें पाहून कृष्ण रणांगणावर अर्जुनाला म्हणाला, 'पार्था, ह्या महासर्पाचा तूं वध कर ! हा तुझा मोठा वैरी आहे.' कृष्णानें असें सांगतांच त्या गांडीवधारी अर्जुनानें त्याला विचारलें, 'कृष्णा, गरुडाच्या मुखांत उडी टाकूं पहाणारा हा सर्प आहे तरी कोण ?'

**कृष्ण**—अर्जुना, तूं खांडववनांत अग्नीला संतुष्ट केलेंस, त्यासमयीं हा अंतरिक्षांत होता व ह्याच्या देहाचें संरक्षण ह्याच्या मातेनें केलें होतें ! त्याच्या मातेचा तूं वध केलास, तें वैर आठवून हा स्वतःच्या वधाची प्रार्थना करीत आकाशांतून प्रज्वलित उल्केप्रमाणें तुजवर चालून आला आहे !

**संजय**—धृतराष्ट्रा, नंतर अर्जुनानें मोठ्या क्रोधानें त्या सर्पाकडे नजर टाकली आणि सहा तीक्ष्ण बाण त्यावर मारले ! तेव्हां आकाशांतून तिर्यग् गतीनें अर्जुनावर चालून येणारा तो अश्वसेन नाग छिन्नगात्र होऊन भूमीवर मरून पडला ! याप्रमाणें त्या नागराजाचा वध झाल्यावर श्रीकृष्णानें अर्जुनाचा रथ पुनः आपल्या भुजांनीं वर काढला ! इतक्यांत कर्णानें तिर्यक् दृष्टीनें अर्जुनाला पाहून दहा मयूरपिच्छ बाण त्यावर टाकले ! तें पाहून अर्जुनानेंहि बारा तीक्ष्ण वराहकर्ण बाण व सर्पविषासमान एक वेगवान् नाराच बाण आकर्ण कानाडी ओढून कर्णावर टाकिला ! त्या बाणानें कर्णाचे कवचाचा भेद केला व नंतर तो त्याच्या शरीरांत शिरला ! तेथें त्याचें रक्त प्राशन करून व आपले पुंख रक्तदिग्ध करून तो बाहेर पडला आणि वसुंधरेच्या उदरांत प्रविष्ट झाला ! तें पाहून दंडानें सर्पावर प्रहार केला असतां तो जसा क्रोधाविष्ट होतो, तसा कर्ण क्रुद्ध झाला आणि त्यानें विषारी सर्पाप्रमाणें महाभयंकर बाण अर्जुनावर टाकण्यास आरंभ केला ! त्यानें बारा बाण कृष्णावर व नव्याण्णव बाण अर्जुनावर टाकले आणि पुनः एका भयंकर बाणानें अर्जुनाला विद्ध केलें आणि मोठ्यानें गर्जना करून तो हंसला ! कर्णाचा तो हर्ष अर्जुनाला सहन झाला नाहीं ! त्या मर्मवेत्त्या अर्जुनानें कर्णाच्या मर्मस्थळांवर शंभर तीक्ष्ण बाण मारले आणि बलदैत्याला

जसें इंद्रानें विदीर्ण केलें, त्याप्रमाणें कर्णाचें शरीर भिन्न केलें! राजा, अर्जुनानें आणखीहि नव्वद यमदंडाप्रमाणें भयंकर बाण कर्णावर मारले! त्या बाणांनीं वज्रानें विदारित पर्वताप्रमाणें कर्ण व्यथित झाला! त्या वेळीं त्याच्या अंगावरील रत्नें, उत्तमोत्तम हिरे आणि सुवर्ण, यांनीं भूषित त्याचें शिरोभूषण आणि त्याचीं उत्तम कुंडलें भूमीवर पडलीं! नंतर अर्जुनानें त्या कर्णावर आणखी शरवृष्टि करून त्याचें मूल्यवान् कवचहि छेदून त्याचे तुकडे तुकडे केले!

(४) राजा, याप्रमाणें कर्ण कवचहीन झाला असतां अर्जुनानें त्यावर क्रोधानें चार बाण मारिले! नंतर तो कर्ण पित्त, कफ व वात यांनीं पीडित झालेल्या रुग्ण मनुष्याप्रमाणें अत्यंत व्यथा पावून विवळूं लागला! नंतर अर्जुनानें त्या कर्णावर तीक्ष्ण बाणांची एवढी वृष्टि केली कीं, तीमुळें त्याचीं मर्मस्थळें विदीर्ण होऊन गेलीं! नंतर अर्जुनानें नानाप्रकारचे शिताग्र शरांनीं त्या कर्णाला इतकें व्याकुल करून सोडलें कीं, त्याच्या शरीरांतून रक्तस्राव होऊं लागला; त्यामुळें गैरिक धातुपर्वतांतून बाहेर पडणाऱ्या आरक्त जलाप्रमाणें त्याचा देह रक्त दिसूं लागला! नंतर अर्जुनानें त्याच्या मर्मांवर यमदंडासारखे प्राणघातक, सरलगामी, सुवर्णपुंख पोलादी बाण मारले आणि कार्तिकेयानें जसें क्रौंच पर्वताचें विदारण केलें, त्याप्रमाणें त्याचें शरीर विदीर्ण केलें! त्यामुळें इंद्रधनुष्यासमान बळकट धनुष्य व बाण कर्णाचे हातून पडले आणि तो रथांतच मूर्च्छित झाला! त्यावेळीं अर्जुनानें कर्णाचा वध सहज केला असता, परंतु आर्यजनाप्रमाणें संकटांत असतां त्या कर्णाचा वध करण्याची इच्छा अर्जुनानें केली नाहीं!

(५) राजा धृतराष्ट्रा, त्यावेळीं कृष्णानें अर्जुनाला मोठ्या घाईनें विचारलें 'अर्जुना, हें तूं वेड्यासारखें काय करीत आहेस! शहाणे लोक दुर्बल शत्रूचा देखील वध करण्यास एक क्षणाचीहि वाट पाहत नसतात! शहाणे लोक शत्रूचा वध त्याच्या संकटकालांतच करितात आणि तसें केल्यानें धर्म व यश हीं दोन्ही संपादन करितां येतात! म्हणून अर्जुना, तूंहि या तुझ्या हाडवैरी व बलवान् एकवीर कर्णाचा त्वरित वध कर! तो सावध होऊन पूर्वीप्रमाणें तुजवर धांवून येईल, म्हणून नमुचीला जसें पूर्वी इंद्रानें वधिलें, त्याप्रमाणें तूं या कर्णाचा आज शीघ्र वध कर!' तेव्हां अर्जुनानें कृष्णाला 'तुझ्या म्हणण्याप्रमाणें करितों,' म्हणून सांगितलें आणि इंद्रानें जसा बलीवर बाणांचा प्रहार केला, त्याप्रमाणें त्या कर्णावर तीक्ष्ण बाणांचा प्रहार केला! त्यावेळीं अर्जुनानें कर्णाच्या

अश्वांवर व सारथ्यावरहि वत्सदंत बाणांची वृष्टि करून त्याला विह्वल केलें! नंतर त्या अर्जुनानें सुवर्णपुंख बाणांनीं दशदिशा व्याप्त करून टाकिल्या! बाणांनीं व्याप्त झालेला तो कर्ण सुपुष्पित अशोक, पलाश किंवा शाल्मलिवृक्षाप्रमाणें अथवा चंदनकाननानें भरलेल्या पर्वताप्रमाणें शोभूं लागला! रणांगणावर कर्णाच्या शरीरांत इतके बाण रुतून गेले होते कीं, ज्याचे सानु व दऱ्या वृक्षांनीं भरगच्च भरून गेलेल्या आहेत किंवा ज्यावरील कर्णिकार वृक्ष अत्यंत प्रफुल्लित होऊन गेले आहेत, अशा गिरींद्राप्रमाणें तो दिसूं लागला! अशा स्थितींतहि अनेक प्रकारच्या बाणांचे प्रहार तो अर्जुनावर करूं लागला! त्यामुळें संध्यासमयीं अस्ताचलाला जाणाऱ्या सूर्याचे बिंबाप्रमाणें तो रक्तदिग्ध कर्ण दिसूं लागला!

राजा धृतराष्ट्रा, नंतर कर्णानें सर्पसमान तीक्ष्ण बाणांची वृष्टि अर्जुनावर केली, परंतु अर्जुनानें उलट शिताग्र बाण मारून त्या प्रज्वलित कर्णबाणांचा संहार केला! नंतर कर्णानें मोठ्या धैर्यानें क्षुब्ध झालेल्या सर्पाप्रमाणें अर्जुनावर दहा व कृष्णावर सहा बाण टाकिले! तेव्हां अर्जुनानें उग्र शब्द करणारा, सर्प, विष किंवा अग्नि यांसमान एक पोलादी भयंकर बाण उग्र अस्त्रानें अभिमंत्रित करून कर्णावर सोडण्याचें मनांत आणलें! इतक्यांत कर्णाचा वधकाल समीप आला, असें जाणून तेथें अदृश्यरूपानें काल प्राप्त झाला आणि विप्रकोपामुळें आतां कर्णवध होणार हें दर्शवीत कर्णाला म्हणाला, 'कर्णा, भूमीनें तुझें रथचक्र गिळून टाकिलें आहे, पहा!' इतक्यांत भार्गवानें दिलेलें अस्त्रहि त्याला स्मरेनासें झालें! राजा, त्या कर्णाचा वधकाल जवळ येत चालला, तेव्हां त्याचा रथ कंपित होऊन त्याचें डावें रथचक्र भूमींत रुतलें! तें पाहून, तो सूतपुत्र कर्ण अत्यंत विह्वल झाला! त्याचा रथ पार बांधलेल्या सुपुष्पित महाद्रुमाप्रमाणें भूमींत रुतल्यासारखा दिसूं लागला! रथ कंपित झाला, ब्राह्मणशापामुळें परशुरामापासून मिळविलेल्या अस्त्राचें विस्मरण होऊं लागलें, सर्पमुख शर पार्थानें छिन्न केला, हें पाहून कर्ण भयभीत झाला! सर्व दुःखें असह्य होऊन त्यानें बोटें मोडून निंदा करीत म्हटलें, 'धर्म हा प्रधान असून तो सर्वांचें रक्षण करतो असें धर्मवेत्ते म्हणतात; आम्ही तर सदैव यथाशक्ति व यथाबुद्धि धर्माचरण करण्याविषयीं प्रयत्न करीत असतों! असें असतां हा धर्मच आमचें रक्षण न करितां आम्हांला मारीत आहे! म्हणून धर्म हा सर्वदा रक्षणकर्ता आहे, असें मला वाटत नाहीं!'

राजा, कर्ण याप्रमाणें उद्गार काढीत आहे, तों अर्जुनानें त्याचयावर बाणवृष्टि सुरू केली ! त्या बाणाघातांनीं कर्ण, त्याचा सारथि आणि अश्व हे आपापल्या आसनांपासून चलित झाले ! यावेळीं कर्णाचीं मर्मस्थळें शिथिल होऊन गेलीं होतीं; त्याच्या अंगांत युद्ध करण्याची पूर्वींसारखी शक्ति नव्हती; त्यामुळें तो धर्माचीच निंदा करीत राहिला ! नंतर त्यानें तीन भयंकर बाण कृष्णावर व सात बाण अर्जुनावर टाकले ! तेव्हां अर्जुनानें सरलगामी, इंद्रवज्राप्रमाणें भयंकर आणि अग्नीसमान प्रज्वलित सतरा बाण कर्णावर सोडले ! ते बाण कर्णशरीरांत शिरून बाहेर आले आणि पृथ्वीतलावर पडले ! तेव्हां कर्ण कंपित झाला आणि त्यानें आपलें सर्व सामर्थ्य एकवटून मोठ्या स्थैर्यानें ब्रह्मास्त्राचें अभिमंत्रण केलें ! कर्णाच्या ब्रह्मास्त्रावर अर्जुनानेंहि ऐंद्रास्त्राची प्रेरणा केली ! त्यानें पुरंदर पर्जन्यवृष्टि करितो, त्याप्रमाणें कर्णावर मोठी शरवृष्टि केली ! ते तेजोमय बाण पार्थरथापासून निघून कर्णरथावर येऊं लागले ! कर्णानें त्यांचा आपल्या बाणांनीं संहार केला ! तेव्हां कृष्ण अर्जुनाला म्हणाला, 'अर्जुना, ह्या राधेयानें आपल्या बाणांचा संहार केला आहे, म्हणून दुसरें अस्त्र योज ! नंतर अर्जुनानें ब्रह्मास्त्राचें अभिमंत्रण करून त्याची कर्णावर योजना केली आणि आपल्या बाणांनीं कर्णाला आच्छादून टाकिलें ! तेव्हां कर्णानें उलट अर्जुनावर आपले तेजस्वी व तीक्ष्ण बाण टाकून त्याची प्रत्यंचा तोडून टाकली ! त्यासमयीं अर्जुनानें बाण सोडावे व कर्णानें प्रत्यंचा तोडून टाकावी, असा क्रम चालू होता ! अशाप्रकारें दुसरी, तिसरी अशा शतावधि प्रत्यंचा जोडून कर्णावर अर्जुनानें बाण मारले आणि कर्णानें त्या तोडून टाकल्या ! शंभर प्रत्यंचा अर्जुनाजवळ असतील हें कर्णाला माहीत नव्हतें ! त्यावर अर्जुनानें नवीन प्रत्यंचा जोडून पुनः अस्त्राचें अभिमंत्रण केलें आणि सर्पतुल्य दारुण शरांनीं कर्णाला झांकून टाकिलें ! इकडे कर्ण अर्जुनाच्या प्रत्यंचा छेदीत होता ! नंतर रणांत अर्जुनानें इतक्या शीघ्रतेनें कर्णावर बाणवृष्टि केली कीं त्याच्या प्रत्यंचेवर कर्णाचें अवधान राहीना व त्यामुळें प्रत्यंचाछेदन कर्णाच्या हातून होईना ! इतक्यांत कर्णानें अस्त्रांनीं अस्त्रांचा प्रतिकार करून पार्थाहून आपली श्रेष्ठता दर्शविली ! कर्णास्त्रानें पार्थ पीडित झाल्याचें पाहून कृष्ण त्याला बोलला, 'अर्जुना, त्याच त्या अस्त्राची पुनः योजना कर व कर्णावर तें टाक ! नंतर अर्जुनानें सर्पविषासमान व अग्निसदृश एक घोर पोलादी बाण त्यावर अस्त्राचें अभिमंत्रण करून कर्णावर सोडण्याचा विचार मनांत आणला. हें होत आहे तों पृथ्वीनें त्या राधेयाचें रथचक्र गिळून टाकलें !

( ६ ) राजा धृतराष्ट्रा, त्यावेळीं कर्ण आपल्या रथांतून उतरला आणि दोन्ही भुजांनीं तें रथचक्र वर काढण्याचा यत्न करूं लागला ! त्या समयीं कर्णानें ती पृथ्वी सप्तद्वीपें, पर्वत, वनें आणि जल ह्यांसह चार अंगुळें वर उचलून धरली, तरी तें चक्र वर आलें नाहीं ! त्यामुळें कर्ण अत्यंत क्षुब्ध झाला आणि त्याच्या नेत्रांत अश्रूहि आले ! अर्जुन क्रुद्ध झाल्याचें पाहून कर्ण त्याला म्हणाला, " हे महाधनुर्धर पार्था, हें भूमींत रुतलेलें चक्र मी वर काढीपर्यंत निमिषभर थांब ! अर्जुना, दुर्दैवयोगानें माझ्या रथाचें हें डावें चक्र भूमींत शिरलें आहे, तरी तें मी वर काढीपर्यंत तुझा हेतु बाजूला ठेव ! मी आतां संकटावस्थेंत आहें, म्हणून तूं मजवर बाणप्रहार करूं नकोस ! निंद्यजनासारखें आचरण तुला शोभत नाहीं ! कौंतेया, रणकर्मामध्यें विख्यात म्हणून तूं प्रसिद्ध आहेस; तर हे पांडवा, तुझ्या हातून विशिष्टच कार्य झालें पाहिजे ! अर्जुना, साधुव्रत आचरणारे शूर पुरुष गैदी, युद्धविमुख, कृतांजलि, न्यस्तशस्त्र, याचनक, बाणहीन, भग्नकवच, भग्नायुध, भ्रष्टायुध वीरावर अथवा ब्राह्मणावर कधींहि शस्त्रें टाकीत नसतात ! हे पांडवा, तूं सर्व लोकांमध्यें अत्यंत शूर आणि साधुशील आहेत ! तुला सर्व युद्धधर्म अवगत आहेत, वेदांततत्त्वें तुला उत्तम प्रकारें विदित आहेत, तूं दिव्यास्त्रवेत्ता आहेस आणि युद्धांत कार्तवीर्यासारखा अमितपराक्रमी आहेस ! तूं रथाधिष्ठित आहेस व मी भूमीवर उभा आहें ! मी तुला किंवा श्रीकृष्णालाहि भीत नाहीं ! तूं क्षत्रियकुलोत्पन्न असून महाकुलवर्धक आहेस ! म्हणून मीं हें चक्र वर काढीपर्यंत माझ्यावर बाणप्रहार करूं नकोस ! हें मी तुला सांगत आहें, तर त्याची तूं मला क्षणभर क्षमा कर." ८. १०.

---

## अध्याय २१ वा.

[ १ मागील गोष्टींची आठवण देऊन कर्णाला 'तेव्हां तुझा धर्म कोठें गेला होता' म्हणून कृष्ण विचारतो. २ कर्णार्जुनांचें युद्ध व अर्जुनाची मूर्च्छा. ३ कर्णवध. ४ कौरवांनीं केलेला हाहाकार. ]

( १ ) **संजय**—तेव्हां अर्जुनाच्या रथांत अधिष्ठित झालेला वासुदेव कर्णाला म्हणाला, " राधेया, आज तुला येथें धर्माची आठवण होत आहे, ही मोठ्या भाग्याची गोष्ट होय. नीच पुरुष व्यसनसमुद्रांत मग्न झाले म्हणजे बहुधा

त्यांना दैवाची आठवण होते, परंतु आपलें निंद्य कर्म त्यांच्या लक्ष्यांत येत नाहीं! कर्णा, दुर्योधन, दुःशासन, शकुनि व तूं मिळून एकवस्त्रा द्रौपदीला सभेंत आणविली, त्यावेळीं तुझा धर्म तुला दिसला नाहींना? कर्णा, शकुनीनें अनक्षज्ञ धर्मराजाला कपटानें द्यूतांत जिंकिलें, तेव्हां तुझा धर्म कोठें गेला होता! कर्णा, वनवासाचीं बारा वर्षें व अज्ञातवासाचें एक वर्ष अशीं तेरा वर्षेंहि निघून गेल्यावर पांडवांना त्यांचें राज्य तुम्हीं परत दिलें नाहीं, तेव्हां तुझा धर्म कोठें गेला होता? कर्णा, भीमसेनाला जेव्हां दुर्योधनानें तुझ्या मतानें विषान्न खाऊं घातलें व अंगावर सर्प सोडले, तेव्हां तुझा धर्म कोठें गेला होता? राधेया, वारणावेतामध्यें पांडव लाक्षागृहांत सुप्त झाले असतां तूं त्या गृहाला पेटविलेंस, तेव्हां तुझा धर्म कोठें गेला होता? तसेंच रजस्वला द्रौपदी दुःशासनाच्या हातांत सांपडली असतां तूं सभेमध्यें मोठ्यानें हंसत राहिलास, तेव्हां राधेया, तुझा धर्म कोठें गेला होता? राधेया, पूर्वीं नीच लोकांनीं निरपराधी द्रौपदीला अनेक प्रकारें छळिलें, तेव्हां तूं जवळ असूनहि पाहत राहिलास, तेव्हां तुझा धर्म कोठें गेला होता? त्याप्रमाणेंच सर्व पांडव नष्ट झाले व ते आतां कायमचे नरकांत पडले, म्हणून तूं आतां अन्य पति कर, असें जेव्हां तूं त्या गजगामिनीला म्हटलेंस आणि तिचा धिक्कार केलास तेव्हां कर्णा, तुझा धर्म कोठें गेला होता?

१ येथें कविवर्य मोरोपंतांनीं केलेलें भाषांतर वाचकांना मनोरंजक वाटेल, असें वाटल्यावरून पांचच आर्या देत आहों:—

कृष्ण म्हणे, "राधेया, भला बरा स्मरसि आजि धर्मातें,
नीच व्यसनीं बुडतां निंदिति दैवासि न स्वकर्मातें. ॥ १ ॥
जेव्हां तूं दुर्योधन दुःशासन शकुनि एकमति झालां,
कैसें कपटद्यूतीं चित्तींहि न धर्म लंघितां भ्यालां. ॥ २ ॥
जेव्हां सभेसि नेली पांचाळी, मानिलें मनीं शर्म,
तेव्हां गेला होता कोठें राधासुता, तुझा धर्म? ॥ ३ ॥
राज्य न देसी, करवुनि वनवासाज्ञातवासही, जेव्हां,
गेला होता कोठें धर्म तुझा सूतनंदना, तेव्हां? ॥ ४ ॥
केले दग्ध जतुगृहीं त्वां पांडव वारणावतीं जेव्हां,
गेला होता कोठें धर्म तुझा सूतनंदना, तेव्हां?" ॥ ५ ॥



ज्या कर्णरूप सूर्यानें आपल्या दीप्त शरकिरणांनीं शत्रूला संतप्त करून सोडलें होतें, तोच कर्ण अखेरीला बलवत्तर अर्जुनकालानें अस्तंगत करून टाकिला ! (कर्णपर्व पृष्ठ ६८.)

राधासुता, तूं राज्यलुब्ध होऊन शकुनीच्या आश्रयानें पांडवांना द्यूतासाठीं बोलाविलेंस, तेव्हां तुझा धर्म कोठें गेला होता? जेव्हां युद्धामध्यें तुम्हीं पुष्कळ महारथ्यांनीं एकत्र मिळून अभिमन्यु बाळाचा वध केलात, तेव्हां कर्णा, तुझा धर्म कोठें गेला होता? जर तुम्हीं त्यावेळीं धर्माकडे ढुंकूनहि पाहिलें नाहीं, तर आतां ' धर्म, धर्म' म्हणून कंठशोषण करण्यांत अर्थ तो काय? कर्णा, आज तूं कितीहि धर्माच्या गोष्टी सांगितल्यास, तरी आतां तूं जिवंतपणीं सुटणार नाहींस! नलराजा द्यूतांत पुष्कराकडून जिंकिला गेला, तरी त्यानें आपल्या वीर्यानें पुनः राज्य व यश संपादन केलें; तसेंच हे पांडव आपल्या बाहुवीर्यानें आणि सोमकांच्या साहाय्यानें राज्याकरितां मोठमोठ्या शत्रूंचा युद्धांत वध करून राज्यप्राप्ति करून घेतील! त्या धर्मरक्षित नरवर पांडवांकडून कौरवांचा विनाश झाल्यावांचून राहणार नाहीं!

( २ ) संजय—हे भारता, याप्रमाणें कृष्णाचें भाषण ऐकून कर्णानें लज्जेनें मुख अवनत केलें; तो कांहींएक बोलला नाहीं. क्रोधाविष्ट होऊन त्यानें आपलें धनुष्य उचलिलें आणि मोठ्या आवेशानें तो अर्जुनाशीं युद्ध करूं लागला! तेव्हां कृष्ण त्या नरवीर पार्थाला म्हणाला, ' हे महाबल अर्जुना, दिव्यास्त्राचीच योजना करून तूं कर्णाचा वध कर!' कृष्णाचें बोलणें अर्जुनानें ऐकून घेतलें आणि त्याला कृष्णानें सांगितलेल्या सर्व गोष्टींचें स्मरण होऊन त्याच्या सर्व शरीररंध्रांतून तेजाच्या ज्वाला निघूं लागल्या! तें पाहून कर्णानें त्या धनंजयावर ब्रह्मास्त्राची योजना केली व पुनः तें रथचक्र वर काढण्याचा तो यत्न करूं लागला! अर्जुनानेंहि कर्णावर ब्रह्मास्त्राचीच योजना केली आणि त्याच्यावर बाणांची वृष्टि करून कर्णास्त्राचें निवारण केलें! नंतर अर्जुनानें आपलें प्रिय असें दुसरें आग्नेयास्त्र कर्णावर सोडिलें! तें आपल्या अंगच्या तेजानें प्रज्वलित होऊन जिकडेतिकडे अग्नि झाला! कर्णानें त्यावर वारुणास्त्र टाकिलें व त्या अग्नीचें प्रशमन केलें! सर्वत्र मेघांनीं सर्व दिशा व्याप्त करून टाकिल्या व अंधार पडून कांहींहि दिसेना! तेव्हां त्या वीर्यवान् अर्जुनानें निश्चलपणें वायव्यास्त्राची योजना केली व कर्णाच्या समक्ष त्यानें त्या सर्व मेघांचा संहार केला! तेव्हां कर्णानें अर्जुनाच्या वधाकरितां अग्नीसारखा एक भयंकर प्रज्वलित बाण घेतला व धनुष्याची पूजा करून तो धनुष्याला जोडला! त्याच्या योगानें पर्वत, जलें आणि काननें यांसह सर्व पृथ्वी कांपूं लागली आणि वायु सोसाट्यानें वाहूं लागून धूळीनें दशदिशा व्याप्त झाल्या! आकाशांत देवांमध्यें मोठा

हाहाकार उडून गेला आणि कर्णानें तो बाण धनुष्यावर जोडलेला पाहतांच पांडव दीन होऊन दुःखग्रस्त झाले ! तो इंद्रवज्राप्रमाणें तीक्ष्ण बाण कर्णानें अर्जुनावर टाकला, तेव्हां सर्प जसा वल्मीकांत शिरतो, त्याप्रमाणें तो अर्जुनाचें हृदय विदीर्ण करून त्यांत शिरला ! त्यामुळें अर्जुन अतिविद्ध होऊन गेला, कांपूं लागला आणि त्याच्या हातचें गांडीव धनुष्यहि गळून पडलें ! त्यासमयीं भूकंपानें जसा पर्वत कंपायमान होतो, तशी अर्जुनाची स्थिति झाली ! ही उत्तम संधि आहे, असें पाहून कर्णानें रथाखालीं उडी घेऊन तें चक्र पुनः वर काढण्याचा यत्न सुरू केला ! त्या बलवान् कर्णानें आपल्या दोन्ही हस्तांनीं तें चक्र उचलण्याचा मोठा प्रयत्न केला, परंतु दैवाच्या प्रतिकूलतेनें त्याला त्या कामीं यश मिळालें नाहीं !

(३) राजा धृतराष्ट्रा, इतक्यांत अर्जुन सावध झाला आणि त्यानें यमदंडासमान एक उग्र प्रांजलिक बाण घेतला; तेव्हां वासुदेव अर्जुनाला बोलला, ‘ हा कर्ण पुनः रथारूढ झाला नाहीं, तों त्याचें मस्तक बाणानें छेदून टाक !’ अर्जुनानें ‘ बरें आहे ’ असें म्हणून एक प्रज्वलित बाण घेतला आणि कर्णरथाची हस्तिकक्षा व ध्वज हीं तोडून टाकिलीं ! त्या ध्वजावर कक्षा ( सांखळदंड ) लावली होती, त्याच्या पृष्ठावर सुवर्ण, मोत्यें, रत्नें आणि हिरे यांचें कोंदणकाम उत्तम शिल्पकारांनीं केलें होतें. तुझ्या सैन्याला सर्वदा विजयास्पद, शत्रूंना भयदायक व सर्वांना आदित्याप्रमाणें वंदनीय व कांतीनें अग्नि, सूर्य किंवा चंद्र यांसारखा ध्वज अर्जुनानें सुवर्णपुंख अग्निसमान प्रज्वलित क्षुरप्रानें छिन्न केला ! त्याबरोबर कौरवांचा गर्व, यश, दर्प, त्यांचीं प्रियकार्यें नष्ट होऊन त्यांचीं हृदयें दुःखमग्न झालीं व सर्वत्र हाहाकार उडून राहिला !

राजा, अर्जुनानें कर्णाचा ध्वज तोडून टाकतांच तुझ्या सैन्यांतील कोणाहि सैनिकाला कर्णजयाची किमपि आशा उरली नाहीं ! इतक्यांत अर्जुनानें मोठी त्वरा करून कर्णवधाकरितां महेंद्रवज्र किंवा अग्नि यांसमान भयंकर व रविकिरणांप्रमाणें तेजस्वी असा एक आंजलिक बाण तूणीरांतून काढला आणि तो मर्मभेदी, रुधिर व मांस यांनीं दिग्ध, अग्नि-सूर्यांप्रमाणें तेजस्वी, महार्ह, नर, अश्व व गज यांचा प्राणहारक, तीन हात लांबीचा, सहा पिच्छांचा, अत्यंत वेगवान् , इंद्रवज्राप्रमाणें बलवान् , कालानलाप्रमाणें सर्वभक्षक, पिनाक-सुदर्शनचक्रांप्रमाणें भयंकर, देवगणांनाहि अनिवार्य, देवासुरांना जिंकणारा, सर्वांना

वंदनीय बाण उचलून अर्जुन धनुष्याला जोडणार असें पाहून सर्व चराचर जगत् कांपूं लागलें, आणि 'सर्व जगताचें कल्याण होवो' असे उद्गार ऋषिजनांनीं काढिले! अर्जुनानें तो बाण आपल्या गांडीव धनुष्याला जोडला आणि त्यावर महास्त्राचें अभिमंत्रण केलें! तो बाण आकर्ण ओढून अर्जुन म्हणाला, 'गांडीवा, हा अभिमंत्रित महाबाण शत्रूचें शरीर व प्राण यांचें हरण करो! जर मी उत्तमप्रकारें तपश्चर्या केली असेल, गुरूंना संतुष्ट केलें असेल, किंवा सुहृज्जनांचें इष्ट भाषण ऐकलें असेल, तर त्या सर्व पुण्यानें हा शर माझ्या महाशत्रु कर्णाचें हनन करो!'

राजा धृतराष्ट्रा, असें बोलून अर्जुनानें तो घोर बाण कर्णावर सोडला! नंतर मृत्यूलाहि असह्य असा तो बाण कर्णावर जात असतां अर्जुन हर्षानें म्हणाला, 'हा बाण मला विजयप्रद होवो आणि कर्णाला यमसदनीं पाठवो!' त्या सूर्याप्रमाणें तेजस्वी बाणानें दशदिशा आणि अंतरिक्ष हीं प्रज्वलित केलीं आणि शेवटीं इंद्रानें वज्राच्या योगें जसें वृत्रासुराचें मस्तक उडविलें, तसें त्या बाणानें कर्णाचें शिर छिन्न केलें! राजा, याप्रमाणें त्या महेंद्रपुत्र अर्जुनानें आंजलिक बाणानें अपराह्णकालीं कर्णाचें मस्तक छेदिलें! तें भूमीवर पडल्यावर क्षणांत त्याचा देहहि कोसळून पडला! उदय पावणाऱ्या प्रातःकालीन सूर्याप्रमाणें तेजस्वी कर्णाचें मस्तक कौरवांच्या अग्रभागीं पृथ्वीवर पडलें, तेव्हां रक्तमंडळ सूर्यच अस्ताचलावरून खालीं पडल्याचा भास झाला! श्रीमंताला आपलें सर्वसमृद्ध गृह सोडून जाणें जसें जिवावर येऊन ठेपतें, त्याप्रमाणें त्या मस्तकानें उदार कर्णाच्या नित्य सुखमग्न व अत्यंत सुंदर अशा देहाचा त्याग मोठ्या संकटानें केला असावा! कावेच्या पर्वताचें शिखर वज्रहत झालें असतां जसा त्यांतून रक्तवर्ण प्रवाह वाहूं लागतो, तसा त्या शरभिन्न कर्णशरीरांतून एकसारखा रुधिरस्राव होऊं लागला! राजा, त्यासमयीं समरांत हत झालेल्या त्या कर्णशरीरापासून जें एक तेज निघालें, तें सर्व मानवयोद्ध्यांसमक्ष आकाशांतील सूर्यांत जाऊन मिळालें!

(४) अशा प्रकारें अर्जुनाकडून कर्णाचा वध झाला असतां पांडव मोठमोठ्यानें शंखनाद करूं लागले! कृष्णार्जुनांनींहि हर्षभरित होऊन शंखस्फुरण केलें! कर्ण हत झालेला पाहतांच सोमकवीरांनीं सैन्यासह सिंहगर्जना केल्या! पांडवसैन्यांत आनंदानें वाद्यें वाजूं लागलीं आणि सर्व सैनिक हात उभारून

आपलीं वस्त्रें फडकावीत अर्जुनाजवळ गेले ! तेथें अर्जुनाच्या बाणांनीं हत होऊन पडलेल्या कर्णास पाहतांच ते वीर एकमेकांना मोठ्या हर्षानें मिठ्या मारून व ओरडून नाचूं लागले ! सोसाट्याच्या वाऱ्यानें जसें पर्वतशिखर कोसळावें किंवा यज्ञसमाप्ति झाली असतां जसा अग्नि शांत व्हावा, त्याप्रमाणें कर्णाचें छिन्न मस्तक त्यावेळीं अस्तंगत सूर्यबिंबासमान दिसत होतें ! तो कर्णाचा देह सर्वत्र बाणांनीं विद्ध आणि रक्तस्रावानें व्याप्त होऊन किरणांनीं सूर्य शोभतो, तसा शोभूं लागला ! ज्या कर्णरूप सूर्यानें आपल्या दीप्त शरकिरणांनीं शत्रूला संतप्त करून सोडलें होतें, तोच कर्ण अखेरीला बलवत्तर अर्जुन कालानें अस्तंगत करून टाकिला ! अस्तास जाणारा सूर्य जसा आपली प्रभा घेऊन जातो, त्याप्रमाणें तो अर्जुनबाण त्या कर्णवधदिवशीं अपराह्णकालीं कर्णाचें जीवित घेऊन निघून गेला ! तो शूर कर्ण अशा रीतीनें अर्जुनबाणांनीं हत होऊन भूमीवर पडलेला पाहतांच मद्रराज शल्य त्याच्या छिन्नध्वज रथासकट निघून गेला आणि अर्जुनबाणांनीं विद्ध झालेले कौरवहि भयार्दित होऊन अर्जुनाच्या त्या तेजस्वी ध्वजाकडे पाहत पाहत पळून गेले ! इकडे तो इंद्रतुल्य पराक्रमी कमलमुख कर्ण दिनावसानीं सूर्य जसा अस्ताला जातो, तसा भूतलावर हत होऊन पडला ! ८. ९१.

---

## अध्याय ९२ वा.

[ १ शल्यप्रत्याभिगमन. २ शल्य दुर्योधनाला कर्णवध झाल्याचें सांगतो. ]

( १ ) **संजय**—राजा, कर्णार्जुनांच्या युद्धांत कौरवसैन्यें पांडवबाणांनीं हत झालीं व रथचक्र पृथ्वीनें गिळून टाकिलें असतां पदचारी कर्ण युद्धांत अर्जुनाकडून मारला गेला; तें पाहून शल्य कर्णाचा भग्नरथ घेऊन दुर्योधनाकडे आला ! कर्णाचें वधवृत्त ऐकून दुर्योधनाचे डोळे दुःखाश्रूंनीं भरून आले आणि तो वरचेवर निश्वास टाकूं लागला ! तो कर्ण शरविद्ध व रुधिरदिग्ध होऊन भूतलावर पडला असतां आकाशस्थ सूर्यच यदृच्छया अवनीवर आल्याचा भास झाला ! कर्णाला पाहण्याच्या इच्छेनें भिन्न प्रकृतींचे प्रेक्षक त्यासभोंवतीं उभे होते; त्यांत पांडवादिकांना मोठा आनंद झाला होता, भीरुजन भयभीत झाले होते, कौरव दुःखग्रस्त होऊन गेले होते व प्रेक्षकवर्ग विस्मयचकित झाले होते ! त्यावेळीं तुझ्याकडील किंवा शत्रूकडील लोक आपापल्या स्वभावानुसार सुखी

किंवा दुःखी झाले होते ! त्या पराक्रमी कर्णाचा वध करून त्याचें कवच, अलंकार, वस्त्रें आणि आयुधें यांचा अर्जुनानें संहार केल्याचें ऐकून कौरव निर्जन वनांत वृषभाचा वध झाला असतां गाई भयभीत होऊन जशा सर्वत्र पळत सुटतात, त्याप्रमाणें पळूं लागले !

( २ ) राजा, भीमानें भयंकर गर्जना करून आकाश व पृथ्वी कंपित करून सोडली आणि भुजास्फालन करून तो वल्गना करीत नाचूं लागला, त्यामुळें कौरव अत्यंत भयग्रस्त होऊन गेले ! सोमक व सृंजय यांनीं मोठ्यानें शंख वाजविले ! इतर क्षत्रियांनींहि कर्णाचा वध होतांच आनंदित होऊन परस्परांस आलिंगन दिलें ! अरण्यांत जसा सिंहानें गजाचा वध करावा, त्याप्रमाणें अर्जुनानें कर्णाशीं संग्राम करून त्याचा वध केला आणि त्या पुरुषश्रेष्ठानें आपली प्रतिज्ञा शेवटास नेऊन कर्णाच्या वैराचाहि शेवट करविला ! नंतर तो मद्राधिप शल्य दुःखग्रस्त चित्तानें भग्नध्वज रथ घेऊन दुर्योधनाजवळ आला आणि दुःखाश्रू ढाळीत त्याला म्हणाला, " दुर्योधना, तुझ्या सैन्यांतील गज, अश्व, रथ आणि वीर यांचा संहार झाला असून त्याला यमराष्ट्राचें स्वरूप प्राप्त झालें आहे ! राजा, तुझ्या सैन्यांतील पर्वतशिखरांप्रमाणें मोटमोठे गज आणि अश्व यांनीं परस्परांना तुडवून भयंकर नाश केला आहे ! हे राजा, ह्या कर्णार्जुनसंग्रामाप्रमाणें संग्राम आजपर्यंत कधीं झाला नाहीं ! कर्णानें कृष्णार्जुनांना व तुझ्या इतर सर्व शत्रूंना अगदीं ग्रासून टाकिलें होतें, परंतु ज्याअर्थीं आमचा नाश होऊन पांडवांचें संरक्षण झालें, त्याअर्थीं दैवाचीच अनुकूलता पांडवांना होती असें म्हटलें पाहिजे ! तुझ्या कार्यसिद्ध्यर्थ जे योद्धे तुझ्या बाजूनें युद्ध करीत होते, ते देखील शत्रूंकडून वधिले गेले ! हे राजा, तुझे वीर वीर्य, शौर्य, बल तेज व इतर गुणांमध्यें कुबेर, यम, इंद्र यांसारखे प्रभावी आणि अवध्य असूनहि पांडवांच्या हातून वध पावले ! हे भारता, ही सर्व दैवाची प्रतिकूलता आहे, तर तूं शोक करूं नकोस; सर्वदा सिद्धीच मिळत असते असें नाहीं ! " अशाप्रकारें मद्रराज शल्याचें भाषण श्रवण करून आणि आपलीं सर्व दुष्कृत्यें मनांत आणून दुर्योधन दीन होऊन गेला आणि पुनः पुनः दुःखाचे निश्वास टाकीत मूर्च्छित झाला ! ८. ९२.

## अध्याय ९३ वा.

[ १ धृतराष्ट्रप्रश्न. २ संजयानें केलेलें कौरवांच्या दुर्दशेचें वर्णन. ३ दुर्योधनाचा कौरवसैनिकांस धारातीर्थी मरून जाणेंच श्रेयस्कर होय असा उपदेश. ]

( १ ) **धृतराष्ट्र**—संजया, कर्णार्जुनांच्या युद्धदिवशीं जो भयंकर संहार उडाला, त्यांत कुरु-सृंजयांचीं सैन्यें दग्ध होऊन पळून जाऊं लागलीं आणि बाण-प्रहारांनीं त्यांचा नाश झाला; पुढें त्या सैन्याचें काय झालें तें सांग !

( २ ) **संजय**—राजा, त्या युद्धांत नर, गज आणि अश्व यांचा जो भयंकर नाश झाला, तो सांगतों; लक्ष्यपूर्वक ऐक ! कर्णाचा वध केल्यावर पार्थानें सिंह-नाद केला, तेव्हां तुझे पुत्र भीतीनें पळत सुटले ! कर्णाचा वध झाल्यावर सैन्यांना आंवरून धरण्याची किंवा पांडवांशीं युद्ध करण्याची शक्ति त्यांपैकीं एकाच्याहि अंगीं नव्हती ! नौका भग्न झाली असतां त्या भयंकर विनाशकालीं त्यांतील वणिग्जनांची जशी स्थिति होते, तशीच त्यांची स्थिति होऊन गेली ! सूतपुत्र कर्णाचा वध झाल्यावर शस्त्रांनीं क्षत झालेले कौरव सिंहांनीं पीडित हरिणांप्रमाणें, भग्नशृंग वृषभांप्रमाणें किंवा दांत पाडून टाकलेल्या सर्पांप्रमाणें सर्वत्र पळत सुटले ! अर्जुनानें पराभव केल्यावर मोठमोठे वीर तीक्ष्ण बाणांनीं हत होऊन सर्व सैन्याचा संहार झाला व तें संध्याकाळीं मागें फिरलें ! सूतपुत्र कर्णाच्या वधानंतर तुझे पुत्र भीतीनें पळून गेले ! त्यांच्या हस्तांतील शस्त्रें गळून पडलीं, अंगांतील कवचें विदीर्ण झालीं व आपण कोठें आहों, हेंहि त्यांस समजेनासें झालें !

राजा, भयाकुल होऊन ते आपापल्याच लोकांवर प्रहार करूं लागले ! 'हा अर्जुन माझ्या मागून येत आहे; हा भीमसेन माझ्या मागें लागला आहे,' असें मानून कौरववीर घाबरून गेले व मूर्च्छित होऊन पडले ! कित्येक महारथ गजांवर, कित्येक अश्वांवर, तर कित्येक पदातींच्या स्कंधांवर आरूढ होऊन भीतीनें पळूं लागले ! पळत असतां गजांनीं रथांना, महारथांनीं सादींना, अश्वसमुदायांनीं पदातिगणांना तुडवून टाकिलें ! राजा, व्याघ्र, तस्कर इत्यादिकांनीं व्याप्त वनामध्यें सार्थभ्रष्ट प्रवाशाची जी स्थिति होते, तीच स्थिति कर्णवधानंतर तुझ्या योद्ध्यांची झाली ! वीरहीन गज किंवा हस्तहीन नर यांप्रमाणें तुझे वीर भयभीत झाले आणि त्यांना सर्वत्र अर्जुनच दिसूं लागला ! भीमसेनाच्या भीतीनें कौरववीर पळत असल्याचें पाहून दुर्यो-

धनानें मोठ्या दुःखानें आपल्या सारथ्याला म्हटलें, "मी धनुष्पाणि समोर उभा असतां भीम माझा अतिक्रम कधींहि करूं शकणार नाहीं ! याकरितां माझे अश्व सर्व सैन्याच्या मागून सावकाश हांक ! भीमसेन जर माझ्याशीं युद्ध करूं लागला, तर मी निःसंशय त्याचा वध करीन ! विस्तीर्ण समुद्राच्यानें ज्याप्रमाणें आपल्या सीमेचें अतिक्रमण करवत नाहीं, त्याप्रमाणें भीम माझ्याशीं युद्धार्थ उभा राहूं शकणार नाहीं ! आज मी त्या गोविंदाला, मानी भीमसेनाला, अर्जुनाला आणि दुसऱ्याहि मोठमोठ्या शत्रूंना मारून कर्णाच्या ऋणांतून मुक्त होईन !"

राजा, अशाप्रकारें शूर आर्याला शोभेल, असें त्या दुर्योधनाचें भाषण श्रवण करून तो सारथि दुर्योधनाच्या रथाचे अश्व हळूहळू चालवूं लागला ! तें पाहून कौरवांचें पंचवीस सहस्र पदातिसैन्य युद्धार्थ उभें राहिलें ! त्याला क्रोधाविष्ट भीमसेन व धृष्टद्युम्न यांनीं चतुरंग सैन्यासह वेढा दिला आणि त्यावर भयंकर बाणवृष्टि सुरू केली ! त्या युद्धांत कित्येक कौरववीर भीम व धृष्टद्युम्न यांचीं नांवें उच्चारून त्यांच्यांशीं युद्ध करूं लागले ! त्यामुळें संतप्त भीम तत्काळ रथांतून खालीं उतरला आणि गदापाणि होऊन त्यानें कौरवांशीं बाहुयुद्ध आरंभिलें ! त्या धर्मज्ञ भीमसेनाला पादचारी कौरवसैन्याशीं आपण रथांतून युद्ध करणें प्रशस्त वाटलें नाहीं ! भीमसेनानें आपली सुवर्णालंकृत गदा घेऊन दंडपाणि अंतकाप्रमाणें तुझ्या पदातींचा संहार केला ! तुझे पदातीहि जीवाची आशा सोडून पतंग ज्याप्रमाणें अग्नीवर धांवून जातात, त्याप्रमाणें भीमसेनावर धांवून गेले ! मग भूतसमुदाय जसा अंतकापासून संहार पावतो, त्याप्रमाणें ते सर्व कौरववीर भीमाच्या हस्तें नाश पावले ! भीमसेन गदा हातांत घेऊन श्येनपक्ष्याप्रमाणें आकाशांतून भ्रमण करूं लागला आणि तेथून गदाप्रहारानें त्यानें त्या पंचवीस हजार कौरववीरांचा संहार केला !

राजा, त्या सत्यपराक्रमी भीमानें धृष्टद्युम्नाला पुढाकार दिला व आपण स्वस्थ उभा राहिला ! नंतर धनंजय कौरवांच्या रथसैन्यावर आणि नकुल, सहदेव व सात्यकि हे मोठ्या वेगानें शकुनीवर धांवून गेले ! त्यांनीं तीक्ष्ण बाणांनीं शकुनीचे अश्वसादींचा वध केला ! इतक्यांत गांडीवाचा टणत्कार करीत अर्जुनहि तुझ्या रथसैन्यावर चाल करून आला ! तेव्हां तो अर्जुनाचा कृष्णसारथि, त्याचा तो श्वेताश्व रथ आणि त्या रथांत अधिष्ठित झालेला तो अर्जुन यांना पाहून तुझें सैन्य भयभीत होऊन पळत सुटलें !

अशाप्रकारें त्या धृष्टद्युम्नानें कौरवांच्या पंचवीस सहस्र पदातींवर बाणांची वृष्टि करून त्यांस यमसदनीं पाठविलें आणि भीमसेनाला पुनः पुढाकार देऊन तो स्वतः रणांगणावर आला ! त्याला समरभूमीवर पाहतांच तुझें सैन्य भयभीत होऊन पुनः पळत सुटलें ! त्या धृष्टद्युम्नाला माद्रीपुत्र नकुल-सहदेव, सात्यकि, चेकितान, शिखंडी आणि द्रौपदेय हे जाऊन मिळाले ! त्या सर्वांनीं मिळून तुझ्या सैन्याचा संहार करून शंख वाजविले ! नंतर तुझे सैनिक पळून जात असल्याचें पाहून, क्षुब्ध झालेल्या वृषभाच्या मागें जसे दुसरे वृषभ लागतात, त्याप्रमाणें त्या वीरांनीं त्यांचा पाठलाग केला ! तुझ्या अवशिष्ट रथसैन्यावर त्या बलवान् अर्जुनानें क्रोधानें चालून जाऊन त्यावर गांडीव धनुष्यानें भयंकर शरवृष्टि केली ! त्या शरवृष्टीनें सर्वत्र इतका अंधार पडला कीं, आधींच धुळीनें व्याप्त झालेल्या महीतलावर कोणाला कांहींच दृष्टीस पडेना, असें होऊन गेलें !

( ३ ) हे राजा, त्यावेळीं तुझे सर्व योद्धे भयभीत होऊन पळून गेले, तेव्हां तुझ्या दुर्योधन पुत्रानें आपल्यावर चालून आलेल्या पांडववीरांवर चाल केली व बलीनें देवांस आह्वान केलें, त्याप्रमाणें इतर पांडवांसहि युद्धार्थ आह्वान केलें ! तेव्हां ते सकल पांडवयोद्धे गर्जना करीत दुर्योधनावर चालून आले ! त्यांनीं कौरवांची निर्भर्त्सना करीत त्यांजवर शस्त्रास्त्रांची सारखी वृष्टि केली ! दुर्योधनानें त्यांशीं भयंकर संग्राम करून त्यांच्या शतशः आणि सहस्रशः वीरांचा वध केला ! त्यावेळीं दुर्योधन एकटाच असून त्या एकत्रित झालेल्या पांडवांच्या सैन्यांशीं युद्ध करीत होता ! हा तुझ्या पुत्राचा पराक्रम पाहून मला मोठें आश्चर्य वाटलें ! आपल्या सैन्याची ती दुरवस्था पाहून तो कुरुराज दुर्योधन त्यांस धीर देण्यासाठीं म्हणाला, “ वीरांनो, तुम्ही पांडवांना भिऊन पळून जात आहां ! परंतु मला एकहि स्थळ दिसत नाहीं, कीं जेथें गेल्यानें तुमचें पांडवांपासून रक्षण होईल; मग तुम्ही पळून जाण्यांत लाभ तरी कोणता ? ह्या पांडवांचें सैन्य अगदीं अल्प आहे आणि कृष्णार्जुन तर शरप्रहारांनीं विद्ध झाले आहेत ! आज मी सर्व पांडवांचा वध करीन ! वीरहो, आमचा विजय निश्चयेंकरून होणार आहे ! जर आतां भंग पावून पळून जाल, तर तुम्हां अपराध्यांचा पाठलाग करून पांडव तुमचा वध निःसंशय करितील ! आम्हांला रणांगणावर मरणें हेंच यशस्कर होय ! क्षत्रधर्मानें युद्ध करणाऱ्याला संग्रामांत मृत्यु येणें हें सर्वदा सुखकारकच आहे ! रणांत मृत्यु पावलेल्याला दुःखाचा अनुभव

कधींहि येत नाहीं, तो मेल्यावर अनंत सुख भोगीत असतो! येथें जमलेले सर्व क्षत्रियहो, माझें भाषण श्रवण करा! जर यम शूराला काय किंवा भित्र्याला काय, सर्वांलाच मारतो, तर माझ्यासारख्या क्षत्रियव्रती पुरुषांनीं युद्ध न करणें हा मूर्खपणाचा मार्ग नव्हे काय? कोण मूर्ख त्या क्रुद्ध व द्वेष्ट्या भीमसेनाला वश होईल? वीरहो, वाडवडिलांनीं आचरिलेला धर्म सोडणें हें तुम्हांला योग्य नाहीं! युद्धांत पलायनाइतका क्षत्रियाला दुसरा कोणताहि पापकारक अधर्म नाहीं! कौरवांनो, युद्धधर्मापेक्षां स्वर्गाचा दुसरा कोणताच श्रेयस्कर मार्ग नाहीं! म्हणून आतां तुम्ही त्वरित युद्धांत देह ठेवून स्वर्ग-सुखाचा अनुभव घ्या!"

**संजय**—अशाप्रकारें तुझ्या पुत्रानें अनेक प्रकारें सांगितलें तरी शरप्रहारांनीं अतिविद्ध झालेल्या सैनिकांनीं त्याच्या भाषणाकडे दुर्लक्ष्य केलें आणि ते दाही दिशांना पळून गेले! ८. ९३.

---

## अध्याय ९४ वा.

[ १ शल्यानें केलेलें रणभूमिवर्णन. २ कर्णवधाची वार्ता ऐकून दुर्योधनाची मूर्च्छा. ३ कर्णस्वरूपवर्णन. ४ देव-गंधर्वांनीं केलेलें कृष्णार्जुनांचें स्तवन. ]

( १ ) **संजय**—राजा धृतराष्ट्रा, युद्धांतून पळून जाणाऱ्या तुझ्या सैनिकांचें पूर्ण मन युद्धार्थ वळविण्याचा दुर्योधन यत्न करीत असल्याचें पाहून मद्रराज शल्य संत्रस्त होऊन गेला, त्याला कांहीं सुचेनासें झालें आणि तो दुर्योधनाला भीतभीत म्हणाला—

**शल्य**—दुर्योधना, नर, अश्व आणि गज यांच्या मृतदेहांच्या राशींनीं भरलेली ही रणभूमि[1] कशी भयंकर दिसत आहे पहा! येथें पर्वतप्राय गज शर-प्रहारांनीं भग्न होऊन पडले आहेत; त्यांच्यापैकीं कित्येक विवळत आहेत, तर कित्येक मरून पडले आहेत! तसेच हे शरांनीं भिन्न होऊन पडलेले अश्व पहा! कित्येक आर्त होऊन निश्वास टाकीत आहेत, व रक्त ओकत आहेत! कित्येक दीन होऊन आक्रोश करीत आहेत, कित्येक इकडेतिकडे नेत्र

---

१ अशा प्रकारचीं रणभूमिवर्णनें सप्तम आणि अष्टम खंडांत अनेक ठिकाणीं आलीं असल्यामुळें येथें त्या वर्णनाचा बराच संक्षेप केला आहे.

फिरवीत आहेत, कित्येक पृथ्वीचा चावा घेत आहेत, तर कित्येक अनाथ होऊन आर्त स्वर काढीत आहेत ! हे गज व अश्व यांवरील वीरसमुदाय बाणप्रहारांनीं भिन्नदेह होऊन खालीं पडले आहेत ! त्यांतील कित्येक आसन्नमरण आहेत, तर कित्येक गतप्राण झाले आहेत ! ह्या महासंग्रामांत अनेक नर, अश्व, गज व रथ ह्यांचा संहार झाला आहे, त्यावरून ही रणभूमि म्हणजे वैतरणीच होय असें वाटतें ! हे हत होऊन पडलेले गजयोधी, अश्वयोधी, रथयोधी आणि पदाति पहा ! त्यांचीं कवचें, आभरणें, वसनें आणि आयुधें विदीर्ण होऊन रणाग्रभागीं पडलेलीं आहेत; त्यांना पाहून विझविलेले अग्निच ते होत, असें भासतें ! हे शरप्रहारांनीं व्याकुल होऊन पडलेले सहस्रशः योद्धे पाहतांच जणुंकाय अंतरिक्षांतून रात्रौ पडलेल्या अतिदीप्तिमान् ग्रहांनीं ही भूमि आकाशाप्रमाणेंच शोभत आहे असा भास होतो !

राजा, कर्णार्जुनांच्या बाणांनीं विद्ध होऊन मूर्च्छित झालेले सृंजय व कौरव वीर पुनः सावध होऊन श्वासोच्छ्वास टाकीत आहेत ! त्यामुळें विझविलेले अग्नि पुनः प्रज्वलित झाल्याचा भास होत आहे ! हे राजा, कर्णार्जुनांच्या बाणांनीं पतन पावलेले नर, अश्व, गज आणि रथ यांच्या योगानें पृथ्वी आच्छादित होऊन अदृश्य झाली आहे ! तसेंच त्यांच्या बाणसमुदायांनीं भग्न झालेल्या रथांवरील आयुधें, ध्वज, बंधनें, चक्रें, आंस, जोखडें व त्रिवेणु हीं अगदीं छिन्नभिन्न होऊन गेलीं आहेत ! त्या रथांतील शस्त्रें व उपयुक्त द्रव्यें नष्ट झालीं आहेत; रथांचे कणे मोडले आहेत; त्यांचे निषंग ( बाणभाते ) व बंधनरज्जु तुटून गेले आहेत आणि सुवर्णमंडित आसनें भंग पावलीं आहेत ! अशी रथाच्छादित भूमि अवलोकन केली असतां जणुंकाय शारदीय मेघांनींच आकाश आच्छादित केलें आहे, असा भास होतो ! हे सुवर्णपट्टे, परिघ, परश्वध ( कुऱ्हाडी ), शूल, मुसलें, मुद्गर, खड्गें, गदा, धनुष्यें, बाहुभूषणें, शर, ऋष्टि, प्रास, हार, ध्वज, पताका, मुकुट, मोत्यें, रत्नें इत्यादिकांचे नग इतस्ततः पडून राहिलेले दिसत आहेत ! सुखोपभोगक्षम गात्रें, इंदुसमान मुखांनीं युक्त मस्तकें, देह, भोग, दास-दासी, सर्व प्रकारचे सुखविलास यांचा त्याग करून मोठ्या धर्मनिष्ठेनें हे अनेक वीर यश संपादण्याकरितां स्वर्गलोकीं गेले ! म्हणून दुर्योधना, तूं आतां मागें फिर, सैनिक युद्ध सोडून जात आहेत ते जावोत, आणि तूंहि शिबिराला जा ! सूर्य अस्ताचलाला चालला आहे ! हें सर्व संकट ओढवण्याचें कारण तूंच आहेस !

( २ ) राजा धृतराष्ट्रा, दुर्योधनाला असें बोलून तो शोकाकुल शल्य स्तब्ध राहिला ! दुर्योधन आर्त होऊन 'हा कर्णा,' 'हा कर्णा' असा शोक करूं लागला; त्याच्या नेत्रांतून दुःखाश्रू वाहूं लागले; अखेरीस तो संज्ञाहीन होऊन पडला ! तेव्हां द्रोणपुत्र अश्वत्थामादि सर्व वीर तेथें आले आणि त्यांनीं त्याचें नानाप्रकारें सांत्वन केलें ! अर्जुनाचा ध्वज, तसेंच नर, गज व अश्व यांच्या रक्तानें सिंचित झालेली भूमि अवलोकन करून जरीचीं लाल वस्त्रें परिधान करून व रक्तवर्ण पुष्पमाला गळयांत घालून ही कोणी दिव्य स्त्रीच उभी आहे, असें त्यांस भासलें ! ते योद्धे जरी रणांगणांत मृत्यु पावून स्वर्गलोकीं जाण्याकरितां तयार होते, तरी त्या रौद्रप्रसंगीं ते तेथें उभे राहूं शकले नाहींत ! कर्णवधामुळें दुःखित होऊन 'हा कर्णा, हा कर्णा,' असें म्हणत ते त्वरेनें रक्तसूर्यबिंबाकडे पहात आपापल्या शिबिराला निघून गेले ! अर्जुनाच्या गांडीव धनुष्यापासून सुटलेले सुवर्णपुंख बाण प्रथम कर्णाच्या शरीरांत शिरले आणि नंतर तेथून ते बाहेर पडले ! त्या बाणांचे पंख त्याच्या रुधिरांत दिग्ध झाले व बाणहि त्याच्या शरीरांत रुतून तो कर्ण अंशुमाली सूर्याप्रमाणें दिसूं लागला ! रुधिरावसिक्त कर्णशवाला भक्तानुकंपी भगवान् रक्तवर्ण सूर्य करस्पर्श करून स्नानार्थ परसमुद्राला जाऊं लागला ! तें पाहून सुर व ऋषि यांचे समूहहि तें स्थान सोडून आपापल्या स्थानीं गेले ! याप्रमाणें निखिल प्राणिवर्गास भयंकर वाटणारें असें कुरु-पांडवांच्या मुख्य वीरांचें—कर्णार्जुनांचें—तें अद्भुत युद्ध पाहून सर्व लोक त्यांची प्रशंसा करीत निघून गेले !

( ३ ) कर्णाचें कवच शरप्रहारांनीं विदीर्ण होऊन त्याच्या शरीरांतून रक्त वाहूं लागलें; त्याच्या योगानें त्याचीं वस्त्रें रक्तवर्ण दिसत होतीं ! तो मृत होता, तरी त्याच्या शरीरावरील तेज नाहींसें झालें नव्हतें ! तो तप्त सुवर्णाप्रमाणें किंवा सूर्य व अग्नि यांप्रमाणें दीप्तिमान् दिसत असून सर्व प्राण्यांना तो शूर कर्ण जीवंत आहे असेंच वाटत असे ! सिंहाला पाहून मृग जसे भयभीत होऊन जातात, त्याप्रमाणें त्या कर्णाचें शव पाहून सर्व योद्ध्यांना भीति वाटत असे ! त्या महात्म्या कर्णाला कोणतीच विकृति नसल्यामुळें तो मृत झाला असतांहि जीवंतच आहे, असें सर्वांना वाटत असे ! तो कर्णाचा वेष सुंदर असून त्याचें मस्तकहि रमणीय केसांनीं विशेषच शोभायमान दिसत असे ! त्याच्या मुखाची कांति पूर्ण चंद्राप्रमाणें शोभिवंत होती ! राजा, त्याच्या शरीरावर अनेक प्रकारचीं आभरणें असून त्याचीं बाहुभूषणें तप्त सुवर्णाप्रमाणें विराजत होतीं !

असा तो कर्णदेह समरभूमीवर पडलेला पाहून अंकुरांनीं युक्त वृक्षच पडला आहे असें वाटूं लागलें ! कर्णाचें शरीर सुवर्णासमान असल्यामुळें तो प्रज्वलित अग्निच आहे असें वाटत असे ! ज्याप्रमाणें पेटणारा अग्नि जलाच्या योगानें शांत होतो, तसा पार्थाच्या शररूप जलवृष्टीनें तो कर्णाग्नि उपशम पावला ! अशा रीतीनें कर्णानें आपलें यश दाही दिशांमध्यें मिरविलें ! त्यानें आपल्या अस्त्रतेजानें सर्व पांडव आणि पांचाल यांस भयभीत करून सोडिलें ! शत्रूंवर तीक्ष्ण बाणवृष्टि करून त्यांचा निःपात केला आणि सूर्याप्रमाणें सर्व जगताला तापवून सोडलें ! अशा त्या कर्णाचा पुत्र व वाहनें यांसह अर्जुनानें वध केला ! आणि वृक्षाचा नाश झाला असतां पक्षी जसे अनाथ होतात, त्याप्रमाणें कर्णनिधनानें याचकांचा कल्पवृक्ष नाहींसा होऊन ते अनाथ झाले ! कोणींहि प्रार्थना केली असतां जो सर्वदा ‘देतों’ असेंच म्हणत असे, ‘नाहीं’ असें तो कधींच कोणाला म्हणत नसे, त्या महात्म्यानें आपलें सर्व वित्त ब्राह्मणांच्या स्वाधीन केलें होतें ! ब्राह्मणाला वाटेल ती वस्तु–आपलें स्वतःचें जीवित देखील–देण्यास तो सर्वदा तत्पर असे ! महारथ कर्ण हा सर्वदा स्त्रियांना प्रिय असे ! असा तो कर्ण अर्जुनाच्या अस्त्राग्नीनें दग्ध होऊन स्वर्गाला गेला !

राजा, ज्याचा आश्रय करून तुझ्या पुत्रानें पांडवांशीं वैर केलें, तो कर्ण स्वर्गास गेला आणि त्याबरोबरच तुझ्या पुत्रांची जयाशा, सुख व सर्व आधार नाहींसा झाला ! कर्णाचा वध होतांच नद्यांचें वाहणें बंद झालें, सूर्य अस्ताला गेला आणि सोमपुत्र बुधग्रह अग्नीप्रमाणें तेज धारण करून तिर्यक् गमन करूं लागला ! आकाशांत मोठ्यानें स्फोट होऊं लागला, पृथ्वी गर्जना करूं लागली, सोसाट्याचे वारे सुटले, दिशा पेटूं लागल्या, महार्णव क्षुब्ध होऊन घोष करूं लागले, पर्वत कांपूं लागले, सर्व भूतगण भयभीत होऊन गेले, अंतरिक्ष तमोव्याप्त झालें, भूमि कंपायमान झाली, प्रज्वलित उल्का खालीं पडूं लागल्या, आणि निशाचर अत्यंत आनंदित झाले ! अर्जुनानें कर्णाचें शिर क्षुर बाणानें छेदिलें, तेव्हां अंतरिक्षांत देवांच्याहि तोंडून हाहाकार निघाले. पूर्वी वृत्रासुराच्या वधानंतर जसें शतक्रतु इंद्राचें तेज वाढलें, तसाच कर्णाचा वध केल्यावर अर्जुनहि परम तेजानें शोभूं लागला ! नंतर महेंद्राच्या अश्वांसमान अश्व जोडलेल्या रथांतून ते इंद्रतुल्य पराक्रमी नरश्रेष्ठ कृष्णार्जुन रणांतून जाऊं लागले, तेव्हां एका रथांत बसून हे विष्णु-वास

वच शोभत आहेत, असें सर्वांस वाटलें! अर्जुनानें आपल्या प्रत्यंचेचा नाद, टाळयांचा ध्वनि आणि बाणांचा घोष यांच्या योगानें शत्रूंना हतप्रभ करून सोडिलें! नंतर ते अमितप्रभावी कृष्णार्जुन मोठ्या आनंदानें शत्रु-स्त्रियांचीं हृदयें भग्न करीत जात असतां आपले शंख वाजवूं लागले! त्या पांचजन्य व देवदत्त या दोन्ही शंखांच्या प्रचंड आवाजानें आकाश, पृथ्वी आणि दिशा हीं सर्व व्यापून गेलीं! हे राजसत्तमा, कृष्णार्जुनांचा तो शंखनाद ऐकून सर्व कौरव भयभीत झाले आणि युधिष्ठिराला मोठा आनंद झाला! तो ध्वनि कानीं पडतांच ते कौरवसैनिक मद्राधीश शल्य व राजा दुर्योधन यांस सोडून वेगानें पळत सुटले!

( ४ ) राजा, त्या महायुद्धांत सर्व भूतगण एकत्र होऊन त्यांनीं कृष्णार्जुनांचें मोठ्या प्रेमानें अभिनंदन केलें! त्यावेळीं त्यांस ते दोघे उदयास आलेले दिवाकरच होत असें वाटलें! दोघांच्याहि शरीरांत कर्णबाण रुतून राहिले होते; त्या योगानें अंधकाराचा नाश करून आकाशांत रश्मिमाली चंद्रसूर्यच विराजत आहेत असें सर्वांस भासलें. नंतर त्या उभयतां कृष्णार्जुनांनीं आपल्या शरिरांत रुतलेले बाण काढून टाकिले आणि मग ते दोघे अतुलपराक्रमी वीर आपल्या सुहृद्गणांसह शिबिरास निघून गेले! तेथें प्राप्त झाल्यावर, सदस्यांनीं आहूत विष्णु-वासवच आले आहेत, असें सर्वांस वाटलें! त्या समयीं देव, गंधर्व मनुष्य, चारण, महर्षि, यक्ष आणि महोरग यांनीं कृष्णार्जुनांनीं मिळविलेल्या जयाबद्दल त्यांचें पूजन केलें आणि त्यांचे गुणानुवाद गाइले! तेव्हां बलदैत्याचा वध केल्यावर जसे विष्णु-वासव हर्षभरित झाले, तसेच ह्यावेळीं ते कृष्णार्जुन सुहृद्गणांसह अतिआनंदित झाले! ८. ९४.

---

## अध्याय ९५ वा.

[ १ शिबिरप्रयाण. ]

( १ ) **संजय**—राजा, विकर्तनपुत्र कर्णाचा वध झाल्यावर सहस्रावधि कौरव भयपीडित होऊन सर्व दिशांकडे पहात पळत सुटले! शत्रूंच्या बाणांनीं विद्ध झालेल्या तुझ्या वीरांनीं युद्धनिवृत्ति करण्याचा विचार ठरविला! तुझे दुःखपीडित सैनिक दुर्योधनानें कितीहि निवारण केलें, तरी युद्धविमुख होऊन मार्गे परतले! तें पाहून दुर्योधनानेंहि त्यांचा व शल्याचा विचार घेऊन

सर्व सैन्यें मागें फिरविलीं. मग कृतवर्मा तुझ्या नारायणसैन्यांतील अवशिष्ट रथ्यांसह शिबिरास गेला ! शकुनीहि आधिरथ कर्णाचा वध झाल्याचें पाहून सहस्र गांधार यांसहवर्तमान शिबिरास गेला ! राजा, शारद्वत कृप महामेघसदृश आपली गजसेना घेऊन त्वरित शिबिरास गेला ! शूर अश्वत्थामा पांडवांचा जय झाल्याचें पाहून दुःखाचे श्वासोच्छ्वास टाकीत शिबिरास गेला ! सुशर्मा संशप्तकांच्या अवशिष्ट राहिलेल्या सैन्यासह भयाकुल होऊन आपल्या निवेशाला गेला ! राजा दुर्योधन आपलें सर्वस्व आणि बांधव यांचा नाश झालेला पाहून अत्यंत दुःखी व विमनस्क होत्साता शिबिराकडे वळला; तसाच तो रथिश्रेष्ठ शल्य छिन्नध्वज रथ घेऊन दाही दिशांकडे दृष्टिक्षेप करीत आपल्या निवेशाला गेला ! दुसरेहि अनेक भारतीय महारथी लज्जित होऊन उद्विग्न मनानें शिबिराकडे वळले ! आणि सर्व भयाकुल कौरववीर विद्ध होऊन रक्त ओकत आणि कांपत निघून गेले !

राजा, त्यावेळीं कित्येक महारथ अर्जुनाची, तर कित्येक कर्णाची प्रशंसा करूं लागले ! सर्व कौरव भयत्रस्त होऊन दाही दिशांना पळत सुटले ! त्या महायुद्धांत असलेल्या सहस्रावधि योद्ध्यांमध्यें एकहि पुरुष असा नव्हता, कीं ज्याच्या मनांत युद्ध करण्याची इच्छा होती. कर्णाचा वध होतांच सर्व कौरव जीवित, राज्य, स्त्रिया किंवा धन यांविषयीं अगदीं निराश होऊन गेले. त्या सर्वांना मोठ्या प्रयत्नानें तुझ्या दुःखशोकाकुल पुत्रानें एकत्रित केलें आणि आतां आपापल्या शिबिराला जा म्हणून मोठ्या खेदानें त्यांना सांगितलें ! ती दुर्योधनाची आज्ञा शिरसा मान्य करून ते वीर मोठ्या कष्टानें शिबिराला निघून गेले ! ८. ९५.

---

## अध्याय ९६ वा.

[ १ कृष्णार्जुन युधिष्ठिराकडे जाऊन कर्णवधवृत्तानें त्याला हर्षवितात. २ धर्मराजाचें रणभूमिदर्शनाकरितां गमन व कृष्णप्रशंसा. ३ धृतराष्ट्राचा शोक. ४ कर्णवधकथाश्रवणमाहात्म्य. ]

( १ ) **संजय**—राजा धृतराष्ट्रा, अशाप्रकारें कर्णाचा वध होऊन कौरवसैन्य पळून गेलें असतां दाशार्ह कृष्णानें मोठ्या आनंदानें अर्जुनाला आलिंगन दिलें व म्हटलें "हे धनंजया, वज्रधारी इंद्रानें जसा वृत्राचा वध केला, तसाच तूं

कर्णाचा वध केला आहेस ! वृत्राच्या वधाचे वर्णनाप्रमाणेंच मानव आतां कर्णवधाचेंहि वृत्त परस्परांस कथन करितील ! इंद्रानें वृत्राला आपल्या वज्रानें मारिलें, त्याप्रमाणें तूंहि कर्णाला गांडीव धनुष्यानें तीक्ष्ण बाणांची वृष्टि करून मारलेंस ! कौंतेया, चल, तुझा तो यशस्कर पराक्रम आतां धर्मराजाला जाऊन सांगूं ! अर्जुना, कर्णाचा वध करण्याचा तुझा उद्देश बरेच दिवसांपासूनचा आहे; म्हणून कर्णाचें वधवृत्त युधिष्ठिराला सांगून तूं अनृणी हो ! पूर्वीं तुझें व कर्णाचें युद्ध सुरू असतां तें पाहण्याकरितां युधिष्ठिर मोठ्या कौतुकानें आला होता; परंतु तो शरांनीं विद्ध झाला असल्यामुळें रणांगणांत राहण्यास शकला नाहीं ! म्हणून तो शिविरांत जाऊन स्वस्थ पडून राहिला !” कृष्णाचें भाषण ऐकून अर्जुनानें ‘ ठीक आहे ’ असें म्हटलें आणि मग त्या यदुपुंगवानें अर्जुनाचा रथ मागें फिरविला. त्यावेळीं कृष्ण सैनिकांना म्हणाला, ‘ वीरहो, सावधानपणें शत्रूवर नजर ठेवा ! तुमचें कल्याण होवो !’ नंतर कृष्ण धृष्टद्युम्न, युधामन्यु, नकुल, सहदेव, भीमसेन आणि युयुधान यांस म्हणाला, आम्ही जाऊन कर्णवधवृत्त युधिष्ठिराला कळवितों, तोंपर्यंत तुम्ही शत्रूशीं मोठ्या दक्षतेनें युद्ध करा !’

धृतराष्ट्रा, त्या सर्व शूरांनीं कृष्णाला अनुमोदन दिल्यावर तो अर्जुनाला घेऊन धर्मराजाकडे गेला ! तो राजश्रेष्ठ युधिष्ठिर सुवर्णाच्या शय्येवर पडला होता, तेथें जाऊन कृष्णार्जुनांनीं हर्षभरानें त्याचे पायांना स्पर्श केला ! धर्मराजानें त्यांची ती आनंदित मुद्रा पाहून अर्जुनानें कर्णवध केल्याचें जाणलें, आणि लागलाच उठून त्यानें त्या कृष्णार्जुनांस वारंवार प्रेमानें आलिंगन दिलें. नंतर त्यानें कृष्णार्जुनांस युद्धवृत्त विचारिलें ! तेव्हां कृष्णानें सर्व कर्णवधवृत्तांत त्यास सांगितला आणि हास्यपूर्वक म्हटलें, “ धर्मा, आज अर्जुन, भीम, नकुल, सहदेव व तूं हे सर्व कुशल आहांत, ही मोठ्या सुदैवाची गोष्ट आहे ! ह्या लोकक्षयकर महासंग्रामांतून तुम्ही मुक्त झालां, ही खरोखर मोठ्या आनंदाची गोष्ट समज ! आतां पुढील कार्याकरितां तुला सिद्ध झालें पाहिजे ! सुदैवानें महारथ सूतपुत्र वैकर्तन कर्ण युद्धांत हत झाला आणि तूं जय पावलास ! धर्मा, ज्यानें द्यूतांत जिंकिलेल्या द्रौपदीला अनेकप्रकारें विटंबिलें, त्या पुरुषाधम कर्णाचें रक्त आज भूमि प्राशन करीत आहे ! हे कुरुपुंगवा, आज तो तुझा शत्रु शरविद्ध होत्साता भूमीवर मृत होऊन पतन पावला आहे ! महाभुजा युधिष्ठिरा, तूं आतां हतशत्रु होऊन आम्हांसह या पृथ्वीचा पुष्कळ वर्षें भोग घे !”

**संजय**—राजा, अशाप्रकारें कृष्णाचें भाषण ऐकून धर्म आनंदित झाला व त्या कृष्णाला बोलला, “ कृष्णा, किती महद्भाग्याची गोष्ट म्हणून सांगूं ! देवकीनंदना, तुला या जगांत अशक्य असें काय आहे ? तुझ्यासारखा सारथि आणि पार्थासारखा यत्नवान् पुरुष यांचा समागम घडून कर्णासारखा वीर हत झाला, यांत आश्चर्य मानण्यासारखें कांहीं नाहीं ! महाबाहो कृष्णा, हें सर्व तुझ्या कृपेचें फळ आहे ! ” नंतर त्या धर्मानें कृष्णाचा उजवा हात धरून कृष्णार्जुनांस म्हटलें, “ कृष्णार्जुनहो, तुम्ही पुराणकालांतील ऋषिश्रेष्ठ नर-नारायण आहां, असें मला नारदानें सांगितलें आहे. तत्त्ववेत्त्या कृष्णद्वैपायन व्यासानेंहि मला तुमची अशीच कथा वारंवार कथन केली आहे. कृष्णा, हा पांडव धनंजय तुझ्या प्रसादानें शत्रूंना जिंकतो आणि कधींहि अपजय पावत नाहीं. हे कृष्णा, जेव्हां तूं अर्जुनाचें सारथ्य स्वीकारिलेंस, तेव्हांच सर्वदा आमचा जय होणार, पराजय कधींहि होणार नाहीं, असें आम्हीं निश्चित ठरविलें ! गोविंदा, भीष्म, द्रोण, कर्ण आणि दुसरे पुष्कळ वीर पुरुष व त्यांचे अनुचर ह्यांचा वध झाला, हें केवळ तुझ्या कृपाप्रसादाचेंच फळ होय, असें मी समजतों ! ”

( २ ) राजा, असें भाषण करून तो युधिष्ठिर आपल्या हेमविभूषित रथांत जाऊन बसला. त्या रथाला शुभ्र अश्व जोडले होते व त्यांचीं पुच्छें कृष्णवर्ण होतीं. त्या रथावर धर्म आरूढ होऊन कृष्णार्जुनांशीं भाषण करीत रणभूमि पाहण्याकरितां निघाला. जात असतां तो पुरुषश्रेष्ठ कर्ण रणांत हत होऊन पडलेला त्याच्या दृष्टीस पडला. कदंबांच्या कुसुमाभोंवतीं जसे सर्वत्र केसर असतात, त्याप्रमाणें शरशतांनीं कर्णशरीर व्याप्त झाल्याचें त्यानें पाहिलें ! बाणांनीं त्याचें कवच छिन्नभिन्न होऊन गेलें होतें व त्याच्या शेजारींच त्याचा मृतपुत्र पडला होता ! पुनःपुनः निरीक्षण केल्यावर ते कर्ण-वृषसेनच होत, असें युधिष्ठिराच्या प्रत्ययास आलें ! नंतर पुनः कृष्णार्जुनांची स्तुति करण्यास त्यानें प्रारंभ केला. तो म्हणाला, “ कृष्णा, तूं माझें परिपालन केल्यामुळेंच मी आज बंधूंसह या पृथ्वीचा अधिपति झालों आहें ! तो अतिमानी नरव्याघ्र राधेय हत झाल्याचें ऐकून त्या दुरात्म्या दुर्योधनाची अगदीं निराशा होईल ! रणांत राधात्मज कर्णाचा वध झाल्याचें ऐकतांच दुर्योधनाला जीविताची आणि राज्याचीहि आशा राहणार नाहीं ! हे पुरुषश्रेष्ठा, तुझ्या प्रसादामुळेंच आज आम्ही कृतार्थ झालों आहों ! गोविंदा, तुझें दैव मोठें, म्हणूनच आज तूं शत्रूवर जय मिळविलास ! त्या दैवामुळेंच आज आपल्या शत्रूचा—कर्णाचा—वध

झाला आहे ! अर्जुनाच्या सुदैवानेंच तो विजयी झाला ! हे महाभुजा, तेरा वर्षें आम्हीं स्वस्थपणें झोंप घेतली नाहीं ! रात्रंदिवस जागून आम्ही दुःखांत दिवस काढले ! तुझ्या कृपेमुळें आज आम्हांला सुखाची झोंप येईल !" कृष्णार्जुनांची अशाप्रकारें त्या युधिष्ठिरानें वरचेवर स्तुति केली !

**संजय**—कर्ण व त्याचा पुत्र वृषसेन या दोहोंचाहि पार्थबाणांनीं वध झाल्याचें पाहून युधिष्ठिराला आपला पुनर्जन्म झाल्यासारखें वाटलें ! तेव्हां त्या युधिष्ठिराभोंवतीं मोठमोठे महारथी जमले आणि त्यांनीं त्याची प्रशंसा करून त्याला हर्षविलें ! तेव्हां नकुल, सहदेव, भीमसेन, सात्यकि, धृष्टद्युम्न, शिखंडी, पांडव, पांचाल आणि सृंजय ह्या सर्वांनीं कर्णवधाबद्दल त्याचें मोठें गौरव केलें ! त्यांनीं त्या धर्मात्म्या युधिष्ठिराचें अभिनंदन केलें, कृष्णार्जुनांची योग्य शब्दांनीं स्तुति केली आणि नंतर ते महारथी मोठ्या आनंदानें आपापल्या शिबिराला निघून गेले. हे राजा, अशाप्रकारें शरीर रोमांचित करणारा हा क्षय झाला आणि ह्याला कारण म्हणजे तुझाच दुर्मंत्र होय ! आतां शोक करण्यांत अर्थ तो काय ?

( ३ ) **वैशंपायन**—राजा जनमेजया, अशाप्रकारें अंबिकासुत धृतराष्ट्रानें तें अप्रिय वृत्त श्रवण करून छिन्नमूल वृक्षाप्रमाणें तो निश्चेष्ट होऊन खालीं पडला ! धृतराष्ट्राबरोबर त्याची स्त्री देवी गांधारी हीहि पडली आणि तिनें कर्णाच्या मृत्यूबद्दल अत्यंत विलाप केला ! तेव्हां विदुरानें गांधारीला व संजयानें धृतराष्ट्राला सांवरिलें आणि नंतर त्या दोघांनीं राजा धृतराष्ट्राचें सांत्वन केलें ! इतक्यांत कौरवस्त्रियांनीं गांधारीला उठविलें ! दैवच बलवत्तर आहे, व भवितव्यापुढें कांहीं उपाय चालत नाहीं, ही गोष्ट लक्ष्यांत येऊन धृतराष्ट्राला अत्यंत दुःख झालें व तो पुनः शोक करूं लागला ! चिंता व शोक यांनीं व्याप्त होऊन तो पुनः मूर्च्छित झाला ! तेव्हां विदुर-संजयांनीं पुनः त्याचें सांत्वन केलें, तरी तो विचेतन धृतराष्ट्र स्तब्ध पडून राहिला !

( ४ ) राजा, महात्मे धनंजय व कर्ण यांमधील महायुद्धरूपी यज्ञाचें जो कोणी पठण किंवा श्रवण करील, त्याला इष्ट यज्ञाचें फल प्राप्त होईल ! यज्ञ म्हणजेच भगवान् सनातन विष्णु आणि अग्नि, वायु व चंद्र-सूर्य हेहि यज्ञच होत, असें म्हटलें आहे ! म्हणून जो कोणी सर्व मत्सरभाव सोडून ह्याचें पठण किंवा श्रवण करील, त्याची गति श्रेष्ठ लोकांत होऊन तो सुखी होईल ! जे कोणी ह्या पुण्यग्रंथाचें सदोदित पठण करितील, त्यांना धन, धान्य आणि यश हीं प्राप्त

होतील! जो मनुष्य असूया सोडून या ग्रंथाचें श्रवण करील, त्याला सर्व सुखें प्राप्त होतील! आणि त्या नरोत्तमावर भगवान् विष्णु, स्वयंभू ब्रह्मदेव आणि शंकर हे प्रसन्न होतील! ह्या ग्रंथाचे श्रवणानें ब्राह्मणांना वेदपठण केल्याचें श्रेय मिळेल, क्षत्रियांचें बळ वाढून सर्वदा युद्धांत जय मिळेल! वैश्यांना पुष्कळ धनप्राप्ति होईल आणि शूद्रांची आरोग्यवृद्धि होईल! ह्या ग्रंथांत भगवान् सनातन विष्णु ह्याचें गुणकथन केलें असल्यामुळें ह्याच्या श्रवण-पठणानें महामुनि व्यासांनीं सांगितल्याप्रमाणें मनुष्याचे सर्व काम परिपूर्ण होतात! देवा, कर्णपर्वाच्या श्रवणानें सवत्स कपिलांचें वर्षभर नित्यदान केल्याची पुण्यप्राप्ति होते! ८. ९६.

[ येथें आठवें कर्णपर्व समाप्त झालें. ]

---

यापुढें नववें शल्यपर्व लागेल. त्याचा प्रथम श्लोक हा आहे—

**जनमेजय**—एवं निपातिते कर्णे समरे सव्यसाचिना।
अल्पावशिष्टाः कुरवः किमकुर्वत वै द्विज ॥

# श्रीमन्महाभारतार्थ

## ( महाभारताचें मराठी सुबोध भाषांतर. )



## शल्यपर्व ९.



### शल्याभिषेकपर्व १.



नारायणं नमस्कृत्य नरं चैव नरोत्तमम् ।
देवीं सरस्वतीं चैव ततो जयमुदीरयेत् ॥ १ ॥

### अध्याय १ ला.

[ १ जनमेजयाचा युद्धविषयक प्रश्न. २ त्याला वैशंपायनाचें उत्तर–शल्याला सैन्यापत्याभिषेक करून दुर्योधनाचें युद्धार्थ गमन. ३ संजयाच्या तोंडून दुर्योधन-वध ऐकून धृतराष्ट्राची मूर्च्छा व त्याचें संजयाकडून शांतवन. ]

( १ ) **जनमेजय**—वैशंपायना, अशाप्रकारें त्या सव्यसाची अर्जुनानें समरांत कर्णाचा वध केला असतां कौरवांच्या अवशिष्ट अल्पसैन्यानें पुढें काय केलें ? दुर्योधन राजानें आपल्या सैन्याचा संहार होत असल्याचें पाहून व प्रसंगावर दृष्टि ठेऊन पुढें काय करावयाचें ठरविलें ? तें ऐकण्याची मला फार इच्छा आहे, तर हे द्विजोत्तमा, तें सांग ! माझ्या पूर्वपुरुषांचें चरित्र श्रवण करीत असतां माझी तृप्ति म्हणून कधींच होत नाहीं !

( २ ) वैशंपायन—राजा, कर्णाचा वध झाला असतां धृतराष्ट्रपुत्र दुर्योधन शोकसागरांत मग्न झाला आणि त्याच्या सर्व आशा समूळ नष्ट झाल्या ! ' हा कर्णा, हा कर्णा ' म्हणून दुर्योधनानें सारखा शोक केला ! नंतर अवशिष्ट नृपांसह तो मोठ्या कष्टानें आपल्या शिबिराला गेला ! त्यांनीं त्याला शास्त्रनिश्चित हेतू सांगून त्याचें समाधान करण्याचा पुष्कळ यत्न केला; परंतु सूतपुत्र कर्णाची वारंवार स्मृति होऊन त्याला शांति मिळाली नाहीं ! ' दैव बलवत्तर आहे' असा मनाचा निश्चय करून तो प्रभातकाल होतांच पुनः युद्धाकरितां निघाला ! त्यानें मद्राधीश शल्याची सेनापतिपदावर योजना केली आणि आपल्या अवशिष्ट नृपगणांसह तो बाहेर पडला ! हे भरतश्रेष्ठा, तेव्हां कौरव-पांडवांचें देवासुरांप्रमाणें मोठें तुमुल युद्ध झालें ! त्यांत शल्यानें मध्याह्नकालापर्यंत शत्रुसैन्याचा भयंकर संहार केला; परंतु शेवटीं धर्मराजानें त्याचा वध केला ! राजा, शल्यवध झालेला पाहून आधींच बंधुहीन झालेला तो दुर्योधन शत्रुभयानें रणांगणांतून पळून गेला व एका घोर ऱ्हदामध्यें जाऊन लपून बसला ! त्या दिवशीं अपराह्णकालीं भीमादिक पांडववीरांनीं त्या ऱ्हदाला वेढा घातला, त्या दुर्योधनाला युद्धार्थ आह्वान केलें आणि शेवटीं त्याला युद्धांत मारिलें ! त्या वीर दुर्योधनाचा असा वध झाल्यावर कृप, कृतवर्मा आणि अश्वत्थामा ह्या तिघांनीं पांडवसैनिकांचा मोठा संहार केला !

( ३ ) दुसऱ्या दिवशीं सकाळीं शोकार्त संजयानें आपल्या शिबिराहून निघून कौरवपुरींत प्रवेश केला ! दुःखी संजय शोक करीत राजवाड्यांत शिरला, तेव्हां त्याचें सर्व शरीर दुःखावेगानें थरथर कांपत होतें ! त्याला पाहून तेथील मोठमोठे पुरुषश्रेष्ठहि शोकाकुल होऊन नष्टचित्त झाले व धांवत सुटले ! संजयानें मोठ्या दुःखानें आक्रोश करीत त्यांना म्हटलें, " अहो, महात्म्या दुर्योधनाचा वध झाला ! आज आम्ही सर्व बुडालों ! कालगति किती विचित्र आहे म्हणून सांगूं ? अहो, आमचे कौरववीर इंद्रतुल्य पराक्रमी असून त्या सर्वांचा वध झाला !" तें ऐकून राजवाड्यांतील सर्व लोकांनीं ' हायहाय, दुर्योधन गेला ' म्हणून मोठ्यानें शोक केला ! पुरींतील आबालवृद्ध सर्व लोकांनीं दुर्योधन हत झाल्याचें ऐकून मोठा विलाप केला ! इतक्यांत तो संजय धृतराष्ट्राच्या महालांत गेला ! तेथें तो प्रज्ञाचक्षु नृपश्रेष्ठ धृतराष्ट्र आसनावर बसला असून त्याच्या सभोंवतीं त्याच्या सुना, गांधारी, विदुर, इतर सुहृज्जन व हितचिंतक बंधुवर्ग बसले होते ! कर्णाच्या निधनानें आतां पुढें काय करावयाचें ह्याच विचार त्याच्या

मनांत सारखा चालला होता ! जनमेजया, नंतर तो दुःखाकुल संजय बाणांनीं सद्गद होऊन बोलला "नरव्याघ्रा धृतराष्ट्रा, मी संजय आहें ! भरतश्रेष्ठा, तुला मी प्रणिपात करितों ! मद्राधिप शल्य, सौबल शकुनि, ( त्याचा पुत्र ) पुरुषश्रेष्ठ दृढविक्रमी उलूक, सर्व संशप्तक, कांबोज, शक, म्लेच्छ, पार्वतीय व यवन ह्या सर्वांचा रणांत संहार झाला ! तसेंच हे राजा, प्राच्य, दाक्षिणात्य, उदीच्य, प्रतीच्य वगैरे दिशांचे शूर वीर, राजे व राजपुत्र हत झाले ! कर्णपुत्र सत्यसेनाचाहि वध झाला ! भीमसेनानें आपल्या प्रतिज्ञेनुसार दुर्योधनाचा वध केला असून तो दुर्योधन ऊरु भग्न होऊन धूळींत पडला आहे ! राजा, धृष्टद्युम्न; शिखंडी, उत्तमौजा, युधामन्यु, प्रभद्रक, पांचाल व चेदि या सर्वांचा नाश झाला ! तुझे पुत्र, तसेंच द्रौपदेयहि मारले गेले ! सर्व मनुष्यें, गज, अश्व यांचा नाश झाला असून तुझ्या पुत्रांचीं शिबिरें आतां निःशेष झालीं आहेत ! पांडव व कौरव यांच्या भयंकर रणसंग्रामांत परस्परांनीं परस्परांचा अंत केला असून ह्या कालग्रस्त जगतांत बहुधा स्त्रियाच आतां अवशिष्ट राहिल्या आहेत ! पांडवांचे सात व धार्तराष्ट्रांचे तीन रथी ह्या घोर संग्रामांत वांचले आहेत ! पांच पांडव, बंधु, वासुदेव आणि सात्यकि व कौरवपक्षीय कृतवर्मा, कृप आणि अश्वत्थामा हे ते वीर होत ! अठरा अक्षौहिणी सैन्यापैकीं हे दहा रथीच केवळ अवशिष्ट राहिले आहेत ! हे भरतर्षभा, बाकीचें सर्व सैन्य कालमुखीं पडलें ! त्या कालानेंच दुर्योधनाला पुढें करून जगतांतील सर्व जनांचा वध करविला !

**वैशंपायन**—संजयानें केलेलें अप्रिय भाषण ऐकून राजा धृतराष्ट्राचें धैर्य नष्ट झालें व तो भूमीवर पडला ! नंतर शोकाकुल विदुर आणि त्यामागून धृतराष्ट्रपत्नी गांधारी व सर्व कुरुस्त्रिया त्या दारुण वार्तेनें भूमीवर मूर्च्छित होऊन पडल्या ! सर्व राजमंडळहि निःसंज्ञ होऊन भूतलावर पडलें ! तेव्हां तीं पड्द्यावरील चित्रेंच होत असा भास झाला ! नंतर पुत्रशोकानें मूर्च्छित झालेला तो धृतराष्ट्र राजा हळुहळू सावध झाला ! दुःखानें त्याचें शरीर कांपत होतें ! सर्व दिशांकडे दृष्टि टाकून तो विदुराला म्हणाला, "हे प्राज्ञा विदुरा, मी अनाथ झालों आहें, माझे सर्व पुत्र मृत्युमुखीं पडले आहेत ! तेव्हां सांप्रत तूंच माझा आधार आहेस ! असें बोलत तो पुनः हतसंज्ञ होऊन भूमीवर पडला ! तेव्हां त्याच्याजवळ असणाऱ्या बांधवांनीं त्यावर शीत जलाचें सिंचन केलें आणि पंख्यांनीं त्याला वारा घातला. बऱ्याच वेळानें धृतराष्ट्र राजा शुद्धीवर आला आणि कुंभांत टाकलेल्या सर्पाप्रमाणें वरचेवर निश्वास टाकू

लागला ! त्या धृतराष्ट्राची ती दुःखावस्था पाहून संजयालाहि रडूं कोसळलें ! तशाच गांधारी आणि सर्व स्त्रिया यांनीं रडरडून एकच आकांत केला ! धृतराष्ट्र वरचेवर मूर्च्छित होऊं लागला ! बऱ्याच वेळानें तो विदुराला बोलला, "विदुरा, ह्या सर्व स्त्रिया आणि गांधारी, तसेच हे सर्व सुहृदहि येथून जावोत; त्यांच्या येथें राहण्यानें माझे मनाला मोठें अस्वास्थ्य वाटतें ! धृतराष्ट्राचें भाषण ऐकून विदुरानें मोठ्या दुःखानें त्या स्त्रियांस व आप्तमंडळीस जाण्यास सांगितलें व ते सर्व धृतराष्ट्राची ती दुःखाकुल स्थिति पाहून तेथून निघून गेले ! नंतर त्या शोकाकुल धृतराष्ट्र राजानें सावध झाल्यावर आतां या जगांत मला कोणाचा आधार म्हणून दुःखग्रस्त संजयास विचारलें ! मग त्यानें हात जोडून वरचेवर शोक करणाऱ्या त्या राजाचें गोड भाषण करून सांत्वन केलें ! ९.१.१.

## अध्याय २ रा.

[ १ धृतराष्ट्राचा विलाप. २ धृतराष्ट्राचा संजयाला युद्धविषयक प्रश्न. ]

( १ ) **वैशंपायन**—जनमेजय राजा, धृतराष्ट्राच्या जवळून त्या स्त्रिया गेल्यावर त्याचा शोक अधिकच वाढला. दुःखातिरेकानें तो उष्ण निश्वास सोडीत वरचेवर हातवारे करूं लागला ! त्यानें पुष्कळ विचार केला आणि शेवटीं संजयाला बोलला—

**धृतराष्ट्र**—सूता, आज केवढें महद्दुःख मजवर कोसळल्याचें तूं मला सांगितलेंस ! सर्व पांडवांचें कुशलवृत्त आणि माझे सर्व पुत्र हत झाल्याचें तूं सांगत आहेस ! माझें हृदय वज्राचेंच असलें पाहिजे आणि म्हणूनच हें घोर वृत्त ऐकून त्याचे सहस्रावधि तुकडे होत नाहींत ! संजया, बालपणच्या त्यांच्या क्रीडा आणि आज त्यांचा झालेला वध ऐकून माझें हृदय फाटून जात आहे ! माझ्या अंधत्वामुळें त्यांचें स्वरूपदर्शन मला घडलें नाहीं, तरी पुत्रस्नेहामुळें माझें त्यांजवर नित्य प्रेम होतें ! बालपण जाऊन त्यांना तारुण्यदशा प्राप्त झाली ! पुढें ते अत्यंत संपन्न झालेले ऐकून मला मोठा आनंद झाला ! परंतु आज ते सर्व ऐश्वर्यहीन व तेजोहीन होऊन पतन पावल्याचें ऐकून माझी सर्व शांती नाहींशी झाली ! वत्सा राजेंद्रा दुर्योधना, ये ये, तुझ्यावांचून मी अगदीं अनाथ झालों आहें ! माझी आतां काय गति होणार ? तुझ्या साहाय्यार्थ किती

तरी राजे आले असून त्या सर्वांला सोडून यःकश्चित् क्षुद्र राजाप्रमाणें हत होऊन भूमीवर पडला आहेस ! अनेक आप्तांना व सुहृदांना आजपर्यंत आश्रय देऊन हे वीरा, अंध आणि वृद्ध अशा मला सोडून तूं आज कोठें निघालास ? तुझें तें प्रेम, ती कृपा आणि भूपालांमध्यें तुझ्याविषयींचा आदर आज कोठें गेला ! रणांत तूं अपराजित असून आज तुझा वध झाला तरी कसा ? सकाळीं उठून 'बाबा, बाबा,' म्हणून मला आतां कोण हाका मारील ? आणि मला 'महाराज, लोकनाथ' असें तरी सतत कोण म्हणेल ? माझ्या गळ्याला मिठी घालून व आनंदाश्रू डोळ्यांत आणून मजकडे पहात 'कुरुराज, काय आज्ञा आहे' म्हणून आतां कोण म्हणेल, तें सांग पाहूं ! पुत्रा, तुझ्या तोंडचे मीं असेहि शब्द ऐकले आहेत कीं, "बाबा, ह्या पृथ्वीवर माझें जितकें सामर्थ्य आहे, तितकें धर्मराजाचें नाहीं ! भगदत्त, कृप, शल्य, आवंत्य, जयद्रथ, भूरिश्रवा, महाराज बाल्हिक, अश्वत्थामा, भोज, महाबल मागध, बृहद्बल, क्राथ, सौबल शकुनि, लक्षावधि म्लेच्छ, शक आणि यवन, कांबोजाधिपति सुदक्षिण, त्रिगर्ताधीश, पितामह भीष्म, भारद्वाज, गौतम, श्रुतायु, अयुतायु, वीर्यवान् शतायु, जलसंध, ऋष्यशृंगपुत्र, राक्षस, अलायुध, वीरबाहु अलंबुष, महारथ सुबाहु, हे व दुसरेहि पुष्कळ राजे मजकरितां आपले प्राण आणि धन यांवर पाणी सोडून पांडवांशीं युद्धार्थ तयार आहेत ! त्यांच्यांमध्यें स्थित होऊन बंधूंसह मी पांडव, पांचाल, चेदि, द्रौपदेय, सात्यकि, कुंतिभोज आणि घटोत्कच राक्षस यांच्याशीं युद्ध करीन ! हे पांडववीर मजवर चालून आले असतां मी एकटा देखील त्यांचें निवारण करीन; मग हे पांडवांचे वैरी मला सहाय झाले असतां पांडवांचा पराजय होईल, यांत संशय तो कसला ? अथवा हे सर्व मिळून पांडवांच्या अनुयायांशीं युद्ध करून त्यांचा रणांत वध करितील आणि मग मी आणि कर्ण मिळून सर्व पांडवांचा वध करूं ! नंतर ते सर्व शूर राजे माझ्या आज्ञेंत राहतील आणि मग त्यांचा पुढारी बलवान् कृष्ण कधींहि कवच धारण करणार नाहीं !"

सूता संजया, अशा प्रकारें दुर्योधनानें माझ्याजवळ अनेकदां भाषण केलें ! आणि मी त्यावर विश्वास ठेवून पांडव युद्धांत खरोखरच हत झाले, असें समजत होतों ! परंतु आज त्या पांडवांच्या मध्यें उभे राहून युद्ध करीत असतां माझेच पुत्र वध पावले ! या सर्वांला कारण एक दैवच आहे ! दुसरें कांहीं नाहीं ! प्रतापवान् लोकनाथ भीष्म हा शिखंडीशीं युद्ध करीत असतां वध

पावला; तेव्हां जणुंकाय कोल्ह्यानेंच सिंहाला मारलें असें सर्वांना वाटलें ! सर्वशस्त्रास्त्रविद्याकुशल ब्राह्मण द्रोण, परंतु त्यालाहि पांडवांनीं युद्धांत वधिलें, यावरून बलवत्तर दैवापुढें कोणाचें काय चालणार ? तसाच दिव्यास्त्रवेत्ता महाबलवान् कर्ण युद्धांत पतन पावला, भूरिश्रवा, सोमदत्त आणि महाराज बाल्हिक यांचाहि समरांत नाश झाला, हा सर्व दुर्दैवाचाच खेळ नव्हे तर दुसरें काय ? गजयुद्धविशारद भगदत्त आणि शूर जयद्रथ हे युद्धांत वध पावले, तेव्हां दैवगतीशिवाय दुसऱ्या कोणाला दोष द्यावा बरें ? ज्या युद्धांत सुदक्षिण, पौरव जलसंध, श्रुतायु आणि अयुतायु यांसारख्या शूर वीरांचा वध होतो, तेथें दैवच बलवत्तर आहे, असें म्हटल्यावांचून राहवत नाहीं ! सर्वशस्त्रधराग्रणी व बलाढ्य पांड्य राजा ह्याला देखील पांडवांनीं युद्धांत वधिलें, तेव्हां आमचें दुर्दैवच ओढवलें, असें म्हटलें पाहिजे ! बलिष्ठ बृहद्बल आणि मागध, तसाच महाधनुर्धर पराक्रमी उग्रायुध, आवंत्य, त्रिगर्ताधीश आणि संशप्तक वीर या सर्वांचा वध व्हावा, तेव्हां दैवाशिवाय दुसरें काय बलवत्तर आहे ? अलंबुष, राक्षस अलायुध आणि ऋष्यशृंगपुत्र यांचाहि जेथें वध होतो, तेथें हे सर्व दुर्दैवाचेच खेळ होत, असेंच म्हणणें भाग आहे ! नारायण आणि गोपाल या युद्धदुर्मद सैन्यांचा तसाच सहस्रावधि म्लेच्छांचा संहार झाला, याला दैवदुर्विलसित म्हणूं नये तर काय म्हणावें ? या युद्धांत बलवान् सौबल शकुनि व त्याचा पुत्र कैतव्य हे वीर पतन पावले, त्याला दुर्दैवाचाच परिणाम कां बरें म्हणूं नये ? अशाप्रकारें हे व दुसरेहि पुष्कळ अस्त्रविशारद, युद्धनिपुण, शूर, परिघबाहु राजे आणि राजपुत्र जर रणांत वध पावूं लागले, तर त्याला दैवदुर्घटितापेक्षां दुसरें काय म्हणावें ?

सूता संजया, ज्या ठिकाणीं शूर, महाधनुर्धर, अस्त्रनिष्णात आणि युद्धदुर्मद असे इंद्रतुल्यविक्रमी राजे निधन पावतात, त्याला दैवच म्हटलें पाहिजे ! नाना देशांहून आलेले मोठमोठे क्षत्रिय वीर जेथें रणांगणावर पतन पावतात, त्याला तो दैवाचाच परिणाम असें म्हणूं नये, तर दुसरें काय म्हणावें ? माझे बलवान् पुत्र, पौत्र, मित्रवर्ग आणि बंधुजन मरून पडावे हें सर्व माझ्या भागधेयाचेंच फळ होय ! मनुष्य जन्माला येतो, तेव्हां तो आपल्या बऱ्यावाईट दैवाला घेऊन येतो ! जो मनुष्य भाग्यवान् असतो, त्याचें जगांत कल्याण होतें ! मी भाग्यहीन असल्यामुळें माझे सर्व पुत्रादिकांचा संहार झाला आहे ! संजया, मी आतां वृद्धावस्थेंत शत्रुवश झालों असतां माझी गति काय होईल ? वनवासाला

जाण्याशिवाय मला दुसरी कोणतीच गति दिसत नाहीं! रणांत सर्व ज्ञातिजनांचा संहार होऊन मी बंधुहीन झालों आहें! म्हणून आतां मला पंख तोडलेल्या पक्ष्याप्रमाणें ह्या दुर्दशेंत राहण्यापेक्षां वनवासच बरा वाटत आहे! आतां बलवान् दुर्योधन, शल्य, दुःशासन, विविंश आणि विकर्णासारखे शूर पुरुष पतन पावले असतां भीमसेनाचे कठोर शब्द मीं कसे ऐकून घ्यावे? ज्या एकट्या भीमसेनानें माझ्या शंभर पुत्रांचा वध केला, तो वारंवार मला दुर्योधनवधवृत्त ऐकवील; तें आधींच दुःखशोकांनीं अभितप्त अशा माझ्याच्यानें कसें बरें सोसवेल?

वैशंपायन—राजा जनमेजया, याप्रमाणें तो बंधुहीन धृतराष्ट्र राजा शोकसंतप्त झाला असतां वरचेवर पुत्रांची स्मृति होऊन तो वारंवार मूर्च्छित होऊं लागला! त्यानें बराच वेळ शोक केला आणि दीर्घ व उष्ण निश्वास टाकून त्यानें आपल्यावरील संकटाचा विचार केला आणि अत्यंत दुःखसंतप्त होऊन त्यानें गावल्गणि संजयाला युद्धवर्णन विस्तारानें करण्यास सांगितलें!

( २ ) धृतराष्ट्र—संजया, भीष्मद्रोणांचा तसाच कर्णाचाहि वध झाल्याचें समजलें! त्यानंतर माझ्या योद्ध्यांनीं कोणाला सेनापति केलें? ज्याला ज्याला म्हणून आतांपर्यंत सेनापति केलें, त्याला त्याला पांडवांनीं अल्पावकाशांत मारून टाकिलें! संजया, तुम्हां सर्वांसमक्ष अर्जुनानें भीष्माला रणाग्रभागीं पाडिलें! पुढें द्रोणाचा तुम्ही सर्व पहात असतां वध झाला! नंतर त्या प्रतापवान् कर्णाचाहि तुम्ही व सर्व राजे यांदेखत अर्जुनानें वध केला! त्या महात्म्या विदुरानें मला पूर्वींच सांगून ठेविलें आहे कीं 'दुर्योधनाच्या अपराधामुळें ही सर्व प्रजा नाश पावेल! तसेंच कित्येक असे मूढ आहेत कीं, डोळ्यांनीं प्रत्यक्ष पाहूनहि त्यांस त्यांतील इंगित समजत नाहीं!' त्या दीर्घदृष्टि आणि धर्मशील विदुरानें मला त्यावेळीं सांगितलेलें सर्व आतां अनुभवास येत आहे! दुर्दैवानें माझा बुद्धिभ्रम होऊन माझ्या हातून पूर्वीं जो अन्याय झाला, त्याचेंच हें फळ आज मी भोगीत आहें! तर संजया, त्या संग्रामाचें पुनः यथातथ्य वर्णन करून मला सांग!

संजया, कर्ण निधन पावला असतां कौरवांचा सेनापति कोण झाला! तसेंच युद्धांत कृष्णार्जुनांविरुद्ध चालून जाणारा असा कोण कौरव वीर होता? मद्रराज शल्याचें दक्षिण आणि वाम चक्रांचें रक्षण कोण करीत होता? त्याच्या

पृष्ठभागाचें रक्षण कोणीं केलें? संजया, तुम्ही सर्व एकत्रित असतां महारथी मद्रराज शल्य आणि माझा पुत्र दुर्योधन हे पांडवांकडून युद्धामध्यें कसे मारले गेले? संजया, समरांत सर्व भारतीयांचा महाक्षय कसा झाला आणि माझा पुत्र दुर्योधन कसा मारला गेला तें सर्व वृत्त मला विस्तारानें सांग! तसेंच सर्व पांचाल, त्यांचे अनुचर, धृष्टद्युम्न, शिखंडी, द्रौपदीचे पांच पुत्र यांचेंहि वधवृत्त मला निवेदन कर! पांडव, कृष्ण, सात्यकि, कृप, कृतवर्मा आणि अश्वत्थामा हे युद्धांतून जीवंत कसे सुटले, युद्ध कोणकोणामध्यें व कसकसें झालें, तें सर्व ऐकण्याची माझी इच्छा आहे. संजया, तूं अत्यंत कुशल वक्ता आहेस, म्हणून तूंच तें कथन कर! ९. १. २.

## अध्याय ३ रा.

[ १ कौरवसैन्यपलायन. २ आपल्या सैन्यास प्रोत्साहनपूर्वक पुनः दुर्योधनाचा युद्धोद्योग. ३ दुर्योधनाचें पांडवांस युद्धार्थ आह्वान. ]

( १ ) **संजय**—राजा धृतराष्ट्रा, कौरव-पांडवांनीं परस्परांवर चालून जाऊन एकमेकांचा जो महान् क्षय केला, त्याचें वर्णन मी आतां करितों; लक्ष्यपूर्वक ऐक! पराक्रमी अर्जुनानें सूतपुत्र कर्णाचा वध केला असतां कौरवसैन्यें पळून जाऊं लागलीं; त्यांस दुर्योधनानें पुनः पुनः एकत्रित केलें, तरी तीं पळून गेलीं! त्या भयंकर संग्रामांत कर्णाचा वध झाला आणि मोठमोठे नरवीर हत होऊन पृथ्वीवर पडले असतां अर्जुनानें मोठ्यानें सिंहनाद केला! तेव्हां तुझे पुत्र अगदीं भयभीत होऊन गेले! त्यांना आपल्या सैन्याला आंवरून धरितां आलें नाहीं, किंवा पांडवांवर चालून जाण्याचें धैर्यहि त्यांना नव्हतें! कर्ण हा कौरव-सैन्याला द्वीपासारखा आधार होता. त्याचा वध होतांच अगाध समुद्रांत नौकाभंग होऊन जशी वणिग्जनांची भयप्रद स्थिति होते, तशी कौरवांची झाली! कर्णवधानंतर अर्जुनाच्या शरप्रहारांनीं विद्ध झालेलीं तुझीं सैन्यें अत्यंत भयग्रस्त होऊन गेलीं! सिंहार्दित मृगांची जशी अनाथ स्थिति होते, तशी कौरव-सैन्यांची होऊन तीं आतां या संकटांत आपला संरक्षणकर्ता नाथ कोण, या काळजींत पडलीं! अर्जुनानें तुझ्या सैन्यांचा पराभव केला, तेव्हां भग्नशृंग वृषभांप्रमाणें किंवा छिन्नदंत सर्पांप्रमाणें तीं दिसूं लागलीं! महान् वीर पतन पावले आणि दुसरे तीक्ष्ण बाणांनीं छिन्न होऊन गेले! मग तुझे पुत्र पळून

गेले ! ते कवचहीन होऊन पळून जात असतां आपण कोणत्या दिशेला जात आहों, हेंहि भान त्यांस राहिलें नाहीं ! ते आपल्याच लोकांना शत्रु म्हणून मारूं लागले ! भयग्रस्त होऊन ते 'हा माझ्यावर अर्जुन धांवून आला, हा भीमसेन चालून आला,' असें म्हणत गलितधैर्य होऊन गेले व मूर्च्छित झाले ! कित्येक महारथ अश्वांवर, कित्येक गजांवर तर कित्येक पदातींच्या कंधांवर बसून पळत सुटले ! तेव्हां त्या गर्दीत पळत सुटलेल्या गजांनीं रथांचा भंग केला, महारथींनीं सादींना मारिलें व अश्वांनीं पदातींना मारिलें ! हिंस्र पशु किंवा चोरटे लोक यांनीं अगदीं गजबजून गेलेल्या वनामध्यें सार्थभ्रष्ट मनुष्याची जी स्थिति होते, तशीच कर्णाचा वध झाला असतां तुझ्या लोकांची अवस्था झाली !

( २ ) राजा, त्यावेळीं कित्येक गजसादी हत झाले, कित्येक गजांच्या शुंडा तुटल्या आणि जिकडेतिकडे त्या भयार्दित कौरवांना भीम दिसूं लागला ! भीमसेनाच्या भीतीनें पळून जाणाऱ्या आपल्या सैनिकांस पाहून दुःखग्रस्त मनानें दुर्योधन आपल्या सारथ्यास बोलला, "सूता, धनुष्य घेऊन युद्धार्थ सज्ज असलेल्या मला सैन्याच्या पृष्ठभागीं पाहून हा भीमसेन महार्णव जसा आपले मर्यादेचें उल्लंघन करूं शकत नाहीं, त्याप्रमाणें माझ्यावर धांवून येणार नाहीं ! सारथे, आज मी गोविंदासह अर्जुन, मानी भीमसेन आणि मोठमोठे शत्रूकडील योद्धे यांचा वध करून कर्णाच्या ऋणांतून मुक्त होईन, तर अश्वांना शीघ्र चालव !"

राजा धृतराष्ट्रा, याप्रमाणें दुर्योधनाचें शूर आर्यसदृश भाषण ऐकून त्याच्या सारथ्यानें आपले सुवर्णालंकृत अश्व पांडवांकडे हांकले ! तेव्हां गज, अश्व आणि रथ यांविरहित असे पंचवीस सहस्र पदाति पांडवांशीं युद्धार्थ सिद्ध झाले ! त्यावेळीं भीमसेन व धृष्टद्युम्न हे क्रोधसंतप्त होऊन आपल्या चतुरंग सैन्यासह त्या कौरवांवर चालून गेले आणि त्यांनीं मोठी शरवृष्टि केली ! कौरवांनींहि भीम-धृष्टद्युम्नांचीं नांवें घेऊन त्यांशीं आवेशानें युद्ध आरंभिलें ! त्या पादचारी कौरवसैनिकांना पाहून भीम रथांतून खालीं उतरला आणि त्यानें हातांत गदा घेतली ! त्या धर्मात्म्या भीमानें कौरवांप्रमाणें आपणहि भूतलावर उभें राहून त्यांशीं भुजवीर्यानें युद्ध आरंभिलें ! आपली सुवर्णविभूषित गदा घेऊन तिचे शत्रूवर एवढे मोठे प्रहार केले कीं, हा प्रत्यक्ष दंडपाणी अंतकच प्राण्यांचा संहार

करीत आहे असें सर्वांस वाटलें ! तो तुझ्या सर्व वीरांचा सारखा संहार करीत चालला ! कौरववीरहि क्षुब्ध झाले आणि जीवित आणि बांधव यांची आशा सोडून पतंग ज्याप्रमाणें अग्नीवर उडी घालतात, त्याप्रमाणें त्यांनीं भीमसेनावर धांवून जाऊन त्याशीं युद्ध केलें ! भूतांचे संघ काळ आल्याचें पाहून जसा आक्रोश करितात, त्याप्रमाणें त्यांनीं भीमाला पाहतांच मोठ्यानें आक्रोश केला ! भीम खड्ग व गदा यांचे त्यांवर प्रहार करीत त्यांसभोंवतीं परिभ्रमण करूं लागला ! त्या युद्धांत भीमानें पंचवीस हजार कौरवांच्या पदातींचा संहार केला ! याप्रमाणें त्या पदातिसैन्याचा नाश करून तो सत्यपराक्रमी भीमसेन धृष्टद्युम्नाला पुढाकार देऊन आपण स्वस्थ राहिला !

राजा, इकडे त्या वीर्यवान् अर्जुनानें कौरवांच्या रथसैन्याचा पाठलाग केला. तसेंच माद्रीपुत्र नकुल-सहदेव आणि सात्यकि ह्यांनींहि शकुनीवर धांवून जाऊन दुर्योधनसैन्याचा संहार केला ! त्यांनीं अनेक तीक्ष्ण बाण टाकून शकुनीचे अश्वसादी मारिले आणि नंतर शकुनीला गांठून पुनः युद्ध प्रवृत्त झालें ! राजा, त्या युद्धांत अर्जुनानें आपले धनुष्याचें आस्फालन करून कौरवांच्या रथ-सैन्यांत प्रवेश केला, तोंच श्वेताश्व व कृष्णसारथि अर्जुन आपल्यावर चालून येत आहे असें पाहून ते तुझे सैनिक भयभीत होऊन तत्काल पळून गेले; तेव्हां ते रथहीन व अश्वहीन असे पंचवीस सहस्र पदातिवीर बाणवर्षाव करीत अर्जुनावर धांवून आले व त्यांनीं त्याला वेढा दिला ! इतक्यांत भीमसेनाच्या नेतृत्वाखालीं पांचालमहारथ धृष्टद्युम्न हा त्यांवर चाल करून आला व त्यानें त्या सर्वांचा नाश केला ! त्या शत्रुसंहारक धृष्टद्युम्नाला रणांत पाहून तुझे योद्धे भीतीनें पळून गेले ! नंतर माद्रीपुत्र नकुल–सहदेव व सात्यकि हे आवेशानें गांधारराज शकुनीवर तुटून पडले !

( ३ ) इकडे चेकितान, शिखंडी आणि द्रौपदेय ह्यांनीं तुझ्या सेनेचा संहार करून आपापले शंख वाजविले ! अवशिष्ट सैन्य पळून जात असलेलें पाहून पांडववीरांनीं वृषभाच्या झुंजांत जसे विजयी वृषभ जित वृषभांच्या मागें लागतात, त्याप्रमाणें त्या कौरवसैन्याचा पाठलाग केला ! कौरवांचा सैन्यावशेष अजूनहि युद्धसमर्थ आहे, असें पाहून सव्यसाची अर्जुन अत्यंत क्रोधाविष्ट झाला आणि त्यानें बाणवृष्टि करून त्याला आच्छादून टाकिलें ! सर्वत्र धूळ उडून कांहींहि दिसेनासें झालें आणि सर्व महीतल शरांनीं व्याप्त होऊन गेलें !

तेव्हां तुझे वीर भीतीनें सर्व दिशांस पळून गेले! राजा, सर्व कौरवसैन्याचा भंग झालेला पाहून कुरुराज दुर्योधन अत्यंत क्षुब्ध झाला आणि आपल्या व शत्रूच्या अशा दोन्ही सैन्यांवर धांवून गेला! त्यानें देवांना पूर्वी बलीनें आह्वान केलें तसें सर्व पांडवांना युद्धार्थ आह्वान केलें!

राजा धृतराष्ट्रा, नंतर त्या गर्जना करणाऱ्या दुर्योधनावर त्या सर्वांनीं चाल केली व नानाप्रकारच्या शस्त्रांची त्याजवर वृष्टि केली आणि त्याची वारंवार निर्भर्त्सनाहि केली! दुर्योधनानें मोठ्या शौर्यानें त्यांवर बाण-वृष्टि केली आणि पांडवांचे सैन्याचा असा भंग केला कीं तो त्याचा पराक्रम पाहून आम्ही आश्चर्यचकित झालों! कारण सर्व पांडवांच्यानें त्या एकट्या दुर्योधनाला मार्गे हटववेना! नंतर आपलें सैन्य अतिविद्ध होऊन पळून जाण्याच्या विचारांत आहे, असें दुर्योधनाला समजलें! तेव्हां त्या तुझ्या चतुर पुत्रानें त्या योद्ध्यांना प्रोत्साहन देऊन युद्धार्थ उद्युक्त करण्याकरितां म्हटलें, "वीरांनो, पृथ्वीवर किंवा पर्वतांवर असा एकहि देश माझ्या आढळण्यांत नाहीं, कीं जेथें तुम्ही गेल्यानें पांडव तुमचा वध करूं शकणार नाहींत! मग पळून जाऊन तुम्ही काय मिळविणार? सांप्रत पांडवांचें सैन्य अत्यल्प आहे आणि कृष्णार्जुनहि भयंकर विद्ध झाले आहेत; म्हणून आम्ही जर येथें स्थिर राहून युद्ध केलें, तर आम्हांला निश्चयेंकरून जय मिळेल! परंतु भंग पावून जर पळून जाल, तर पांडव तुमचा पाठलाग करतील आणि अपराधी म्हणून तुमचा वधहि करितील! वीरांनो, समरांत वध होणें हेंच आम्हांला श्रेयस्कर आहे! क्षात्रवृत्तीनें युद्ध करणाऱ्यांना संग्रामांत आलेला मृत्यु खरोखरच हितकारक होय? रणांत मृत झालेल्याला दुःखानुभव मुळींच येत नाहीं व मेल्यावरहि त्वरित स्वर्गप्राप्ति होते! सर्व क्षत्रियवीरांनो, येथून पळून गेल्यास तुम्ही भीमसेनाच्या हातीं सांपडाल! आपल्या वाडवडिलांपासून चालत आलेल्या धर्माचें अतिक्रमण करणें तुम्हाला योग्य नाहीं! युद्धांतून पलायन करून जाणें ह्यापेक्षां अधिक पापावह असें क्षत्रि-याला दुसरें कोणतेंहि कर्म नाहीं! हे कौरवांनो, क्षत्रियाला युद्धधर्मापेक्षां दुसरा कोणताच स्वर्गमार्ग नाहीं! हा स्वर्गलोक मिळविण्यास इतरांस बराच काळ लागतो, परंतु युद्धार्थी पुरुषाला हा तत्काल प्राप्त होतो!"

राजा, दुर्योधनाचें भाषण ऐकून कौरव महारथांनीं तें मान्य केलें आणि पुनः पराजय पावून पळून जाण्यापेक्षां युद्धांत पराक्रम करून दाखविणेंच

उत्तम असें ठरवून ते सर्व पांडवांवर धांवून गेले ! नंतर तुझ्या व पांडवांच्या दोन्ही सैन्यांत देव-दानवांच्या युद्धाप्रमाणें अत्यंत भयंकर युद्ध प्रवृत्त झालें ! राजा धृतराष्ट्रा, अशारीतीनें तुझ्या दुर्योधन पुत्रानें सर्व कौरवसैन्यासह युधिष्ठिरादिक पांडवांवर चाल केली ! ९. १. ३.

## अध्याय ४ था.

[ १ पांडवांशीं सख्य करणेंच श्रेयस्कर होय, असें कृपाचार्यांचें भाषण. ]

( १ ) संजय—राजा धृतराष्ट्रा, युद्धांत सर्वत्र महारथ्यांचे रथ, सारथ्यांचीं आसनें, तसेच गज आणि पदाति मरून पडलेले पाहून ती युद्धभूमि म्हणजे रुद्राचें क्रीडास्थानच होय, असें सर्वांस वाटलें ! लक्षावधि राजे रणांगणावर मरून पडले आणि तुझा पुत्र ( दुर्योधन ) शोकोद्विग्न होऊन युद्धविमुख झाला; तसेच तुझे सर्व सैनिक पार्थाचा पराक्रम पाहून भयभीत होऊन गेले ! त्या संकटकालीं आतां पुढें काय करावयाचें, हाच एक विचार प्रत्येक वीराच्या मनांत घोळूं लागला ! असें चाललें आहे, तों पांडवांनीं तुझ्या सैन्याचा संहार केला असून तीं मोठ्यानें आक्रोश करीत आहेत आणि युद्धभूमीवर योद्ध्यांचीं आभरणें इतस्ततः भग्न होऊन पडलेलीं आहेत, असें पाहून धर्मात्म्या वृद्ध व शीलसंपन्न कृपाचार्यांच्या मनांत करुणा उत्पन्न झाली आणि तो दुर्योधन राजाजवळ येऊन त्यास मोठ्या दुःखानें बोलला " दुर्योधना, मी तुला जें कांहीं सांगत आहे तें लक्ष्यांत घे आणि हे अनघा, माझें म्हणणें तुला रुचल्यास तूं त्याप्रमाणें कर ! हे राजेंद्रा, युद्धधर्मापेक्षां दुसरा कोणताहि मार्ग क्षत्रियाला श्रेयस्कर नाहीं ! याचाच आश्रय करून सर्व क्षत्रिय सर्वदा युद्ध करीत असतात. क्षत्रजीवी मनुष्याला पुत्र, बंधु, पिता, भाचा, मातुल आणि आपल्या इतर बांधवांशींहि युद्ध केलें पाहिजे. युद्धांत मृत्यु पावणें हा क्षत्रियांचा महान् धर्म असून पलायन करणें हा मोठा अधर्म सांगितला आहे. जे जीविताच्या इच्छेनें युद्धविमुख होतात, त्यांना भयंकर नरकाची प्राप्ति होत असते; म्हणून तुला कांहीं हिताची गोष्ट सांगतों, ती ऐक !

राजा दुर्योधना, सांप्रतच्या महायुद्धांत भीष्म-द्रोण पतन पावले, महारथ कर्णाचा वध झाला, जयद्रथ हत झाला आणि तुझे बंधु व तुझा पुत्र लक्ष्मण

हेहि मारले गेले! तेव्हां आतां असें काय राहिलें आहे कीं ज्याकरितां आम्हीं कांहीं केलें पाहिजे! जे सर्व भार अंगावर घेऊन करितील, अशी आम्ही इच्छा करीत होतों, ते सर्व शूर रणभूमीवर देहत्याग करून ब्रह्मवेत्त्यांच्या गतीला गेले! आमचे गुणी महारथी आम्हांला सोडून गेले आणि असें असूनहि आम्ही अनेक राजांना मृत्युमुखांत टाकून दुष्ट कर्म करण्यास प्रवृत्त झालों आहों! आमचे सर्व महारथ आज जीवंत असते, तरीहि अर्जुन त्यांना अजिंक्यच वाटला असता! महाबाहु अर्जुनाचा कृष्ण हा नेता असल्यामुळें देवांनाहि अर्जुनाचा पराभव करणें शक्य नाहीं! इंद्रधनुष्याप्रमाणें शोभणाऱ्या व इंद्रध्वजासमान अत्यंत उंच अशा वानरध्वजाजवळ कौरवांची महासेना प्राप्त होतांच भयभीत होऊन कशी कांपूं लागली हें ध्यानांत आण!

"राजा, भीमाच्या सिंहनादानें, कृष्णाच्या पांचजन्यध्वनीनें आणि अर्जुनाच्या गांडीवनिर्घोषानें कोणाचीं अंतःकरणें भयग्रस्त होऊन जात नाहींत? गांडीवाची प्रत्यंचा पाहिली असतां ती महाविद्युत् स्फुरण पावत आहे किंवा अलातचक्र गरगर फिरत आहे असा भास होतो! अर्जुन आपलें सुवर्णविभूषित धनुष्य फिरवूं लागला म्हणजे सर्व दिशांमध्यें मेघसमूहांवर विद्युत् चकाकत आहे असें वाटतें! अर्जुनाच्या रथाला जोडलेले अत्यंत वेगवान् शशिप्रभ श्वेत अश्व जणुंकाय आकाशच पिऊन टाकीत आहेत कीं काय असा भास होतो! वायु ज्याप्रमाणें मेघांना वाहून वाटेल तिकडे नेतो, त्याप्रमाणें सुवर्णविभूषित अर्जुनाचे अश्व कृष्णानें सूचना देतांच अर्जुनाला तत्काल रणांगणावर आणतात! दुर्योधना, शिशिर ऋतूंत अग्नि जसा गवत जाळून टाकितो, तसें अस्त्रविशारद अर्जुनानें तुझ्या सर्व सैन्याला जाळून टाकिलें! इंद्रतुल्य पराक्रमी अर्जुनानें जेव्हां आमच्या सैन्यांत प्रवेश केला, तेव्हां तो चार दंतांचा गजच होय असें आम्हांस वाटलें! आमच्या सेनेची वाताहत करून राजांनाहि अर्जुनानें भयभीत करून सोडलें, तें पाहून गजच कमलिनींचा संहार करीत आहे, असें आम्हांस भासलें! त्या अर्जुनानें धनुष्याच्या टणत्कारानें जेव्हां आमच्या योद्धयांना त्रासवून सोडलें, तेव्हां हा सिंहच मृगगणांना भिववून सोडीत आहे, असा आम्हांला भास झाला!

"राजा, हा अत्यंत भयंकर संग्राम सुरू होऊन आज सतरा दिवस झाले आणि ह्या कालांत दोहोंकडील अनेक धनुर्धर युद्धांत पतन पावले! शरत्कालांतील वायु जसा मेघसमूहांना उधळून लावितो, त्याप्रमाणें शत्रूंनीं तुझीं सर्व

सैन्यें सर्वत्र पळवून लाविलीं ! महासागरामध्यें पडलेली नौका वाऱ्याच्या योगानें जशी हालत असते, त्याप्रमाणें सव्यसाची अर्जुनानें तुझ्या सर्व सैन्याला कंपायमान करून सोडलें ! जेव्हां अर्जुनानें जयद्रथाचा वध केला, तेव्हां तुझा सूतपुत्र कर्ण, तसाच अनुयायांसह तो द्रोण कोठें होता ? मी, तूं, हार्दिक्य (कृतवर्मा), दुःशासन आणि तुझे इतर बंधु कोठें होते ? अर्जुनानें तुझ्या त्या सर्व साहाय्यकर्त्या संबंधिजनांचा पराजय करून जयद्रथाचा वध केला ! आतां कोणाच्या साहाय्याची आम्हीं इच्छा करावी ? आज अर्जुनाचा पराभव करील, असा येथें कोण पुरुष आहे ? त्या महात्म्याचीं तीं दिव्य अस्त्रें आणि त्याच्या गांडीवाचा तो निर्घोष हीं आमचें धैर्य हरण करितात ! राजा, ही तुझी हतनायक सेना आतां चंद्रहीन रात्रीप्रमाणें निस्तेज दिसत आहे ! शुष्क नदीच्या कांठावरील वृक्ष गजानें भग्न केलें असतां तो प्रदेश जसा निस्तेज दिसत असतो, तशीच तुझ्या सेनेची अवस्था झाली आहे ! ह्या सेनेचा नायक हत झाल्यामुळें आतां तो श्वेतवाहन अर्जुन तिजमध्यें संचार करील आणि अग्नि जसा गवताला जाळून टाकितो, तद्वत् तिचा नाश करील ! सात्यकि आणि भीमसेन या दोघांचाहि वेग इतका भयंकर आहे कीं तो सर्व पर्वतांचें विदारण करील किंवा सर्व सागरांचें शोषण करील !

"राजेंद्रा, भीमसेन सभेमध्यें जें बोलला, तें बहुतेक त्यानें सफल करून दाखविलें आहे, व बाकी राहिलेलें तो लवकरच करून दाखवील ! दुर्योधना, तुझा सेनापति कर्ण असतां त्या गांडीवधारी अर्जुनानें पांडवसेनेचें रक्षण केलें आणि त्यामुळें तें तुम्हांला अजेय झालें आहे ! तुम्ही त्या साधुशील पांडवांना अनुचित कर्में करून अकारण छळिलेंत, त्याचेंच हें फल सांप्रत तुम्हांला मिळालें आहे ! हे भरतर्षभा, तूं आपला स्वार्थ योजून ह्या सर्व लोकांना आपणाजवळ आणलेंस आणि आज तूं स्वतःच मोठ्या संकटांत पडला आहेस ! दुर्योधना, आतां तूं स्वतःचें तरी रक्षण करून घे ! आत्मा हा सर्वांना कलशाप्रमाणें आहे. कलश भग्न झाला असतां त्यांतील वस्तु सर्व दिशांना उधळून गेल्याशिवाय राहत नाहींत ! हीन किंवा समबल पक्षानें संधि करणें हेंच सर्वदा योग्य आहे ! ज्याचें बल अधिक असेल, त्यानेंच युद्धाला सज्ज व्हावें असें बृहस्पतीचें म्हणणें आहे ! आमचें बल आणि शक्ति यांचा विचार केला असतां सांप्रत आम्ही पांडवांपेक्षां अत्यंत हीन आहों ! म्हणून हे प्रभो, आजच्या स्थितींत पांडवांशीं संधि करणें हेंच योग्य आहे, असें मला वाटतें !

"राजा दुर्योधना, ज्याला आपलें कल्याण कशांत आहे हें समजत नाहीं, किंवा तें समजूनहि जो त्याची अवहेलना करितो, तो राज्यापासून तत्काळ भ्रष्ट होतो आणि कल्याणालाहि मुकतो ! युधिष्ठिराला प्रणिपात करून आपण राज्यप्राप्ति करून घेतल्यास त्यांत जें आमचें कल्याण होणार आहे, तें मूर्खपणानें त्याशीं युद्ध करून त्यांत पराजय पावून होणार नाहीं ! राजा, कृपाळू धर्मराज धृतराष्ट्राच्या व कृष्णाच्या सांगण्यावरून तुझी राज्यावर योजना करील ! कृष्ण जें जें सांगेल, तें तें राजा युधिष्ठिर, अर्जुन आणि भीमसेन केल्याशिवाय कधींहि राहणार नाहींत ! कृष्ण कौरवाधीश धृतराष्ट्राच्या वचनाचा कधीं अनादर करणार नाहीं आणि युधिष्ठिरहि कृष्णाचा उपदेश ऐकणार नाहीं, असें कधीं होणार नाहीं ! म्हणून पांडवांशीं युद्ध न करितां त्यांच्याशीं सख्य करणें हेंच प्रशस्त होय, असें मला वाटतें ! मी दीनपणानें किंवा प्राणरक्षणाकरितां तुला असें सांगतों असें नाहीं; तर मला जें हितकारक वाटत आहे, तेंच मी सांगत आहें ! तुला माझें म्हणणें आज कदाचित् पटणार नाहीं, पण मरणकाल आल्यावर तरी माझे वचनाचें स्मरण होईल !"

राजा धृतराष्ट्रा, याप्रमाणें त्या वृद्ध शारद्वत कृपानें दुर्योधनाला सांगितलें आणि त्यानें पुष्कळ विलाप केला ! शेवटीं त्यानें दीर्घ व उष्ण निश्वास टाकिले आणि शोक करीत असतां तो मूर्च्छित झाला ! ९. १. ४.

---

## अध्याय ५ वा.

[ १ दुर्योधनाकडून कृपाचार्यांच्या उपदेशाचा अनंगीकार. ]

( १ ) संजय—राजा धृतराष्ट्रा, कृपाचार्यांचें तें करुणास्पद भाषण श्रवण करून दुर्योधनानें एक दीर्घ उष्ण निश्वास सोडला आणि तो स्तब्ध राहिला ! नंतर दुर्योधनानें क्षणभर विचार केला आणि मग कृपाचार्यांला म्हणाला, "हे शारद्वत कृपाचार्या, माझा सुहृद् या नात्यानें जें कांहीं सांगण्यासारखें होतें, तें सर्व तूं मला सांगितलें आहेस आणि युद्ध करतांना प्राणांचीहि पर्वा न करितां माझ्याकरितां जें तुला करतां आलें, तें सर्व तूं केलें आहेस ! महारथ पांडवां-बरोबर युद्ध करून तूं त्यांची दुर्दशा उडविलीस, हेंहि सर्वांनीं पाहिलें आहे ! जें कांहीं मित्रकार्य कर्तव्य होतें, तें सर्व तूं केलें आहेस, तथापि मुमूर्षूला ज्याप्रमाणें औषध आवडत नाहीं, त्याप्रमाणें तुझें भाषण मला रुचत नाहीं !

हे विप्रश्रेष्ठा, तुझ्या भाषणांत हेतु आणि कारण यांचा योग्य विचार असल्यामुळें तें हितकारक आणि उत्तम झालें आहे, तथापि तें मला रुचत नाहीं! राज्यापासून ज्याला आम्हीं भ्रष्ट केलें, त्यानें आतां आमच्यावर विश्वास कसा ठेवावा बरें? तसेंच ज्या नृपतीला आम्हीं द्यूतांत जिंकिलें, त्यानें पुनः माझ्या वचनावर विश्वास ठेवणें कसें योग्य होईल? शिवाय पार्थांच्या कल्याणाविषयीं सर्वदा तत्पर असा श्रीकृष्ण शिष्टाई पत्करून आला असतां त्याला आम्हीं फसविणें म्हणजे केवढा अविचार? आतां श्रीकृष्णानें तरी आमचें भाषण कसें मानावें? सभेमध्यें आल्यावर द्रौपदीनें केलेला विलाप श्रीकृष्ण कधींहि सहन करणार नाहीं, त्याचप्रमाणें आम्हीं पांडवांचें हरण केलेलें राज्य हीहि गोष्ट तो कधीं विसरेल, असें होणार नाहीं!

"ब्राह्मणश्रेष्ठा, श्रीकृष्ण आणि अर्जुन हे उभयतां एकप्राण असून अन्योन्यांच्या आश्रयानें राहणारे आहेत, असें मीं पूर्वीं ऐकिलें होतें, तें आज माझ्या दृष्टीस पडत आहे! रणांत आपला भाचा अभिमन्यु पडला, हें ऐकून त्या कृष्णाला स्वस्थपणें झोंपहि येत नाहीं! आम्ही त्याचे अपराधी आहों, म्हणून तो आम्हांला क्षमा कशी करील? अभिमन्यूच्या नाशानें अर्जुनाच्या सर्व सुखाशा नष्ट झाल्या आहेत, तेव्हां त्याची याचना केली तरी तो माझ्या हिताकरितां प्रयत्न करील, हें कसें होईल? मध्यम पांडव भीमसेन उग्र स्वभावाचा असून बलवान्हि तसाच आहे! तो आपल्या घोरप्रतिज्ञेचा भंग करण्यास तयार होईल, हें संभवत नाहीं! ते दोघे जुळे बंधु—नकुल व सहदेव—हे हस्तांत खड्ग घेऊन व अंगांत कवचें घालून यमाप्रमाणें माझ्या वधाची इच्छा करीत आहेत! धृष्टद्युम्न व शिखंडी ह्यांचें माझ्याशीं हाडवैर आहे, तेव्हां हे द्विजसत्तमा, माझ्या हिताकरितां ते यत्न कसा बरें करतील? दुःशासनानें एकवस्त्रा व रजस्वला अशा द्रौपदीची सर्व लोकांसमक्ष भरसभेमध्यें विटंबना केली; विवस्त्र द्रौपदीची ती दीन स्थिति अद्यापि पांडव विसरले नाहींत! त्या पांडवांना युद्धापासून परावृत्त करणें कोणाला शक्य आहे?

"विप्रोत्तमा, आम्हीं द्रौपदीला जे क्लेश दिले, त्यांमुळें दुःखित होऊन ती सर्वदा स्थंडिलावर झोंप घेते! तसेंच माझ्या नाशाकरितां व भर्त्यांच्या अर्थसिद्धीकरितां वैराच्या समाप्तीपर्यंत उग्र तपश्चर्या करण्याचा निश्चय करून तदनुरूप ती वागत आहे! वासुदेवाची बहीण सुभद्रा हीहि आपला मान

व गर्व सोडून द्रौपदीची दासीप्रमाणें सेवा करीत आहे ! असें हें आमचें वैर इतक्या थरास आलें असतां कांहींहि केलें असतां आतां त्याचा उपशम होईल, असें दिसत नाहीं ! आमच्या हातून अभिमन्यूचा वध झाल्यामुळें तो धर्मराज तरी संधि करण्यास कसा सिद्ध होईल ? ही समुद्रवलयांकित पृथ्वी आजपर्यंत मी स्वच्छंद रीतीनें भोगिली आणि आतां यापुढें पांडवांच्या कृपाप्रसादानें मीं ती भोगावी, हें कसें व्हावें ? सर्व राजांवर आजवर ज्यानें प्रखर सूर्याप्रमाणें आपली सत्ता गाजविली, त्या म्यां आज युधिष्ठिराच्या मागून दासाप्रमाणें कसें फिरावें ? ज्यानें आजवर पुष्कळ भोग भोगले व इतरांनाहि पुष्कळ मोठमोठ्या देणग्या दिल्या, त्या म्यां आतां कृपण लोकांबरोबर कृपणांसारखी जीविका कशी करावी ?

" कृपाचार्या, तूं जें हितकारक व प्रेमळ भाषण केलेंस, त्याचा मी तिरस्कार करीत नाहीं; तथापि कांहीं झालें, तरी हा काल संधि करण्याला योग्य नाहीं ! हे परंतपा, सांप्रत युद्ध करणें हेंच प्रशस्त होय, असें मला वाटतें ! क्लीबत्व अंगीकारून बसण्याचा हा वेळ नव्हे. ह्या काळीं आम्हीं युद्ध करणेंच उचित आहे ! मीं आजवर पुष्कळ यज्ञ केले, ब्राह्मणांना दक्षिणा दिल्या, याचकांचे मनोरथ पुरविले, वेदांचें श्रवण केलें आणि शत्रूंचीं मस्तकें पायांखालीं तुडविलीं ! तसेंच मीं भृत्यांचें उत्तम रीतीनें पोषण केलें आणि दीन जनांचाहि उद्धार केला ! परराष्ट्रांना जिंकून स्वराष्ट्राचें पालन केलें ! विविध भोग भोगले, धर्म, अर्थ आणि काम यांचें सेवन केलें, पितृऋणांतून मुक्त झालों आणि क्षात्रधर्माचेंहि उत्तम प्रकारें रक्षण केलें ! मनुष्याचें सुख एकदां नाहींसें झाल्यावर त्याला राष्ट्र आणि कीर्ति ह्यांची किंमत ती काय ? ह्या लोकीं कीर्ति मिळवायाची ती युद्ध करूनच प्राप्त करणें योग्य आहे, दुसरा मार्ग नाहीं ! म्हणून धर्मराजाकडे असलें दीन भाषण करणें मला शोभत नाहीं !

"द्विजोत्तमा, क्षत्रियानें गृहांत मरण पावणें हें अत्यंत गर्हणीय आहे, कारण गृहीं शय्येवर पडून मरणें हा क्षत्रियाला मोठा अधर्म सांगितला आहे; जो पुरुष मोठे यज्ञ करून संग्रामांत किंवा अरण्यांत देह टाकितो, तो मोठेपणाला पावतो. जो जरापीडित किंवा रोगार्त होऊन आक्रोश करणाऱ्या ज्ञातिजनांमध्यें दीनपणें विलाप करितो, तो पुरुषच नव्हे ! जे कोणी विविध भोग सोडून परम गतीला पोंचले आहेत, त्यांप्रमाणें मीहि आज पांडवांशीं युद्ध करून त्याच

श्रेष्ठ गतीला जाईन. जे शूर, आर्यवृत्ताचे, रणांगणांत कधींहि माघार न घेणारे, बुद्धिमान्, सत्यवचनी, यज्ञयाग करणारे आणि शस्त्रावभृथस्नानानें पवित्र झाले आहेत, अशांना निश्चयेंकरून स्वर्गप्राप्ति होते. अशाप्रकारें युद्धोत्सुक वीरांकडे अप्सरांचे समूह मोठ्या आनंदानें पाहत असतात आणि स्वर्गांत गेल्यावर मोठ्या आनंदांत अप्सरांनीं वेष्टित त्या वीरांचा सुरसभेंत झालेला मान पाहून त्यांचे पितरहि संतुष्ट होतात ! ज्या मार्गानें देव व युद्धविमुख न होणारे लोक आजपर्यंत गेले, त्याच मार्गाचा स्वीकार आपण करावा !

"वृद्ध पितामह भीष्माचार्य, बुद्धिमान् द्रोणाचार्य, जयद्रथ, कर्ण आणि दुःशासन यांनीं याच मार्गाचें अवलंबन केलें ! माझ्या कार्यसिद्ध्यर्थ अनेक राजे हत झाले, तसेच अनेक राजे शरविद्ध होऊन रणांत पडले आहेत ! त्यांच्या शरीरांतून रक्तस्राव चालले आहेत ! उत्तम शूर, शस्त्रास्त्रवेत्ते आणि यथोक्त रीतीनें यज्ञयाग करणारे, त्यांस निःसंशय इंद्रसदनांत स्थानप्राप्ति होत असते ! त्यांनीं स्वीकृत केलेला मार्ग जरी दुर्गम असला, तरी जे कोणी त्याचें अवलंबन करतील, ते अंतीं सद्गतीला जातील ! ज्यांनीं माझ्याकरितां समरांगणावर देह ठेविले, त्यांच्या कृतींचा विचार केला असतां मी राज्यसुख भोगणें प्रशस्त दिसत नाहीं. असें केल्यानेंच त्यांच्या ऋणांतून मी मुक्त होईन ! आपले मित्र, भ्राते व पितामह यांचा वध करवून मी जर जीविताचें रक्षण करूं लागलों, तर सर्व लोक माझी निःसंशय विटंबना करितील. बंधुहीन मला आतां राज्य मिळविणें आणि तेंहि पांडवांना प्रणिपात करून मिळविणें, यांत लाभ तो कोणता ? असें केल्यानें लोकांच्या उपहासास मी पात्र होईन. म्हणून आतां शत्रूशीं उत्तमप्रकारें युद्ध करीन आणि स्वर्गप्राप्ति करून घेईन. यावांचून आतां दुसरा मार्ग मला नाहीं !"

राजा, असें दुर्योधनाचें भाषण श्रवण करून सर्व वीरांनीं 'अति उत्तम, अति उत्तम' असें म्हणून त्याचे धन्यवाद गाइले आणि पराजयाच्या दुःखाची विस्मृति होऊन पराक्रम करून दाखविण्याचा त्यांनीं निश्चय केला. मग युद्धाची दांडगी हांव धरून त्यांनीं आपल्या अश्वांना विश्रांति दिली आणि जवळजवळ दोन योजनें चालून हिमालयाच्या पठारावर पवित्र व उघड्या जागेंत त्यांनीं तळ दिला. तेथें त्यांनीं सरस्वती नदींत स्नान केलें व तिचे उदकाचें प्राशन केलें. तुझ्या पुत्राच्या भाषणानें ते सर्व क्षत्रिय वीरश्रीला

चढून पुनः युद्धाकरितां सज्ज झाले ! आपलें मन स्थिर ठेवून आणि इतरांचीहि भीति घालवून ते सर्व कालप्रेरित वीर युद्धाकरितां सिद्ध झाले ! ९. १. ५.

---

## अध्याय ६ वा.

[ १ सेनापति निवडण्याविषयीं दुर्योधनाला सर्व वीरांचा आग्रह. २ शल्याला सेनापति करण्याविषयीं अश्वत्थाम्याची सूचना. ३ शल्याकडून सैनापत्यस्वीकार. ४ दुर्योधनाकडून शल्याचें अभिनंदन. ]

( १ ) **संजय**—धृतराष्ट्र राजा, ते कौरव योद्धे याप्रमाणें हिमालयाच्या पठारावर युद्धोत्सुक होऊन बसले असतां तेथें सर्व महारथ जमा झाले; त्यांत शल्य, चित्रसेन, शकुनि, अश्वत्थामा, कृप, कृतवर्मा, सुषेण, अरिष्टसेन, वीर्यवान् धृतसेन, जयत्सेन इत्यादि सर्व राजे येऊन रात्रभर राहिले. रणांगणावर कर्ण हत होऊन पडला असतां त्या विजयी पांडवांनीं तुझ्या पुत्रांना इतकें त्रासवून सोडलें कीं ते हिमालयाच्या पठारावर येईपर्यंत त्यांना स्वास्थ्य म्हणून मिळालेंच नाहीं. नंतर ते सर्व दुर्योधनाजवळ गेले आणि त्याचा यथाविधि गौरव करून शल्यासमक्ष म्हणाले, 'राजा, तूं आतां सेनापतीची निवड करून शत्रूशीं युद्ध करावें हें योग्य आहे. तो सेनापति आमचें रक्षण करील आणि मग आम्ही शत्रूला रणांत जिंकूं !'

( २ ) राजा, नंतर तो दुर्योधन राजा अश्वत्थाम्याजवळ प्राप्त झाला. तो अश्वत्थामा सर्वयुद्धकलानिपुण असून युद्धामध्यें प्रत्यक्ष अंतकाप्रमाणें भासत असे. त्याची अंगकांति अत्यंत सुंदर असून मस्तकावर शिरोवेष्टन होतें; मानेवर शंखसदृश त्रिवली ( तीन रेषा ) असून त्याचे योगानें तो मोठा दैववान् असल्याचें दिसून येत होतें. त्याचें भाषण अति मधुर असे. त्याचे नेत्र विकसित कमलाप्रमाणें असून मुख व्याघ्रमुखासमान उग्र होतें; मेरूपर्वताप्रमाणें तो गंभीर दिसत असे; स्कंध, नेत्र, गति आणि स्वर हीं शंकराच्या वृषभाप्रमाणें होतीं; त्याचे दीर्घ बाहु पुष्ट असून छाति विस्तीर्ण होती; बल गरुडाप्रमाणें असून वेग वायूसमान होता; त्याचें तेज सूर्यासमान असून बुद्धि शुक्राप्रमाणें होती; त्याची कांति, रूप आणि मुख हीं चंद्राप्रमाणें शोभिवंत होतीं; त्याला निर्माण करतांना ब्रह्मदेवानें कोठें कोठें गुण आहेत, त्यांचें वारंवार स्मरण करून प्रयत्नपूर्वक त्याचा देह घडविला होता; तो सर्वलक्षणसंपन्न असून सर्व श्रुतीं-

मध्यें निपुण होता; तो मोठ्या आवेशानें शत्रूंना जिंकणारा होता, तसाच धनुर्वेदाचीं दशांगें व चारहि पाद यांत निष्णात होता. अयोनिसंभव द्रोणानें अतियत्नपूर्वक त्र्यंबकाची आराधना करून अयोनिज स्त्रीच्या ठिकाणीं ह्या पुत्राची प्राप्ति त्याला झाली होती. त्यामुळें त्याचें कर्म व रूप हीं पृथ्वीतलावर अप्रतिम होतीं. तो सर्व विद्यापारंगत असून सद्गुणांचा केवळ सागर होता. अशा त्या अश्वत्थाम्याला दुर्योधन म्हणाला, 'गुरुपुत्रा, तूं आम्हां सर्वांची परम गति आहेस, तुझाच पुरस्कार करून आम्ही सर्व पांडवांना जिंकून टाकूं! म्हणून कोणाला सेनापति करावें, तें तूं सांग!'

अश्वत्थामा—दुर्योधना, शल्य हा कुल, रूप, तेज, यश आणि श्री इत्यादि सर्व गुणांनीं युक्त आहे, म्हणून तूं त्यालाच सेनापति करावें. आपल्या भागिनेयांचाहि त्याग करून तो तुला येऊन मिळाला आहे. तो मोठा कृतज्ञ आहे, तसाच पराक्रमांतहि दुसरा कार्तिकेय आहे. देवांनीं अजित स्कंदाला सेनापति करून जसें दानवांला जिंकिलें, त्याप्रमाणें त्याला सेनापति करून आम्हीहि पांडवांना जिंकूं!

(३) राजा द्रोणपुत्राचें भाषण ऐकून ते सर्व राजे शल्यासभोंवतीं जमा झाले आणि त्यांनीं शल्याचा मोठा जयजयकार केला! कौरववीरांचा आवेश चढून त्यांनीं मोठ्या दृढनिश्चयानें युद्ध करण्याचा विचार केला! दुर्योधन राजा रथांतून उतरला आणि हात जोडून रथांत अधिष्ठित असलेल्या भीष्म-द्रोणांसमान शल्याला म्हणाला, 'मित्रवत्सला शल्या, ज्या काळांत मित्र किंवा शत्रु ह्यांची सुज्ञ लोक परीक्षा करितात असा काल आज येऊन ठेपला आहे! तूं मोठा शूर आहेस, त्यामुळें तूं ह्या माझ्या सैन्याचा नायक हो! तूं सेनानायक झाल्यावर पांडव नष्टधैर्य होऊन जातील व त्यांचे अमात्य आणि पांचाल हेहि निरुद्यमी होऊन बसतील!' दुर्योधनाचें भाषण ऐकून मद्राधीश शल्य सर्व राजांसमक्ष दुर्योधनाला बोलला—

---

१ धनुर्वेदाचीं दशांगें—व्रतं प्राप्तिर्धृतिः पुष्टिः स्मृतिः क्षेपोरिभेदनं,
चिकित्सोद्दीपनं कृष्टिरिष्वस्त्रं स्याद्दशांगकम् ॥ १ ॥

२ धनुर्वेदाचे चतुष्पाद—दीक्षा शिक्षात्मरक्षा च एतत्साधनमेव च,
धनुर्वेदस्य चत्वार एते पादाः प्रकीर्तिताः ॥ १ ॥

शल्य—कुरुराज, मीं जें करावें अशी तुझी इच्छा आहे तें सर्व मी करीन. राजा, माझे प्राण, राज्य आणि धन ह्या सर्वांचाहि तुझ्याकरितां त्याग करण्यास मी सिद्ध आहें !

( ४ ) दुर्योधन—मातुला, अतुलपराक्रमी अशा तुला मी सेनापति करीत आहें; म्हणून हे युद्धविशारदा, स्कंदानें ज्याप्रमाणें युद्धांत देवांचें पालन केलें, त्याप्रमाणें तूंहि आमचें रक्षण कर ! स्कंदावर जसा देवांनीं अभिषेक केला, तसाच हे राजेंद्रा, तूंहि आपणाला सैन्यापत्याचा अभिषेक करून घे ! आणि महेंद्रानें ज्याप्रमाणें दानवांचा संहार केला, त्याप्रमाणें आज तूं रणांगणांत पांडवांचा विध्वंस कर ! ९. १. ६.

---

## अध्याय ७ वा.

[ १ शल्याला सैन्यापत्याधिकार. २ मद्रकांनीं केलेला शल्याचा जयजयकार. ३ कृष्णाचें युधिष्ठिराला प्रोत्साहन. ]

( १ ) संजय—राजा धृतराष्ट्रा, दुर्योधनाचें हें भाषण ऐकून तो प्रतापवान् मद्राधीश शल्य बोलला, "महाबाहो दुर्योधना, हे रथस्थ कृष्णार्जुन मोठे रथिश्रेष्ठ आहेत, असें तुला वाटतें; परंतु या दोघांपैकीं बाहुवीर्यांत एकहि माझ्याशीं कधीं बरोबरी करूं शकणार नाहीं. मी क्रुद्ध झालों असतां सुर, असुर व मानव यांसह सर्व पृथ्वी जरी मजशीं युद्धार्थ सिद्ध झाली, तरी तिचा रणाग्रभागीं मी संहार करण्यास समर्थ आहें. मग तेथें पांडवांची कथा ती काय ? मी रणांत पांडव आणि त्यांबरोबर सोमकांनाहि जिंकीन ! दुर्योधना, मी तुझें सेनापतिपद स्वीकारण्यास तयार आहें, यांत संशय नाहीं. मी आतां अशी व्यूहरचना करितों कीं, त्याचा भेद करून जाणें शत्रूंनाहि शक्य होणार नाहीं. दुर्योधना, मी बोलतों, तें सर्व सत्य आहे, यांत मुळींच संशय नाहीं !" अशाप्रकारचें शल्याचें भाषण झाल्यावर दुर्योधन राजानें त्याला सेनेच्या मध्यभागीं यथाशास्त्र व यथाविधि अभिषेक केला ! त्याबरोबर सर्वत्र मोठमोठ्यानें सिंहनाद होऊं लागले व वाद्येंहि वाजूं लागलीं.

(२) राजा, नंतर महारथ मद्रकांनीं मोठ्या आनंदानें गर्जना करून रणशोभी शल्याची स्तुति करण्यास आरंभ केला ! ते म्हणाले, " राजा शल्या, तूं विजयी हो, तूं दीर्घायुषी होऊन तुजवर चालून आलेल्या सर्व शत्रूंचा वध कर ! तुझ्या

बाहुबलाचा आश्रय करून महाबलवान् कौरव निखिल शत्रूंचा संहार करून पृथ्वीचें राज्य करोत ! रणांगणावर सुरासुर व मानव यांनाहि जिंकण्यास तूं समर्थ आहेस, मग मर्त्यधर्मी सृंजय व सोमक यांचा तूं विध्वंस करशील, यांत नवल तें काय ?" याप्रमाणें त्या मद्राधीश बलवान् शल्याचें गौरव मद्रकांनीं केल्यावर त्या वीर पुरुषाला मोठी धन्यता वाटली !

शल्य—राजा दुर्योधना, आज मी रणांत सर्व पांचाल आणि पांडव यांचा वध करीन किंवा त्यांच्या हस्तें हत झालों तर स्वर्गास जाईन ! आज लोक मला निर्भयपणें रणांत संचार करितांना पाहतील. आज सर्व पांडव, श्रीकृष्ण, सात्यकी, पांचाल, चेदि, द्रौपदेय, धृष्टद्युम्न, शिखंडी आणि सर्व प्रभद्रक माझा पराक्रम, धनुर्बल, चपलता, अस्त्रनैपुण्य आणि माझें बाहुबल पाहोत ! आज पांडव, सिद्ध आणि चारण ह्यांना माझ्या बाहूंचें बल आणि माझी अस्त्रसंपत्ति केवढी आहे हें दिसून येईल ! आज पांडवांच्या महारथांनीं माझा पराक्रम पाहून त्याचा प्रतिकार करण्याकरितां त्यांना इष्ट वाटेल, तें तें करून दाखवावें ! आज पांडवांच्या सैन्यांला मी सर्वत्र पळवून लावीन आणि भीष्म, द्रोण आणि कर्ण ह्यांच्याहूनहि मोठा पराक्रम करून तुझ्या हिताकरितां युद्ध करीत रणांत संचार करीन !

संजय—राजा धृतराष्ट्रा, याप्रमाणें शल्याला कौरवसैन्यापत्याभिषेक झाल्यावर कौरवसैनिकांना कर्णवधामुळें वाटणारी काळजी तत्काळ दूर झाली आणि त्यांचीं मनें पूर्ववत् आनंदित झालीं. मद्रराजाच्या हस्तांत सांपडून पांडव आतां मृत्युमुखींच पडले, असें त्यांना वाटलें ! हे भरतर्षभा, त्या कौरवसेनेला याप्रमाणें पुनः आवेश उत्पन्न झाला आणि त्या रात्रीं त्यांनीं मोठ्या आनंदानें झोंप घेतली !

( ३ ) इकडे तुझ्या सैन्यांत चाललेली गर्जना ऐकून युधिष्ठिरानें सर्व क्षत्रियांसमक्ष कृष्णाला म्हटलें, 'कृष्णा, मद्रराज शल्याला दुर्योधनानें सेनापतिपदाचा अधिकार दिला असून त्याचा अभिषेकहि झाला. आतां तुला जें योग्य वाटेल तें तूं कर; कारण, आमचा नायक व रक्षक तूंच आहेस !' त्यावर कृष्ण धर्मराजाला बोलला, "बा धर्मा, या आर्तायनीला ( शल्याला ) मी पूर्णपणें ओळखतों ! हा शल्य वीर्यवान्, महातेजस्वी आणि विशेषेंकरून मोठा धर्मात्मा आहे ! तो मोठा कर्तृत्ववान् व विचित्र योद्धा असून त्याचें हस्तलाघवहि प्रेक्ष-

णीय आहे! ह्या शल्य रणांत भीष्म, द्रोण किंवा कर्ण ह्यांसारखाच नव्हे, तर ह्यांहूनहि अधिक योग्यतेचा आहे, असें माझें मत आहे! त्याच्याशीं बरोबरी करणारा वीर मला आजवर कोठें आढळला नाहीं. युधिष्ठिरा, शिखंडी, अर्जुन, भीम, सात्यकि, धृष्टद्युम्न यांच्यापेक्षांहि तो अधिक बलवान् आहे. शल्य हा सिंह किंवा गज यांप्रमाणें पराक्रमी असून प्रलयकालीं क्रुद्ध काल ज्याप्रमाणें प्राण्यांच्या शरीरांत प्रवेश करितो, त्याप्रमाणें हाहि शत्रूंमध्यें निर्भयपणें संचार करितो! रणांगणावर त्याच्याशीं युद्ध करणारा तुझ्याशिवाय दुसरा कोणी पुरुषश्रेष्ठ मला दिसत नाहीं! कुरुनंदना धर्मा, देवलोकीं किंवा ह्या लोकीं रणांगणावर त्या क्रुद्ध शल्याचा वध करील, असा तुझ्याशिवाय दुसरा कोणी पुरुप मला आढळला नाहीं! प्रत्येक दिवशीं तुझ्या सैन्याशीं युद्ध करून त्याला हा क्षोभवून सोडतो; म्हणून शंबरासुराला जसें इंद्रानें वधिलें, त्याप्रमाणें तूं ह्या शल्याचा रणांत वध कर!

"राजा युधिष्ठिरा, हा शल्य वीर रणांत अजेय आहे आणि म्हणूनच दुर्योधनानें त्याला सेनापति केलें आहे. ह्या मद्रेश्वर शल्याचा रणांत वध झाला असतां मग तुलाच जय मिळाला असें समज! त्याचा वध झाला म्हणजे अर्थातच हें सर्व मोठें कौरवसैन्य नष्ट झाल्यासारखें आहे! हे महाराजा, हें माझें भाषण ऐकून तूं तत्काल त्या महारथ शल्यावर चालून जा आणि इंद्रानें ज्याप्रमाणें नमुचीचा वध केला, त्याप्रमाणें तूंहि त्याचा वध कर! हा शल्य आपला मातुल आहे, म्हणून त्याच्यावर तूं दया दाखवूं नकोस! क्षात्रधर्म लक्षांत आणून आधीं त्या मद्रेश्वराचा वध कर! युधिष्ठिरा, द्रोण-भीष्मरूपी अर्णव तरून आणि कर्णरूपी पाताळाचाहि अंत काढून ह्या शल्यरूपी गोष्पदांत तूं अखेर बुडून जाऊं नकोस! तुझ्या अंगीं तपाचें जें वीर्य आहे किंवा जें क्षात्रबल आहे, तें सर्व या रणांत दाखवून त्या महारथ शल्याचा वध कर!"

राजा धृतराष्ट्रा, याप्रमाणें त्या शत्रुसंहारक कृष्णानें भाषण केल्यावर व सर्व पांडवांनीं त्याचा उत्तम सत्कार केल्यावर संध्याकाळ झाला व श्रीकृष्ण शिबिरास गेला. नंतर युधिष्ठिरानें सर्व भ्रात्यांस, पांचालांस आणि सोमकांस आपापल्या ठिकाणीं जाण्याची अनुज्ञा देऊन विशल्य गजाप्रमाणें त्या रात्रीं तो स्वस्थ झोंपीं गेला! ते सर्व महाधनुर्धर पांचाल आणि पांडववीर यांनींहि कर्णवधामुळें प्रसन्न अंतःकरणानें त्या रात्रीं सुखानें निद्रा घेतली आणि सूतपुत्राच्या निधनानें

महासागराच्या परतीरास गेल्याप्रमाणें तें सर्व पांडवसैन्य अत्यंत आनंदित झालें ! ९. १. ७.

---

## अध्याय ८ वा.

[ १ व्यूहरचना करून उभय सैन्यांचें युद्धार्थ निर्गमन. ]

( १ ) संजय—राजा, अशारीतीनें ती रात्र निघून गेल्यावर राजा दुर्योधन सर्व कौरवांना बोलला, 'महारथहो, आतां युद्धाला सिद्ध व्हा' ! राजाची आज्ञा मान्य करून ती कौरवसेना तत्काल सज्ज झाली. कित्येकांनीं आपले रथ त्वरित जोडून तयार केले, तर कित्येक सर्वत्र धांवत सुटले ! गजांना सज्ज करण्यांत आलें, पदातीहि सिद्ध झाले आणि सहस्रावधि वीरांनीं आपापल्या रथांत आस्तरणें घालून ठेवलीं. हे राजा, नंतर रणवाद्यांचा घोष होऊं लागला ! सर्व कौरवसैन्यें युद्धार्थ सज्ज होऊन समरभूमीकडे निघालीं ! यावेळीं त्यांचें सर्व मृत्युभय नष्ट झालें होतें ! त्या महारथांनीं सैन्याचे विभाग केले आणि ते सर्व वीर आपापल्या ठिकाणीं स्थित झाले ! तेव्हां ते सर्व सैनिक, कृप, कृतवर्मा, अश्वत्थामा, शल्य, सौबल शकुनि आणि दुसरे सर्व राजे यांनीं तुझ्या पुत्राशीं असा समय केला कीं कोणींहि एकट्यानें पांडवांशीं युद्ध करूं नये ! जो कोणी एकटा पांडवांशीं युद्ध करील किंवा त्यांशीं युद्ध करणाऱ्याला सोडून जाईल, त्याला पंच पातकें आणि उपपातकें लागतील ! अन्योन्यांचें रक्षण करीत सर्वांनीं मिळून पांडवांशीं युद्ध करावें ! अशाप्रकारचा समय करून ते सर्व महारथ मद्रराज शल्याच्या आज्ञेनें शत्रूंवर धांवून गेले !

राजा धृतराष्ट्रा, इकडे त्या घनघोर युद्धामध्यें पांडवांनींहि आपल्या सैन्याचा व्यूह रचून चारी बाजूंनीं युद्ध करीत ते शत्रूंवर चालून गेले. हे भरतश्रेष्ठा, क्षुब्ध झालेल्या समुद्राप्रमाणें गर्जना करीत तें अमर्याद सैन्य जात होतें. त्यांतील रथकुंजरादिकांच्या संचारामुळें सेनासमुद्रावर त्या मोठ्या लहरीच कोसळत आहेत, असा भास होत होता !

धृतराष्ट्र—संजया, भीष्म, द्रोण आणि कर्ण यांचा वध कसा झाला, हें तूं सांगितलेंस, तें सर्व मीं ऐकलें. आतां शल्य आणि माझा पुत्र दुर्योधन ह्यांचें रणभूमीवर कसें पतन झालें तें सांग ! संजया, शल्याला धर्मराजानें रणांत कसें मारलें, त्याचप्रमाणें महाबाहु भीमानेंहि माझ्या पुत्राचा वध कसा केला, तें सर्व मला कथन कर !

संजय–राजा, आतां मी तुला रणांगणांवर अनेक मनुष्यें, गज आणि अश्व यांचा भयंकर क्षय कसा झाला, तें सांगतों; लक्षपूर्वक ऐक. द्रोण व भीष्म ह्यांचा रणांत संहार झाला, सूतपुत्र कर्ण पतन पावला, तेव्हां शल्य हा समरांत सर्व पांडवांचा वध करील, अशी आशा तुझ्या पुत्रांना उत्पन्न झाली! ती आशा अंतःकरणांत धरून मोठ्या धैर्यानें त्यांनीं शल्याचा आश्रय केला आणि आतां आपण सनाथ झालों असें त्यांना वाटलें! कर्णाचा वध झाला, तेव्हां पांडवांनीं मोठा सिंहनाद केला. तें पाहून कौरवांना मोठी भीति उत्पन्न झाली! परंतु पुढें प्रतापी शल्य सेनापति झाल्यावर त्यानें त्या सर्व कौरववीरांना आश्वासन देऊन व बळकट व्यूह रचून तो पांडवांवर धांवून गेला! त्याच्या श्रेष्ठ रथाला सिंधुदेशचे अश्व जोडले होते; त्याचें धनुष्य विचित्र, भारक्षम आणि अत्यंत वेगवान् होतें. त्याचा कुशल सारथि रथांत बसला असून त्याच्या योगें रथाला अपूर्व शोभा आली होती. त्याच्यासह शल्याला रथाधिष्ठित झालेला पाहून तुझ्या पुत्रांची सर्व भीति नाहींशी झाली. प्रयाणकालीं अंगांत कवच घालून शल्य सैन्याच्या अग्रभागीं उभा होता! त्याच्या सभोंवार बलवान् मद्रकवीर आणि दुर्जय कर्णपुत्र ह्यांचा वेढा होता! डाव्या बाजूला त्रिगर्तांनीं परिवेष्टित कृतवर्मा होता! उजव्या बाजूचें रक्षण शक व यवन यांसह कृपाचार्य करीत होता; कांबोजांनीं परिवारित अश्वत्थामा पृष्ठभागावर उभा होता; मोठमोठ्या कुरुपुंगवांनीं रक्षित दुर्योधन मध्यभागीं स्थित होता आणि मोठ्या हयसैन्यानिशीं सौबल शकुनि आणि त्याचा पुत्र कैतव्य सैन्य घेऊन युद्धाकरितां निघाले होते!

राजा धृतराष्ट्रा, पांडवीय महाधनुर्धर वीरांनींहि आपली व्यूहरचना केली. त्यांनीं आपल्या सैन्याचे तीन भाग केले आणि तुझ्या सैन्यावर चाल करून आले. धृष्टद्युम्न, शिखंडी आणि सात्यकि हे तीन पांडववीर शल्याचे सैन्याचा वध करण्याचें योजून रणांत त्यावर धांवून आले! युधिष्ठिर राजाहि शल्याच्या वधार्थ स्वसैन्यासह त्यावर तुटून पडला! शत्रुसंहारक अर्जुनानें कृतवर्म्यावर व संशप्तकगणांवर मोठ्या आवेशानें चाल केली! भीमसेन आणि महारथ सोमक हे गौतमावर चालून गेले! माद्रीपुत्र नकुल-सहदेव हे शकुनि व उलूक यांवर धांवून गेले! त्याचप्रमाणें तुझे अयुतावधि योद्धे हातांमध्यें विविध आयुधें घेऊन मोठ्या क्रोधानें पांडवांवर चाल करून गेले!

धृतराष्ट्र—संजया, महाधनुर्धर भीष्म, द्रोण व महारथ कर्ण हे रणांगणावर पडले असतां कौरवांचें सैन्य अल्पावशिष्ट होतें, त्यामुळें पांडवांना विशेष हुरूप येऊन त्यांचा विजय झाला. तेव्हां माझें व शत्रूंचें सैन्य किती अवशिष्ट होतें तें सांग पाहूं!

संजय—राजा, युद्धार्थ सज्ज होऊन राहिलेलें आमचें तसेंच शत्रूचें सैन्य ह्यांमध्यें प्रत्येकाचें सैन्य किती होतें, तें सांगतों; श्रवण कर! हे भरतर्षभा, कौरवांकडे एकादशसहस्र रथ, दशसहस्र सातशें गज, दोन लक्ष अश्व आणि तीन कोटि पदाति इतकें सैन्य होतें! तसेंच पांडवांकडे सहा हजार रथ, सहा हजार गज, दहा हजार अश्व आणि दोन कोटि पदाति इतकें सैन्य होतें. कौरव-सैन्य शल्याचे आज्ञेनुसार जयाच्या आशेनें पांडवांवर धांवून गेलें, आणि पांडवहि पांचालांसह विजयाशेनें कौरवांवर तुटून पडले! राजा, तीं दोन्ही सैन्यें प्रभातकाळीं एकमेकांवर धांवून गेलीं आणि परस्परांनीं परस्परांचा वध आरंभिला! अशाप्रकारें महाभयंकर व अतिदारुण युद्ध पांडव-कौरवांमध्यें प्रवृत्त झालें! ९. १. ८.

---

## अध्याय ९ वा.

[ १ अष्टादशदिवसयुद्धारंभ. २ संकुलयुद्ध. ३ भीमार्जुनांचा पराक्रम. ]

( १ ) संजय—राजा धृतराष्ट्रा, त्यावेळीं कौरव व सृंजय यांचें फारच तुमुल युद्ध झालें. तें युद्ध देव आणि असुर यांमधीलच घोर युद्ध आहे, असें सर्वांस भासलें! तेव्हां नर, रथ, गज, अश्व आणि सहस्रशः पराक्रमी सादी परस्परांवर तुटून पडले! परस्परांवर चालून जाणाऱ्या गजांचे भयंकर आवाज वर्षाकालांतील मेघगर्जनेप्रमाणें ऐकूं येत होते! कित्येक रथी आपल्या रथांसह गजांच्या प्रहारांनीं पतन पावले! तसेच मदोन्मत्त गजांनीं उधळून लावलेले कित्येक वीर पळत सुटले! कित्येक रथ्यांनीं अश्वांच्या समुदायांना बाणप्रहारांनीं परलोकीं पाठविलें! कित्येक युद्धनिपुण अश्वसादींनीं महारथांना वेष्टून प्रास, शक्ति व ऋष्टि यांच्या भयंकर आघातांनीं त्यांचा संहार केला! कित्येक महारथी वीर गजांना व दुसऱ्या रथ्यांना वेढा देऊन त्यांपैकीं एकेकट्याला युद्धांत गांठून मारूं लागले! कोणी रथी क्रोधाविष्ट होऊन गजांवर बाण टाकीत असतां तेच

गज चारी बाजूंनीं त्या रथ्यांना वेष्टून त्यांचा वध करूं लागले ! हे भारता, रणांत नागांनीं नागांवर आणि रथ्यांनीं रथ्यांवर चालून जाऊन शक्ति, तोमर आणि नाराच बाण यांच्या योगानें त्यांचा विनाश केला ! रथ, गज आणि अश्व यांनीं समरभूमीवर कित्येक पदातींना आपल्या पायांखालीं तुडवून टाकिलें ! चामरांनीं सुशोभित अश्व इतक्या वेगानें सर्वत्र धांवत सुटले कीं हिमालयाच्या पठारावरील हंसच धांवून जणुंकाय मेदिनीचें प्राशन करीत आहेत ( अतिवेगानें पळतांना अश्वांचें मुख चरणांला संलग्न होऊन पोट पृथ्वीला लागलें आहे ) असें वाटलें ! त्यावेळीं अश्वांच्या टापांनीं विचित्र झालेली भूमि नखाग्रांनीं विक्षत झालेल्या स्त्रीप्रमाणें दिसूं लागली ! अश्वांच्या खुरांच्या आवाजानें, रथनेमींच्या नादानें, पदातींच्या कोलाहलानें, गजांच्या विरावानें, रणवाद्यांच्या घोषानें, आणि शंखांच्या निनादांनीं ती रणभूमि इतकी निनादित झाली कीं भूमिकंपानें विदीर्ण होऊन ती जणुंकाय आक्रोशच करीत आहे असा भास झाला !

( २ ) हे राजा, त्यावेळीं जिकडेतिकडे धनुष्यांचे टणत्कार ऐकूं येऊं लागले, देदीप्यमान शस्त्रें झळकूं लागलीं आणि कवचांच्या प्रभांचें तेज सर्वत्र प्रसृत होऊन कांहींएक ओळखतां येईनासें झालें ! बहुतेक वीरांचे गजशुंडेसमान बाहु छिन्न झाले आणि नानाप्रकारच्या चेष्टा करीत ते तळमळूं लागले ! त्यांचीं मस्तकें धरणीतलावर पडूं लागलीं, तेव्हां जणुंकाय ताडाच्या वृक्षांवरून ताडफळेंच धरणीवर पडत आहेत असें ऐकूं येऊं लागलें ! रक्तानें माखलेलीं मस्तकें धरणीतलावर पडलेलीं पाहून तीं कांचनसमान पद्मेंच पृथ्वीवर पडलेलीं आहेत, असा भास झाला ! रणांगणावर सर्वत्र शस्त्रहत वीर पडले असून त्यांच्या टवटवीत नेत्रांच्या योगानें ती रणभूमि पुंडरीक कमलांनींच आच्छादित झाली आहे, असें दिसून येत होतें ! रणांत चंदनलिप्त व अंगद धारण करणारे बाहू सर्वत्र पडलेले पाहून ते इंद्राचे ध्वजच फडकत आहेत, असा भास होत होता ! मोठमोठ्या राजे लोकांच्या फुटलेल्या मांड्या पाहून त्या गजांच्या छिन्न केलेल्या शुंडाच होत असें वाटत होतें ! तेथें सर्वत्र धडें, छत्रें, चामरें इत्यादि पडलेलीं पाहून तें सेनावन प्रफुल्लित झालें असल्याचा भास होत होता ! हे राजा, त्या ठिकाणीं रुधिरस्नात योद्धे निर्भयपणें संचार करीत असतांना पाहून ते फुल-

१ सदृशवर्णन—आलिङ्गन्तो वसुधां निजखुरदलितामिवानुनेतुममी ।
वदनविगतचरणा इव संलक्ष्यन्ते जवादश्वाः ॥—धनंजयविजय.

लेले किंशुक वृक्षच आहेत, असें वाटत होतें ! तेथें शरतोमरांनीं विद्ध झालेले गज पडत असतांना पाहून ते छिन्न घनच कोसळून पडत असल्याचा भास होत होता !

राजा, मोठमोठ्या वीरांकडून मारलें जाणारें गजसैन्य पळतांना पाहून ते वाऱ्यानें उधळून लावलेले मेघच दशदिशांस पळून जात आहेत, असें वाटे ! ते मेघसदृश गज जेव्हां सर्वत्र भूतलावर पडूं लागले, तेव्हां ते प्रलयकालीं वज्र-भिन्न होऊन पडणाऱ्या पर्वतांप्रमाणें दिसत होते ! त्या कालीं अश्व व अश्वसादी हे रणांगणांत पर्वतप्राय राशींप्रमाणें मरून पडले होते ! तेथें वीरांना परलोक-प्राप्ति करून देणारी नदी उत्पन्न झाली ! राजा, तेथें रणांगणांत कुरु-सृंजयांचें तुमुल युद्ध सुरू होऊन चतुरंग सैन्याचा भयंकर नाश होऊं लागला ! हे परंतपा, सर्वत्र बांधवांच्या नांवानें मारलेल्या आरोळ्या ऐकूं येऊं लागल्या; परंतु सर्व भीतिग्रस्त होऊन गेल्यामुळें तो आक्रोश ऐकूनहि त्यांच्या साहाय्यास जाण्यास कोणीहि धजले नाहींत !

( ३ ) अशाप्रकारें तेथें भयंकर रणकल्लोल माजला असतां अर्जुन-भीमसेन यांचा पराक्रम पाहून शत्रूंची मति आश्चर्यचकित झाली ! हे नराधिपा, त्यावेळीं तुझे सैनिक शत्रुहस्तें हत होऊन पडूं लागले, तेव्हां मदवश झालेल्या स्त्रियाच जणुंकाय पृथ्वीतलावर पडत आहेत असें भासलें ! अशा रीतीनें तुझ्या सेनेला आश्चर्यचकित करून त्या भीमार्जुनांनीं आपले शंख वाजविले आणि सिंहनाद केले ! तो महाशब्द श्रवण करून धृष्टद्युम्न व शिखंडी हे धर्मराजाला पुढाकार देऊन शल्यावर चालून गेले ! हे राजा, त्यावेळीं ते सर्व शूर पांडव शल्याशीं एकत्र व विभक्तपणें युद्ध करूं लागले ! इतक्यांत माद्रीपुत्र नकुल-सहदेवहि युद्धाची मोठी हांव धरून शल्यावर चालून आले ! त्या विजयी पांडवांच्या शरप्रहारांनीं व्याकुल झालेलें तुझें सैन्य युद्धविमुख होऊन मागें परतलें ! नंतर तुझ्या पुत्रांच्या समक्ष पांडवांनीं त्याचा मोठा क्षय केला; तेव्हां अवशिष्ट वीर शरवृष्टीला भिऊन दशदिशांना पळून गेले ! राजा, त्यासमयीं तुझ्या सैन्यामध्यें महान् हाहाकार उडाला ! पळून जाणाऱ्या तुझ्या सैन्यांतहि कित्येक महात्मे क्षत्रिय होते, ते जयाशेनें इतरांस 'थांबा, थांबा' म्हणून मोठ्यानें ओरडत होते; परंतु पांडवांनीं भग्न केलेलें तें तुझें सैन्य जें एकदां पळत सुटलें, तें पुनः कधींहि मागें फिरलें नाहीं ! तुझे योद्धे आपल्या प्रियकर पुत्रांना, बंधूंना, पितामहांना,

मातुलांना, भागिनेयांना, मित्रांना, अश्वांना आणि गजांना टाकून केवळ आपल्या प्राणरक्षणार्थ चारी दिशांना पळून गेले ! ९. १. ९.

---

## अध्याय १० वा.

[ १ संकुलयुद्ध. २ कर्णपुत्र चित्रसेनाचा नकुलहस्तें वध. ३ सुषेण व सत्यसेन यांशीं नकुलाचें युद्ध व त्यांत त्यांचा वध. ४ शल्य व पांडव यांचें युद्ध. ]

( १ ) संजय—राजा, आपलें सैन्य भंग पावलें, असें पाहून त्या प्रतापवान् मद्रराज शल्यानें आपल्या सारथ्याला म्हटलें, 'सारथे, माझ्या वेगवान् अश्वांस आतां सत्वर चालव पाहूं ! तो पहा शुभ्र छत्रानें विभूषित पांडुपुत्र युधिष्ठिर आपल्यापुढें उभा आहे ! त्याच्या जवळ मला शीघ्र घेऊन जा आणि मग माझा पराक्रम काय आहे, तो पहा ! सूता, आज युद्धांत युधिष्ठिर माझ्या समोर उभा राहण्यास समर्थ नाहीं !' याप्रमाणें शल्यानें सांगतांच त्या सारथ्यानें शल्याचा रथ धर्मराज होता, तेथें तत्काल नेला आणि वेला जशी क्षुब्ध समुद्राला एकदम मागें सारिते, त्याप्रमाणें त्या शल्यानें पांडवसैन्याला मागें हटविलें ! पर्वताशीं समागम झाला असतां ज्याप्रमाणें सिंधूच्या वेगाची स्थिति होते तशीच स्थिति त्या मद्रराजाला समरांत युद्धाकरितां उभा असलेला पाहतांच पांडवांच्या सैन्याची झाली ! अशा रीतीनें शल्य पांडवांशीं युद्धास सज्ज झाला असतां संग्रामांत मरण आलें तरी पर्वा नाहीं, अशा निश्चयानें तें कौरवसैन्य युद्धाकरितां निघालें ! नंतर आपापल्या विभागांत व्यूहरचना करून त्यांनीं पांडवसैन्याशीं भयंकर संग्राम केला; त्यांत रक्ताच्या नद्या वाहूं लागल्या ! त्या युद्धांत नकुल कर्णपुत्र चित्रसेन याजवर चालून गेला ! त्या दोन्ही योद्धयांनीं विचित्र धनुष्यें धारण करून परस्परांवर एवढी मोठी शरवृष्टि केली कीं जणुंकाय दक्षिणोत्तर मेघ येऊन आकाशांत परस्परांवर जलवृष्टीच करीत आहेत, असा भास झाला ! ते इतके जवळून परस्परांशीं युद्ध करीत होते कीं त्यांच्यांमध्यें किमपि अंतर दिसत नव्हतें ! ते दोघेहि शस्त्रास्त्रप्रवीण असून रथ चालविण्यांत कुशल, तसेच मोठे बलवान्हि होते ! ते वीरपुरुष परस्परांचा वध करण्याविषयीं अत्युत्सुक असून एकमेकांचीं छिद्रें शोधून काढण्यांत अतितत्पर दिसत होते !

(२) राजा, अशाप्रकारें त्या दोघां वीरांचें अन्योन्यांशीं युद्ध चालू असतां चित्रसेनानें एक तीक्ष्ण बाण मारून नकुलाच्या धनुष्याचे तीन तुकडे केले ! नंतर त्यानें आणखी तीन सुवर्णपुंख बाण नकुलाच्या मस्तकावर मारले आणि तीन तीक्ष्ण बाणांनीं त्याच्या अश्वांसहि यमसदनीं पाठविलें ! तसेंच तीनतीन बाण टाकून त्याचा ध्वज व सारथि यांचाहि त्यानें संहार केला ! चित्रसेनानें ललाटप्रदेशावर मारलेल्या तीन बाणांच्या योगें तो नकुल त्रिशृंगपर्वताप्रमाणें शोभूं लागला ! तो धनुष्यहीन व विरथ नकुल हातांत खड्ग-चर्म धारण करून सिंह जसा शैलाग्रावरून खालीं उतरतो, त्याप्रमाणें रथांतून उतरून चित्रसेनावर चालून गेला; परंतु चित्रसेनानें पायांनीं आपल्यावर चालून येणाऱ्या त्या नकुलावर घोर बाणवृष्टि केली; परंतु नकुलानें आपल्या चर्माच्या ( ढालीच्या ) योगें त्या वृष्टीचा मोठ्या कुशलतेनें प्रतिकार केला आणि चित्रसेनाच्या संनिध जाऊन तें सर्व कौरवसैन्य पाहत असतां त्याच्या रथावर चढला आणि त्याचीं कुंडलें, मुकुट, सुंदर नासिका आणि विशाल नेत्र यांनीं शोभिवंत मस्तक त्याच्या धडापासून वेगळें केलें ! याप्रमाणें त्या चित्रसेनाचें दिवाकराप्रमाणें कांतिमान् शरीर रथोपस्थावर पतन पावलें !

( ३ ) राजा, याप्रमाणें चित्रसेनाचा नकुलानें वध केलेला पाहून सर्व महारथांनीं त्याचें गौरव केलें आणि मोटमोठ्यानें सिंहनाद केले ! आपल्या बंधूचा वध केल्याचें पाहून कर्णपुत्र सुषेण व सत्यसेन यांनीं नकुलावर मोठी बाणवृष्टि केली आणि महावनांत ज्याप्रमाणें दोन व्याघ्रांनीं गजाचा वध करण्याकरितां त्यावर धांवून जावें, त्याप्रमाणें त्या दोघां वीरांनीं मोठ्या त्वेषानें चालून जाऊन त्यावर भयंकर शरवृष्टि केली ! त्यावेळीं जलवृष्टि करणारे ते दोन मेघच आहेत, असा सर्वांस भास झाला ! तो नकुल असा बाणविद्ध झाला असतांहि त्यानें मोठ्या धैर्यानें दुसरें धनुष्य घेतलें आणि तत्काल तो दुसऱ्या रथावर चढला ! यावेळीं तो नकुल अंतकाप्रमाणें उग्ररूप दिसत होता ! त्या रथाधिष्ठित नकुलावर चित्रसेनाच्या बंधूंनीं संनतपर्व बाणांची वृष्टि करून त्याच्या रथाचा भंग करण्याचा उद्योग आरंभिला ! तेव्हां नकुलानें हंसतहंसतच तीक्ष्ण बाणवृष्टि करून सत्यसेनाचे चार अश्वांचा वध केला आणि एका सुवर्णपुंख बाणानें त्याच्या धनुष्याचेहि तुकडे केले ! नंतर सुषेण-सत्यसेन दुसऱ्या रथांत बसून व दुसरें धनुष्य घेऊन त्या नकुलावर धांवून गेले ! तेव्हां त्या माद्रीपुत्र नकुलानें त्या दोघां वीरांवर दोन दोन बाण मारून त्यांना विद्ध केलें ! त्यामुळें सुषेणाला अत्यंत

संताप आला आणि त्यानें त्या नकुलाचें तें धनुष्य क्षुरप्र बाण टाकून तत्काल छिन्न केलें !

राजा धृतराष्ट्रा, त्यासमयीं नकुलानें क्रोधाविष्ट होऊन दुसरें धनुष्य घेतलें आणि त्या सुषेणावर पांच बाण मारून त्याचा ध्वजहि एका बाणानें छिन्न केला ! नंतर त्यानें मोठ्या आवेशानें सत्यसेनाचें धनुष्य आणि त्याचें तलत्राण हीं तोडून टाकिलीं ! तें पाहून कौरवसैन्यांत मोठा आक्रोश सुरू झाला ! सत्यसेनानें पुनः दुसरें भारक्षम धनुष्य घेतलें आणि त्या नकुलावर सारखी बाणवृष्टि करून तीखालीं त्यास आच्छादून टाकिलें ! त्यावर शत्रुसंहारक नकुलानें त्या बाणांचें निवारण केलें. त्यानें सुषेण आणि सत्यसेन या दोघांवर दोन दोन बाण मारून त्यांना विद्ध केलें ! त्या कर्णपुत्रांनीं मग नकुलावर सरलगामी बाणांची वृष्टि केली आणि तीक्ष्ण बाणांनीं त्याच्या सारथ्याला विद्ध केलें ! सत्यसेनानें नकुलाच्या रथाची ईषा आणि त्याचें धनुष्यहि छिन्न केलें ! तेव्हां नकुलानें कोणती शक्ति सोडावी याचा विचार करून एक स्वर्णदंडाची, तीक्ष्णाग्रांची, जणुंकाय नागीणच अशी महाविषारी मोठी शक्ति घेऊन ती सत्यसेनावर सोडली ! राजा, त्या शक्तीनें सत्यसेनाच्या हृदयाचे शतावधि तुकडे होऊन तो गतप्राण होऊन रथांतून खालीं भूमीवर पडला !

राजा, आपला बंधु हत झाल्याचें पाहून सुषेणाचा क्रोध अनावर झाला आणि त्यानें चार बाणांनीं नकुलाच्या रथाचे चार अश्व मारिले आणि तीन बाणांनीं त्याच्या सारथ्यास मारिलें ! नंतर त्यानें मोठी गर्जना केली. सुषेणानें नकुलाला विरथ केल्याचें पाहून द्रौपदीचा पुत्र सुतसोम हा नकुलाकडे त्याच्या साह्यार्थ रथ घेऊन आला. त्या रथांत नकुल चढून बसला व पर्वतस्थ सिंहासारखा शोभला ! त्यानें दुसरें धनुष्य घेतलें व तो सुषेणाशीं युद्ध करूं लागला ! त्यावेळीं ते दोघे परस्परांच्या वधेच्छेनें एकमेकांवर भयंकर बाणवर्षाव करूं लागले ! तेव्हां सुषेण अत्यंत संतप्त झाला आणि त्यानें नकुलावर तीन व सुतसोमाची छाती व बाहू यांवर वीस बाण मारिले ! तें पाहून नकुलानेंहि सुषेणावर भयंकर बाणवृष्टि सुरू केली आणि त्या बाणांच्या योगें सर्व दिशा आच्छादित केल्या ! नंतर नकुलानें एक तीक्ष्णाग्र, तेजस्वी व अत्यंत वेगवान् बाण घेऊन तो कर्णपुत्र सुषेणावर टाकला, त्यायोगानें त्याचें मस्तक देहापासून पृथक् होऊन रणांगणांत पडलें ! सर्व सैन्याच्या समक्ष नकुलाचा हा पराक्रम पाहून सर्वांस मोठें आश्चर्य वाटलें ! तो सुषेण वीर भूमीवर पडला, तेव्हां पाण्याच्या

वेगानें नदीच्या तीरावरील महान् वृक्षच एकदम कोसळून पडल्याचा सर्वांस भास झाला !

(४) भरतसत्तमा धृतराष्ट्रा, कर्णपुत्राचा वध व नकुलाचा तो पराक्रम पाहून तुझें सैन्य भयभीत होऊन पळून जाऊं लागलें ! आपलें सैन्य पळून जात असल्याचें पाहून मद्रराज शल्य त्याच्या रक्षणार्थ पुढें सरसावला ! त्यानें त्या सैनिकांस निर्भय केलें व जागच्याजागीं उभें केलें ! नंतर त्यानें सिंहनाद करून आणि प्रत्यंचेचा टणत्कार करून पांडवांशीं पुनः युद्ध आरंभिलें ! त्या सेनापति शल्याच्या आश्रयाखालीं राहून पांडवांशीं युद्ध करण्यास सर्व वीर जमा झाले व अशारीतीनें मोठी कौरवसेना सज्ज झाली ! इकडे पांडवसेनाहि सिद्ध होऊन तींत सात्यकि, भीमसेन, माद्रीपुत्र नकुल-सहदेव, ह्यांनीं त्या जयशाली युधिष्ठिरास पुढाकार दिला आणि त्यांनीं मोठ्यानें सिंहनाद करून शंखांचा व बाणांचा मोठा ध्वनि केला ! तुझें सैन्यहि मद्राधिपति शल्यासभोंवतीं वेढा घालून स्थित झालें ! नंतर त्या दोन्ही सैन्यांत मोठें भयंकर युद्ध सुरू झालें ! त्या युद्धांत यमराष्ट्राची फारच वाढ झाली ! तेव्हां कपिध्वज अर्जुन रणांत संशप्तकांचा संहार करून पुनः कौरवसेनेवर चालून आला ! धृष्टद्युम्नादिक पांडववीरहि कौरवसेनेवर तीक्ष्ण बाणांची वृष्टि करीत तिजवर धांवून आले ! पांडवांच्या बाणांनीं व्यथित होऊन ते कौरव सैनिक इतके भयग्रस्त होऊन गेले कीं दिशा, विदिशा आणि आपलीं सैन्येंहि त्यांस ओळखतां येईनात! याप्रमाणें पांडवांनीं तुझ्या सैन्यांतील प्रमुख वीरांचा संहार केल्यावर त्याची अगदीं वाताहात झाली ! पांडवांनीं तें तुझें सैन्य चारी बाजूंना उधळून लाविलें ! तुझ्या पुत्रांनींहि पांडवांवर चालून जाऊन त्यांचे हजारों वीरांना वधिलें. परस्परांनीं उभयतांचे सैन्यांचा संहार केला आणि ते वीर प्रावृट्कालांतील नद्यांप्रमाणें क्षुब्ध होऊन गेले ! हे राजेंद्रा, तुझ्या सैन्यांतील वीरांप्रमाणेंच ते पांडवीय वीरहि तो रणसंग्राम पाहून अत्यंत भयभीत होऊन गेले ! ९. १. १०.

---

## अध्याय ११ वा.

[ १ शल्य व धर्म यांचें युद्ध. २ शल्य-भीमसेनांचें गदायुद्ध. ]

( १ ) संजय—राजा धृतराष्ट्रा, त्या दोन्ही सैन्यांचा परस्परांकडून अशारीतीनें वध होऊं लागून त्या महारणांत योद्धे पळूं लागले, गजांची धांवपळ सुरू झाली,

पदातींच्या आरोळ्या ऐकूं येऊं लागल्या, अश्वांचा भयंकर संहार होऊं लागला, अगणित प्राणहानि झाली, नाना प्रकारचीं शस्त्रें नष्ट झालीं, रथ आणि गज ह्यांचा विध्वंस उडाला, परस्परांच्या वधेच्छेनें वीर एकमेकांवर तुटून पडूं लागले, आणि प्राणांचा पण लावून भयंकर द्यूताला प्रारंभ झाला! प्रातःकालच्या सूर्योदयाबरोबर हा घोर संग्राम सुरू झाला आणि धर्मराजानें रक्षण केलेले व उत्तम प्रकारें शरसंधान करणारे पांडववीर जिवावर उदार होऊन कौरवांशीं युद्ध करूं लागले! वीरश्री चढलेल्या त्या पांडववीरांच्या हातून तुझ्या सेनेची दावाग्नींत सांपडलेल्या मृगांप्रमाणें झालेली दुरवस्था पाहून कौरवसेनापति शल्य पांडवांवर तत्काल धांवून गेला! त्या पंकांत रुतलेल्या दुर्बल गाईंप्रमाणें कौरवसेनेची ती दीन अवस्था लक्षांत आणून शल्यानें आपल्यावर चालून येणाऱ्या त्या पांडवसेनेवर मोठी शरवृष्टि केली! पांडवहि विजयप्राप्तीकरितां मोठ्या आवेशानें त्या मद्राधिपति शल्यावर चाल करून त्यावर प्राणहारक तीक्ष्ण शरांचा वर्षाव करूं लागले!

राजा, त्या मद्राधिपति शल्यानें धर्माच्या समक्ष शेंकडो बाण मारून त्या पांडवसेनेला जर्जर करून सोडलें! तेव्हां अनेक प्रकारचीं दुश्चिह्नें दिसूं लागलीं! पर्वतांसह सर्व पृथ्वी शब्द करून कांपूं लागली! सर्वत्र प्रज्वलित उल्का फुटून व रविमंडळास स्पर्श करून अंतरिक्षांतून भूमीवर पडूं लागल्या! मृग, महिष आणि पक्षी तुझ्या सेनेला अपसव्य घालून जाऊं लागले! शुक्र, भौम आणि बुध हे धर्मराजाला सातवे स्थानीं येऊन त्यांनीं धर्म हा सर्व पृथ्वीचें आधिपत्य भोगणार असें दर्शविलें! शस्त्राग्रांपासून ज्वाला निघून त्यांचें तेज दुर्निरीक्ष्य झालें! काक आणि उलूक ( घुबडें ) वीरमस्तकांवर किंवा ध्वजाग्रांवर बसूं लागले!

राजा धृतराष्ट्रा, नंतर रणांगणांत त्या सैनिकांमध्यें भयंकर युद्ध प्रवृत्त झालें! कौरव पांडवांवर धांवून गेले आणि सहस्रनेत्र इंद्र जशी जलवृष्टि करितो, त्याप्रमाणें तो शल्य धर्मराज युधिष्ठिरावर बाणवृष्टि करूं लागला! त्या बलवान् शल्यानें भीमसेन, नकुल, सहदेव, द्रौपदीपुत्र, धृष्टद्युम्न, सात्यकि आणि शिखंडी या सर्वांवर प्रत्येकीं दहा सुवर्णपुंख बाण टाकून त्यांस विद्ध केलें आणि ग्रीष्मकालाचे शेवटीं इंद्र ज्याप्रमाणें पर्जन्यवृष्टि करितो, त्याप्रमाणें त्यानें सर्व पांडवसेनेवर मोठी बाणवृष्टि केली! त्यावेळीं शल्याच्या बाणवृष्टीनें सहस्रावधि

प्रभद्रक व सोमक हत होऊन पृथ्वीवर पडतांना दिसत होते ! पांडवसेनेवर शल्यानें केलेली ती शरवृष्टि म्हणजे भ्रमरपंक्ति, शलभसमूह किंवा पर्जन्यधाराच जणुंकाय कोसळून पडत आहेत, असें सर्वांस भासलें ! मेघ जशी नद्यांवर पर्जन्यवृष्टि करितात, त्याप्रमाणें त्या शल्यानें पांडवसेनेवर बाणवृष्टि केली ! त्या बाणांनीं गज, अश्व, रथी व पदाति हे सर्व विह्वल होऊन मोठ्यानें आक्रोश करूं लागले ! तेव्हां शल्याच्या शरीरांत क्रोध व पराक्रम यांचा संचार होऊन प्रलयकालच्या अंतकाप्रमाणें त्यानें सर्व अरिसैन्यांस बाणांनीं आच्छादून टाकिलें ! शल्यानें मेघाप्रमाणें गर्जना करून पांडवसेनेचा असा भयंकर संहार चालविला कीं शेवटीं त्या पांडवसैनिकांना अजातशत्रु धर्मराजाकडे जाणें भाग पडलें ! त्यासमयीं शल्यानें त्या पांडवांवर आवेशानें तीक्ष्ण बाणांचा वर्षाव केला आणि मोठी बाणवृष्टि युधिष्ठिरावर करून त्यालाहि विद्ध केलें ! पदाति व अश्व यांसह आपल्यावर चालून येणाऱ्या त्या शल्याला पाहतांच अंकुशानें जसा महाद्विपाचा प्रतिकार करितात, त्याप्रमाणें धर्मराजानें तीक्ष्ण शरांनीं त्याचा निरोध केला ! तेव्हां शल्यानें एक सर्पविषासमान घोर बाण धर्मावर टाकला ! त्या भयंकर बाणानें धर्माच्या शरीराचें विदारण केलें आणि नंतर तो बाण पृथ्वींत शिरला !

राजा, युधिष्ठिर शल्यबाणानें विद्ध झाल्याचें पाहून भीमसेन अत्यंत क्रुद्ध झाला आणि त्यानें सात बाण शल्यावर टाकिले ! तें पाहून सहदेवानें पांच आणि नकुलानें दहा बाण त्या मद्राधीशावर मारले ! द्रौपदीपुत्रांनींहि मेघ जसे पर्वतावर जलवृष्टि करितात, त्याप्रमाणें त्या शल्यावर बाणांचा वर्षाव केला ! अशाप्रकारें सर्व पांडवांनीं शल्याचें निवारण केलेलें पाहून कृप आणि कृतवर्मा, तसेच महावीर्य उलूक आणि शकुनि हे अत्यंत क्षुब्ध झाले आणि त्याचे रक्षणार्थ धांवून आले ! नंतर महाबलवान् अश्वत्थामा तेथें आला आणि तुझे पुत्रहि एकत्रित होऊन त्या सर्वांनीं समरांत शल्याचें संरक्षण केलें ! कृतवर्म्यानें भीमसेनावर तीन शिलीमुख मारिले आणि नंतर त्यावर सारखी बाणवृष्टि केली ! अशारीतीनें त्यांनीं त्या क्षुब्ध झालेल्या भीमाचें निवारण केलें ! कृपाचार्यानें संतप्त होऊन धृष्टद्युम्नावर, शकुनीनें द्रौपदेयांवर आणि अश्वत्थाम्यानें नकुल-सहदेवांवर बाणवृष्टि केली ! इकडे समरभूमीवर योधश्रेष्ठ दुर्योधनानें कृष्णार्जुनांवर चालून जाऊन त्यांवर घोर शरवृष्टि केली !

अशाप्रकारें तुझ्या वीरांचीं शत्रूंशीं शतावधि द्वंद्वें सर्वत्र सुरू झालीं. कृतवर्म्यानें

युद्धांत भीमाचे ऋक्षवर्ण अश्वांचा वध केला; त्यामुळें तो पांडुनंदन त्या हताश्व रथांतून उतरला व हातांत गदा घेऊन दंडधर कालाप्रमाणें युद्ध करूं लागला! त्या मद्रराज शल्यानें सहदेवाचे अश्व मारिले! तें पाहून सहदेवानें तलवारीनें शल्याच्या पुत्रावर प्रहार करून त्याचा वध केला! इतक्यांत कृपाचार्य व धृष्टद्युम्न यांमध्यें पुनः युद्ध सुरू झालें! ते दोघेहि वीर सावधानपणें युद्धांत एकमेकांवर आपली सरशी करण्याचा प्रयत्न करीत होते! अश्वत्थाम्यानें हंसतहंसत सहज द्रौपदेयांवर प्रत्येकीं दहा दहा बाण सोडले आणि भीमसेनाच्या अश्वांना मारलें! तें पाहून भीमसेन रथांतून खालीं उतरला आणि दंडपाणि यमाप्रमाणें त्यानें हातांत गदा घेऊन मोठ्या क्रोधानें कृतवर्म्याचे अश्व आणि रथ यांचा संहार केला! नंतर कृतवर्म्यानें रथांतून उडी घेऊन पलायन केलें!

(२) हे राजा, तेव्हां शल्याचा क्रोध अनावर झाला आणि त्यानें सोमक आणि पांडव यांचा संहार करून पुनः त्या युधिष्ठिरावर तीक्ष्ण बाण टाकून त्याला विद्ध केलें! तें पाहून भीम अत्यंत क्रोधाविष्ट झाला आणि दांत-ओंठ खात त्यानें आपली गदा शल्याचा वध करण्याच्या उद्देशानें हातांत घेतली! ती गदा यमदंडासमान उग्र असून कालरात्रीप्रमाणें शत्रुसंहारक होती; तसेंच ती गज, अश्व आणि नर यांचा देहान्त करणारी होती; तीवर सुवर्णाचे पट्टे लावलेले असून ती प्रज्वलित उल्काच आहे कीं काय, असा भास होत होता! ती सर्पिणीप्रमाणें अत्यंत उग्र दिसत असे. ती वज्राप्रमाणें कठीण असून लोहाची केलेली होती. प्रमदा ज्याप्रमाणें चंदनागरूची उटी लावते, त्याप्रमाणें ती गदा वसा व मेद यांनीं लिप्त झालेली होती; ती यमाच्या जिह्वेप्रमाणें वखवखलेली दिसत होती! आकारानें ती कात टाकलेल्या सर्पाप्रमाणें होती. ती सर्व वीरांना भयोत्पादक असून स्वसैन्याला हर्षविणारी होती. तिच्या अंगीं पर्वतशिखरें विदीर्ण करण्याची शक्ति असून तिची प्रसिद्धी मनुष्यलोकांत फार होती. ती गदा घेऊन भीमसेनानें महेश्वरसखा कुबेर याला युद्धार्थ आह्वान केलें; त्याच गदेनें महाबल भीमानें द्रौपदीचें प्रिय करण्याच्या इच्छेनें कुबेरसदनीं ( अलकावतींत ) अनेक मायावी गुह्यकांना, त्यांनीं भयंकर निवारण केलें असतांहि, वधिलें!

राजा धृतराष्ट्रा, ती भयंकर गदा घेऊन भीमसेन रणांगणांत शल्यावर चालून गेला आणि त्यानें त्याचे चारहि अश्वांचा वध केला! तेव्हां शल्य क्रोधाला पेटून

त्यानें मोठ्यानें गर्जना केली आणि भीमसेनाच्या वक्षावर एक तोमर फेंकलें ! त्यानें भीमकवचाचें विदारण करून त्याचे हृदयांत प्रवेश केला ! तें तोमर भीमानें छातींतून उपटून काढिलें आणि त्या मद्रपतीच्या सारथ्यावर तें तोमर फेंकून त्याचें हृदय भेदिलें ! तेव्हां तो शल्यसारथि भिन्नकवच होऊन रक्त ओकूं लागला. तो गतसंज्ञ होऊन तत्काल भूतलावर पडला ! आपल्या सर्व कृत्यांचा भीमानें केलेला प्रतिकार पाहून शल्य विस्मयचकित झाला आणि तो गदाधारी शल्य भीमाकडे वरचेवर पाहूं लागला ! सर्व पांडवांना रणांतील भीमाचा पराक्रम पाहून मोठा आनंद वाटला आणि त्यांनीं त्याचा गौरव केला ! ९. १. ११.

---

## अध्याय १२ वा.

[ १ भीम व शल्य यांचें युद्ध. २ चेकितानाचा वध. ३ शल्य-युधिष्ठिरयुद्ध. ]

( १ ) संजय—राजा, आपला सारथि हत झाल्याचें पाहून शल्यानें आपली लोहमयी गदा वेगानें घेतली आणि तो पर्वतासारखा स्थिर उभा राहिला. तो जणुंकाय प्रलयकालीन प्रज्वलित अग्नि, पाशधारी अंतक, सश्रृंग कैलासपर्वत, वज्रधारी इंद्र, किंवा शूलधारी शंकरच स्थित आहे असा भास झाला. अरण्यांतील मत्त गजाप्रमाणें तो क्षुब्ध दिसूं लागला ! आपली प्रचंड गदा घेऊन भीमसेन त्यावर तुटून पडला ! त्यावेळीं सहस्रावधि शंख, तूर्य इत्यादिकांचे ध्वनि सर्वत्र होऊं लागले आणि वीरांचे हर्षवर्धक सिंहनादहि ऐकूं येऊं लागले ! सर्व बाजूंनीं उभयपक्षीय वीर त्या दोन योध्दवरांचें युद्ध मोठ्या कौतुकानें पाहत ‘ उत्तम, उत्तम ’ म्हणून त्यांची प्रशंसा करूं लागले ! समरांतील तो भीमसेनाचा वेग मद्राधिपति शल्य किंवा यदुनंदन बलराम यांवांचून सहन करण्यास अन्य कोणीहि समर्थ नव्हता ! शल्याचाहि गदावेग सहन करण्यास भीमसेनावांचून दुसरा कोणी समर्थ नव्हता ! नंतर भीम व शल्य हे वृषभांप्रमाणें गर्जना करीत मंडलाकार फिरूं लागले ! मंडलें घेण्यांत व परस्परांवर गदाप्रहार करण्यांत त्या पुरुषश्रेष्ठांनीं आपली समानता दाखविली ! शल्याच्या गदेला तप्त सुवर्णाप्रमाणें दीप्तिमंत पट्ट्यांचें बंधन होतें, त्यामुळें तिजपासून अग्नीच्या ज्वाळाच निघत आहेत, असा भास होत होता. ती गदा पाहून प्रेक्षकांच्या मनोवृत्ति तत्काळ भयभीत होत असत ! भीम मंडलाकार संचार करीत असतां

त्याची गदा म्हणजे मेघमंडलावर विद्युल्लताच शोभत आहे असें भासलें ! तसेंच भीमाची गदा शल्यगदेवर आपटून अंतरिक्षांत अग्नीच्या ठिणग्या उडत असत !

अशाप्रकारें ते दोघे वीर परस्परांशीं युद्ध करीत असतां दोन मदोन्मत्त गज आपल्या दंतांनीं किंवा दोन बलवान् वृषभ आपल्या शिंगांनीं परस्परांवर प्रहार करीत आहेत, असें भासूं लागलें. त्यांनीं आपलीं गदाग्रें अन्योन्यांवर हाणलीं, त्यायोगें त्यांचीं गात्रें भिन्न होऊन त्यांतून रुधिरस्राव होऊं लागला ! तेव्हां त्यांचे देह सुपुष्पित किंशुकवृक्षांप्रमाणें दिसूं लागून त्यांची कांति विशेषच प्रेक्षणीय दिसूं लागली: मद्रराजानें आपल्या गदेनें भीमसेनाच्या डाव्या व उजव्या बाजूला अनेक गदाप्रहार केले, तरी तो भीमसेन यत्किंचित्‌हि न भितां अचलासारखा स्थिर राहिला. गजांकडून मोठमोठे प्रहार झाले तरी ज्याप्रमाणें महापर्वताला त्याचें कांहीं वाटत नाहीं, त्याप्रमाणें भीमसेनानेंहि आपल्या गदेनें शल्यावर वरचेवर प्रहार केले असतां त्या वीरश्रेष्ठाला त्याची व्यथा मुळींच झाली नाहीं. त्या भयंकर युद्धांत पुरुषश्रेष्ठ शल्य-भीमसेनांचे जे परस्परांवर आघात होत असत, त्यांचा घोर ध्वनि वज्राच्या गर्जनेप्रमाणें होऊन दशदिशांना ऐकूं येत असे !

( २ ) राजा, नंतर ते दोघे वीर परस्परांवर गदाप्रहार करीत मंडळाकार फिरूं लागले. अशारीतीनें प्रत्येक जण आठ पावलें पुढें आला आणि लोहदंड घेऊन ते दोघे युद्ध करूं लागले ! त्यासमयीं त्या वीरांनीं अमानुष पराक्रम करून दाखविला ! अन्योन्यांच्या वधाची इच्छा धारण करून ते मंडलाकर फिरूं लागले, आणि त्यांनीं आपलें हस्तकौशल्य उत्तम प्रकारें दर्शविलें ! ते आपल्या गदा उभारून सशृंग पर्वतांप्रमाणें एकमेकांवर धांवूं लागले ! ते दोघेहि वीर क्रोधमूर्च्छित होऊन अन्योन्यांवर गदाप्रहार करूं लागले; तेव्हां ते विद्ध होऊन इंद्रध्वजाप्रमाणें एकदम भूमितलावर पडले ! त्यामुळें दोन्ही दळांतील वीरांमध्यें मोठा हाहाकार उडाला ! दोघांच्याहि मर्मभागीं थोर आघात होऊन ते अत्यंत विह्वल झाले ! तें पाहून त्या मद्राधीश शल्याला कृपाचार्यानें रथांत घालून रणांगणांतून त्वरेनें बाहेर नेलें ! समरांगणांत विह्वल होऊन पडलेला भीमसेन पुनः सावध झाला आणि त्यानें आपली गदा हातांत घेऊन शल्याला युद्धार्थ आह्वान केलें ! तेव्हां तुझ्या सैन्यांतील दुर्योधनादिक सर्व शूर योद्धे आपलीं नानाविध शस्त्रें व अनेक रणवाद्यें घेऊन पांडवांवर धांवून गेले, आणि त्यांनीं हात वर करून मोठी गर्जना करून युद्धास आरंभ केला !

कौरवसैन्य आपल्यावर चाल करून आल्याचें पाहून पांडवांचा रणोत्साह वाढला आणि मोठ्यानें सिंहनाद करून ते दुर्योधनादिकांवर तत्काल तुटून पडले ! याप्रमाणें पांडव कौरवांवर चालून आले असतां तुझ्या दुर्योधन पुत्रानें चेकितानाच्या वक्षःस्थलावर जोराचा प्रहार करून त्याला विद्ध केलें ! तो पांडववीर रुधिरपरिक्लिन्न होऊन वीरासनीं मूर्च्छित झाला व मृत्यु पावला !

राजा धृतराष्ट्रा, अशाप्रकारें चेकितान मृत्यु पावला असतां पांडव महारथांनीं कौरवसेनेवर शरवर्षाव केला आणि ते सर्व मोठ्या शौर्यानें सैन्यांत संचार करूं लागले. तेव्हां कृपाचार्य, कृतवर्मा आणि महारथ अश्वत्थामा हे शल्याच्या नेतृत्वाखालीं धर्मराजाशीं युद्ध करूं लागले. भारद्वाज द्रोणाचार्यांचा वधकर्ता जो धृष्टद्युम्न त्याच्याशीं दुर्योधनानें युद्ध आरंभिलें; तसेंच तीन हजार रथी अश्वत्थाम्याच्या हाताखालीं अर्जुनाशीं युद्धार्थ भिडले ! हे सर्व योद्धे समरांत मारूं किंवा मरूं असा निर्धार करून मोठ्या विजयेच्छेनें युद्ध करीत होते ! तेव्हां तुझ्या वीरांनीं राजहंस जसे महासरोवरांत प्रवेश करतात, त्याप्रमाणें पांडवसैन्यांत प्रवेश केला ! नंतर पांडव-कौरवांचें महाघोर युद्ध प्रवृत्त झालें ! राजा, याप्रमाणें परस्परांनीं अन्योन्यांवर प्राणघातकी बाणांचा वर्षाव सुरू केला आणि मोठमोठ्या वीरांचा क्षय सुरू झाला. त्यावेळीं सोसाट्याचा वारा सुटून सर्वत्र धूळ उडून कांहींहि ओळखतां येईना ! परंतु वीरांनीं एकमेकांचीं घेतलेलीं नांवें आमच्या कानीं पडत, त्यावरून तें युद्ध मोठ्या धैर्यानें व नेटानें चालत आहे, असें आम्हांला वाटलें. सर्वत्र पडलेल्या रक्तानें ती धूळ नाश पावली आणि अंधकाराचा लोप होऊन सर्व दिशा प्रसन्न झाल्या. अशाप्रकारें तो भयानक संग्राम सुरू असतां तुझ्या किंवा शत्रूंकडील वीरांत युद्धविमुख होणारा एकहि पुरुष नव्हता ! सर्व वीर ब्रह्मलोकाच्या इच्छेनें रणांत विजयाची इच्छा करीत होते; त्यामुळें त्या सर्व पराक्रमी वीरांनीं सुयुद्ध करून स्वर्गास जाण्याचा निश्चय केला ! आपल्या अन्नदात्याचे ऋणांतून मुक्त होण्याकरितां त्याचे कार्यसिद्ध्यर्थ यत्न करण्याचा त्यांनीं निश्चय केला आणि नाना प्रकारचीं शस्त्रें परस्परांवर टाकीत त्या सर्व महारथांनीं पुनः घोर युद्धास प्रारंभ केला ! ‘ मारा, विद्ध करा, पकडा, प्रहार करा, कापून काढा, ’ अशाप्रकारचे शब्द तुझ्या व शत्रूच्याहि सैन्यांतून ऐकूं येऊं लागले !

राजा धृतराष्ट्रा, तेव्हां शल्यानें त्या महारथ धर्मराजाचा वध करण्याचें योजून त्यावर तीक्ष्ण बाण टाकिले आणि त्याला विद्ध केलें; धर्मानेंहि उलट हंसत-

हंसत चौदा नाराच बाण त्याच्या मर्मस्थलांवर मारले ! नंतर शल्यानें युधिष्ठिराच्या वधाकरितां अनेक कंकपत्र बाण टाकले आणि पुनः एका संनतपर्व बाणानें सर्व सैन्य पाहत असतां त्या धर्माला विद्ध केलें ! तें पाहून धर्मराजहि अत्यंत संतप्त झाला; त्यानें कंकपिच्छ व मयूरपिच्छ बाणांचा शल्यावर वर्षाव करून त्याला विद्ध केलें; तसेंच चंद्रसेनावर सत्तर, सारथ्यावर नऊ आणि द्रुमसेनावर चौसष्ट बाण मारून त्यांचा वध केला ! धर्मराजानें आपल्या चक्ररक्षकांचा अशाप्रकारें वध केला असतां शल्यानें पंचवीस चेदि वीरांचा समरांत वध केला; नंतर त्यानें सात्यकीवर पंचवीस, भीमसेनावर पांच व नकुल-सहदेवांवर शंभर तीक्ष्ण बाण मारून त्यांना विद्ध केलें !

( ३ ) हे राजसत्तमा, रणांगणांत शल्य अशाप्रकारें पराक्रम दाखवीत असतां धर्मानें त्याच्यावर विषारी सर्पाप्रमाणें भयंकर बाण सोडले आणि एका भल्लानें रणाग्रभागीं असणाऱ्या शल्याचें त्यानें ध्वजाग्र छेदिलें; तो छिन्न ध्वज गिरिशिखराप्रमाणें कोसळून खालीं पडतांना आम्हीं पाहिला. आपला ध्वज भग्न करून धर्मराज स्वस्थ उभा असल्याचें पाहून शल्याला अनावर क्रोध उत्पन्न झाला आणि त्यानें त्या धर्मराजावर सारखी बाणवृष्टि करण्यास आरंभ केला. त्यावेळीं त्या क्षत्रियश्रेष्ठ शल्यानें सात्यकि, भीमसेन, नकुल आणि सहदेव यांवर प्रत्येकीं पांच बाण मारले आणि युधिष्ठिराच्या वक्षःस्थळावर जणुंकाय मेघपटलाप्रमाणें बाणजालच पसरिलें आहे, असें आम्हीं पाहिलें ! त्यानें दिशा आणि प्रदिशा बाणांनीं आच्छादून टाकिल्या ! अशारीतीनें धर्मराज बाणाच्छादित होऊन इंद्रत्रस्त जंभासुराप्रमाणें अत्यंत पीडित झाला ! ९. १. १२.

---

## अध्याय १३ वा.

[ १ शल्यपराक्रमवर्णन. ]

संजय—अशाप्रकारें मद्राधीश शल्यानें धर्मराजाला पीडित केल्यावर सात्यकि, भीमसेन, नकुल-सहदेव हे शल्यावर धांवून आले आणि त्यांनीं शल्याला वेढा देऊन पीडित केलें ! त्या एकट्या शल्यवीराला अनेक वीरांनीं वेढून त्रस्त केल्याचें पाहून सिद्धांनीं आनंदित होऊन त्यांचें मोठें गौरव केलें ! तो रणसंग्राम पाहण्यासाठीं अनेक ऋषि जमले होते, त्यांनींहि तो संग्राम पाहून मोठें आश्चर्य व्यक्त केलें ! राजा, शत्रुहृदयांतील केवळ शल्यच, अशा त्या मद्र-

पति शल्यावर भीमसेनानें प्रथम एक बाण टाकिला आणि नंतर आणखी सात बाण सोडिले; तसेंच धर्मपुत्र युधिष्ठिराचे रक्षणाकरितां सात्यकीनें त्या शल्यावर शंभर बाण मारले आणि नंतर त्यानें मोठा सिंहनाद केला! नकुलानें पांच बाण टाकिले आणि सहदेवानें चवदा बाण मारले! याप्रमाणें त्या शूर शल्य सेनापतीवर सकल पांडववीरांनीं चोहोंकडून बाणांचा भयंकर मारा केला! तें पाहून शल्यानें आपले वेगवान्, भारक्षम आणि घोर धनुष्याचें आकर्षण करून सात्यकीवर पंचवीस, भीमसेनावर सत्तर आणि नकुलावर सात बाण मारिले आणि सहदेवावर एकवीस बाण टाकून त्याचें धनुष्य व बाण तोडून टाकिले! तेव्हां सहदेवानें दुसरें धनुष्य सज्ज करून आपल्या त्या मातुलावर सर्पांप्रमाणें प्राणघातक आणि अग्नीप्रमाणें प्रज्वलित असे पांच बाण मारले आणि त्याच्या सारथ्यावर एक बाण सोडला! मग सहदेवानें आणखी तीन बाण शल्यावर टाकून त्याला विद्ध केलें! नंतर भीमसेनानें सत्तर, सात्यकीनें नऊ आणि धर्मराजानें साठ बाण त्या शल्यावर टाकून त्याला विद्ध केलें! त्या महारथांकडून बाणप्रहारांनीं शल्य अतिविह्वल होऊन गेला! पर्वतांतून ज्याप्रमाणें गेरूचें जल वाहतें, तसे त्यावेळीं शल्यशरीरांतून रक्तप्रवाह वाहूं लागले. अशा दुरवस्थेंत देखील शल्यानें त्या महारथांवर पांच पांच बाण मारून एका भल्ल बाणानें धर्माचें धनुष्य तोडून टाकिलें! हा शल्याचा पराक्रम पाहून सर्वांना मोठें आश्चर्य वाटलें!

राजा धृतराष्ट्रा, नंतर त्या धर्मराजानें दुसरें धनुष्य घेतलें आणि सारखे बाण सोडून त्यायोगें अश्व, सारथि, ध्वज आणि रथ ह्यांसह त्या शल्याला आच्छादून टाकिलें! तशाहि स्थितींत शल्यानें दहा तीक्ष्ण बाण टाकून धर्माला विद्ध केलें! धर्म बाणविद्ध झाल्याचें पाहून सात्यकि क्रोधसंतप्त झाला आणि त्यानें पांच बाण सोडून त्या शूर मद्राधीशाला विद्ध केलें! शल्यानें सात्यकीचें तें धनुष्य क्षुरप्र बाणानें तोडून टाकिलें आणि भीमसेनादि पांडववीरांवर तीन-तीन बाण सोडले! तेव्हां त्या सत्यविक्रम सात्यकीनें एक सुवर्णदंडाचें व अति-मोलवान् असें तोमर त्या शल्यावर सोडलें! भीमसेनानें पन्नगाप्रमाणें भयंकर नाराच बाण त्यावर मारला, नकुलानें शक्ति सोडली, सहदेवानें आपली शुभ गदा त्यावर फेंकली आणि धर्मराजानें शल्याच्या वधाच्या इच्छेनें त्यावर शतघ्नी टाकिली! त्या मद्रराज शल्यानें पांडवांनीं सोडलेलीं तीं शस्त्रें आप-ल्यावर येत असल्याचें पाहून शस्त्रसंधानें त्यांचा प्रतिकार केला. सात्यकीनें

फेंकलेल्या तोमराचा प्रतिकार त्यानें भल्लबाणांनीं केला; भीमसेनानें सोडलेला कनकविभूषित बाण त्या प्रतापवान् शल्यानें हस्तचापल्यानें तोडून त्याचे दोन तुकडे केले. नकुलानें सोडलेली भयंकर शक्ति आणि सहदेवानें मारलेली गदा या सर्वांचें आपल्या शरौघांनीं निवारण केलें आणि त्या सर्व पांडवांसमक्ष तो मोठ्यानें सिंहनाद करूं लागला ! धर्माच्या शतघ्नीचाहि त्यानें दोन बाणांनीं उच्छेद केला !

शल्यानें अशाप्रकारें पांडवांवर मिळविलेला जय सात्यकीला सहन झाला नाहीं. त्यानें दुसरें धनुष्य घेऊन दोन बाण शल्यावर व तीन बाण त्याच्या सारथ्यावर मारले ! नंतर त्या शल्यानें क्रोधानें महागजांवर जसा अंकुश-प्रहार करावा, त्याप्रमाणें त्या सर्व पांडवसेनेवर दहा दहा तीक्ष्ण बाणांचा प्रहार केला ! त्या महारथांचें निवारण शल्यानें अशाप्रकारें केल्यावर ते पांडवाचे वीर मद्रराजाच्या समोर उभे न राहातां, माघार घेऊन राहिले ! शल्याचा तो पराक्रम पाहून दुर्योधनाला वाटलें कीं, आतां पांडव, पांचाल व सृंजय यांचा वध झाल्याशिवाय राहणार नाहीं. पुढें भीमसेन हा जिवावर उदार होऊन शल्याशीं युद्ध करण्याचें योजून त्याजवर धांवून गेला ! त्यावेळीं नकुल-सहदेव व सात्यकि यांनींहि शल्याला वेढा घातला व चारी बाजूंनीं त्यावर घोर शरवृष्टि केली. त्या सर्वांनीं मिळून शल्याला घेरलें असतां तो किमपिहि भयग्रस्त झाला नाहीं. त्यानें एकट्यानें त्या सर्वांशीं युद्ध चालविलें. त्यांत धर्मराजानें एक क्षुरप्रबाण टाकून शल्याच्या एका चक्ररक्षकाला तत्काल वधिलें ! आपल्या चक्ररक्षकाचा पांडवांनीं वध केलेला पाहून शल्यानें पांडव-पक्षीय वीरांवर बाणवृष्टि केली आणि त्या सर्वांना बाणाच्छादित केलें. धर्मराजाला त्यावेळीं मोठी काळजी उत्पन्न झाली. तो विचार करूं लागला कीं ‘कृष्णानें केलेलें भाषण आतां समरांगणांत सत्य कसें ठरणार ? कारण या क्रुद्ध मद्रराज शल्यापुढें माझें सैन्य टिकाव धरून राहील, असें मला तरी वाटत नाहीं !’

राजा धृतराष्ट्रा, ते पांडव नंतर आपले रथ, अश्व व गज यांस घेऊन मद्र-राज शल्याच्या जवळ येऊन त्याजवर त्यांनीं मोठी शरवृष्टि केली. परंतु याहि वेळेला शल्यानें तीं त्यांचीं शस्त्रास्त्रें नष्ट करून टाकलीं ! नंतर शल्यानें त्या पांडवांवर शलभसमूहांप्रमाणें सुवर्णपुंख बाण मारून अंतरिक्ष व्यापून टाकिलें आणि सर्वत्र अंधकार होऊन कांहींहि दिसेनासें झालें ! पांडवांपैकीं किंवा

आमच्यांपैकीं वीरहि ओळखतां येईनात ! पांडवांची सेना शराच्छादित करून व धर्मराजावरहि बाणांचा वर्षाव करून शल्यानें पांडवांच्या सेनेला विह्वल करून सोडलें आणि तो सिंहासारखा गर्जना करूं लागला. पांडवांकडील कोणीहि महारथ शल्यावर चालून जाण्यास त्यावेळीं समर्थ नव्हते; धर्मराज-भीमसेनादि प्रमुख वीर मात्र त्या समरशोभी शल्याशीं युद्ध करीत राहिले होते ! १. १. १३.

---

## अध्याय १४ वा.

[ १ अर्जुन व अश्वत्थामा यांचें युद्ध. २ अर्जुनपराक्रम. ३ अश्वत्थाम्याच्या हातून सुरथवध. ]

(१) **संजय**—राजा, अश्वत्थाम्यानें अर्जुनावर अनेक लोहमय बाण टाकून त्याला विद्ध केलें. नंतर त्या द्रोणपुत्राचे अनुयायी जे त्रिगर्तांचे महारथ त्यांनींहि त्या अर्जुनावर सारखी शरवृष्टि केली, तेव्हां अर्जुनानें अश्वत्थाम्यावर तीन बाण मारले; इतर धनुर्धरांवरहि त्यानें दोन दोन बाण मारून त्या सर्वांस शरविद्ध केलें आणि कौरवसैन्यावर सारखी बाणवृष्टि केली ! तेव्हां सर्व कौरवसैन्य बाणाच्छादित होऊन गेलें ! अर्जुन त्यांच्याजवळ येऊन ठेपला व सर्व कौरव-सैनिक बाणविद्ध झाले, तरीहि युद्धविमुख होऊन ते पळून गेले नाहींत ! इकडे अश्वत्थामादि वीर आपले रथसैन्यानिशीं अर्जुनावर चाल करून आले आणि त्यांनीं त्याच्याशीं युद्ध आरंभिलें. त्या कौरवांच्या सुवर्णभूषित बाणांनीं अर्जुनाचें आसन व्याप्त होऊन गेलें आणि त्याबरोबरच त्या महाधनुर्धरश्रेष्ठ कृष्णार्जुनांचे देहहि शरविद्ध झाले ! कृष्णार्जुनांचे देह बाणांनीं विदीर्ण झालेले पाहून त्या युद्धदुर्मद कौरवसैनिकांना मोठा आनंद झाला; त्यांनीं पुनः आणखी भयंकर शरवृष्टि त्या कृष्णार्जुनांवर करून अर्जुनरथाचें कूबर ( धुरी ), चक्रें, ईषा, बंधनरज्जु, जूं आणि तुंबे हीं सर्व शरविद्ध करून सोडलीं !

राजा, त्यासमयीं तुझ्या योद्ध्यांनीं पांडवांची जी दुर्दशा केली तशाप्रकारची दुर्दशा पूर्वीं कोणाची झालेली आम्हीं कधीं पाहिली नाहीं व ऐकिलीहि नाहीं ! तेव्हां अर्जुनरथ अनेक तीक्ष्ण बाणांनीं भरगच्च भरलेला पाहून शेंकडो उल्कांनीं प्रदीप्त विमानच अंतरिक्षांतून खालीं भूतलावर उतरलें आहे, असा सर्वांस भास झाला ! नंतर त्या अर्जुनानें मेघानें जशी पर्वतावर वृष्टि करावी, त्याप्रमाणें

सन्नतपर्व बाणांची वृष्टि कौरवसैन्यावर केली ! त्यामुळें सर्वत्र पार्थनामांकित बाण पडून तुझ्या सेनेचा भयंकर नाश होऊं लागला. त्यावेळीं कौरवसैन्याचा नाश करणारा पार्थ हा सर्वांस अग्नीसारखा भासला ! त्या अर्जुनाकडून सुटलेले बाण हे त्या अग्नीच्या ज्वाला होत्या, धनुष्याचा शब्द हा तेथील सुटलेला वायु होता व कौरवसैन्य हें त्या अग्नीचें इंधन होतें ! अशा तुझ्या सैन्याचा अर्जुनानें संहार केला !

( २ ) राजा, त्यावेळीं रणांगणांत अर्जुनाच्या रथमार्गावर रथचक्रें, जोखडें, तूणीर, ध्वज, पताका, रथ, कुंडलें, त्याचप्रमाणें भुज, स्कंध, छत्रें, पंखे इत्यादिकांच्या राशी पडलेल्या दिसत होत्या ! तेव्हां भूमि मांसशोणितांनीं आच्छादित झाल्यामुळें ती स्पष्ट दिसत नव्हती ! तें स्थळ म्हणजे शंकराचें क्रीडास्थलच असल्याचा भास होत होता ! अर्जुनानें त्या युद्धांत दोन हजार रथ्यांचा संहार केला आणि अग्नि जसा सर्व चराचर विश्वाला जाळून टाकून विधूम झाल्यावर अत्यंत शोभिवंत दिसतो, तसा तो शोभूं लागला !

राजा धृतराष्ट्रा, अर्जुनाचा तो पराक्रम पाहून अनेक पताकांनीं सुशोभित रथांत बसून अश्वत्थामा त्यावर चालून आला आणि त्यानें अर्जुनाचें निवारण केलें ! मग त्या दोघां पुरुषश्रेष्ठ धनुर्धरांचें युद्ध जुंपलें ! परस्परांच्या वधाची इच्छा धरून ते एकमेकांवर धांवून गेले आणि त्या दोघांनीं अन्योन्यांवर एवढी दारुण बाणवृष्टि केली कीं ग्रीष्मर्तूच्या अंतीं जलवृष्टि करणाऱ्या महामेघांप्रमाणेंच ते भासले ! मत्त वृषभ आपल्या शृंगांनीं जसे परस्परांवर प्रहार करितात, त्याप्रमाणें परस्परांच्या स्पर्धेनें त्या दोघां वीरांनीं संनतपर्व बाणांनीं परस्परांवर मोठे आघात केले ! बराच वेळ त्या दोघांचें युद्ध बरोबरीनें झालें; दोघांचीं अस्त्रेंहि सारखींच घोर होतीं ! नंतर अश्वत्थाम्यानें दहा सुवर्णपुंख बाण अर्जुनावर आणि दहा बाण श्रीकृष्णावर सोडले ! तें पाहून अर्जुनाला मोठा आवेश उत्पन्न झाला ! अश्वत्थामा हा आपला गुरुपुत्र आहे अशा बुद्धीनें क्षणभर त्याविषयीं पूज्य बुद्धि दाखवून गांडीव धनुष्यानें त्यानें त्याजवर बाणवृष्टि केली आणि त्याला अश्वहीन, सारथिहिन व विरथ करून सोडलें ! तेव्हां अश्वत्थाम्यानें त्या भग्न रथावर उभें राहून एक लोहमय परिघतुल्य मुसळ अर्जुनावर फेंकलें ! त्या आपल्यावर येणाऱ्या हेमपट्टविभूषित मुसळाचे त्या शत्रुसंहारक अर्जुनानें बाण मारून सात तुकडे केले ! आपल्या मुसळाचे अर्जुनानें तुकडे केलेले पाहून त्या परमकोपी व

अस्त्रविशारद अश्वत्थाम्यानें महापर्वताच्या शिखराप्रमाणें एक परिघ त्या अर्जुनावर फेंकला ! अंतकाप्रमाणें क्षुब्ध त्या परिघाला पाहून अर्जुनानें पांच उत्तम बाण टाकून त्याचा संहार केला ! त्या महायुद्धांत पार्थबाणांनीं छिन्न झालेला तो परिघ पृथ्वीवर पडला, तेव्हां कौरवपक्षीय राजे लोकांचीं मनें विदीर्ण झालीं !

(३) राजा, नंतर अर्जुनानें आणखी दुसरे तीन भल्ल बाण त्या अश्वत्थाम्यावर टाकले; त्या योगानें तो अत्यंत विद्ध झाला ! तरी तो किमपिहि भयभीत न होतां आपल्याच पराक्रमावर अवलंबून स्वस्थपणें राहिला ! त्यानें सर्व क्षत्रियांसमक्ष महारथ सुरथावर बाण टाकून त्यास आच्छादून टाकिलें ! तें पाहून पांचालमहारथ सुरथ मेघगर्जनेप्रमाणें घोष करणाऱ्या रथांतून अश्वत्थाम्यावर चालून आला आणि त्यानें आपल्या भारक्षम दृढ धनुष्याच्या योगानें अग्नीप्रमाणें प्रदीप्त व सर्पसदृश भयंकर बाणांच्या वृष्टीनें त्या अश्वत्थाम्याला झांकलें ! तो क्रोधसंतप्त सुरथ शरवृष्टि करीत अश्वत्थाम्यावर चालून गेला, तेव्हां त्याला पाहून दंडहत नागाप्रमाणें अश्वत्थामा क्षुब्ध झाला आणि कपाळाला आंठ्या घालून व दांत-ओंठ चावून मोठ्या क्रोधानें सुरथाकडे न्याहाळून त्यानें आपल्या प्रत्यंचेवर हात फिरविला आणि यमदंडाप्रमाणें शोभणारा एक तीक्ष्ण नाराच बाण त्यावर सोडला ! तो बाण वेगानें त्या सुरथाचें हृदय विदीर्ण करून तत्काल पृथ्वींत शिरला ! नंतर वज्राहत पर्वतशिखराप्रमाणें तो सुरथ पृथ्वीवर कोसळून पडला !

राजा धृतराष्ट्रा, याप्रमाणें त्या प्रतापवान् अश्वत्थाम्यानें सुरथाचा वध केल्यावर तो त्याच रथावर आरूढ झाला आणि संशप्तकांनीं परिवेष्टित होऊन अर्जुनाशीं युद्ध करूं लागला. नंतर सूर्य मध्याह्नीं गेला असतां अर्जुनाचें शत्रूंशीं यमराष्ट्राची वृद्धि करणारें असें मोठें भयंकर युद्ध झालें ! त्यांत एकट्या अर्जुनानें एकाच वेळीं कौरवांच्या अनेक बलवान् योद्ध्यांशीं युद्ध केलें आणि त्या युद्धांत त्यानें जो अनेकांचा संहार केला तो पाहून आम्हांला मोठा चमत्कार वाटला ! पूर्वीं इंद्रानें दैत्यांच्या प्रचंड सेनेशीं युद्ध करून जसा त्यांचा संहार केला, तसाच त्या अर्जुनानें कौरवसैन्याचा संहार केला ! ९. १. १४.

---

## अध्याय १५ वा.

[ १ संकुलयुद्ध. ]

( १ ) **संजय**—राजा धृतराष्ट्रा, दुर्योधन आणि पार्षत धृष्टद्युम्न ह्यांचें अत्यंत भयंकर युद्ध सुरू होऊन त्यांत त्यांनीं परस्परांवर शर-शक्तींचा उपयोग केला ! तेव्हां वर्षाकालीं जशा पर्जन्यधारा सर्वत्र पडतात, तशा त्या दोघांच्या धनुष्यांपासून सहस्रावधि बाण पडूं लागले ! दुर्योधन राजानें त्या द्रोणघातक धृष्टद्युम्नावर पांच बाण मारून त्याला विद्ध केलें आणि पुनः त्यावर आणखी सात बाण मारले. नंतर बलवान् व दृढविक्रमी धृष्टद्युम्नानें सत्तर तीक्ष्ण बाण टाकून दुर्योधनाला विह्वल केलें ! दुर्योधन विह्वल झाल्याचें पाहून त्याचे बंधु मोठ्या सैन्यानिशीं येऊन त्यांनीं त्या धृष्टद्युम्नाला वेढिलें ! दुर्योधनबंधूंनीं अशारीतीनें त्या धृष्टद्युम्नास वेढिलें, तरी तो आपलें अस्त्रलाघव दाखवीत रणांत संचार करूं लागला ! तेव्हां शिखंडीनें प्रभद्रकांसह कृपाचार्य व कृतवर्मा या दोन धनुर्धरांशीं युद्ध आरंभिलें ! हे राजा, त्यावेळीं तें युद्ध अतिघोर झालें ! रणांगणावर आपले देह ठेवण्यास तयार झालेले ते वीर प्राण पणास लावून जणुंकाय द्यूतच खेळत आहेत, असें सर्वांस वाटलें ! शल्यानें सर्व दिशांना बाणांचा वर्षाव सुरू करून सात्यकि व वृकोदर यांसह सर्व पांडवांना अत्यंत पीडित केलें आणि त्या रणांगणावर यमाप्रमाणें मोठा पराक्रम गाजविण्याऱ्या नकुल-सहदेवांशींहि मोठ्या वीर्यानें आणि अस्त्रबलानें युद्ध केलें !

त्या महायुद्धांत शल्यानें बाणप्रहारांनीं पांडवांस इतकें जर्जर करून सोडलें कीं त्यांस कोणीहि त्राता तेथें सांपडला नाहीं ! त्या शल्यानें अशाप्रकारें धर्मराजास पीडित केलें असतां तो शूर नकुल आपल्या मातुलावर धांवून गेला. नकुलानें हंसतहंसतच शल्यावर दहा बाण मारून त्याला वक्षःस्थळीं विद्ध केलें ! त्यामुळें शल्य अतिपीडित झाला ! आपल्या भाच्यानें आपणाला विद्ध केल्याचें पाहून शल्यानें नतपर्व बाणांनीं त्या नकुलास जर्जर केलें. नंतर राजा युधिष्ठिर, भीमसेन, सात्यकि आणि सहदेव रथस्वनानें सर्व दिशा व्याप्त करून शल्यावर धांवून आले, परंतु ते आपल्यावर चाल करीत येत असल्याचें पाहतांच शल्य त्यांवर उलट चालून गेला आणि त्यानें युधिष्ठिरावर तीन, भीमसेनावर पांच, सात्यकीवर शंभर आणि सहदेवावर तीन बाण टाकले आणि एका क्षुरप्र बाणानें नकुलाचें धनुष्य व चाप हीं छिन्न केलीं ! याप्रमाणें शल्याच्या बाणांनीं

नकुलाचें धनुष्य छिन्न झालें असतां त्यानें दुसरें धनुष्य घेतलें आणि तो महारथ माद्रीपुत्र शल्याच्या रथावर बाण टाकूं लागला! धर्मपुत्र युधिष्ठिरानें आणि सहदेवानें दहा-दहा बाण शल्याच्या वक्षःस्थलीं मारले! त्याप्रमाणें भीमसेनानें साठ आणि सात्यकीनें दहा कंकपत्र बाण त्या मद्रराजावर टाकले! तेव्हां मद्रराज क्रुद्ध होऊन त्यानें सात्यकीवर एकूणऐशीं नतपर्व बाण टाकून त्याचें धनुष्य व बाण हीं छिन्न केलीं आणि त्याच्या चारहि अश्वांना यमलोकीं पाठविलें! मग त्या विरथ सात्यकीवर महारथ शल्यानें चोहों बाजूंनीं शंभर बाण मारून त्याला विद्ध केलें आणि तसेंच त्या क्षुब्ध झालेल्या नकुल-सहदेवांवर, भीमसेनावर आणि युधिष्ठिरावरहि प्रत्येकीं दहा बाण टाकून त्यांस विद्ध केलें! यावेळीं सर्व पांडव एकत्र असतांहि शल्यावर जाऊं शकले नाहींत, हें शल्याचें अपूर्व शौर्य पाहून आम्ही आश्चर्यचकित झालों!

राजा, नंतर तो सत्यविक्रम सात्यकि दुसऱ्या रथांत जाऊन बसला. पीडित झालेले पांडव शल्याच्या हातांत सांपडल्याचें पाहून तो शल्यावर धांवून गेला. सात्यकि आपल्यावर येत असल्याचें पाहून त्या रणशोभी शल्यानें आपला रथ सात्यकीवर घातला. मग उन्मत्त गजांप्रमाणें त्या दोघां वीरांचा आश्चर्यकारक संग्राम झाला. त्यावेळीं सर्वांस शंबर आणि इंद्रच युद्ध करीत आहेत, असा भास झाला! सात्यकीनें आपल्यापुढें तो मद्रराज शल्य उभा असल्याचें पाहून वेगानें त्यावर दहा बाण टाकले आणि 'शल्या, थांब, थांब,' म्हणून मोठ्यानें आरोळी ठोकली! इकडे शल्यानेंहि तीक्ष्ण चित्रपुंख बाणांचा सात्यकीवर वर्षाव करून त्याला विद्ध केलें. अशा रीतीनें कुरु-पांडवांचें भयंकर युद्ध पुनः सुरू झालें आणि भीमादि पांडववीर हे शल्याचा वध करण्याचा निश्चय करून तत्काळ त्याजवर धांवून गेले. नंतर तेथें तुमुल रणसंग्राम होऊन त्यांत रक्ताचे पूर वाहूं लागले! मोठमोठ्यानें गर्जना करून ते परस्परांशीं युद्ध करूं लागले, तेव्हां आमिषप्राप्त्यर्थ दोन सिंहच एकमेकांशीं युद्ध करीत आहेत, असें सर्वांस वाटलें!

राजा, त्यावेळीं त्यांनीं सोडलेल्या बाणांनीं सर्व भूमि व्याप्त होऊन अंतरिक्षहि बाणमय झालें. त्यामुळें जिकडेतिकडे अंधार पडला आणि सर्वत्र बाण पसरल्यामुळें ते कात टाकलेले पन्नगच होत, असा भास झाला. रणांगणांत त्या एकट्या शूर शल्यानें अनेकांशीं युद्ध केलें आणि आपल्या भुजवीर्यानें टाकलेल्या

अनेक बाणांनीं पृथ्वी आच्छादित केली. राजा, पूर्वी देवासुरांच्या युद्धप्रसंगीं असुरांचा नाश होऊन जसा इंद्ररथ अत्यंत देदीप्यमान दिसत होता, तसाच यावेळींहि शल्याचा रथ समरभूमीवर संचार करतांना दिसूं लागला. ९. १. १५.

---

## अध्याय १६ वा.

[ १ संकुलयुद्ध. २ शल्य-युधिष्ठिरयुद्ध. ३ शल्यपराभव. ]

( १ ) संजय—राजा, तेव्हां तुझीं सैन्यें मद्रराज शल्याला पुढाकार देऊन मोठ्या वेगानें पांडवांवर धांवून गेलीं. रणोत्सुक होऊन धांवणाऱ्या कौरवांनीं पांडवांवर चाल केली, तेव्हां त्यांची संख्या पांडवांपेक्षां अधिक असल्यामुळें अर्थातच पांडवांचा संहार झाला! भीमानें त्यांचें निवारण करण्याचा प्रयत्न केला, तरी त्या पांडवांनीं कृष्णार्जुनांच्या समक्ष रणांतून पळ काढला. तें पाहून अर्जुन क्षुब्ध झाला आणि त्यानें कृपाचार्य, कृतवर्मा आणि त्यांचे अनुचर यांजवर बाणवर्षाव करून त्यांस आच्छादित केलें. तसेंच सहदेवानेंहि शकुनीला बाणांनीं ससैन्य आच्छादून टाकिलें. इतक्यांत नकुलानें पार्श्वभागीं उभें राहून शल्याचें निरीक्षण केलें. द्रौपदेयांनीं अनेक भूपालांचें निवारण केलें, शिखंडीनें अश्वत्थाम्याला अडवून धरिलें, गदापाणि भीमसेनानें दुर्योधनाचा निरोध केला आणि युधिष्ठिरानें शल्य आणि त्याचें सैन्य ह्यांचें निवारण केलें. नंतर त्या कौरव-पांडव योद्ध्यांचें ठिकठिकाणीं युद्ध प्रवृत्त झालें!

( २ ) राजा, जेव्हां शल्य युधिष्ठिराच्या समीप दिसला, तेव्हां चंद्राच्या जवळ शनैश्चरच असल्याचा भास झाला. सर्पसदृश भयंकर बाणांनीं युधिष्ठिराला व्यथित करून त्या शल्यानें भीमसेनावर बाणवृष्टि करून त्याला झांकून काढिलें. शल्याचें तें हस्तलाघव आणि त्याची अस्त्रविद्याकुशलता पाहून तुझ्या आणि पांडवांच्या सैनिकांनींहि त्याचा मोठा गौरव केला. शल्यानें पांडवांना इतकें विद्ध करून सोडलें कीं, युधिष्ठिर आक्रोश करून त्यांचें निवारण करीत असतांहि त्याला सोडून ते पळून गेले. त्या शल्यानें याप्रमाणें पांडवसैन्याची दुर्दशा केल्यावर युधिष्ठिरानें क्रोधाविष्ट होऊन मोठ्या शौर्यानें त्या शल्यावर घोर बाणवृष्टि केली. त्यावेळीं ‘ आपला जय होवो अथवा वध होवो’ अशा दृढनिश्चयानें त्या महारथ धर्मराजानें आपले सर्व बंधु आणि कृष्ण यांस बोलावून आणलें आणि म्हटलें कीं, “वीरहो, भीष्म, द्रोण व कर्ण, तसेच कौरवांच्या अर्थप्राप्त्यर्थ सर्व पराक्रमी

भूपाल आज रणांत पतन पावले आहेत. तुम्हीं सर्वांनीं तुम्हांस नेमून दिलेलीं कामें यथाशक्ति केलीं आहेत. ह्या शल्याचा वध करणें हें एकच काम अवशिष्ट राहिलें आहे. हें काम मीं स्वतः करण्याचें योजिलें आहे. म्हणून मी आज रणांगणांत त्या शल्याला जिंकण्याची इच्छा करीत आहें. तरी माझ्या मनांत जें आहे तें मी तुम्हांला सांगतों. हे माद्रीसुत माझ्या रथचक्रांचें रक्षण करोत. हे इंद्रालाहि अजेय आणि रणांत शूरसंमत आहेत, तसेंच हे धर्माला अनुसरून मातुलाशीं युद्ध करण्यास योग्य आहेत, म्हणून या सत्यप्रतिज्ञ व मानार्ह योद्ध्यांनीं मजकरितां युद्ध करावें. आज रणांत शल्य माझा वध करील किंवा मी त्याचा वध करीन. तुमचें कल्याण होवो! लोकवीरहो, हें माझें सत्यभाषण श्रवण करा! पार्थिवांनो, आज मी माझ्या मातुलाशीं क्षात्रधर्माला अनुसरून युद्ध करीन. शल्य हा माझा अंश आहे, तरी त्याला मारून मी विजयी होईन अथवा मरून तरी जाईन. आतां रथयोजकांनीं युद्धशास्त्रानुसार माझ्या रथावर शल्याच्या रथांतील शस्त्रास्त्रांपेक्षां अधिक शस्त्रास्त्रें व उपकरणें यांचा पुरवठा करावा. शैनेयानें माझ्या दक्षिण रथचक्राचें रक्षण करावें व धृष्टद्युम्नानें माझें उत्तर रथचक्र राखावें. तसेंच धनंजयानें माझें पृष्ठरक्षक व्हावें आणि माझ्या अग्रभागीं शस्त्रधराग्रणी भीमसेनानें असावें. असें झालें असतां मी या महायुद्धांत शल्यापेक्षां अधिक पराक्रम करून दाखवीन!"

राजा धृतराष्ट्रा, अशाप्रकारें धर्मराजानें सांगतांच त्याचें प्रिय करण्यांत सर्वदा तत्पर अशा वीरांनीं त्याच्या सांगण्याप्रमाणें सर्व केलें. नंतर त्या पांडवसैन्यांत आणि विशेषेंकरून पांचाल, सोमक आणि मत्स्य यांमध्यें एकच आनंदीआनंद होऊन राहिला! राजा, धर्मराज त्या मद्रपति शल्यावर धांवून गेला, तेव्हां पांचालांनीं शतावधि शंख आणि भेरी वाजवून मोठमोठ्यानें सिंहनाद केले! मग ते सर्व त्या शूर व वेगवान् मद्राधीशावर तुटून पडले. राजा, असें तें पांडवसैन्य कौरवांवर चालून गेलें असतां त्या कौरवांनाहि मोठा हर्ष वाटला. मग मोठमोठ्या कौरववीरांच्या हर्षनादानें, गजसमूहांच्या निनादानें, शंखांच्या ध्वनीनें आणि रणवाद्यांच्या आवाजानें सर्व पृथ्वी दणाणून गेली. नंतर तुझा पुत्र आणि वीर्यवान् शल्य हे पांडवांवर धांवून गेले आणि मोठमोठे मेघ चालून आले तरी अस्तोदयपर्वत गडबडून न जातां जसे स्थिर राहतात, त्याप्रमाणें त्यांनीं पांडवसैन्याची किमपिहि भीति बाळगली नाहीं. मग त्या रणश्लाघी शल्यानें, इंद्रानें शंबरावर जशी बाणवृष्टि केली, तशी त्या धर्मराजावर केली.

युधिष्ठिरानें रुचिर धनुष्य धारण करून द्रोणाचार्यांनीं शिकविलेलीं विविध अस्त्रें प्रकट केलीं! त्यानें शल्यावर एकसारखे बाण सोडले. धर्मराज रणांत संचार करीत असतां त्याच्यामध्यें कांहीं न्यून असल्याचें कोणाला आढळून आलें नाहीं. त्या दोघांहि महावीरांनीं अनेक जातींच्या बाणांची परस्परांवर वृष्टि करून अन्योन्यांना विद्ध केलें. त्यावेळीं ते दोन शार्दूलच आमिषाकरितां परस्परांशीं युद्ध करीत आहेत असें सर्वांस वाटलें!

राजा, त्या भयंकर महायुद्धांत भीमसेनानें तुझ्या पुत्रावर चालून येऊन युद्धास प्रारंभ केला. तसेंच धृष्टद्युम्न, सात्यकि, नकुल आणि सहदेव यांनींहि समंततः असलेल्या शकुनिप्रमुख वीरांवर चाल केली. नंतर पुनः त्या जयाभिलाषी वीरांमध्यें तुमुल युद्ध सुरू झालें. राजा, ह्या सर्व अनर्थास कारण तुझाच दुर्मंत्र होय.

राजा धृतराष्ट्रा, इकडे दुर्योधनानें एक नतपर्व बाण टाकून भीमसेनाचा सुवर्णभूषित ध्वज छेदून टाकिला. सभोंवतीं घागऱ्या लावून सुशोभित केलेला तो मोहक ध्वज भीमसेनासमक्ष रणभूमीवर कोसळून पडला. दुर्योधनानें पुनः भीमसेनावर एक तीक्ष्ण धारेचा क्षुर बाण टाकिला आणि त्याचें गजशुंडेसमान विचित्र धनुष्य छेदिलें. भीम त्यामुळें क्रोधसंतप्त झालेल्या त्या धनुष्यहीन भीमानें मोठ्या आवेशानें रथशक्ति तुझ्या पुत्रावर सोडली आणि त्याचें हृदय विदीर्ण केलें, तेव्हां तो दुर्योधन एकाएकीं रथोपस्थावर ( वीरासनावर ) बसला आणि मूर्च्छित झाला! दुसरा एक क्षुरप्र बाण भीमसेनानें घेऊन तो दुर्योधनाच्या सारथ्यावर तत्काल सोडला व त्याचें मस्तक उडविलें. सारथि हत होतांच त्या रथाचे अश्व उधळून गेले आणि त्यांनीं वाटेल तिकडे तो रथ नेला. तेव्हां कौरवसैन्यांत मोठा हाहाकार उडाला. त्यावेळीं दुर्योधनाच्या रक्षणाकरितां अश्वत्थामा धांवून आला; तसाच कृप आणि कृतवर्मा हेहि आले. कौरवसेनेचा भीमानें केलेला पराभव पाहून दुर्योधनाचे अनुयायी अत्यंत त्रस्त होऊन गेले. इतक्यांत त्या गांडीवधारी अर्जुनानें आपलें धनुष्य खेंचून त्या कृपादिकांस बाणांनीं विद्ध केलें. युधिष्ठिरहि संतप्त होऊन आपल्या रथाचे श्वेतवर्ण अश्व हांकीत त्या मद्राधीशावर धांवून आला!

राजा, त्या कुंतीपुत्र युधिष्ठिराच्या ठिकाणीं मला एक आश्चर्यकारक गोष्ट दिसून आली. ती ही कीं, पूर्वीं जो मोठा मृदु आणि दमनशील म्हणून

सर्वत्र ख्यात होता, तो महासात्त्विक युधिष्ठिर एकाएकीं क्षुब्ध झाला. तो क्रोधानें थरथर कांपत होता. त्यानें शल्याकडे डोळे वटारून पाहिलें. राजा, धर्मराजानें कौरवसेनेवर एकसारखा तीक्ष्ण बाणांचा वर्षाव केला आणि कौरवांचे हजारों वीर त्यानें यमसदनीं पाठविले! धर्मराजानें ज्या ज्या सेनेवर चाल केली, त्या त्या सेनेला वज्रप्रहारानें जसें पर्वतांना पाडावें, त्याप्रमाणें बाणवर्षाव करून त्यानें वधिलें! त्यानें अश्व, सारथि, ध्वज आणि रथ ह्यांसह अनेक रथ्यांचा संहार केला आणि पवन जसा मेघांशीं क्रीडा करितो, त्याप्रमाणें तो कौरवसेनेशीं क्रीडाच करीत आहे, असा सर्वांस भास झाला. प्रलयकालीं रुद्र क्रोधाविष्ट होऊन पशूंचा संहार करितो, त्याप्रमाणें धर्मराज अश्वसादींसह अश्वांचा व सहस्रावधि पदातींचा रणांगणीं वध करून सर्वत्र बाणवर्षाव करूं लागला. अशा रीतीनें सर्व रणभूमि शून्य करून तो शल्यावर धांवून गेला व 'शल्या, थांब, थांब,' असें त्यास म्हणाला. रणभूमीवर धर्मराजाचा तो भीमपराक्रम पाहून तुझे सर्व वीर भयभीत होऊन गेले. एकटा शल्य मात्र धर्मावर धांवून गेला. नंतर ते उभय वीर अत्यंत क्षुब्ध झाले, त्यांनीं शंख वाजविले आणि परस्परांना हाका मारून एकमेकांची निर्भर्त्सना करण्यास आरंभ केला. तेव्हां शल्य व युधिष्ठिर हे दोघे बाणवृष्टि करून परस्परांना पीडा देऊं लागले. उभयतांच्या देहांतून रक्तस्राव होऊं लागला आणि वसंतऋतूंत किंशुक वृक्ष प्रफुल्लित होऊन जसे आरक्त दिसतात, तद्वत् ते दिसूं लागले. ते उभय वीर प्राणांचा पण लावून युद्ध करीत होते; त्या दोहोंपैकीं कोणाचा जय होणार ह्यासंबंधीं निश्चितपणें सांगण्यास कोणीहि समर्थ नव्हता. कोणी म्हणत 'आज रणांगणावर शल्याचा वध धर्मराज करून सर्व पृथ्वीचें राज्य मिळवील,' तर दुसऱ्यानें म्हणावें कीं, 'शल्य युधिष्ठिरादिकांचा वध करून आज सर्व पृथ्वीचें राज्य संपादन करील!' अशा दोन्ही प्रकारचीं अनुमानें त्यावेळीं सैन्यांत निघत होतीं.

(२) अशाप्रकारें त्या उभय वीरांचें युद्ध चाललें असतां धर्मराजानें आपलें सैन्य उजवीकडे नेलें. मग शल्यानें युधिष्ठिरावर शंभर बाण मारले आणि एका बाणानें त्याचें धनुष्यहि भंगून टाकलें! तेव्हां युधिष्ठिरानें दुसरें धनुष्य धारण केलें आणि शल्यावर तीनशें बाण मारले आणि एका क्षुर बाणानें त्याच्या धनुष्याचा भंग केला. त्यानें नतपर्व बाणांनीं शल्याचे चारहि अश्व वधिले आणि दोन तीक्ष्णाग्र बाणांनीं त्याचे पार्ष्णिसारथ्यांचा वध केला! नंतर धर्मराजानें एक

पीतवर्ण, तीक्ष्ण व प्रज्वलित भव्य बाण घेऊन अग्रभागीं असलेला शल्याचा ध्वज भग्न केला. हे अरिंदमा, नंतर तें सर्व कौरवसैन्य भंग पावून पळूं लागलें. तशा दुर्धर स्थितींत असलेल्या मद्राधिपतीला आपल्या रथांत घेऊन अश्वत्थामा मोठ्या त्वरेनें निघून गेला. याप्रमाणें शल्याचा पराभव होऊन द्रोणपुत्र त्याला घेऊन जात असतां युधिष्ठिरानें मोठ्यानें गर्जना केली. तें पाहून शल्य हंसला आणि दुसऱ्या रथांत जाऊन बसला. त्या रथावर शस्त्रास्त्रांची व उपकरणांची उत्तम सिद्धता केली होती. त्याचे अश्व शुभ्रवर्ण होते आणि त्याचा घोष मेघाप्रमाणें होता; तो पाहून शत्रूंच्या अंगावर कांटा उभा रहात असे ! ९. १. १६.

---

## अध्याय १७ वा.

[ १ शल्यवध. ]

( १ ) संजय—राजा, नंतर त्या बलवान् शल्यानें पहिल्यापेक्षां अधिक वेगवान् असें दुसरें धनुष्य घेतलें आणि युधिष्ठिराला विद्ध करून त्यानें सिंहासारखी गर्जना केली ! त्यावेळीं त्यानें युधिष्ठिरावर पर्जन्यासारखी बाणवृष्टि केली. त्यानें सात्यकीवर दहा आणि भीमसेन व सहदेव यांवर प्रत्येकीं तीन बाण मारले. तसेंच युधिष्ठिरावर बाणवृष्टि करून, उल्कांच्या वृष्टीनें जसें गजांना त्रस्त करावें, तसें त्याला पीडित केलें. जे कोणी दुसरे महाधनुर्धर त्याच्याशीं युद्ध करीत होते, त्या सर्वांना त्यांचे अश्व आणि रथकूबर यांसुद्धां मद्रपतीनें बाणवर्षाव करून पीडित केलें. त्यांचे ध्वजांचा छेद केला आणि मोठा संहार करून यज्ञवेदी दर्भांनीं आच्छादित करावी, त्याप्रमाणें सर्व पृथ्वी वीरांनीं आच्छादित केली. अंतकाप्रमाणें शत्रुसैन्याचा वध करणाऱ्या त्या शल्याला पाहून पांडव, पांचाल आणि सोमक ह्यांनीं अत्यंत क्रोधाविष्ट होऊन त्याला वेढिलें. इतक्यांत भीमसेन, सात्यकि व नकुल-सहदेव हे धर्मराजाशीं युद्ध करणाऱ्या त्या शल्यावर चाल करून गेले आणि त्यांनीं एकमेकांस युद्धार्थ आह्वान केलें !

हे राजा, नंतर पांडवांकडील वीरांनीं त्या मद्राधिपति शल्याला वेढा घातला आणि उग्र वेगाचे बाणांची त्यावर सतत वृष्टि केली. त्यावेळीं धर्मराजाचें रक्षण भीमसेन, माद्रीपुत्र नकुल-सहदेव आणि श्रीकृष्ण हे करीत होते. युधिष्ठिरानें शल्याच्या उरःस्थलावर उग्र बाण मारून त्याला अगदीं विह्वल करून सोडलें.

शल्य बाणविह्वल झाल्याचें पाहून तुझे प्रमुख वीर दुर्योधनाच्या आज्ञेनें पुढें सरसावले व शल्यासभोंवतीं उभे राहिले! नंतर त्या मद्राधीशानें युधिष्ठिरावर सात बाण मारले. युधिष्ठिरानेंहि त्या शल्यावर उलट नऊ बाण टाकिले; मग त्या दोघांहि वीरांनीं आकर्ण धनुष्य ओढून तीक्ष्ण बाणांची वृष्टि एकमेकांवर केली आणि दोघेहि परस्परांचें न्यून पाहूं लागले. ते दोघे वीर एकमेकांवर बाणवर्षाव करीत असतां त्यांच्या प्रत्यंचांचा निनाद इंद्रवज्राच्या ध्वनीसारखा होत होता. उभय वीर एकमेकांवर शरवृष्टि करीत तेव्हां त्यांच्या धनुष्यांचा टणत्कार ऐकून महेंद्राच्या वज्राचाच ध्वनि होत आहे, असें वाटत होतें. युधिष्ठिर आणि शल्य हे परस्परांवर धांवून जात, तेव्हां वनांत आमिषाकरितां दोन व्याघ्रशिशुच भांडत आहेत असें वाटत होतें!

राजा धृतराष्ट्रा, तेव्हां त्या महात्म्या शल्यानें युधिष्ठिराच्या हृदयप्रदेशीं सूर्याग्नींसमान एक प्रज्वलित बाण असा मारला कीं, त्यायोगें तो युधिष्ठिर अतिविद्ध झाला; मग धर्मराजानें उलट शल्यावर अचूक बाण मारून त्याला मूर्च्छित केलें, त्यामुळें त्याला मोठा आनंद झाला. थोड्या वेळानें शल्य सावध झाला आणि क्रोधानें लाल डोळे करून त्या महेंद्रतुल्य पराक्रमी वीरानें युधिष्ठिरावर शंभर बाण मारिले. त्यावर धर्मराजानें शल्यावर नऊ बाण सोडून त्याचें वक्षःस्थळ विदीर्ण केलें आणि दुसऱ्या सहा बाणांनीं त्याचें सौवर्ण कवच भिन्न केलें. तेव्हां शल्यानें दोन बाण त्या युधिष्ठिरावर टाकून त्याचें धनुष्य तोडिलें. नंतर युधिष्ठिरानें अधिक भयंकर असें दुसरें धनुष्य घेतलें आणि नमुचीवर इंद्रानें जसे तीक्ष्ण शर सोडून त्याला विह्वल केलें त्याप्रमाणें बाणवृष्टि करून त्या शल्याला विद्ध केलें! त्यावर शल्यानें नऊ बाण टाकून धर्मराज व भीमसेन यांचीं सुवर्णमय चर्में (ढाली) छिन्न करून टाकलीं आणि त्यांचे भुजहि विदीर्ण केले. त्या शल्यानें पुनः एकदां अग्नि व सूर्य यांप्रमाणें उज्ज्वल असा एक क्षुर बाण टाकून धर्माचें धनुष्य छेदून टाकिले. इतक्यांत कृपाचार्यानें धर्माच्या सारथ्यावर सहा बाण टाकिले त्यामुळें तो रणांत अग्रभागीं पडला! शल्यानें पुनः युधिष्ठिरावर चार बाण सोडून त्याच्या चारहि अश्वांचा वध केला आणि धर्मराजाच्या वीरांचा बराच मोठा क्षय केला!

राजा, इकडे महात्म्या भीमसेनानें एक वेगवान् बाण टाकून त्या मद्राधिपाचें धनुष्य छेदून टाकिलें आणि दोन बाणांनीं त्याला अतिविद्ध केलें! दुसरा

एक बाण टाकून शल्याच्या सारथ्याचा वध केला आणि क्रोधाविष्ट होऊन त्यानें त्याचे चारहि अश्वांना यमसदनीं पाठविलें ! सर्वधनुर्धरश्रेष्ठ भीमसेनानें रणांगणावर वेगानें संचार करणाऱ्या त्या शल्यावर अशाप्रकारें शंभर बाण टाकले ! माद्रीपुत्र सहदेवानेंहि त्याच्यावर तशीच बाणवृष्टि करून त्याला मूर्च्छित केलें ! मद्राधिपति मूर्च्छित झाल्याचें पाहून भीमानें आणखी एका बाणानें त्याचें चर्म (ढाल) छिन्न केलें ! थोड्या वेळानें शल्य सावध होऊन आपलें चर्म भग्न झाल्याचें पाहून त्यानें दुसरें बळकट चर्म व खड्ग धारण केलें. नंतर त्या शल्यानें रथांतून उतरून नकुलाच्या ईषेचा भंग केला आणि मग तो युधिष्ठिरावर धांवून गेला ! अंतकाप्रमाणें क्रुद्ध होऊन चाल करून येणाऱ्या त्या शल्याला धृष्टद्युम्न, द्रौपदीपुत्र, शिखंडी आणि सात्यकि यांनीं वेढिलें; नंतर भीमसेनानें नऊ बाण मारून त्याच्या अप्रतिम चर्माचा भंग केला आणि भल्ल बाणांनीं त्याचें खड्गहि मुष्टिप्रदेशीं छिन्न केलें. त्यासमयीं भीमसेन सैन्यांत प्रहृष्ट मनानें गर्जना करूं लागला !

राजा धृतराष्ट्रा, भीमसेनाचा तो पराक्रम पाहून पांडवांच्या रथिश्रेष्ठांना मोठा आनंद झाला. ते हर्षभरानें मोठ्या गर्जना करूं लागले आणि चंद्रासारखे शुभ्र शंख वाजवूं लागले. तो भयंकर शब्द ऐकून तें कौरवांचें सैन्य भयभीत झालें आणि आपण कोठें आहों हेंहि त्या सैनिकांस समजेना. त्यांचें अंग रक्तलिप्त होऊन ते अतिखिन्न झाले आणि त्यांना मूर्च्छा आली. नंतर भीमसेनादि मुख्यमुख्य पांडववीरांनीं शल्यावर बाणवृष्टि केली; तेव्हां मृगासाठीं सिंह जसा धांवून येतो, त्याप्रमाणें युधिष्ठिराच्या वधासाठीं शल्य त्यावर धांवून आला आणि त्यानें त्याचे अश्व व सारथि यांचा वध केला ! धर्मराज अश्वहीन व सारथिहीन झाल्यावर त्याचा क्रोध अग्नीप्रमाणें भडकला आणि मोठ्या आवेशानें त्या मद्राधिप अरीवर धांवून गेला. श्रीकृष्णाच्या भाषणाचें स्मरण त्याला झालें व त्यानें शल्याचा वध करण्याचें मनांत योजिलें. नंतर तो आपल्या अश्वहीन रथावर उभा राहिला आणि त्यांतील शक्ति शल्यावर सोडण्याचें त्यानें मनांत आणिलें. शल्याचा पराक्रम लक्षांत आणून, तसेंच त्याच्या वधाचा भार आपण घेतला असून आपल्या हातून तें कार्य अजून घडलें नाहीं, ह्याचा विचार करून कृष्णाच्या वचनाप्रमाणें त्यानें शल्याचा वध करण्याचा दृढनिश्चय केला. नंतर त्या युधिष्ठिरानें कांचनप्रभ शक्ति घेतली आणि क्रोधानें आपल्या दीप्त नेत्रांनीं त्या शल्याचें निरीक्षण केलें !

राजा, याप्रमाणें त्या पूतात्म व पापरहित धर्मराजानें शल्यावर नजर टाकतांच तो कुरुसेनापति भस्म होऊन कसा गेला नाहीं, त्याचें मला मोठें आश्चर्य वाटलें. नंतर युधिष्ठिरानें ती प्रदीप्त शक्ति मोठ्या वेगानें शल्यावर सोडली. युधिष्ठिरानें ती शक्ति सोडतांच तिच्यांतून ठिणग्या पडूं लागल्या; तें पाहून सर्व कौरवांना प्रलयकाल होऊन आकाशांतून उल्काच पडत आहेत असा भास झाला. धर्मराजानें ती सोडलेली शक्ति म्हणजे प्रत्यक्ष पाशहस्ती कालरात्रि किंवा उग्ररूप यमाची ती धात्रीच होय असें सर्वांस वाटलें. अशी ती ब्रह्मदंडाप्रमाणें अमोघवीर्य शक्ति युधिष्ठिरानें शल्यावर सोडली. गंध, माला, अग्र्यासन इत्यादिकांनीं सर्व पांडव त्या शक्तीची पूजा करीत असत. तिची शक्ति प्रलयकालीन सांवर्तिक अग्नीप्रमाणें असून अथर्वांगिरसी कृत्येप्रमाणें तिचें रूप भयंकर होतें! ती शंकराकरितां ब्रह्मदेवानें निर्माण केली असून शत्रूचे प्राण आणि देह हें तिचें भक्ष्य होतें! पंचमहाभूतांचा नाश करण्याची तिच्या अंगीं शक्ति होती. तिला घंटा आणि पताका लावल्या असून तिजवर मणि, हिरे, वैडूर्य इत्यादिकांचें काम केलें होतें. तिला सुवर्णदंड होता; ब्रह्मदेवानें मोठ्या प्रयत्नानें ती निर्माण केली असून ब्रह्मद्वेष्ट्यांचा नाश करणारी ती अमोघशक्ति होती!

राजा, अशा त्या शक्तीवर धर्मराजानें घोर मंत्रांनीं आवाहन करून आपल्या बलप्रयत्नांनीं तिजमध्यें वेग उत्पन्न केला आणि त्यानें ती मद्राधीश शल्याच्या वधाकरितां अंतरिक्षांत सोडली! त्यावेळीं 'हे पाप्या, तूं आतां मेलास,' अशी मोठी गर्जना त्या धर्मराजानें केली आणि पूर्वीं अंधकासुरावर प्राणहारक बाण सोडून शंकर जसा नाचला, तसा तो नाचूं लागला! धर्मराजानें ती शक्ति शल्यावर सोडली, तेव्हां होमाग्नि जसा हुत केलेल्या आज्यधारेचें ग्रहण करण्यास सिद्ध होतो, त्याप्रमाणें तो शल्यहि त्या शक्तीचें ग्रहण करण्यास सिद्ध होऊन गर्जना करूं लागला! त्या शक्तीनें शल्याच्या सर्व मर्मस्थळांचा भेद केला. त्याच्या शुभ्र व विशाल उरःस्थळाचा भेद करून ती बाहेर पडली आणि शल्याचें विशाल यश दग्ध करीत भूगह्वरांत शिरली! त्यावेळीं शल्याचें नाक, नेत्र, कर्ण आणि मुख ह्यांतून आणि त्याच्या शरीरावरील व्रणांतून सारखा रक्तस्राव होऊं लागला आणि त्यामुळें त्याचीं सर्व गात्रें रुधिरदिग्ध झालीं. तेव्हां तो शल्य स्कंदानें विदीर्ण केलेल्या क्रौंचपर्वताप्रमाणें दिसूं लागला. तो विशालदेही शल्य अंगांतील कवच छिन्न होऊन

वज्रहत पर्वतशृंगाप्रमाणें बाहु पसरून धर्माच्या अग्रभागीं रथांतून पडला ! सर्व गात्रें छिन्न होऊन तो रक्तदिग्ध शल्य भूमीवर पतन पावला, तेव्हां क्रीडोत्सुक भर्त्याची स्त्री जसें त्याचें मोठ्या प्रेमानें स्वागत करते, त्याप्रमाणें त्या मद्रपतीच्या पत्नीनें–वसुमतीनें–त्याचें आदरपूर्वक स्वागत केलें ! नंतर चिरकाल त्या वसुंधरेचा उपभोग घेऊन व सर्व अंगांनीं आलिंगन देऊन तो शल्य प्रसुप्त झाला असें भासलें !

राजा, याप्रमाणें धर्मराजानें शल्याचा वध केला, तेव्हां विधिपूर्वक हवन केलेला अध्वराग्निच शांत झाला असें वाटलें ! शल्याचें हृदय धर्माच्या शक्तीनें भग्न झालें, त्याचीं आयुधें व ध्वज हीं नष्ट झालीं आणि शेवटीं तो मृत होऊन पडला, तरी त्याच्या शरीरावरील कांति लुप्त झाली नाहीं. शल्यवधानंतर धर्मराजानें इंद्रधनुष्याप्रमाणें दुसरें धनुष्य घेतलें आणि मग गरुड जसा सर्पांचा संहार करितो, तसा त्यानें क्षणांत शत्रूंचा संहार केला ! धर्मराजाच्या बाणांनीं तुझे सर्व सैनिक व्याप्त झाले आणि डोळे मिटून परस्परांशीं युद्ध करूं लागले, तेव्हां त्यांच्या शरीरांतून रक्ताचे प्रवाह सुरू झाले, त्यांचीं सर्व आयुधें नष्ट झालीं आणि शेवटीं ते जीवितालाहि मुकले !

राजा, मद्रपति शल्याचा वध झाला असतां त्याचा धाकटा बंधु धर्मावर त्वरित चालून आला. तो तरुण रथी युद्धविद्येमध्यें आपल्या बंधूप्रमाणेंच मोठा कुशल होता. त्या नरश्रेष्ठानें नाराच बाणांची धर्मावर सारखी वृष्टि करून बंधुऋणांतून मुक्त होण्याचा पुष्कळ यत्न केला, परंतु धर्मानें सहा बाण मारून त्याला विद्ध केलें, त्याचें धनुष्य आणि ध्वज यांचा दोन क्षुर बाणांनीं संहार केला आणि एका सुदृढ व देदीप्यमान बाणानें त्याचें मस्तक उडविलें ! तें कुंडलविभूषित शरीर पुण्यक्षय होऊन स्वर्गसुखाला भ्रष्ट झाल्याप्रमाणें रथांतून खालीं पडलें. त्याचें रुधिरदिग्ध शरीर रणांगणांत पतन पावल्याचें पाहून कौरवसैन्य हाहाकार करीत पळत सुटलें. शल्यानुजाचा वध झालेला पाहून तुझे सैनिक पांडवांच्या भीतीनें अगदीं मृतवत् होऊन जमिनीवर धुळींत पडले कौरवसैन्य भयानें पळून जात असतां बाणांचा वर्षाव करीत सात्यकि त्यावर चालून आला तों हार्दिक्य कृतवर्म्यानें त्यावर चालून जाऊन त्याला अडविलें. नंतर ते दोघे वीर सात्यकि व कृतवर्मा ह्यांनीं परस्परांस गांठून युद्ध करण्यास आरंभ केला. त्याकालीं दोन प्रबळ सिंहच आपसांत युद्ध करीत आहेत असें वाटलें; त्यांनीं एकमेकांना बाणाच्छादित करून सोडलें, तेव्हां

ते दोन दिवाकर असून त्यांनीं आपल्या किरणांनीं परस्परांस झांकून टाकिलें आहे, असा भास झाला.

राजा, त्या दोघां वीरांनीं सोडलेले बाण आकाशांत गेलेले पाहून पतंगच वेगानें संचार करीत आहेत, असें वाटलें. कृतवर्म्यानें सात्यकीवर दहा बाण आणि त्याच्या अश्वांवर तीन बाण मारून त्याला विद्ध केलें आणि एका नतपर्व बाणानें त्याचें धनुष्य छिन्न केलें. सात्यकीनें दुसरें बळकट व वेगवत्तर धनुष्य घेतलें आणि त्या कृतवर्म्याच्या वक्षःस्थलावर दहा बाण मारून त्याला विद्ध केलें. नंतर त्यानें त्यावर आणखी भल्ल बाण टाकून त्याचा रथ, जूं, ईषा आणि अश्व यांचा संहार करून त्याच्या दोघां पार्ष्णिसारथ्यांचा वध केला. कृतवर्म्याला सात्यकीनें विरथ केलेला पाहून कृपाचार्यानें त्यास आपल्या रथांत घेतलें आणि रणांगणांतून त्याला सत्वर बाहेर नेलें. राजा धृतराष्ट्रा, अशाप्रकारें मद्रराज शल्याचा वध झाला आणि कृतवर्मा विरथ झाला, असें पाहून दुर्योधनाचें सर्व सैन्य पुनः पळत सुटलें ! नंतर धुळीनें सर्व सैन्य व्याप्त होऊन कांहीं दिसेनासें झालें, त्यामुळें त्यांचें पुढें काय झालें तें समजलें नाहीं. त्यावेळीं कौरवसैन्य बहुतेक नष्ट झालें होतें आणि उरलेलें अल्प सैन्य युद्धविमुख होऊन गेलें होतें. थोड्या वेळांत अनेक सैनिकांच्या रक्तस्रावानें ती धूळ शांत झाली. दुर्योधनानें आपले सैन्याचा भंग झालेला पाहिला आणि आपल्यावर चालून येणाऱ्या पांडवांचें त्या एकट्यानें निवारण केलें. त्यानें पांडव, धृष्टद्युम्न, आनर्त हे रथांतून आपणांवर चालून येत असतां त्यांना मागें हटविलें ! मर्त्य जीव जसे मृत्यूला भिऊन दूर राहतात, त्याप्रमाणें ते पांडव वीर दुर्योधनाजवळ जाण्यास धजले नाहींत ! इतक्यांत दुसऱ्या रथांत बसून कृतवर्मा तेथें आला. त्या महारथ धर्मराजानें चार बाण मारून त्याच्या चारहि अश्वांचा वध केला आणि सहा तीक्ष्ण भल्ल बाणांनीं त्या गौतमालाहि विद्ध केलें. तेव्हां अश्वत्थाम्यानें विरथ झालेल्या कृतवर्म्यास आपल्या रथांत घेऊन धर्मापासून दूर नेलें !

राजा, इकडे कृपाचार्यानें सहा बाणांनीं युधिष्ठिराला विद्ध केलें आणि आठ तीव्र शिलीमुखांनीं त्याच्या अश्वांनाहि विद्ध केलें ! राजा, आतां बहुतेक युद्ध संपून अल्पस्वल्प शेष राहिलें आणि ह्या सर्व संकटाला कारण तूं आणि तुझे पुत्र यांचा दुर्मंत्र हेंच होय ! तो महाधनुर्धर श्रेष्ठ शल्य युद्धांत युधिष्ठि-

राच्या हातून वध पावला असतां सर्व पांडुपुत्र एकत्र झाले आणि त्यांनीं परम हर्षानें शंख वाजविण्यास सुरवात केली. त्यावेळीं इंद्रानें वृत्रासुराचा वध केल्यावर देवांनीं जशी त्याची प्रशंसा केली, तशी सर्व पांडवांनीं युधिष्ठिराची करून अनेकविध वाद्यध्वनींनीं सर्व पृथ्वी निनादित केली! ९. १. १७.

---

## अध्याय १८ वा.

[ १ संकुलयुद्ध. ]

( १ ) संजय—राजा, मद्रराज शल्याचा वध झाला असतां त्याचे सातशें पदानुयायी शूर रथी पांडवांशीं युद्ध करण्यास निघाले; तेव्हां दुर्योधन राजा पर्वत-समान गजावर बसून त्यांच्या सन्निध गेला आणि त्यांना 'तुम्ही युद्ध करूं नका, युद्ध करूं नका,' म्हणून सांगून त्या मद्रांचें निवारण करण्याचा त्यानें प्रयत्न केला; परंतु युधिष्ठिराचा वध करण्याविषयीं त्यांची इच्छा असल्यामुळें दुर्योधनानें वरचेवर त्यांचें निवारण केलें तरी ते युद्ध करण्याचा निश्चय करून पांडवांच्या सैन्यावर धांवून गेले! राजा, त्या मद्रांनीं धनुष्याचा टणत्कार करून पांडवांशीं युद्ध सुरू केलें. इतक्यांत मद्रपति शल्य समरांगणांत पडला आणि त्याचें प्रिय करण्याकरितां मद्रक महारथांनीं धर्माला पीडिलें, हें अर्जुनाला समजतांच आपल्या गांडीवाची गर्जना करीत आणि रथघोषानें दाही दिशा दणाणून सोडीत तो तेथें आला. अर्जुनाबरोबर भीम, नकुल-सहदेव, नरव्याघ्र सात्यकि, द्रौपदेय, धृष्टद्युम्न, शिखंडी, पांचाल आणि सोमक हेहि येऊन त्यांनीं युधिष्ठिराचें रक्षण करण्याच्या इच्छेनें त्याला वेढिलें! अशा रीतीनें धर्माच्या भोंवतीं उभे राहून मकर सागराला क्षोभवून सोडतात, त्याप्रमाणें त्यांनीं त्या मद्रांच्या सैन्याला क्षोभविलें. महावात जसे वृक्षांना कांपवितात, त्याप्रमाणें त्यांनीं त्या सैन्याला कांपविलें. नंतर महानदी गंगा समोरून सोसाट्याचा वायु वाहूं लागला असतां जशी क्षुब्ध होते, त्याप्रमाणें ते मद्र वीर चालून येतांच ती पांडवसेना अत्यंत क्षुब्ध झाली. तेव्हां मद्रकांकडील महारथ पांडवसैन्यावर धांवून गेले आणि 'तो धर्मराज कोठें आहे? त्याचे ते शूर बंधु कोठें आहेत? ते येथें दिसत नाहींत हें कसें? तसाच तो धृष्टद्युम्न, तो शैनेय आणि द्रौपदेय, ते पराक्रमी पांचाल आणि महारथ शिखंडी कोठें आहेत?' असा मोठा आक्रोश त्यांनीं केला.

राजा, तेव्हां द्रौपदेय आणि युयुधान त्या मद्रसैनिकांवर धांवून गेले ! त्या युद्धांत तुझ्याकडील कित्येक रथचक्रांखालीं चुरडून मेले, कित्येकांचा तुटलेल्या ध्वजांखालीं नाश झाला. युद्धांत पांडवांनीं मद्रकांचा संहार चालविल्याचें पाहून दुर्योधनानें त्या सर्वांना मागें बोलाविलें. दुर्योधनानें अशाप्रकारें निवारण केलें असतांहि ते पुनः पांडवांवर चालून गेले. तेव्हां गांधारराजाचा पुत्र शकुनि हा दुर्योधनाला बोलला "दुर्योधना, आम्हां सर्वांसमक्ष मद्रांचें सैन्य मारलें जात आहे ! राजा, तूं रणांगणांत असतां अशी गोष्ट होणें योग्य नाहीं. सर्वांनीं एकत्रित होऊन युद्ध करावें, असा प्रथम समय केला असतां शत्रूंकडून होणारा मद्रकांचा संहार तूं सहन करीत आहेस हें कसें ?"

दुर्योधन—शकुने, ह्यांचें प्रथमतः मीं निवारण केलें असतां ह्यांनीं माझें म्हणणें न ऐकतां युद्ध आरंभिलें. हेच पांडुसैन्यावर चालून जाऊन आतां हत होऊन पडले आहेत.

शकुनि—दुर्योधना, वीर पुरुष क्रोधाला पेटले असतां रणांत भर्त्याचेंहि शासन ऐकत नसतात. म्हणून आतां त्यांवर क्रोध करणें योग्य नाहीं; ह्यावेळीं त्यांची उपेक्षा करणें प्रशस्त होणार नाहीं. म्हणून आम्ही सर्व अश्व, रथ आणि गज घेऊन त्या महाधनुर्धर शल्यानुयायांच्या रक्षणार्थ जाऊं या आणि हे राजा, यत्नपूर्वक परस्परांचें रक्षण करूं या.

संजय—राजा धृतराष्ट्रा, शकुनीचें भाषण ऐकून दुर्योधन मोठें सैन्य बरोबर घेऊन शत्रूवर निघाला. सिंहासारखी गर्जना करीत आणि सर्व पृथ्वीला थरथर कांपवीत तो रणांगणांत येऊन ठेपला. तेव्हां तुझ्या सैन्यांत 'मारा, तोडा, धरा, प्रहार करा, कापून काढा,' असा एकच तुमुल ध्वनि सर्वत्र होऊं लागला ! याप्रमाणें ते मद्रक वीर कौरवसैन्यासह पांडवांवर धांवून गेले, तें पाहून पांडववीर आपल्या सैन्याचा मध्यमनामक व्यूह रचून कौरवांवर त्वरित चालून गेले ! मग त्या दोन सैन्यांत मोठें युद्ध होऊन दोघांकडील वीर हातघाईवर आले आणि अल्पावधींतच त्या सर्व मद्रकांचा संहार उडाला ! ते शूर मद्रक वीर आम्हांसमक्ष रणांगणावर मृत होऊन पडले असतां सर्व पांडव एकत्र होऊन गर्जना करूं लागले आणि रणभूमीवर सर्वत्र कबंधें उठलेलीं दिसूं लागलीं ! सूर्यमंडलाच्या मध्यापासून उल्कापात झाला ! सर्व भूमितल भग्न रथांनीं, मेलेल्या महारथ्यांच्या शवांनीं आणि हताश्वांनीं व्याप्त होऊन गेलें ! सारथिहीन

अश्व रणांत योद्धयांना घेऊन वायुवेगानें उधळून सर्वत्र जात असल्याचें दिसूं लागलें ! कित्येक अश्व समरभूमीवर भग्नचक्र रथ ओढून नेत होते, तर कित्येक गळ्यांतील बंधनरज्जूसह वेगानें पळत होते ! युद्धांत पडणारे रथी पाहून क्षीण-पुण्य होऊन सिद्धच आकाशांतून खालीं पडत आहेत, असें वाटलें. मद्रराजाच्या शूर पदानुयायांचा वध झाला असतां आम्ही पांडवांवर धांवून गेलों, तेव्हां तेहि आमच्यावर मोठ्या वेगानें चालून आले आणि बाणांचा व शंखांचा मोठा ध्वनि ऐकूं येऊं लागला. त्यांनीं आमच्यावर बाणवृष्टि केली व धनुष्यांचे टण-त्कार आणि मोठमोठे सिंहनाद ते करूं लागले. नंतर मद्रराज रणांत मरून पडल्याचें आणि तसेंच त्याचें सैन्य हत झाल्याचें पाहून तें दुर्योधनसैन्य युद्धविमुख होऊन गेलें; मग त्या विजयी पांडवांनीं त्या सैन्याला गांठून त्याचा संहार उडविला. तेव्हां त्या बलवान् पांडवांच्या हातून जे सुटले ते गोंधळून दशदिशांना पळून गेले ! ९. १. १८.

---

## अध्याय १९ वा.

[ १ संकुलयुद्ध. २ शल्यवधानंतर पांडव आणि पांचाल ह्यांचें परस्परांशीं भाषण. ३ दुर्योधनाचें पांडवांशीं युद्ध. ४ दुर्योधनाचें कौरवांस प्रोत्साहनपर भाषण. ५ पुनः युद्धारंभ. ]

( १ ) संजय—राजा धृतराष्ट्रा, युद्धामध्यें महारथ मद्रराज शल्याचा वध झाला असतां तुझे पुत्र, तसेच तुझे सैनिक युद्धविमुख झाले ! राजा, अगाध समुद्रांत नौका भग्न होऊन वणिग्जनांची जशी विपन्न दशा होते, त्याप्रमाणें युद्धांत शल्य पतन पावला असतां त्यांची स्थिति झाली आणि अपार समुद्रांत बुडणाऱ्यांनीं परपारास जाण्याची इच्छा करणें व्यर्थ होय, असें त्यांस वाटूं लागलें. महात्म्या धर्मानें शल्याचा वध केल्यावर पांडवांच्या शरप्रहारांनीं विद्ध होऊन सिंहानें आर्त केलेल्या मृगांप्रमाणें आम्ही अत्यंत दीन झालों आणि युधिष्ठिराच्या हातीं पराभव पावून आणि 'आतां आमचें रक्षण करणारा नाथ कोण आहे' असे दुःखोद्गार काढीत मध्यान्हीं परत माघारे आलों. हे राजा, शल्याच्या निधनानंतर आपलीं सैन्यें पुनः एकत्रित करावीं किंवा कांहीं परा-क्रम करून शत्रूवर तुटून पडावें, अशी बुद्धि कोणाहि योद्धयाला झाली नाहीं. भीष्म, द्रोण आणि सूतपुत्र कर्ण यांच्या वधामुळें तुझ्या वीरांना जें दुःख व भय झालें, तशाच प्रकारचें दुःख व भय शल्याचे वधानें आम्हांला झालें.

राजा, महारथ मद्रराजाचा वध होतांच जयाविषयीं आम्ही सर्व निराश झालों, आणि कौरवांकडील कित्येक प्रमुख वीर पांडवांच्या तीक्ष्ण बाणप्रहारांनीं हत झाले. कितीएक विध्वस्त झालेले व कित्येक छिन्न झालेले पाहून, तुझे इतर वीर भयामुळें रणांतून पळून गेले. धृतराष्ट्रा, कित्येकांनीं अश्वांवर, कित्येकांनीं गजांवर बसून, तर कित्येकांनीं रथांतून पलायन केलें. पदातींनींहि मोठ्या वेगानें तेथून पळ काढला. त्यासमयीं पर्वतसमान दोन हजार बलवान् व रणझुंजार गज अंकुशांचे व अंगुष्ठांचे प्रहार सोसूनहि रणांगणांतून पळून गेले ! तुझे सर्व वीर चारी दिशांना पळून गेले. शराहत होऊन पळून जात असतां ते सारखे निश्वास टाकीत होते ! त्या हतोत्साह व पराजित होऊन पळत सुटलेल्या कौरवांस पाहून पांडव व जयेच्छु पांचाल त्यांवर चालून गेले आणि मग सर्वत्र बाणांचे आवाज, सिंहासारख्या गर्जना आणि शंखांचे ध्वनि ऐकूं येऊं लागले !

( २ ) राजा, तें कौरवांचें सैन्य भयभीत होऊन पळून जात असतां पांडव आणि पांचाल यांचें परस्परांशीं भाषण झालें. ते म्हणाले, "आज या सत्यशील युधिष्ठिर राजाचे सर्व शत्रूंचा संहार होऊन त्याला राज्यप्राप्ति झाली आहे आणि दुर्योधनाची राज्यलक्ष्मी त्याला सोडून गेली आहे ! आज धृतराष्ट्र आपला पुत्र मेला असें समजून विह्वल होऊन मूर्च्छा पावेल ! सर्व धनुर्धरांमध्यें अर्जुन हाच श्रेष्ठ आहे, ही गोष्ट आज त्याला समजून येईल. तो दुष्टबुद्धि पापी आज आपणाला दोष लावून घेईल. आज विदुराच्या सत्य व हितकर भाषणाचें त्याला स्मरण होईल. आजपासून पांडवांच्या येथें सेवकाप्रमाणें राहून पांडवांनीं भोगलेल्या दुःखांचा त्याला अनुभव येईल. आज धृतराष्ट्र राजाला कृष्णाचें माहात्म्य समजून येईल. आज अर्जुनधनुष्याच्या घोर ध्वनीची बरोबर कल्पना त्याला होईल, तसेंच अर्जुनाचें अस्त्रबल आणि बाहुबल यांचें रणांत किती महत्व आहे, हेंहि त्याला कळेल ! इंद्रानें जसें बलासुराला मारिलें, त्याप्रमाणें महात्म्या भीमानें दुर्योधनाला आज मारलें म्हणजे भीमाची शक्ति किती घोर स्वरूपाची आहे, ह्याचें बरोबर ज्ञान त्याला होईल ! दुःशासनाचा वध भीमसेनानें केला, तेव्हां त्यानें ज्या प्रकारचा पराक्रम केला, तशा प्रकारचा अद्भुत पराक्रम बलवान् भीमावांचून दुसऱ्या कोणाच्याहि हातून ह्या लोकीं होणार नाहीं ! देवांनाहि दुस्सह अशा त्या मद्रपति शल्याचा धर्मराजानें वध केलेला पाहून आज त्या ज्येष्ठ पांडवाच्या पराक्रमाचें माहात्म्य धृतराष्ट्राला समजून

येईल ! आज रणांत माद्रीपुत्र नकुल-सहदेवांनीं सौबल वीर शकुनि आणि दुसऱ्या प्रमुख वीरांचा जो क्षय केला, तो पाहून त्यांच्याहि बलाची योग्यता त्याला बरोबर समजून येईल ! ज्यांच्या सैन्यांत धनंजयासारखा योद्धा असून सात्यकि, भीमसेन, धृष्टद्युम्न, द्रौपदेय, नकुल-सहदेव, धनुर्धर शिखंडी आणि धर्मराज युधिष्ठिर यांसारख्या वीरांचा ज्यांला आश्रय आहे, जगतीनाथ जनार्दन कृष्ण हा ज्यांचा नाथ आहे आणि धर्म हा ज्यांचा आधारस्तंभ आहे, त्यांला जय कसा बरें मिळणार नाहीं ? भीष्म, द्रोण, कर्ण, मद्रराज शल्य आणि दुसरे अनेक शतावधि व सहस्रावधि राजे ह्यांस रणांगणांत जिंकण्यास त्या पार्थ-युधिष्ठिरावांचून दुसरा कोण समर्थ आहे ? आणि त्यास कारण म्हणजे तो सत्य-यशोनिधि कृष्ण त्याचा नाथ आहे हेंच होय !

( ३ ) राजा, अशाप्रकारचें भाषण करीत ते पांडव आणि पांचाल वीर मोठ्या आनंदानें तुझ्या पळून जाणाऱ्या सैन्याचा पाठलाग करूं लागले ! धनंजय तुझ्या रथसैन्यावर चालून गेला, माद्रीपुत्र व महारथी सात्यकि शकुनीवर धांवून गेले आणि भीमसेनानें त्या सर्व सैन्यास भयभीत करून पळावयास लावलें ! आपले सैनिक पळत असल्याचें पाहून दुर्योधन आपल्या सारथ्याला म्हणाला, " सूता, मी येथें राहिलों असतां जयाच्या आशेनें पार्थ माझ्यावर चालून येईल, म्हणून सर्व सैन्याच्या जघनभागीं माझा रथ घेऊन चल. तेथें राहून युद्ध करीत असतां माझ्यावर अर्जुन चालून येऊं शकणार नाहीं; कारण, समुद्र सीमेचें उल्लंघन कधीं करीत नसतो, त्याप्रमाणें तो अर्जुन माझें उल्लंघन करण्यास समर्थ होणार नाहीं ! सूता, हे पहा माझ्या सैन्यावर पांडव चालून आले ! ही पहा समंतात् भागीं पांडवसैन्याच्या योगें कशी धूळ उडत आहे, तसेच हे घोर व भयंकर होणारे सिंहनादहि ऐक ! सारथे, माझा रथ हळूहळू सैन्याच्या मागें घेऊन जा आणि त्याच्या जघनभागाचें रक्षण कर ! मी समरांत उभा राहून पांडवांचा निरोध केला असतां माझे सैनिक पुनः मोठ्या शौर्यानें युद्ध करण्यास सज्ज होतील ! "

राजा, ह्याप्रमाणें दुर्योधनाचें तें शूर आर्यांला शोभेल असें भाषण श्रवण करून त्या सारथ्यानें सुवर्णालंकारांनीं विभूषित ते अश्व सैन्याच्या पृष्ठभागीं आणिले ! दुर्योधनाला पाहतांच गज, अश्व आणि रथ यांविरहित एकवीस हजार पदाति जिवाची आशा सोडून मोठें यश मिळविण्याच्या उद्देशानें रणांत

युद्धास तयार झाले ! ते पांडवांवर मोठ्या आवेशानें चालून गेले आणि मग परस्परांचें परस्परांशीं घनघोर युद्ध सुरू झालें ! त्या युद्धांत भीमसेन व पार्षत धृष्टद्युम्न ह्यांनीं आपल्या चतुरंग सैन्यासह त्या कौरवसैन्यावर चालून जाऊन त्यांचें निवारण केलें; तों दुसरे पदाति भीमसेनावर धांवून आले आणि त्यांनीं वीरलोक मिळविण्याच्या इच्छेनें त्याशीं युद्ध आरंभिलें ! त्यावेळीं कौरवसेना भीमसेनाला वेढून सारखी गर्जना करीत राहिली. त्या पदातींनीं चोहों बाजूंनीं चाल करून त्यावर अनेक प्रकारचे शस्त्रप्रहार केले; परंतु तो मैनाक पर्वतासारखा आपल्या स्थानापासून यत्किंचित्‌हि ढळला नाहीं. कौरवसैनिकांनीं आपणाला वेढा घातलेला पाहून भीमसेन अत्यंत संतप्त झाला आणि रथांतून खालीं उतरला. नंतर सुवर्णमंडित मोठी गदा घेऊन दंडपाणि यमाप्रमाणें तो तुझ्या सैनिकांचा वध करूं लागला ! तेव्हां भीमानें त्या सकल अश्व-रथ-गजहीन सैनिकांचा वध केला ! राजा, ते सर्व कौरव रुधिरदिग्ध होऊन रणांत पडलेले पाहून जणुंकाय पुष्पित कर्णिकारवृक्षच वाऱ्यानें कोसळून पडले आहेत, असा भास होत होता ! त्यांनीं नानाप्रकारचीं शस्त्रें धारण केलीं होतीं, नानाविध कुंडलें कानांत घातलीं होतीं, ते नाना देशांतून आले होते व त्यांच्या जातीहि नानाविध होत्या ! ध्वजपताकांनीं आच्छादित व शस्त्रप्रहारांनीं छिन्न होऊन पडलेल्या त्या पदातिसैन्याचें स्वरूप अत्यंत घोर, रौद्र आणि भयप्रद दिसत होतें !

(४) राजा तुझ्या सैन्यांतील मोठमोठे प्रमुख वीर युद्धपराङ्मुख होऊन पळून जात असल्याचें पाहून युधिष्ठिरादि पांडव वीर आपापल्या सैन्यांनिशीं तुझ्या दुर्योधन पुत्रावर धांवून गेले ! परंतु सीमा जशी समुद्राचें उल्लंघन करूं शकत नाहीं, त्याप्रमाणें ते सर्व पांडव वीर दुर्योधनाचें आक्रमण करूं शकले नाहींत. त्यावेळचा तुझ्या पुत्राचा तो पराक्रम पाहून आम्हांला मोठें आश्चर्य वाटलें. त्या एकट्या दुर्योधनाला ते सर्व पांडव एकत्र होऊनहि मागें हटवूं शकले नाहींत ! आपलें समीपवर्ति सैन्य विद्ध होऊन अगदीं पळून जाण्याच्या बेतांत आहे, असें पाहून त्याला दुर्योधन बोलला, “ वीरहो, मला सर्व पृथ्वीवर किंवा पर्वतावर एकहि असा देश आढळत नाहीं कीं त्या ठिकाणीं तुम्हीं गेल्यानें तुम्हांला पांडव मारूं शकणार नाहींत ! मग पळून जाण्यांत फायदा तो काय ? या पांडवांचें सैन्य अत्यल्प आहे आणि कृष्णार्जुन हे अतिविद्ध झाले आहेत. जर आम्ही या समयीं एकत्र राहून युद्ध करूं तर निःसंशय आमचा विजय होईल ! विभक्त

होऊन तुम्ही पळून जाल, तर तुम्ही आपले अन्यायी आहां, ही गोष्ट लक्षांत आणून ते तुमचा पाठलाग करितील आणि मग तुमचा वध करितील! म्हणून युद्ध करून त्यांत आलेला मृत्यु आम्हांला श्रेयस्कर होय! सर्व क्षत्रिय वीरहो, माझें म्हणणें नीट लक्षांत घ्या! शूर असो, किंवा भीरु असो, या दोघांनाहि जर यम सर्वदा मरण आणीत असतो, तर क्षत्रियांत असा मूर्ख कोण आहे कीं जो युद्ध न करितां मरण्यास तयार होईल? क्रुद्ध भीमसेनाच्या पुढें उभें राहून युद्ध करणेंच आम्हांला श्रेयस्कर आहे! क्षत्रधर्मानें युद्ध करणाऱ्याला आलेला मृत्यु सुखकारक होय! मर्त्यप्राण्याला गृहीं केव्हांना केव्हां मरायाचें हें आहेच. म्हणून क्षत्रधर्मानें युद्ध करून मरावें हा सनातन धर्म होय. जर आपण शत्रूचा वध केला, तर येथेंच आपणांला सुखप्राप्ति होईल व शत्रुहस्तें मरण आलें, तर मेल्यावर मोठें फल–स्वर्ग–मिळेल! अहो कौरवांनो, स्वर्गाला पोंचविणारा युद्धधर्मावांचून दुसरा श्रेयस्कर मार्ग नाहीं! युद्धांत आलेल्या मृत्यूनें मनुष्य त्वरित स्वर्गलोकाला जातो आणि नाना प्रकारचे भोग भोगतो!"

(५) राजा धृतराष्ट्रा, याप्रकारें त्या दुर्योधनाचें भाषण श्रवण करून त्या सर्व भूपालांनीं त्याची स्तुति केली आणि ते सर्व पांडवांवर धांवून गेले! जयेच्छु पांडवांनीं क्रोधाविष्ट होऊन व्यूहरचना केली आणि नंतर त्या शत्रुसैन्यावर ते तुटून पडले! राजा, त्यावेळीं अर्जुनानें तीनहि लोकांत विख्यात आपले धनुष्याचें आस्फालन केलें आणि रथांत बसून तो शत्रूवर चालून गेला. तसेंच नकुल-सहदेव शकुनीवर आणि महाबल सात्यकि मोठ्या आवेशानें तुझ्या सैन्यावर धांवून आले! ९. १. १९.

---

## अध्याय २० वा.

[ १ म्लेच्छाधिपति शाल्वाशीं युद्ध. २ शाल्वगजपराक्रम. ३ सात्यकीच्या हस्तें शाल्ववध. ]

( १ ) **संजय**—राजा धृतराष्ट्रा, तें कौरवसैन्य युद्धाला तयार झालें असतां म्लेच्छगणांचा अधिपति शाल्व हा क्रुद्ध होऊन पांडवांच्या मोठ्या सैन्यावर चालून आला! तो पर्वतासारख्या एका विशाल व मदोन्मत्त गजावर आरूढ झाला होता! तो गज ऐरावतासारखा दृप्त असून शत्रुगणांचें हनन करणारा

अशी त्याची ख्याति होती ! त्याची उत्पत्ति प्रख्यात कुलांत झाली असून दुर्योधन त्याचें नित्य पूजन करीत असे ! समरांत सर्वदा उपयुक्त असें सर्व साहित्य त्यावर ठेवलें असून शास्त्रप्रवीणांनीं त्याला उत्तम प्रकारचें युद्धशिक्षण देऊन तयार केलें होतें. शाल्व नेहमीं त्यावर बसून युद्ध करीत असे. रात्रीचा अंत होऊन सूर्य उदयपर्वतावर येतो, तसा शाल्व त्या गजावर बसून एकत्र झालेल्या त्या पांडवसैन्यावर धांवून गेला ! शाल्वानें महेंद्रवज्रसदृश घोर बाण पांडवांवर टाकून त्याचें विदारण केलें आणि अनेक वीरांना यमसदनीं पाठविलें ! पूर्वीं देवदानवयुद्धांत वज्रधर इंद्र ऐरावतावर अधिष्ठित होऊन दैत्यांचा संहार करीत असतां जसें त्यामध्यें देवदैत्यांना कांहीं व्यंग दिसलें नाहीं, त्याप्रमाणें त्या शाल्वाच्या ठिकाणीं कौरव किंवा पांडव यांस कांहींच न्यून आढळलें नाहीं ! राजा, तो एकटा गज महेंद्रगजाप्रमाणें अनेक प्रकारचीं रूपें घेऊन आपल्या संनिध फिरत असतांना पांडव, सोमक व सृंजय ह्यांस दिसत असे ! त्या गजानें शत्रुसैन्यावर चाल केली, तेव्हां तें गतप्राण झाल्यासारखें सर्वांस भासलें ! त्या गजाला पाहून पांडवसैन्य इतकें भयभीत होऊन गेलें कीं पळून जातांना सैनिकांनीं परस्परांना पायांखालीं तुडविलें ! त्या शाल्वराजानें पांडवसैन्याला इतकें त्रस्त करून सोडलें कीं, त्या गजाचा वेग सहन न झाल्यामुळें भंग पावून तें चारी दिशांना पळत सुटलें ! याप्रकारें ती पांडवसेना भंग पावली असतां तुझे प्रमुख वीरांना मोठा आनंद होऊन शाल्वाचा गौरव करून ते चंद्राप्रमाणें आपले शुभ्र शंख वाजवूं लागले !

( २ ) राजा, अशाप्रकारें ते कौरव मोठ्या गर्जना व शंखनाद करीत असल्याचें पाहून पांडव-सृंजयांचा सेनापति पांचालराजपुत्र धृष्टद्युम्न ह्यास तें सहन झालें नाहीं ! तो अत्यंत संतापला आणि पूर्वीं देव-दानवयुद्धामध्यें ज्याप्रमाणें जंभासुर इंद्रवाहन ऐरावतावर धांवून गेला, त्याप्रमाणें तो शाल्वाच्या त्या गजावर चालून गेला ! पांचालराजपुत्र आपल्यावर चाल करून येत असल्याचें पाहून त्या राजसिंह शाल्वानें त्या द्रुपदपुत्राच्या वधाकरितां आपला गज त्यावर सोडला ! त्या गजावर धृष्टद्युम्नानें अग्नीसारखे प्रदीप्त व भयंकर तीन नाराच बाण टाकिले आणि नंतर आणखी पांचशें नाराच बाण त्याच्या कुंभस्थळीं मारून त्याला विद्ध केलें ! तेव्हां तो गज रणांगणावर अत्यंत विह्वल होऊन पळत सुटला ! परंतु शाल्वानें त्यास परतविलें आणि शूल व अंकुश यांनीं टोंचून त्यास पांचाल राजपुत्राच्या रथावर पुनः सोडलें ! गजानें त्या धृष्टद्युम्नाच्या

रथावर चाल करून तो रथ अश्व व सारथि यांसह आपल्या शुंडेनें उचलून पृथ्वीतलावर आपटिला व त्याचें चूर्ण केलें आणि त्यानें मोठी गर्जना केली !

( ३ ) त्या गजानें अशाप्रकारें धृष्टद्युम्नाला पीडित केलें असतां भीमसेन, शिखंडी व सात्यकि हे मोठ्या वेगानें त्या गजावर धांवून आले आणि त्यांनीं त्या गजावर बाणवृष्टि करून त्या गजाचा प्रतिकार केला ! तें पाहून सूर्य आपल्या किरणसमूहांनीं दशदिशा व्याप्त करितो त्याप्रमाणें शाल्वानें बाणवृष्टि करून दशदिशा आच्छादित केल्या ! त्यामुळें पांडवांचे रथसमूह व्यथित होऊन जिकडेतिकडे पळत सुटले ! समरांगणांतील शाल्वाचा तो पराक्रम पाहून पांडवसैन्यांत एकच हाहाकार झाला ! नंतर पांचाल आणि सृंजय यांनीं त्या गजाला अडविलें ! तेव्हां तो शूर धृष्टद्युम्न आपली पर्वतशृंगप्राय गदा घेऊन मोठ्या आवेशानें त्या गजश्रेष्ठावर धांवून गेला आणि पर्वतसमान प्रचंड आणि मेघासारख्या मदस्राव करणाऱ्या त्या गजावर त्यानें गदाप्रहार चालवून त्याचा तत्काळ वध केला ! तेव्हां त्या गजाच्या मुखांतून रक्त येऊं लागलें आणि क्षितिकंप होऊन पर्वत जसा सहसा कोसळून पडतो, त्याप्रमाणें तो गज एकाएकीं खालीं पडला ! शाल्वाचा गज पडतांच तुझ्या सैन्यांत मोठा हाहाकार झाला आणि इतक्यांत शिनिप्रवीर सात्यकीनें एक तीक्ष्ण भल्ल बाण टाकून वज्रहत पर्वतशिखराप्रमाणें त्या शाल्वराजाचें मस्तक छिन्न केलें ! ९. १. २०.

---

## अध्याय २१ वा.

[ १ सात्यकि-कृतवर्मा यांचें युद्ध. २ कृतवर्म्याचा पराजय. ]

( १ ) **संजय**—राजा, त्या समरभूषण शाल्वाचा अशारीतीनें वध झाला असतां वाऱ्यानें जसा महावृक्ष भग्न होतो, तसें तुझें सर्व सैन्य भग्न झालें ! आपल्या सैन्याचा भंग झालेला पाहून महारथ कृतवर्म्यानें शत्रुसैन्याला थांबवून धरिलें आणि शत्रूंनीं समरांत भयंकर बाणवृष्टि केली असतांहि तो पर्वतासमान स्थिर राहिला आहे, असें पाहून ते पळून जाणारे कौरववीरहि मागें फिरले. मग कौरव-पांडवांचें युद्ध सुरू झालें ! त्यासमयीं प्राणांवर उदार होऊन कौरववीरांनीं युद्ध केलें. त्यांत सात्वत कृतवर्म्यानें एकट्यानें सकल पांडवसेनेचें निवारण केलें. तें पाहून सर्वांस मोठें आश्चर्य वाटलें. कृतवर्म्याचा पराक्रम

पाहून उभय सैन्यांतील वीरांनीं मोठ्या शौर्यानें युद्ध केलें. त्या युद्धांत कौरव-वीरांनीं आकाशाला नाद जाऊन भिडेल, एवढ्या मोठ्यानें सिंहगर्जना केल्या ! त्या नादानें पांचाल वीर भयभीत झाले, तेव्हां शैनेय सात्यकि तेथें येऊन पोंचला आणि त्यानें बलवान् क्षेमधूर्ति राजावर सात तीक्ष्ण बाण सोडून त्याला यमसदनीं पाठविलें ! आपल्या सैन्यावर तीक्ष्ण बाणवृष्टि करीत येणाऱ्या त्या सात्यकीला पाहून बुद्धिमान् हार्दिक्य कृतवर्मा त्यावर धांवून गेला; मग त्या दोघां वीरांचें दारुण युद्ध सुरू होऊन त्यांनीं परस्परांवर शस्त्रास्त्रें टाकिलीं. त्यावेळीं पांडव, पांचाल आणि दुसरे मोठमोठे राजे त्यांचें तें घोर युद्ध पाहत उभे राहिले.

( २ ) राजा, त्या वृष्णि-अंधककुलोत्पन्न महारथांनीं परस्परांवर नाराच, वत्सदंत बाणांची वृष्टि केली; तेव्हां दोन मदोन्मत्त गजच परस्परांशीं युद्ध करीत आहेत असें सर्वांस वाटलें ! त्या दोघां वीरांनीं परस्परांवर सोडलेले बाण पाहून ते शलभांचे समूहच आकाशांत मोठ्या वेगानें संचार करीत आहेत असें वाटलें ! त्या युद्धांत एकट्या सात्यकीला गांठून कृतवर्म्यानें चार निशित बाण टाकून त्याचे चारहि अश्वांस विद्ध केलें ! तें पाहून अंकुशाच्या माऱ्यानें गज जसा क्रुद्ध होतो, तसा तो सात्यकि अत्यंत क्रोधाविष्ट झाला आणि त्यानें आठ तीक्ष्ण बाण त्या कृतवर्म्यावर सोडिले. नंतर कृतवर्म्यानें तीन बाणांनीं सात्यकीला विद्ध केलें आणि एका बाणानें त्याचें धनुष्य छेदिलें ! सात्यकीनें तें छिन्न धनुष्य फेंकून दिलें आणि दुसरें धनुष्य घेतलें आणि त्याला बाण जोडून तो वीर्यवान् सात्यकि कृतवर्म्यावर चालून गेला ! कृतवर्म्यानें आपलें धनुष्य छेदून टाकिलें, ही गोष्ट त्याला सहन झाली नाहीं. त्यानें दहा बाण सोडून कृतवर्म्याचा सारथि, अश्व आणि ध्वज यांचा नाश केला ! नंतर त्या महारथ कृतवर्म्यानें मोठ्या संतापानें सात्यकीचा वध करण्याच्या हेतूनें आपला शूल त्याजवर फेंकिला. परंतु सात्यकीनें भयंकर शरवृष्टीनें त्या शूलाचें चूर्ण करून टाकिलें ! तें पाहून कृतवर्मा अत्यंत भयभीत होऊन गेला. त्यानें रथाधिष्ठित होऊन पुनः एक भल्ल बाण सात्यकीच्या वक्षःस्थळावर मारिला. सात्यकीनेंहि त्याचे अश्व आणि सारथि यांना मारून टाकिलें. मग तो कृतवर्मा जमिनीवर उतरला आणि नंतर त्यांचें द्वैरथयुद्ध सुरू झालें; त्यांतहि कृतवर्मा पुनः विरथ झाल्याचें पाहून सर्व कौरव अत्यंत भयभीत झाले व तुझा पुत्र दुर्योधनहि चिंतातुर होऊन गेला !

राजा, कृतवर्म्याचे अश्व आणि सारथि हत होऊन तो विरथ झाल्याचें पाहून सात्यकीचा वध करण्याच्या इच्छेनें कृपाचार्य पुढें आला आणि त्यानें कृतवर्म्याला आपल्या रथांत घेऊन सर्व धनुर्धर पाहत असतां त्याला रणापासून दूर नेलें ! अशा रीतीनें कृतवर्मा निवृत्त होऊन सात्यकीची सत्ता रणांत प्रस्थापित झाली, तें पाहून दुर्योधनाचें सर्व सैन्य पुनः युद्धपराङ्मुख झालें ! सर्व सैन्य धूलीनें आच्छादित झाल्यामुळें त्याचें काय झालें, तें शत्रूंना समजलें नाहीं ! एकट्या दुर्योधनाखेरीज बाकी सर्व सेना पळून गेली. आपलें सैन्य भग्न झाल्याचें पाहून दुर्योधनानें वेगानें जाऊन त्या सर्वांचें निवारण केलें आणि मोठ्या शौर्यानें पांडवसैन्यावर शरवर्षाव सुरू केला ! त्यानें धृष्टद्युम्न, शिखंडी, द्रौपदेय, पांचाळ, केकय, सोमक आणि सृंजय ह्या सर्वांवर निशित बाण टाकिले आणि ज्याप्रमाणें यज्ञांतील मंत्रपूत अग्नि आपल्या स्वतःच्या कांतीनें शोभत असतो, तसा तो दुर्योधन राजा आपल्या दिव्य कांतीनें रणभूमीवर प्रकाशूं लागला ! मानवांना जसा मृत्यु भयंकर वाटतो, त्याप्रमाणें पांडवांना तो दुर्योधन राजा रणांगणांत वाटूं लागला आणि कोणाहि पांडववीराला त्याजवर चालून जाण्याचें धैर्य होईना ! इतक्यांत हार्दिक्य कृतवर्मा दुसऱ्या रथांत बसून तेथें आला ! ९. १. २१.

---

## अध्याय २२ वा.

[ १ दुर्योधनपराक्रम. २ दुर्योधनसंकुलयुद्ध. ]

( १ ) संजय—राजा धृतराष्ट्रा, त्यावेळीं तुझ्या पुत्रानें रथारूढ होऊन प्रतापवान् रुद्राप्रमाणें शत्रूंवर भयंकर बाणवृष्टि केली. पर्जन्यानें जशी पर्वतावर जलवृष्टि करावी त्याप्रमाणें दुर्योधनानें पांडवांवर सोडलेल्या सहस्रावधि बाणांनीं सर्व भूमि आच्छादित झाली ! दुर्योधनाच्या बाणांनीं विद्ध झाला नाहीं, असा एकहि नर, गज अथवा अश्व पांडवांच्या सैन्यांत नव्हता ! ज्याला ज्याला रणांगणांत मीं पाहिलें, तो तो तुझ्या पुत्राच्या हातून विद्ध झालेला होता ! सैनिकांच्या पायांनीं सर्वत्र उडलेल्या धुळीनें जशी सर्व सेना अदृश्य झाली, त्याप्रमाणें दुर्योधनाच्या बाणांनीं सर्व रणांगण आच्छादित होऊन कांहींहि दिसनासें झालें ! दुर्योधनानें सोडलेल्या त्या बाणांनीं सर्व पृथ्वी बाण-मय होऊन गेली ! तुजकडील किंवा शत्रूकडील त्या सहस्रावधि योद्ध्यांमध्यें

एक दुर्योधनच खरा वीर आहे, अशी माझी समजूत झाली ! त्या युद्धांत तुझ्या पुत्राचा पराक्रम पाहून मला मोठें आश्चर्य वाटलें, तें हें कीं एकट्या दुर्योधनावर चालून जाण्यास त्या एकत्रित झालेल्या पांडुपुत्रांना धैर्य झालें नाहीं ! हे भरतर्षभा, दुर्योधनानें युधिष्ठिरावर शंभर, भीमसेनावर सत्तर, सहदेवावर पांच, नकुलावर चौसष्ट, धृष्टद्युम्नावर पांच, द्रौपदेयांवर सात आणि सात्यकीवर तीन बाण टाकिले ! नंतर त्यानें एका बाणानें सहदेवाचें धनुष्य तोडून टाकिलें! माद्रीपुत्रानें मग दुसरें प्रचंड धनुष्य घेतलें आणि तो दुर्योधनावर धांवून गेला ! त्यानें दुर्योधनाला दहा बाणांनीं विद्ध केलें !

( २ ) राजा, इकडे नकुलानें दुर्योधनावर भयंकर नऊ बाण टाकिले व तो मोठ्यानें गर्जना करूं लागला ! तें पाहून सात्यकीनें एक आनतपर्व बाण दुर्योधनावर सोडला. मग द्रौपदेयांनीं त्र्याहत्तर, धर्मराजानें पांच आणि भीमानें ऐशीं बाण मारून त्याला अगदीं जर्जर केलें ! अशाप्रकारें दुर्योधनावर सर्व बाजूंनीं बाणांचे प्रहार होत असतांहि तो यत्किंचित्हि ढळला नाहीं ! तेव्हां त्याचें हस्तलाघव, अस्त्रकौशल्य आणि वीर्य पाहून सर्व लोक थक्क होऊन गेले ! यावेळीं कौरववीर पळून फार दूर गेले नव्हते; त्यांनीं पाहिलें तों दुर्योधन राजा आपणांमध्यें नाहीं, असें त्यांस दिसून आलें. मग त्यांनीं आपलीं कवचें धारण केलीं आणि ते सर्व दुर्योधनाकडे परतले ! तेव्हां त्या दोन्ही सैन्यांमध्यें तुमुल संग्राम सुरू झाला आणि प्रावृट्कालीं क्षुब्ध झालेल्या समुद्राप्रमाणें भयंकर गर्जना करीत ते कौरव पांडवांवर चालून गेले ! त्या युद्धांत क्रुद्ध अश्वत्थाम्यानें भीमसेनाचें निवारण केलें ! मग दोन्ही दळांतील सैनिकांनीं परस्परांवर एवढी बाणवृष्टि केली कीं दिशा आणि उपदिशा ह्याहि ओळखतां येईनाशा झाल्या ! त्या दोघां वीरांनीं मोठ्या शौर्यानें घोर युद्ध करून सर्व दिशा त्रस्त करून सोडल्या !

राजा धृतराष्ट्रा, त्यावेळीं शकुनि युधिष्ठिरावर धांवून गेला आणि त्यानें त्या धर्मराजाचे चारहि अश्वांचा वध करून मोठी गर्जना केली, त्यामुळें पांडवसैन्यें अत्यंत क्षुब्ध होऊन गेलीं ! इतक्यांत सहदेव तेथें येऊन पोंचला; त्यानें धर्मराजाला रथांत घालून दूर नेलें ! नंतर तो युधिष्ठिर दुसऱ्या रथांत बसला आणि त्यानें शकुनीवर प्रथम नऊ आणि नंतर पांच बाण मारून त्याला विद्ध केलें ! त्यावेळीं त्या धनुर्धर युधिष्ठिरानें मोठी गर्जना केली आणि मग त्या दोघां वीरांचें अत्यंत घोर आणि आश्चर्यकारक युद्ध झालें ! तें पाहून प्रेक्षकांना

मोठें कौतुक वाटलें आणि सिद्धचारणहि मोठ्या विस्मयानें येऊन तें युद्ध पाहत राहिले !

राजा, इतक्यांत सौबलसुत उलूक त्या युद्धदुर्मद नकुलावर धांवून आला आणि त्यानें त्यावर चारी बाजूंनीं शरवृष्टि सुरू केली ! नकुलानेंहि उलट त्या उलूकावर बाणांची वृष्टी करून त्याला अडवून ठेविलें. त्यावेळीं ते दोघेहि कुलवान् महारथी एकमेकांवर चढाओढ करीत धांवून गेले ! इकडे त्या शत्रुतापन सात्यकीनें कृतवर्म्याला रणांत गांठून त्याशीं युद्ध आरंभिलें ! तेव्हां समरांत इंद्राचें बलिदैत्याशींच युद्ध चाललें आहे, असें वाटलें. दुर्योधनानें धृष्टद्युम्नाचें धनुष्य छेदून टाकिलें आणि त्यावर तीक्ष्ण बाणांचा वर्षाव केला. धृष्टद्युम्नानें दुसरें बळकट धनुष्य धारण केलें आणि सर्व धनुर्धरांच्या समक्ष दुर्योधनाशीं युद्ध करण्यास आरंभ केला; तें त्यांचें दारुण युद्ध पाहून दोन मदस्राव करणाऱ्या मत्त गजांचेंच युद्ध चाललें आहे असें वाटलें ! तेव्हां गौतमानें क्षुब्ध होऊन अनेक सन्नतपर्व बाणांनीं द्रौपदीपुत्रांना विद्ध करून त्यांच्याशीं इंद्रियें व देही यांमध्यें जसें युद्ध व्हावें, तसें युद्ध चालविलें ! अशाप्रकारें कृपाचार्य व द्रौपदेय यांमध्यें भयंकर व निर्मर्याद संग्राम झाला ! इंद्रियें ज्याप्रमाणें अज्ञान पुरुषाला पीडितात, त्याप्रमाणें त्या कृपाचार्याला द्रौपदेयांनीं त्रस्त करून सोडलें; परंतु त्यानें पुनः त्यांवर चाल केली व त्यांशीं मोठें विचित्र युद्ध करून त्यांस आंवरून धरलें ! राजा, इंद्रियांचा जोर प्रबल होऊन तीं जशीं वरचेवर मनुष्यांस पीडा देतात, त्याप्रमाणें त्या वीरांनीं परस्परांला वारंवार त्रासवून सोडलें ! पदातींनीं पदातींना गांठलें; गज गजांशीं, अश्व अश्वांशीं आणि रथी रथ्यांशीं भिडून मोठें निकराचें व दारुण युद्ध जुंपलें ! तें युद्ध पाहून प्रेक्षकांना मधूनमधून कौतुक वाटत असे, केव्हां भीति वाटत असे, तर केव्हां त्याचें रौद्रस्वरूप लक्षांत येऊन धडकी भरून येत असे !

राजा, अशाप्रकारें तें घोर युद्ध चालू झालें असतां परस्परांनीं परस्परांचा वध केला आणि मोठमोठ्या गर्जना केल्या ! त्या युद्धांत अश्वांच्या खुरांनीं, रथनेमींनीं व गजांच्या निश्वासांनीं धूळ उडून ती वाऱ्यानें सर्वत्र पसरली व संध्याकाळच्या अभ्रानें पडावा तसा अंधकार पडला. त्या धूळीमुळें सूर्य निस्तेज झाला, सर्वत्र रणभूमि आणि तिजवर युद्ध करीत असणारे ते शूर योद्धे दिसत नाहींसे झाले. थोड्या वेळानें ती रणभूमि वीरांच्या रक्तानें सिंचित होऊन धूळ खालीं

बसली आणि पुनः तें रणांगण स्वच्छ दिसूं लागलें! ती धूळ याप्रमाणें नाहींशी होतांच पुनः मध्याह्नसमयीं त्या वीरांमध्यें मोठ्या शौर्यानें अतिदारुण युद्ध प्रवृत्त झाल्याचें दिसून आलें ! वीरांच्या अंगांतील कवचांचें उज्ज्वल तेज सर्वत्र प्रकाशित होतें आणि पर्वताला आग लागून वेळूंचे वनांत जसा भयंकर ध्वनि होतो, तसा वीरांनीं परस्परांवर चालविलेल्या शस्त्रप्रहारांचा घोर नाद होऊं लागला ! १. ९. २२.

## अध्याय २३ वा.

[ १ संकुलयुद्ध. २ शकुनि-सहदेवांचें भयंकर युद्ध. ३ शकुनि व धृष्टद्युम्न यांचें युद्ध. ]

(१) संजय—राजा धृतराष्ट्रा, याप्रमाणें तें घोर आणि भयानक युद्ध चाललें असतां पांडवांनीं तुझ्या सैन्याचा भंग केला, तेव्हां तुझे महारथ पळून जाऊं लागले; त्यांस तुझ्या पुत्रानें मोठ्या यत्नानें मागें परतविलें आणि मग पांडवसेनेशीं त्यांनीं पुनः युद्ध आरंभिलें. तुझ्या पुत्राचा जय व्हावा, अशी त्या सर्वांस उत्सुकता असल्यामुळें त्यांनीं पांडवसेनेशीं इतकें दारुण युद्ध केलें कीं तें देव-दानवांचेंच युद्ध होत आहे, असें वाटूं लागलें ! त्यावेळीं तुझ्या किंवा शत्रूच्या सेनेंतील कोणीहि युद्धपराङ्मुख झाला नाहीं ! त्या युद्धांत वीर एकमेकांचीं नांवें घेऊन किंवा अनुमानानें परस्परांशीं युद्ध करीत होते. त्यांत परस्परांनीं परस्परांचा भयंकर नाश केला ! तें पाहून युधिष्ठिर राजा क्रोध-संतप्त होऊन सर्व भूपालांसह कौरवांस जिंकण्याच्या इच्छेनें त्यांवर बाण-वर्षाव करूं लागला. तीन सुवर्णपुंख बाण टाकून त्यानें शारद्वताला विद्ध केलें आणि चार नाराच बाण टाकून त्यानें कृतवर्म्याचे चारहि अश्वांस मारून टाकिलें ! तें पाहून अश्वत्थाम्यानें त्या कृतवर्म्यास आपल्या रथांत घालून बाजूला नेलें. नंतर शारद्वतानें आठ बाण युधिष्ठिरावर मारिले आणि इकडे दुर्यो-धनानेंहि सातशें रथ त्या धर्मपुत्र युधिष्ठिरावर पाठविले !

राजा, त्यासमयीं ते सातशें रथ मनोवेगानें आपल्या रथ्यांसह युधिष्ठिरावर चालून आले आणि मेघ ज्याप्रमाणें दिवाकराला झांकून टाकितात, त्याप्रमाणें त्यांनीं बाणप्रहारांनीं त्या युधिष्ठिराला आच्छादिलें ! धर्मराजाला कौरवांनीं बाणाच्छादित केलेला पाहून शिखंडिप्रमुख वीरांना ती गोष्ट आवडली नाहीं.

क्रोधाविष्ट होऊन त्यांनीं आपल्या रथांना वेगवान् अश्व जोडून त्यांतून ते धर्मराजाच्या रक्षणार्थ तत्काल धांवून आले ! नंतर त्या दोन सैन्यांमध्यें भयंकर रणसंग्राम माजला आणि त्यांत यमराष्ट्राची वृद्धि करणारे रुधिरप्रवाह वाहूं लागले ! त्या आततायी कौरवांच्या सातशें रथांचा संहार करून पांडव पुनः पांचालांसह त्या कौरवांवर धांवून गेले आणि नंतर पुनः युद्ध सुरू झालें ! त्याप्रकारचें युद्ध मी कधीं पाहिलें नाहीं किंवा ऐकलेंहि नाहीं ! त्या अमर्याद युद्धांत दोन्ही पक्षांतील अनेक योद्धे पतन पावूं लागले, चोहोंकडे शंखध्वनि होऊं लागले, सिंहनाद आणि वीरांच्या गर्जना ऐकूं येऊं लागल्या ! उभय पक्षांचे वीर परस्परांच्या मर्मस्थळांवर आघात करूं लागले, आणि जयेच्छेनें एकमेकांवर धांवून जाऊं लागले ! पृथ्वीवर शोकोत्पादक संहार घडून सर्वत्र अनर्थ कोसळला आणि पुष्कळ तरुण स्त्रियांना वैधव्यप्राप्ति झाली !

राजा, याप्रमाणें निर्मर्याद आणि अतिदारुण युद्ध प्रवृत्त झालें असतां महाभयंकर उत्पातहि होऊं लागले. पर्वत व वनें यांसह सर्व पृथ्वी मोठा निनाद करून थरथर कांपूं लागली; आकाशांतून पृथ्वीवर उल्कांचा वर्षाव होऊन सर्वत्र सोसाट्याचा वारा वाहूं लागला आणि दशदिशा धूळीनें व्याप्त झाल्या ! गजांच्या नेत्रांतून अश्रू गळूं लागून त्यांचीं शरीरें थरथर कांपूं लागलीं. अशाप्रकारचे घोर उत्पात झालेले पाहूनहि त्या क्षत्रिय वीरांना त्यांचें कांहींहि वाटलें नाहीं; ते स्वर्गाची इच्छा करून त्या रमणीय कुरुक्षेत्रामध्यें युद्धाकरितां सज्ज होऊन राहिले. नंतर गांधारराजाचा पुत्र शकुनि आपल्या वीरांस बोलला, ‘तुम्ही सैन्याच्या अग्रभागीं राहून युद्ध करा, पृष्ठभागीं मी राहून पांडवांचा वध करितों !’

राजा, याप्रमाणें आम्ही युद्धार्थ रणांगणावर गेलों असतां, आमच्याकडील मद्रदेशीय व दुसरे वीर आवेशानें गर्जूं लागले, तेव्हां पांडव आम्हांवर धांवून आले आणि त्यांनीं आपलीं धनुष्यें खेंचून आम्हांवर सारखी बाणवृष्टि चालविली. त्या पांडवांनीं मद्रसैन्याचा वध केलेला पाहून दुर्योधनसैन्य पुनः युद्धपराङ्मुख झालें. तेव्हां तो गांधारराज पुनः बोलला, ‘कौरववीरहो, अधर्मज्ञांसारखे काय करितां ? मागें फिरा आणि युद्ध करा, युद्धपराङ्मुख होऊन तुम्ही काय मिळविणार ?’ त्या गांधारराजाकडे दशसहस्र अश्वसैन्य असून त्या सर्व वीरांपाशीं विशाल प्रास होते. कौरवसैन्याचा पांडवांनीं संहार केलेला पाहून

गांधारराजानें त्या पृष्ठभागाकडून पांडवसेनेवर अश्वसेनेसह चाल केली आणि त्याबरोबर तीक्ष्ण बाणवृष्टि करून वारा जसा मेघसमुदायांना उधळून लावितो, त्याप्रमाणें त्यानें शत्रुसैन्याचा संहार केला ! आपल्या सैन्याचा कौरवांनीं केलेला मोड पाहून युधिष्ठिरानें सहदेवाला म्हटलें, 'सहदेवा, हा दुष्ट सुबलपुत्र शकुनि आमच्या सैन्याला पृष्ठभागाकडून त्रास देत आहे, तरी तूं द्रौपदेयांसह त्याजवर चालून जा आणि त्याचा वध कर ! मी पांचालांसह त्यांच्या रथसैन्याचा संहार करितों ! सर्व गज, अश्व, आणि तीन सहस्र पदाति इतक्या सेनेसह तूं शकुनीवर धांवून जा आणि त्याचा वध कर !'

(२) राजा, नंतर सहदेव सातशें गजसादी, पांचहजार अश्वसादी, तीन सहस्र पदाति आणि द्रौपदेय इतक्या सेनेसह त्या युद्धदुर्मद शकुनीवर धांवून गेला. त्या जयेच्छु शकुनीनेंहि पृष्ठभागाकडून पांडवसैन्यावर चाल करून त्याची दाणादाण उडविली. तेव्हां पांडवांचे वेगवान् अश्वसादी कौरवांच्या रथसेनेचा भंग करून आंत शिरले ! मग त्या अश्वसादींनीं सौबलाच्या सेनेवर शरांचा सारखा वर्षाव सुरू केला. तेथें मोठमोठे युद्धनिपुण वीर गदा, प्रास इत्यादिकांनीं युद्ध करूं लागले आणि मग भयंकर युद्ध जुंपलें. राजा, तुझ्या दुर्मंत्राचें हें सर्व फळ होय ! दोन्ही सैन्यांपैकीं कोणतें सैन्य विशेष पराक्रमी आहे हें समजेनासें झालें. शूर वीर बाहुबलानें ज्या शक्ति परस्परांवर सोडीत असत, त्या पाहून आकाशांतून खालीं उल्काच पडत आहेत, असें कौरव-पांडवांस वाटूं लागलें. हे राजा, वीरांवर पडणाऱ्या विमल ऋष्टींनीं आकाश व्याप्त होऊन त्याला विशेष शोभा आली होती. परस्परांवर प्रासांचा एवढा मारा होऊं लागला कीं, तो पाहून शलभसमूहच आकाशांत संचार करीत आहे, असा भास झाला ! अश्वसादी स्वतः विद्ध झाले असूनहि शत्रूंकडील हजारों अश्वांचा त्यांनीं वध केला. तेव्हां त्या अश्वांच्या शरीरांतून सारखा रक्तस्राव होऊं लागला. अश्व परस्परांवर धांवून जाऊन परस्परांचा संहार करूं लागले व कित्येक क्षत होऊन रक्त ओकूं लागले. नंतर धूळ उडून सर्वत्र अंधकार पडला आणि ते वीर रणस्थान सोडून जात असतांना माझ्या दृष्टीस पडले ! धूळीनें सर्वत्र अंधकार होऊन उभय दळांतील वीर एकमेकांचे केश धरून युद्ध करूं लागले; कित्येकांनीं अश्वांच्या पृष्ठांवरील वीरांना खेंचून त्यांच्यांशीं मल्लयुद्ध आरंभिलें आणि एकमेकांचा वध केला ! कित्येक वीर अश्वांवरच मृत झाले व त्या अश्वांनीं त्यांना रणांगणांतून दूर नेलें. कित्येक

विजयैषी व अभिमानी वीर मृत होऊन जमिनीवर पडले आहेत असें दिसलें !

राजा, त्यावेळीं शतावधि आणि सहस्रावधि वीर भुज तुटून व केश छिन्न-भिन्न होऊन पृथ्वीवर पडलेले दिसत होते. पृथ्वीवर सर्वत्र अश्व व अश्वसादी यांच्या प्रेतांचा ढीग पडल्यामुळें त्यांतून अश्व चालविणें मोठें कठिण झालें होतें ! वीरांचीं कवचें रणांगणांत रक्तानें माखलेलीं दिसत होतीं आणि नानाविध शस्त्रास्त्रांनीं परस्परांच्या वधाच्या इच्छेनें परस्परांशीं निकरानें युद्ध करीत असतां बरेच वीरांचा वध झाला होता ! असें थोडा वेळ युद्ध करून तो शकुनि आपल्या अवशिष्ट सहा हजार अश्वसैन्यानिशीं रणांगणांतून निघून गेला. नंतर पांडवसैन्यहि आपले उरलेले सहा हजार अश्व घेऊन निघून गेले ! तेव्हां प्राणांवर उदार होऊन युद्ध करणारे ते पांडवांचे अश्वसादी म्हणाले, ‘जेथें रथांना देखील गति नाहीं, तेथें गजांनीं युद्ध करणें शक्य कसें होणार ? म्हणून रथांनीं रथ्यांवर व गजांनीं गजांवर चालून जावें; शकुनि रणांगण सोडून आपल्या सैन्यांत जाऊन राहिला आहे, तो पुनः युद्धाला येणार नाहीं !’

( ३ ) राजा, नंतर द्रौपदेय आपल्या मदोन्मत्त महागजांसह जेथें धृष्टद्युम्न होता, तेथें गेले आणि सहदेव सर्वत्र धुळीचे मेघ उठले असतां जेथें धर्मराज होता, तिकडे गेला. याप्रमाणें ते द्रौपदेय व सहदेवादि वीर रणांगण सोडून गेले असतां सौबल शकुनि पुनः मागें फिरला आणि संतापानें त्यानें धृष्टद्युम्नाच्या सैन्यावर पृष्ठभागाकडून चाल करून त्याचा संहार आरंभिला. तेव्हां पुनः मोठें भयंकर रणकंदन त्या दोन सैन्यांत सुरू झालें; त्यांत वीरांनीं परस्परवधेच्छेनें प्राणांचीहि पर्वा न करितां मोठ्या आवेशानें युद्ध केलें ! त्या युद्धांत शतावधि वीरांनीं परस्परांवर धांवत जाऊन अन्योन्यांचीं मस्तकें छिन्न केलीं, तेव्हां तालवृक्ष भूमीवर कोसळून पडत असतां जसा ध्वनि होतो, तसा होऊं लागला आणि त्याबरोबर वीरांचीं आयुधांसह छिन्न शरीरें, बाहु आणि मांड्या भूतलावर कोसळून त्यांचाहि भयंकर नाद अंगावर कांटा उभा राहील, असा ऐकूं येऊं लागला ! आमिषाकरितां पक्षी जसे अन्योन्यांवर धांवून येत असतात, त्याप्रमाणें उभय दळांतील वीर एकमेकांवर धांवून आले आणि प्रत्येक ‘मी पूर्वी,’ ‘मी पूर्वी,’ असें म्हणून शत्रूंचा संहार करूं लागला ! समरांगणांत इतके अश्वसादी आपल्या आसनांवर मृत होऊन पतन पावले कीं त्यांच्या खालीं सहस्रावधि

वीर चेंगरून मेले! त्यावेळीं विद्ध झालेले शीघ्रगामी अश्व खिंकाळत होते आणि कवचधारी वीर मोठ्यानें गर्जना करीत होते; तशांत तुझ्या दुष्ट उपदेशानें ते वीर एकमेकांच्या मर्मस्थळीं प्रहार करीत असतां शक्ति, ऋष्टि आणि प्रास यांचाहि तुमुल ध्वनि होत होता!

राजा, अशाप्रकारें तुझ्या सैन्यांतील ते क्षुब्ध योद्धे शेवटीं श्रांत झाले, त्यांचीं वाहनें दमून गेलीं, ते तृषापीडित झाले, शत्रूंच्या शस्त्राघातांनीं ते विद्ध झाले आणि अखेरीला ते युद्धपराङ्मुख झाले! राजा, त्या रुधिरगंधानें पुष्कळ वीरांना उन्माद झाला. त्यांचें देहभान नष्टप्राय होऊन जवळ आलेल्या सर्वांचा ते मित्र आहेत किंवा शत्रु आहेत, याचा विचार न करितां त्यांनीं वध केला! जयाच्या आशेनें युद्ध करणारे बहुत क्षत्रिय शरवृष्टीनें गतप्राण होऊन भूमीवर पडले! राजा, तुझ्या पुत्राच्या देखत तुझ्या सर्व सैन्याचा भयंकर क्षय होऊन वृक, गृध्र आणि कोल्हे यांना तो दिवस मोठ्या आनंदाचा गेला! हे राजा, सर्व भूमि नर आणि अश्व यांच्या प्रेतांनीं व्याप्त झाली, तेथें होणाऱ्या रक्तस्रावानें भीरुजनांला भयवर्धक असें भूमीला विचित्र स्वरूप प्राप्त झालें. खड्गें, पट्टिश आणि शूल यांच्या मारानें वीर एकमेकांचा सारखा संहार करूं लागले. त्यांनीं मरेपर्यंत यथाशक्ति शत्रूंवर शस्त्राघात केले; त्यायोगें व्रणांतून रक्तस्राव सुरू होऊन ते मृत होऊन पडले!

राजा, रणांगणांत एका हातांत केशयुक्त वीराचें मस्तक व दुसऱ्या हातांत रुधिरदिग्ध खड्ग घेऊन फिरणारीं कबंधें दिसूं लागलीं! त्या रुधिरगंधानें सर्वत्र युद्ध करणारे वीर मूर्च्छित झाले! अशाप्रकारें तो रणकल्लोळ जरा शांत होतो, तोंच त्या पांडवसेनेवर सौबल शकुनि आपल्या अल्प अश्वसैन्यानिशीं धांवून आला, तेव्हां पांडववीर आपले पदाति, गज आणि सादी यांसह त्यावर चालून गेले आणि त्यांनीं युद्धाचा शेवट लावण्याच्या इच्छेनें चारी बाजूंनीं वेढा घालून त्याच्यावर नानाविध शस्त्रांचे आघात सुरू केले! पांडववीर तुझ्या सैन्यावर चारी बाजूंनीं आलेले पाहतांच तुझें चतुरंग सैन्य पांडवांवर धांवून गेलें! तेव्हां तुझ्या कित्येक पदातींनीं आपलीं शस्त्रें नष्ट झाल्याचें पाहून केवळ मुष्टि व पादाघात यांनींच शत्रूंचा वध करून शेवटीं आपण पतन पावले! पुण्यक्षय झाला असतां सिद्ध जसे विमानांतून पडतात, तसे रथांतून रथी पडले व गजपृष्ठावरून गजसादी पडले! उभय सैन्यांत याप्रकारें संहार होत असतां वीरांनीं बाप, बंधु,

मित्र, पुत्र यांचाहि वध केला! अशाप्रकारें प्रास, खड्ग, बाण इत्यादि शस्त्रप्रहारांनीं तें युद्ध अत्यंत दारुण झालें! १. ९. २३.

---

## अध्याय २४ वा.

[ १ संकुलयुद्ध. २ अर्जुनपराक्रम. ]

( १ ) **संजय**—पांडवांनीं कौरवसैन्याचा संहार केला असतां रणभूमीवरील कोलाहल शांत झाला. तेव्हां शकुनि आपल्याकडील अवशिष्ट सातशें अश्वांसह पुनः युद्धभूमीवर आला आणि त्वरेनें आपल्या सैनिकांस बोलला, 'शत्रुसंहारक वीरहो, आवेशानें युद्ध करा!' नंतर त्यानें त्या क्षत्रिय वीरांस 'दुर्योधन राजा कोठें आहे?' म्हणून विचारिलें. तेव्हां ते म्हणाले, "तो पहा महाबल दुर्योधन राजा रणामध्यें उभा आहे! तें पहा पूर्णचंद्राप्रमाणें कांतिमान् छत्र त्याच्या मस्तकावर शोभत आहे! त्याच्या समीपभागीं कवचधारी वीर उभे आहेत पहा! आणि तेथूनच मेघध्वनीप्रमाणें ही तुमुल वीरगर्जना ऐकूं येत आहे! हे गांधारराजा, तूं त्या स्थळीं त्वरित जा म्हणजे तुला तो कौरवेश्वर भेटेल!" तें ऐकून तो शकुनि दुर्योधन जेथें उभा होता तेथें गेला. त्यावेळीं दुर्योधन आपल्या रथसैन्यामध्यें युद्धास सज्ज होऊन राहिला होता. शकुनीला पाहतांच सर्व रथ्यांना मोठा आनंद झाला. तो मोठ्या हर्षानें आपणाला कृतकार्य समजून दुर्योधनाला बोलला, "राजा, शत्रूंच्या सर्व अश्वसादींना मीं जिंकिलें आहे, तूं त्यांच्या रथसेनेचा नाश कर! जीविताची आशा सोडून युद्ध केल्याशिवाय युधिष्ठिराला जिंकणें शक्य होणार नाहीं! त्या पांडवांच्या रथसेनेचा नाश केला असतां हे गज, पदाति आणि इतर सैनिक यांचा आपण तत्काळ वध करूं!"

(२) राजा, याप्रमाणें शकुनीचें भाषण ऐकून ते जयेच्छु कौरववीर मोठ्या आवेशानें आपलीं धनुष्यें, बाण आणि तूणीर घेऊन पांडवसैन्यावर धांवून गेले आणि आपलीं धनुष्यें आकर्ण ओढून त्यांनीं सिंहनाद केले! नंतर धनुष्यांचे टणत्कार आणि त्यांबरोबर बाणवृष्टीचा ध्वनी करीत ते सर्व कौरववीर पांडवांच्या सेनेसमीप येऊन ठेपले! त्या धनुर्धारी कौरवांना पाहून कुंतीपुत्र अर्जुन श्रीकृष्णाला म्हणाला, "कृष्णा, मोठ्या सावधगिरीनें अश्वांना हांकून ह्या कौरवसेनेंत प्रवेश कर म्हणजे मी ह्या सर्व शत्रुसैन्याचा तीक्ष्ण बाणप्रहारांनीं त्वरीत नाश करितों!

जनार्दना, युद्धाला आरंभ होऊन आज अठरा दिवस झाले; ह्या काळांत उभयपक्षीय वीर परस्परांस गांठून त्यांचा वध करीत आहेत ! ह्या युद्धांत महारथ वीरांची असंख्य सेना युद्धामध्यें पतन पावली ! तेव्हां दैवाचा चमत्कार कसा विचित्र आहे तो पहा !

"माधवा, दुर्योधनाचें सैन्य सागराप्रमाणें अतिविस्तीर्ण होतें, परंतु आमच्यांशीं त्याची रणांगणांत गांठ पडल्यापासून त्या सैन्याची स्थिति गोष्पदाप्रमाणें झाली आहे ! भीष्माचा वध झाला, तेव्हां जर ह्यानें संधि केला असता, तर खरोखर त्याचें कल्याण झालें असतें, परंतु त्या मूर्खाला ती गोष्ट आवडली नाहीं. कृष्णा, भीष्माचें भाषण खरोखरच हितकर आणि तथ्य होतें, परंतु तें दुर्योधनानें ऐकिलें नाहीं ! भीष्माचा वध होऊन तो रणांत पडला असतां दुर्योधनानें पुनः युद्ध कां सुरू केलें हें समजत नाहीं ! शंतनुपुत्र भीष्माचा वध झाला असतां ज्यांनीं पुनः युद्ध चालविलें ते सर्व धार्तराष्ट्र खरोखरच मूर्ख होत असें मला वाटतें. पुढें तो श्रेष्ठ ब्रह्मवेत्ता द्रोण, तसेच कर्ण आणि विकर्ण यांचा वध झाला असतांहि हा संहार थांबला नाहीं ! तो नरव्याघ्र सूतपुत्र कर्ण सपुत्र वध पावला आणि सैन्यहि अल्पावशिष्ट राहिलें असतां हा क्षय थांबत नाहीं, याला काय म्हणावें ? कृष्णा, वीर श्रुतायुष, पुरुकुलोत्पन्न जलसंध आणि नृपति श्रुतायुध ह्यांचा वध झाला, तरीहि जनक्षय तसाच चालू आहे, तो थांबत नाहीं ! जनार्दना, भूरिश्रवा, शल्य, शाल्व, आवन्त्य वीर पतन पावले, तरी ह्या जनसंहाराचा अंत लागत नाहीं याला म्हणावें तरी काय ? तसेच जयद्रथ, अलायुध राक्षस, बाल्हिक, सोमदत्त, यांचा वध होऊनहि या जनसंहाराचा शेवट लागत नाहीं ! शूर भगदत्त, दारुण कांबोज आणि दुःशासन यांचा नाश झाला असतांहि हा प्राणनाश अजून थांबत नाहीं ! अनेक शूर वीर आणि बलवान् मांडलिक प्रभु यांचा युद्धांत क्षय झालेला पाहूनहि हा जनक्षय संपत नाहीं, याला काय म्हणावें ?

"भीमसेनानें अक्षौहिणी सेनेचा रणांगणावर वध केला असतां लोभानें किंवा मोहानें दुर्योधनानें युद्ध थांबविलें नाहीं ! दुर्योधनावांचून दुसरा कोणता राजकुलोत्पन्न आणि विशेषेंकरून कौरवेय पुरुष असलें निरर्थक मोठें वैर करण्यास प्रवृत्त होईल ! ज्याला आपलें हिताहित कशांत आहे हें समजतें असा कोण विचारी पुरुष आपल्यापेक्षां बलानें, शौर्यानें आणि गुणांनीं अधिक

अशा शत्रूशीं युद्ध करील ? कृष्णा, पांडवांबरोबर संधि करून स्नेहानें रहा म्हणून तूं स्वतः सांगितलें असतांहि ज्यानें तुझ्या हितकारक वचनाचा अनादर केला, तो दुसऱ्या कोणाचें कसें ऐकणार ? शांतनव द्रोण आणि विदुर पांडवांशीं शम कर म्हणून सांगत असतां ज्यानें त्यांचें ऐकिलें नाहीं, त्याला ताळ्यावर आणण्याला कोणतें औषध होतें ? जनार्दना, ज्यानें मूर्खपणानें आपल्या वृद्ध पित्याचें किंवा हितैषी मातेचेंहि कल्याणकारक भाषण ऐकिलें नाहीं, त्याचें बोलणें कोण बरें मान्य करील ? कृष्णा, हा दुर्योधन कुलाच्या अंताकरितांच जन्माला आला आहे ! ह्याचें वर्तन व नीति ह्यांचा विचार केला असतां तेंच दिसून येतें ! अच्युता, आपण होऊन हा कधींहि आम्हांला राज्य देणार नाहीं, अशी माझी समजूत आहे. कृष्णा, महात्म्या विदुरानें मला अनेकदां सांगितलें आहे कीं, 'जोंपर्यंत दुर्योधन जीवंत आहे तोंपर्यंत तो तुम्हांला राज्यभाग कधींहि देणार नाहीं ! जोंवर त्याच्या देहांत प्राण आहे, तोंवर तो दुर्मति तुम्हांशीं पापाचरण करील, म्हणून त्याला जिंकण्याला युद्धाशिवाय दुसरा मार्ग नाहीं !

"माधवा, अशाप्रकारें तो सत्यदर्शन विदुर मला सर्वदा सांगत असे; त्यानें सांगितल्याप्रमाणें त्या दुरात्म्याचे सर्व व्यवहार मला समजले आहेत ! कृष्णा, ज्यानें जामदग्न्याच्या हितावह व पथ्यकारक भाषणाचा अनादर केला, तो दुर्बुद्धि निःसंशय मृत्युमुखांतच उभा असला पाहिजे ! ह्या दुरात्म्या दुर्योधनाच्या जन्मकाळीं सिद्ध पुरुषांनीं असें सांगितलें आहे कीं ह्याच्यामुळें सर्व क्षत्रियांचा नाश होईल ! कृष्णा, तें त्यांचें म्हणणें आज सत्य ठरलें आहे; कारण ह्या दुर्योधनाच्या कृत्यांमुळें आज बहुतेक सर्व राजे नाश पावले आहेत ! म्हणून मी आज सर्व योद्ध्यांचा रणांगणांत वध करीन; याप्रमाणें सर्व क्षत्रियांचा संहार होऊन निखिल शिबिर शून्य झालें असतां आमच्याकडून आपला रणांत वध करून घेणें ह्याला आवडेल ! हे माधवा, ह्याच्या वधाबरोबरच आमच्या वैराचें सर्व कारणहि नष्ट होईल, असें माझें अनुमान आहे ! हे वार्ष्णेया, माझ्या विचारशक्तीनें, विदुराच्या भाषणानें व त्या दुरात्म्याच्या कृत्यांनीं हेंच दिसून येत आहे ! म्हणून हे वीरा कृष्णा, तूं शत्रूंच्या सैन्यावर रथ घेऊन जा, म्हणजे मी माझ्या तीक्ष्ण बाणांनीं दुर्योधन आणि त्याचें सकल सैन्य यांचा संहार करून टाकितों ! हे माधवा, आज मी दुर्योधनासमक्ष त्याच्या त्या दुर्बल सैन्याचा संहार करून धर्मराजाचें कल्याण करीन !"

संजय—राजा, ह्याप्रमाणें अर्जुनानें सांगतांच कृष्णानें हातांतील रश्मींनीं अश्वांना सूचना देऊन तो रथ धैर्यानें शत्रूंच्या मोठ्या सैन्यामध्यें नेला. त्यावेळीं कौरवसैन्य म्हणजे महान् अरण्यच होय, असें त्या कृष्णाला वाटलें. कुंत व खड्ग हें त्या अरण्यांतील तृण असून शक्ति हे त्यांतील कंटक होते; गदा आणि परीघ हे त्यांतील खडतर मार्ग असून रथ आणि गज हे तेथील वृक्ष होते ! अश्व व पदाति ह्या त्या वनांतील लता होत्या ! अशा वनांत तो यशस्वी कृष्ण आपल्या रथासह संचार करूं लागला, तेव्हां कृष्णप्रेरित ते शुभ्र अश्व अर्जुनाला रणांगणांत नेत असतां सर्व दिशांस दिसले ! त्या रथांतून अर्जुन समरभूमीवर आला आणि जलवृष्टि करणाऱ्या मेघांप्रमाणें त्यानें शत्रूंवर सारखी बाणवृष्टि केली; तेव्हां त्या बाणांचा भयंकर ध्वनि होऊं लागला ! अर्जुनाच्या घोर बाणवृष्टीनें कौरववीरांना झांकून काढिलें; नंतर ते बाण त्यांच्या कवचांत शिरले व त्यांच्या अंगांतून बाहेर भूमीवर पडले ! गांडीव धनुष्यापासून सुटलेल्या त्या बाणांचा नर, गज आणि अश्व यांवर प्रहार होतांच आपल्यावर जणुंकाय वज्राघातच झाला आहे कीं काय, असें त्यांस वाटलें ! त्या बाणांनीं सर्व भूभाग व्यापून टाकिले; रणांत ते बाण घोष करणाऱ्या पतंग पक्ष्यांप्रमाणें पडूं लागले; त्यामुळें सर्वत्र अंधकार पडून दिशा व उपदिशा ह्याहि ओळखतां येईनाशा झाल्या ! सर्व भूमितल पार्थनामांकित बाणांनीं व्याप्त झाल्यासारखें दिसूं लागलें ! तेव्हां ते कौरवगज पावकाप्रमाणें पार्थाकडून दग्धच होत आहेत, असें वाटूं लागलें ! तो शरचापधारी पार्थ सूर्यासारखा प्रज्वलित होऊन पेटणारा अग्नि जसा गवताला जाळून टाकितो, त्याप्रमाणें कौरवसैन्याला जाळून टाकूं लागला ! वनामध्यें ज्याप्रमाणें वन्य मनुष्यानें टाकिलेला अग्नि वृक्षांनीं व शुष्क लतापल्लवांनीं भरलेल्या अरण्यास मोठ्या आवेशानें जाळून टाकितो, त्याप्रमाणें अर्जुनाच्या बाणाग्नीनें तुझ्या सर्व सेनेला जाळून खाक केलें ! अर्जुनानें सोडलेले ते प्राणहर बाण इतक्या जोरानें कौरवसैन्यावर येऊन पडले कीं, त्यांनीं त्यांच्या कवचांचेंच केवळ विदारण न करितां त्यांबरोबर त्यांचे देहहि विदीर्ण केले ! त्यावेळीं अर्जुनाला नर, अश्व किंवा गज यांवर दुसरा बाण टाकण्याची आवश्यकताच वाटली नाहीं ! एकट्या त्यानें नानाप्रकारचे बाण शत्रुसैन्यावर सोडून इंद्रानें दैत्यांचा संहार केला, त्याप्रमाणें तुझ्या पुत्राच्या सर्व सेनेचा नाश केला ! ९. १. २४.

## अध्याय २५ वा.

[ १ कौरवसैन्याची दुर्धर अवस्था. २ धृष्टद्युम्नानें पराजित दुर्योधनाचें पलायन व अश्वत्थामादि कौरववीरांनीं चालविलेला त्याचा शोध. ]

( १ ) **संजय**—राजा धृतराष्ट्रा, ते शूर कौरववीर रणांत मृत्यु आला, तरी हरकत नाहीं, पण माघार म्हणून घ्यावयाची नाहीं, असा संकल्प करून युद्ध करीत असतां धनंजयाच्या गांडीव धनुष्यानें तो त्यांचा संकल्प विफल केला ! त्यावेळीं पर्जन्यवृष्टि करणाऱ्या मेघाप्रमाणें अर्जुन वज्रसदृश, दुःसह व तीक्ष्ण बाणांची वृष्टि शत्रूंवर करीत असतां दृष्टीस पडला ! अर्जुनानें आपला संहार चालविल्याचें पाहून त्या सैन्यानें दुर्योधनादेखत रथांतून पलायन केलें ! कित्येकांनीं बाप, बंधु व मित्र यांना रणांत सोडून पळ काढला, तर कित्येक रथ अश्वहीन व सारथिहीन झाले ! कित्येक रथांचे आंस, चक्रें, धुरा, ईषा इत्यादिकांचा भंग झाला, कित्येक वीरांचा बाणक्षय झाला, कित्येक सैनिक शरघातांनीं विह्वल झाले, तर कित्येक अक्षत असूनहि केवळ एकाएकीं भयानेंच पळत सुटले ! आपले बहुतेक बांधव हत झाले असतां पुत्रांस घेऊन कित्येक पळूं लागले, तर कित्येकांनीं संकटकालीं आपले वडील, बंधु, मित्र, बांधव आणि संबंधि जन यांच्या नांवानें आक्रोश करण्यास आरंभ केला ! त्याकालीं रणभूमीवर अनेक महारथ पार्थशरांनीं पीडित होऊन मूर्च्छित पडले होते ! ते केवळ श्वासोच्छ्वासावरून जीवंत असल्याचें दिसून येत होते. त्यांना दुसऱ्या रथ्यांनीं आपल्या रथांतून दूर नेलें आणि सावध केलें !

राजा, नंतर थोडी विश्रांति घेऊन व तृष्णापरिहार करून ते पुनः युद्धाकरितां निघाले ! कित्येक युद्धेच्छु वीरांनीं दुर्योधनाची आज्ञा मानून त्या व्रणार्त वीरांकडे किमपिहि न पाहतां युद्धभूमीकडे गमन केलें ! दुसऱ्या कित्येक वीरांनीं जलपान करून आपल्या अश्वांना ताजेतवाने करून अंगांत कवचें धारण केलीं आणि ते युद्धाकरितां निघाले ! कोणी वीर आपल्या बंधूंचें, कोणी पित्यांचें, तर कोणी आपल्या पुत्रांचें सांत्वन करून व त्यांस शिबिरांत ठेवून युद्धासाठीं रणांत आले ! कोणी वीर आपले रथ सज्ज करून पांडवांच्या सैन्यावर धांवून गेले आणि युद्ध करूं लागले ! ते वीर रथाधिष्ठित होऊन समरभूमीवर आले, तेव्हां त्रैलोक्यविजयाकरितां दैत्य-दानवच सिद्ध झाले आहेत, असें भासलें !

राजा, कौरवांकडील कित्येक योद्धे सुवर्णविभूषित रथांतून पांडवांच्या सैन्यावर एकदम चाल करून आले आणि त्यांनीं धृष्टद्युम्नाशीं युद्ध आरंभिलें! तेव्हां पांचाल्य धृष्टद्युम्न, महारथ शिखंडी आणि नकुलपुत्र शतानीक ह्यांनीं कौरवांच्या रथसैन्याशीं युद्ध सुरू केलें! त्यासमयीं धृष्टद्युम्न अत्यंत संतप्त झाला आणि मोठें सैन्य घेऊन तुझ्या सैनिकांचा वध करण्याच्या इच्छेनें त्यांजवर चालून आला! तुझ्या पुत्रानें त्यांजवर एकसारखी बाणवृष्टि केली आणि तीक्ष्ण व वेगवान् अशा नाराच, अर्धनाराच आणि वत्सदंत वगैरे बाणांनीं त्यानें त्याचें वक्षःस्थल व भुजप्रदेश अति विद्ध केले! अंकुशानें विद्ध झालेल्या गजाप्रमाणें अत्यंत क्षुब्ध होऊन त्या महाधनुर्धर धृष्टद्युम्नानें त्याचे चारहि अश्वांस यमसदनीं पाठविलें आणि एक भल्ल बाण टाकून त्याच्या सारथ्याचें मस्तक धडापासून वेगळें केलें! तें पाहून रथहीन दुर्योधन घोड्यावर बसला आणि आपलें सैन्य हतवीर्य झालेलें पाहून जवळच जेथें सौबल शकुनि होता, तिकडे निघून गेला!

राजा धृतराष्ट्रा, याप्रमाणें कौरवांच्या रथसैन्याचा पराजय झाला असतां कौरवांच्या तीन हजार महागजांनीं पांडवांच्या रथ्यांना वेढा दिला; ते पांच पांडवहि त्यावेळीं त्या गजानीकाकडून वेढले जाऊन पांच ग्रहच मेघपटलांनीं व्याप्त झाले आहेत असें दिसूं लागलें! तेव्हां तो महाभुज, श्वेताश्व व कृष्णसारथि अर्जुन कौरवांवर चालून आला! त्याला त्या पर्वतप्राय गजांनीं समंतात् चारी बाजूंनीं वेढिलें; परंतु अर्जुनानें आपल्या तीक्ष्ण नाराच बाणांनीं त्या गजसैन्याशीं युद्ध करून एकेका बाणानें त्या महागजांना मारून टाकिलें! तेव्हां कित्येक गज रणांत पडले आहेत, कांहीं पडत आहेत व कित्येक छिन्नभिन्न झाले आहेत, असें आम्हीं पाहिलें! इतक्यांत त्या गजांना पाहून भीमसेन मदोन्मत्त गजाप्रमाणें हातामध्यें आपली मोठी गदा घेऊन त्वरेनें रथांतून उतरला आणि दंडपाणि यमाप्रमाणें शत्रुसैन्यावर धांवून आला! गदा उभारलेल्या भीमाला पाहतांच तुझे सैनिक इतके भयभीत होऊन गेले कीं त्यांनीं मलमूत्रविसर्जनास आरंभ केला! त्या गदापाणि वृकोदरानें गदाप्रहारांनीं त्या गजांचीं गंडस्थलें भेदून टाकिलीं असतां ते मोठ्या आवेशानें सर्वत्र धांवत जातांना दृष्टीस पडले! पळून जात असतां आर्तस्वर काढून छिन्नपक्ष पर्वतांप्रमाणें ते भूमीवर एकदम पडले! त्या गजांना तशा स्थितींत पाहून तुझे

सैनिक भयग्रस्त होऊन गेले! इकडे युधिष्ठिर आणि माद्रीपुत्र ह्यांनीं देखील संतप्त होऊन त्या गजांवर तीक्ष्ण बाण मारून त्यांना यमसदनीं पाठविलें!

(२) राजा, धृष्टद्युम्नानें समरांत त्या दुर्योधनाचा पराजय केल्यावर तो दुर्योधन हयपृष्ठावर बसून निघून गेला! इतक्यांत सर्व पांडव गजांनीं वेढल्याचें पाहून तो धृष्टद्युम्न तत्काल पांडवांकडे वळला आणि त्या गजांचा वध करण्याच्या उद्देशानें त्यांच्यावर चालून गेला! तो शत्रुसंहारक दुर्योधन रथ-सैन्यांत नाहीं असें पाहून अश्वत्थामा, कृपाचार्य आणि सात्वत कृतवर्मा हे दुर्योधन कोठें गेला आहे, म्हणून त्या कुरुवीरांना विचारूं लागले! त्यांनीं सर्वत्र शोध करूनहि त्यांस तो आढळला नाहीं, तेव्हां चालू जनक्षयांत दुर्योधनाचा वध झाला असावा, असें त्या सर्वांस वाटलें! ते दीनमुखानें जो कोणी भेटेल त्याजकडे तुझ्या पुत्राची चौकशी करूं लागले! त्यांस कित्येकांनीं उत्तर दिलें कीं, 'दुर्योधनाचा सारथि हत झाला असतां धृष्टद्युम्नाशीं युद्ध करण्याचें सोडून देऊन तो सौबल शकुनि जिकडे होता तिकडे गेला!' तेव्हां अत्यंत विद्ध होऊन पडलेल्या कित्येक क्षत्रियांनीं कौरवांस विचारलें कीं, 'तुम्हांला दुर्योधनाशीं काय कर्तव्य आहे? तो जीवंत असेल, तर तुमची भेट होईल! तुम्ही सर्व एक होऊन शत्रूंशीं युद्ध करा! राजा दुर्योधन काय करणार आहे?' त्या क्षत्रिय वीरांचीं गात्रें क्षत होऊन त्यांचीं वाहनें नष्ट झालीं होतीं, शिवाय शत्रूंकडून त्यांजवर सारखा बाणप्रहारहि होत होता! ते म्हणाले, 'ज्यानें आम्हांला वेढून टाकिलें आहे, त्या पांडवसैन्यास आधीं वधिलें पाहिजे! हे पांडव त्या गजसेनेचा वध करून आम्हांवर धांवून येत आहेत पहा!'

राजा, तें भाषण ऐकून बलवान् अश्वत्थाम्यानें त्या धृष्टद्युम्नाच्या सेनेचा भंग केला आणि पुढें त्या रथसेनेशीं युद्ध न करितां कृपाचार्य व कृतवर्मा यांसह जेथें सौबल शकुनि होता, तिकडे तो निघून गेला! ते निघून गेल्यावर धृष्टद्युम्नादिक पांडववीर येऊन त्यांनीं तुझ्या सैन्याचा संहार चालविला! अशाप्रकारें ते पांडववीर मोठ्या रणोत्साहानें चालून आले असतां तुझ्या सैनिकांनीं प्राणांचीहि पर्वा न करितां मोठ्या शौर्यानें त्यांशीं युद्ध केलें! तेव्हां तुझ्या वीरांचीं मुखें म्लान होऊन गेलीं, त्यांचीं आयुधें नष्ट झालीं आणि तशांत शत्रुसैन्यानें त्यांस वेढा घातला, तें पाहून मी व दुसरे चार कौरवयोद्धे मिळून आपला जीव धोक्यांत घालून कौरवांच्या अल्प सैन्यानिशीं त्या पांचाल सैन्याशीं युद्ध केलें! परंतु अर्जुनाच्या भयंकर बाणप्रहारांनीं पीडित होऊन आम्ही धृष्टद्युम्न

जेथें होता, तिकडे आलों ! धृष्टद्युम्नानें तेथेंहि आमचा पराभव केल्यावर आम्हीं रण सोडून पळून गेलों ! इतक्यांत महारथ सात्यकि आमच्यावर चालून येत असल्याचें आम्हीं पाहिलें ! रणांगणावर त्यानें चारशें रथ्यांसह माझा पाठलाग केला. धृष्टद्युम्नाचे अश्व थकल्यामुळें मी कसातरी त्याच्या हातून सुटलों ! परंतु पातकी मनुष्याला जशी नरकप्राप्ति ठेवलेली, तसा मी त्या माधवाच्या सैन्याच्या हातीं लागून घटकाभर मोठें भयंकर युद्ध झालें ! तेव्हां महाबाहु सात्यकीनें माझ्या सर्व परिच्छदाचा संहार केला !

राजा, त्यावेळीं भीमसेनानें गदाप्रहारांनीं व अर्जुनानें आपल्या नाराच बाणांनीं त्या गजसैन्याचा संहार केला ! ते पर्वतप्राय गज रणभूमीवर सर्वत्र पड-ल्यामुळें पांडवांची गति बंद होऊन त्यांना जातां येईना ! भीमसेनानें इतस्ततः पडलेल्या त्या मृतगजांना एकीकडे केलें आणि रथमार्ग मोकळा केला ! इकडे अश्वत्थामा, कृपाचार्य आणि कृतवर्मा यांनीं त्या रथसेनेंत दुर्योधनाचा पुष्कळ शोध केला, परंतु तो सांपडला नाहीं ! तेव्हां ते त्याला शोधण्याकरितां पांचाल धृष्टद्युम्नास सोडून जेथें सौबल शकुनि होता तिकडे गेले ! युद्धांत आपल्या पक्षाचा झालेला भयंकर क्षय आणि दुर्योधनाचें अदर्शन यानें त्यांची स्थिति अत्यंत शोचनीय झाली. ९. १. २५.

## अध्याय २६ वा.

[ १ भीमाकडून दुर्योधनाच्या अकरा बंधूंचा वध. ]

( १ ) संजय—राजा धृतराष्ट्रा, पांडुपुत्र भीमसेनानें त्या गजसैन्याचा रणां-गणावर वध केल्यावर मग त्यानें तुझ्या सैन्याचा वध करण्यास आरंभ केला ! त्या शत्रुसंहारक भीमाला क्रुद्ध दंडधारी यमाप्रमाणें समरभूमीवर संचार करीत असतांना पाहून तुझे अवशिष्ट पुत्र एकत्र होऊन त्याजवर धांवून आले ! ते सर्व–दुर्मर्षण, श्रुतांत, जैत्र, भूरिबल, रवि, जयत्सेन, सुजात, दुर्विषह, दुर्वि-मोचन, दुष्प्रधर्ष व श्रुतर्वा—अकरा युद्धविशारद वीर एकत्र होऊन भीमावर धांवून गेले व त्यांनीं त्याला सर्व बाजूंनीं वेढून टाकिलें ! तेव्हां भीमसेन पुनः आपल्या रथांत चढून बसला आणि त्यानें तुझ्या पुत्राच्या मर्मस्थळीं तीक्ष्ण बाणवृष्टि करून त्यांना विद्ध केलें ! भीमानें अशारीतीनें त्यांची दाणादाण उडविली, तरी ते पुनः भीमावर चालून गेले आणि ज्याप्रमाणें गजाला कड्यावरून

लोटून त्याचा वध करितात, त्याप्रमाणें त्यांनीं भीमसेनाला रथांतून लोटून बधण्याचा प्रयत्न केला! तेव्हां भीमसेन क्रोधाविष्ट झाला आणि त्यानें दुर्मर्षणाचें मस्तक छेदिलें आणि तें भूतलावर पाडिलें! नंतर त्या भीमसेनानें दुसरा एक कवच-भेदी बाण टाकून तुझा पुत्र श्रुतांत याचा वध केला! नंतर हंसतहंसतच त्यानें एक नाराच बाण जयत्सेनावर टाकिला, त्यानें तो तत्काल रथांतून पडून मेला! तें पाहून श्रुतर्वा क्रोधसंतप्त झाला आणि त्यानें आनतपर्व शंभर गृध्रपुंख बाणांची वृष्टि भीमसेनावर केली तेव्हां भीमसेन अत्यंत क्षुब्ध झाला आणि त्यानें विषासारखे तीन प्राणहारक बाण जैत्र, भूरिबल आणि रवि यांवर टाकतांच ते गतप्राण होऊन रथांतून भूमीवर पडले! तेव्हां वसंतऋतूंत तोड-लेल्या किंशुक वृक्षांप्रमाणें त्यांचीं शरीरें रक्तवर्ण दिसलीं! नंतर त्या भीम-सेनानें दुसरा एक तीक्ष्ण भल्ल बाण टाकून दुर्मोचनाला गतप्राण केलें; तेव्हां तो महारथ तत्काल रथांतून भूमीवर पडला! त्यासमयीं पर्वतशिखरावर वाढ-लेला वृक्षच वाऱ्यानें कोसळून पडल्याचा भास सर्वांस झाला!

राजा, धृतराष्ट्रा, नंतर त्या भीमसेनानें तुझे पुत्र दुष्प्रधर्ष आणि सुजात यांवर प्रत्येकीं दोन दोन बाण टाकून रणाग्रभागीं त्यांचा वध केला! आपल्या बंधूंचा भीमानें केलेला वध पाहून दुर्विषह मोठ्या क्रोधानें भीमावर धांवून आला, परंतु आपल्यावर चाल करून येतांना त्याला पाहून भीमसेनानें एका बाणानें त्याला हतप्राण करून सर्व धनुर्धरांदेखत भूमीवर पाडलें! ह्याप्रमाणें आपल्या बहुतेक बंधूंचा भीमसेनानें रणांत वध केल्याचें पाहून श्रुतर्वा अनावर क्रुद्ध झाला आणि तो आपल्या सुवर्णविभूषित धनुष्याचें आस्फालन करीत विष किंवा अग्नि यांसमान बाण टाकीत त्या भीमसेनावर धांवून गेला आणि त्यानें त्याचें धनुष्य छेदून टाकिलें. नंतर त्यानें त्या छिन्नचाप वीरावर वीस बाण मारले! भीमसेनानें दुसरें धनुष्य घेतलें आणि तुझ्या पुत्रावर भारखी बाणवृष्टि करीत त्याला 'थांब, थांब' असें तो बोलला. त्यावेळीं त्या दोघांमध्यें पूर्वीं जंभासुर व इंद्र यांजमध्यें जसें युद्ध झालें, त्याचप्रमाणें महा-भयानक व अत्यद्भुत युद्ध झालें!

राजा, दोघांनींहि यमदंडासमान बाणांची परस्परांवर वृष्टि करून त्यांच्या योगें आकाश, पृथ्वी, दिशा आणि उपदिशा या सर्वांस आच्छादित करून टाकिलें. नंतर श्रुतर्वा क्षुब्ध होऊन त्यानें आपलें धनुष्य

सज्ज करून भीमसेनाच्या उरःस्थळावर व बाहूवर अनेक बाण टाकून त्याला विद्ध केलें! तुझ्या पुत्रानें बाणविद्ध केलेला भीमसेन पर्वकाळच्या समुद्राप्रमाणें अत्यंत क्षुब्ध झाला आणि त्यानें बाणवृष्टि करून तुझ्या पुत्राचे अश्व व सारथि यांना यमसदनीं पाठविलें. अशा रीतीनें त्याला विरथ केल्यावर भीमसेनानें त्याजवर लोमवाही बाणांची वृष्टि करून आपलें हस्तलाघव उत्तम प्रकारें दर्शविलें. नंतर त्या विरथ श्रुतर्व्यानें खड्ग-चर्म हीं धारण केलीं, इतक्यांत त्या भीमसेनानें एक क्षुरप्र बाण टाकून त्याचें मस्तक छेदिलें; नंतर तें त्याचें शरीर रथांतून कोसळून पृथ्वीतलावर पडलें; त्यामुळें मोठा आवाज होऊन सर्व पृथ्वी दणाणून गेली!

राजा, याप्रमाणें तो वीर श्रुतर्वा रणांत पडला, तुझे सैनिकहि भयव्याकुल होऊन गेले, तरी त्या विजयेच्छूंनीं रणांत भीमसेनावर चाल केली! ते अवशिष्ट कौरवसैनिक अंगांत कवचें घालून आपल्यावर चालून येत आहेत, असें पाहून तो प्रतापी भीमसेन त्यांच्यांशीं युद्धास सज्ज झाला! त्या कौरववीरांनीं त्याला चारी बाजूंनीं वेढा दिला. भीमसेनानें, इंद्रानें जसें असुरांस त्रासवून सोडलें, त्याप्रमाणें आपल्या तीक्ष्ण बाणांनीं त्या कौरववीरांस जर्जर करून सोडलें! त्यासमयीं भीमसेनानें पांचशें कवचधारी कौरव रथ्यांचा वध केला! अशाप्रकारें तुझ्या पुत्रांचा रणांत वध केल्यावर भीमसेनाला मोठी धन्यता वाटली व आपलें जन्म सफल झालें असें त्यानें मानिलें. यावेळीं त्याच्या चेहऱ्यावर अपूर्व तेज झळकूं लागलें. तो भीमसेन तुझ्या सैन्याचा रणांगणांत असा संहार करीत असतां तुझ्या वीरांपैकीं कोणाच्यानेंहि त्याजकडे पाहवलें नाहीं. भीमसेनानें त्या कौरवांना पळवून लावून त्यांच्या सर्व अनुचरांचा वध केला आणि भुज ठोकून असा भयंकर आवाज केला कीं त्याच्या योगानें मोठमोठे गजहि भयभीत होऊन गेले! अशाप्रकारें तुझ्या बहुतेक वीरांचा वध भीमानें केल्यावर ती अल्प कौरवसेना अगदीं दीन दिसूं लागली! ९. १. २६.

---

## अध्याय २७ वा.

[ १ कृष्णार्जुनांचें संभाषण. २ संकुलयुद्ध. ३ भीमाकडून सुदर्शन व सुशर्मा नांवांच्या दुर्योधनाच्या कनिष्ठ बंधूंचा वध. ]

( १ ) **संजय**—राजा, त्यावेळीं तुझे पुत्र दुर्योधन व सुदर्शन हे अश्वसादींमध्यें होते. तेथें त्या दुर्योधनाला पाहून देवकीपुत्र कृष्ण अर्जुनाला म्हणाला, "अर्जुना, आम्हीं बहुतेक शत्रूंचा वध केला आहे, ज्ञातिजनांचेंहि संरक्षण केलें आहे आणि शिनिपुंगव सात्यकीनें संजयाला जीवंत धरून आणलें आहे. त्या पापी धार्तराष्ट्रांशीं व त्यांच्या अनुयायांशीं युद्ध करीत असतां हे नकुल-सहदेव अत्यंत श्रांत झाले आहेत. अश्वत्थामा, कृपाचार्य आणि कृतवर्मा हे तिघे दुर्योधनाला सोडून दुसरीकडेच फिरत आहेत. हा पांचाल्यराज धृष्टद्युम्न दुर्योधनाच्या सर्व सैन्याचा वध करून प्रभद्रक वीरांसह आपल्या दिव्य कांतीनें शोभत आहे. पार्था, हा पहा दुर्योधन राजा अश्वांमध्यें उभा आहे; त्याच्या मस्तकावर छत्र विलसत असून तो वरचेवर सभोंवतीं पहात आहे! त्यानें आपल्या सैन्याची उत्तम व्यवस्था करून युद्धाकरितां तो रणांत उभा आहे. ह्याचा जर तूं आपल्या तीक्ष्ण बाणांनीं वध करशील, तर तूं कृतकृत्य होशील. हे शत्रुनाशना अर्जुना, गजसैन्याचा संहार केलेला पाहून हे कौरव तुझ्यावर धांवून येण्यापूर्वींच तूं या दुर्योधनाचा वध कर! त्या पांचाल्य धृष्टद्युम्नाला शीघ्र बोलावण्याकरितां कोणीं तरी जावें. अर्जुना, सांप्रत दुर्योधनाचें सर्व सैन्य थकून गेलें आहे, म्हणून यावेळीं त्या पाप्याला मोकळा सोडणें योग्य होणार नाहीं. रणांगणावर तुझ्या सैन्याचा वध करून आतां आपण सर्व पांडवांना जिंकिलें आहे असा त्याला मोठा गर्व झाला आहे. परंतु आपलें सैन्य पांडवांनीं वधिलें असून अवशिष्ट सैन्याला ते पीडा देत आहेत, हें पाहून तो दुर्योधन आपल्या स्वतःच्या वधाकरितां निःसंशय रणभूमीवर येईल!"

राजा, कृष्णाचें भाषण ऐकून अर्जुन त्याला म्हणाला, "माधवा, भीमसेनानें धृतराष्ट्राच्या बहुतेक सर्व पुत्रांचा वध केला आहे! त्यांपैकीं दोघेच आज जीवंत आहेत, त्यांचाहि वध आतां होईल! कृष्णा, भीष्म, युद्धांत पतन पावला, द्रोणाचा वध झाला, कर्ण समरांगणांत मृत्युमुखीं पडला, मद्रराज शल्य हत झाला, जयद्रथहि मारला गेला; आतां शकुनीचे पांचशें अश्व, दोनशें रथ, शंभर गज आणि तीन हजार पदाति इतकें सैन्य अवशिष्ट आहे! कृष्णा, दुर्योधनाकडचे

प्रबळ वीर म्हणजे अश्वत्थामा, कृप, त्रिगर्ताधिप, उलूक, शकुनि आणि कृतवर्मा हेच काय ते जीवंत आहेत! यावरून कृष्णा, कालाच्या हातून या लोकीं कोणाचीहि सुटका कधीं होणें शक्य नाहीं. इतक्या कौरवसैन्याचा वध झाला असूनहि दुर्योधन युद्धाला सज्ज होऊन स्थित आहे! पण इतकें खरें आहे कीं आज दिवस संपण्यापूर्वीं युधिष्ठिर राजा निःशत्रु होईल. माझी खात्री आहे कीं शत्रूंपैकीं कोणी माझ्या हातून आज सुटून जाईल, असें मला वाटत नाहीं! जे मदोन्मत्त योद्धे समरांगण सोडून पळून जाणार नाहींत, ते अमानुष कोटींतील असले तरी त्या सर्वांचा वध मी आज करीन! मी तीक्ष्ण बाणांनीं आज शकुनीचा वध करून धर्मराजाला दीर्घ काल लागलेली चिंता दूर करीन! कुरुसभेंत द्यूतप्रसंगीं त्या दुष्टानें आमच्याकडून जीं जीं रत्नें हरण केलीं, तीं सर्व आज मी त्याजकडून परत मिळवीन! आपले पति, पुत्र इत्यादिकांना पांडवांनीं युद्धांत मारलेलें ऐकून हस्तिनापुरांतील स्त्रिया आज मोठा आक्रोश करतील! कृष्णा, अशा रीतीनें माझें कर्तव्य आज संपेल! राजा दुर्योधन माझ्या भीतीनें युद्ध-विमुख होत्साता रणांगण सोडून निघून जाणार नाहीं, तर तो आज आपल्या दिव्य राजलक्ष्मीला आणि प्राणांला निःसंशय मुकेल! कृष्णा, आमच्यांशीं मूर्खपणानें युद्ध करणारें हें अश्वसैन्य मीं आतां मारून टाकिलेंच आहे असें समज! माझ्या धनुष्याचा घोषहि सहन करण्यास हें समर्थ नाहीं. कृष्णा, तूं आतां रथ हांक, तोंवर मी त्याचा संहार करितों!"

(२) राजा धृतराष्ट्रा, अर्जुनाचें भाषण ऐकून कृष्णानें आपला रथ दुर्योधनाच्या सैन्यावर चालविला. तें दुर्योधनसैन्य पाहून पांडवांकडील आणखी दोन वीर–भीमसेन व सहदेव–हे त्यावर चालून गेले! नंतर त्या तिघांनीं मिळून दुर्योधनाचा वध करण्याच्या इच्छेनें मोठा सिंहनाद केला. अशारीतीनें मोठ्या वेगानें आपल्यावर चालून येणारें तें शत्रुसैन्य पाहून शकुनि त्यावर धांवून आला. त्यासमयीं तुझा पुत्र सुदर्शन यानें भीमसेनाशीं युद्ध आरंभिलें, सुशर्मा आणि शकुनि यांनीं किरीटी अर्जुनाला युद्धार्थ गांठिलें आणि दुर्यो-धनानें अश्वारूढ होऊन सहदेवावर चाल केली! त्यानें आपल्या प्रासाचा प्रहार सहदेवाच्या मस्तकावर करून त्याला विद्ध केलें, त्यामुळें तो विव्हल होऊन रथोपस्थावरच बसून राहिला. त्यावेळीं त्याच्या शरीरांतून सारखा रक्तस्राव होऊं लागला आणि तो सर्पासारखे निश्वास टाकूं लागला! कांहीं वेळानें सहदेव सावध झाला आणि क्षुब्ध होऊन त्यानें दुर्योधनावर तीक्ष्ण बाणांची वृष्टि सुरू

केली. इतक्यांत अर्जुनहि क्रोधसंतप्त झाला आणि त्यानें मोठ्या शौर्यानें कौरवयोद्ध्यांचीं मस्तकें छेदून टाकिलीं! अर्जुनानें आपल्या बाणवृष्टीनें सर्व शत्रुसैन्याचा आणि अश्वसादींचा वध केला आणि नंतर तो त्रिगर्तांच्या रथ्यांवर चालून गेला. नंतर ते त्रिगर्तांचे सर्व महारथ एकत्रित होऊन त्यांनीं अर्जुन व कृष्ण यांवर सारखी बाणवृष्टि केली! तेव्हां अर्जुनानें सत्यकर्म्यावर एक क्षुरप्र बाण टाकून त्यास विद्ध केलें आणि त्याच्या रथाची ईषा छेदून टाकिली; एका तीक्ष्ण क्षुरप्र बाणानें त्याचें कुंडलविभूषित मस्तक तोडलें. आणि बुभुक्षित सिंह वनामध्यें जसा मृगावर उडी टाकून जातो, तसा तो अर्जुन सत्येषूवर धांवून गेला आणि सर्व कौरवांच्या देखत त्याचा वध केला!

( ३ ) राजा, नंतर त्यानें तीन बाण टाकून सुशर्म्यास विद्ध केलें आणि त्याच्या सुवर्णविभूषित सर्व रथांचा संहार केला! अशाप्रकारें तो अर्जुन बरेच दिवस सांठवून ठेविलेलें क्रोधविष ओकीत त्या प्रस्थलाधिपति सुशर्म्यावर चालून गेला आणि त्यानें शंभर बाण टाकून त्याच्या अश्वांचा वध केला! नंतर एक भयंकर बाण त्यानें त्या सुशर्म्यावर सोडला! त्या बाणानें सुशर्म्याचें हृदय भेदून त्याला भूतलावर पाडलें! सुशर्मा रणांत पतन पावल्याचें पाहून पांडवांना मोठा आनंद झाला आणि तुझे सैनिकांना अत्यंत दुःख झालें! अशा रीतीनें त्या सुशर्म्याचा वध केल्यावर त्याच्या पंचेचाळीस महारथ पुत्रांचा बाणांनीं वध त्या अर्जुनानें केला आणि तीक्ष्ण बाणवृष्टि करून त्याच्या अनुयायांनाहि मारलें! मग तो अर्जुन अवशिष्ट कौरवसैन्यावर धांवून गेला! राजा धृतराष्ट्रा, इतक्यांत तुझा पुत्र सुदर्शन ह्यावर भीमसेनानें अत्यंत संतप्त होऊन हंसत हंसत बाणप्रहार केला आणि एका तीक्ष्ण क्षुरप्र बाणानें त्याचें मस्तक उडविलें आणि त्याला गतप्राण करून भूमीवर पाडलें!

राजा धृतराष्ट्रा, सुदर्शनाचा वध झाला असतां त्याच्या अनुयायांनीं भीमसेनावर मोठी शरवृष्टि करून त्याला सर्व बाजूंनीं आच्छादित केलें! त्यासमयीं भीमसेनानें इंद्रवज्राप्रमाणें तुझ्या सैन्यावर तीक्ष्ण बाणांचा वर्षाव चारी बाजूंनीं करून त्याला वधिलें! तेव्हां तुझ्या प्रमुख महारथांनीं भीमावर चालून जाऊन त्याशीं घोर युद्ध सुरू केलें! तेव्हां उभय वीरांनीं परस्परांवर बाणवृष्टि करून अन्योन्यांना आच्छादून टाकिलें. तीं सैन्यें परस्परांच्या बाणप्रहारांनीं

विह्वल होऊन पडलीं असतां आपापल्या बांधवांसंबंधीं दोन्ही दळांत एकच हाहाकार उडाला ! ९. १. २७.

## अध्याय २८ वा.

[ १ युद्धभूमिवर्णन. २ शकुनीचा वध. ]

( १ ) **संजय**—राजा, धृतराष्ट्रा, गज, अश्व आणि नर यांचा भयंकर क्षय-करणारें असें मोठें युद्ध कुरु-पांडवांमध्यें प्रवृत्त झालें व सौबल शकुनि सहदेवावर धांवून गेला. शकुनि आपल्यावर चालून येत असल्याचें पाहून सहदेव शीघ्र-गामी पक्ष्याप्रमाणें सारखा त्याजवर बाणवर्षाव करीत चालून आला. त्यासमयीं उलूकानें भीमसेनावर दहा बाण मारले व शकुनीनें तीन बाण त्यावर मारून सहदेवावर नव्वद बाणांची वृष्टि केली. राजा, तेव्हां उभयदळांतील वीरांनीं रणांत एकमेकांना गांठून परस्परांवर शिलाधौत तीक्ष्ण कंकपिच्छ व मयूरपिच्छ बाणांचा प्रत्यंचा आकर्ण ओढून वर्षाव केला. तेव्हां जणुंकाय मेघच पर्जन्यवृष्टीनें सर्व दिशा आच्छादित करीत आहेत, असा भास झाला. भीमसेन व सहदेव हे अत्यंत क्रुद्ध होऊन रणांगणांत शत्रूंचें कंदन करूं लागले. त्या दोघांनीं शतावधि बाण मारून तुझें सैन्य आच्छादित केलें, त्यामुळें सर्वत्र आकाश अंधकारानें व्याप्त झालें. त्यावेळीं अनेक शरविद्ध अश्व मृत वीरांस घेऊन जिकडे-तिकडे पळत सुटले, त्यामुळें मार्गहि बंद झाला. तेव्हां अनेक अश्व व अश्वसादी मरून त्यांचीं छिन्न झालेलीं कवचें, प्रास, ऋष्टि, शक्ति, भाले, खड्गें आणि कुऱ्हाडी यांचे ढीग पडून सर्व भूमि अनेक प्रकारच्या पुष्पांनीं व्याप्त झाल्या-प्रमाणें विचित्र दिसूं लागली. उभय दळांतील वीर मोठ्या क्रोधानें परस्परांचा वध करीत समरभूमीवर संचार करूं लागले. ते क्रोधानें डोळे वटारून व दांत ओंठ खाऊन परस्परांवर प्रहार करीत होते. ज्यांची कांति कमलाप्रमाणें शोभत असून कानांत कुंडलें विराजत आहेत, अशा वीरमस्तकांनीं पृथ्वी आच्छादित झाली. राजा धृतराष्ट्रा, गजांच्या शुंडादंडासमान छिन्न झालेले वीरांचे बाहु, त्यांचीं कवचें, अंगद, खड्ग, प्रास आणि कुऱ्हाडी हीं सर्वत्र भूमीवर पसरलीं होतीं. त्या वीरांचीं छिन्न कबंध उठून एकमेकांसह रणभूमीवर नाचूं लागलीं आणि सर्वत्र हिंस्र प्राणी गोळा होऊन पृथ्वीच स्वरूप घोर दिसूं

लागलें. त्या महायुद्धामध्यें कौरवांचें सैन्य अल्पावशिष्ट राहिलें असतां पांडवांनीं मोठ्या आवेशानें यमसदनीं पाठविलें !

इतक्यांत त्या पराक्रमी सौबल शकुनीनें सहदेवाच्या मस्तकावर प्रास मारून त्याला विद्ध केलें. त्यामुळें सहदेव विह्वल होऊन वीरासनावर बसला. तें पाहून भीमसेनानें त्या कौरवसैन्यावर चाल करून त्याचा प्रतिकार केला आणि शतावधि व सहस्रावधि कौरवांना नाराच बाणांनीं वधून तो मोठ्यानें सिंहनाद करूं लागला ! तेव्हां शकुनीचे अनुयायी भयत्रस्त होऊन आपले गज, अश्व व पदाति यांसह पळूं लागले. आपलें सैन्य पळून जात असल्याचें पाहून दुर्योधन त्या सैनिकांस म्हणाला, " अधर्मज्ञ वीरहो, मागें परता, असें पळून जाण्यांत तुम्हांला कोणता लाभ होणार ? युद्धांत शत्रूला पाठ न दाखवितां जो वीर प्राणत्याग करितो, तो ह्या लोकीं कीर्ति मिळवून मेल्यावरहि पुण्यलोकाला जातो !"

असें दुर्योधनाचें भाषण ऐकून ते शकुनीचे अनुयायी जिवावर उदार होऊन पांडवांवर धांवून गेले; ते मोठमोठ्यानें गर्जना करूं लागले, तेव्हां ते क्षुब्ध झालेल्या सागराप्रमाणें दिसूं लागले. शकुनीचे अनुयायी आपल्यावर चालून येत आहेत असें पाहून त्या विजयेच्छु पांडवांनीं त्यांच्यावर चाल केली, इतक्यांत सहदेवहि सावध झाला आणि त्यानें शकुनीवर दहा बाण टाकिले; त्याचे अश्वांवर तीन बाण सोडले आणि हंसत आणखी बाण मारून त्याचें धनुष्यहि छेदिलें ! शकुनीनें दुसरें धनुष्य घेतलें आणि नकुलावर साठ व भीमावर सात बाण मारिले ! इकडे उलूकानें आपल्या पित्याच्या रक्षणाकरितां भीमावर सात व सहदेवावर सत्तर बाण सोडले. तें पाहून भीमानें त्यावर नऊ, शकुनीवर चौसष्ट आणि त्याचे पार्श्वभागीं राहून त्याचें रक्षण करणाऱ्या वीरांवर प्रत्येकीं तीन बाण टाकिले ! भीमसेनानें त्या कौरववीरांवर असा बाणप्रहार करतांच अत्यंत क्रोधाविष्ट होऊन त्यांनीं शरवृष्टी करून सहदेवाला आच्छादून टाकिलें ! तेव्हां विद्युल्लतेनें युक्त मेघच पर्वतावर जलवृष्टी करीत असल्याचा भास सर्वांस झाला. त्यावेळीं त्या प्रतापी सहदेवानें एक भल्ल बाण सोडून उलूकाचें मस्तक तत्काळ छेदून टाकलें. तेव्हां उलूक रथांतून भूमीवर एकदम पडला. त्यावेळीं त्याचें शरीर रक्तबंबाळ झालें होतें. उलूक मृत होऊन पडतांच पांडवांना अत्यानंद झाला !

राजा धृतराष्ट्रा, आपला पुत्र उलूक रणांत पडला असें पाहून शकुनीचा कंठ भरून आला आणि तो दुःखानें सुसकारे टाकूं लागला. तेव्हां त्यास विदुराच्या भाषणाचें स्मरण झालें. बाष्पपूर्ण नेत्रांनीं त्यानें किंचित्काल विचार केला आणि निश्वास टाकीत तो सहदेवावर चालून आला व तीन बाण टाकून त्यानें त्याला विद्ध केलें ! राजा, तेव्हां त्या प्रतापी सहदेवानें आपल्या शरसंधानीं त्या बाणांचा निरास करून शकुनीचें धनुष्य छेदून टाकिलें ! नंतर शकुनीनें आपलें प्रचंड खड्ग घेऊन तें सहदेवावर फेंकलें. तेव्हां सहदेवानें हंसतहंसतच त्या खड्गाचे दोन तुकडे केले ! तें पाहून शकुनीनें आपली मोटी गदा उचलून ती सहदेवावर फेंकली; परंतु तीहि विफल होऊन भूमीवर पडली ! मग शकुनीनें कालरात्रीप्रमाणें अत्यंत घोर अशी एक शक्ति त्या सहदेवावर फेंकली, परंतु त्यानें आपल्या सुवर्णभूषित शरांनीं त्या शक्तीचे तीन तुकडे करून ती भूतलावर पाडली ! शक्तीचा झालेला विनाश आणि शकुनीची ती भयविह्वल स्थिति अवलोकन करून तुझे सर्व वीर भयानें पळत सुटले ! त्यावेळीं पांडवांना आपला विजय झाल्यासारखें वाटून ते मोठमोठ्यानें गर्जना करूं लागले ! तेव्हां बहुतेक कौरव वीर युद्धपराङ्मुख झाले आणि त्यांची ती भयाकुल स्थिति पाहून सहदेवानें त्यांजवर हजारों बाण टाकून त्यांचें निवारण केलें !

(२) राजा, इतक्यांत गांधारदेशांतील सदृढ अश्वांच्या बळावर अजूनहि जयाची आशा करणारा सौबल शकुनि त्या पांडवांवर धांवून आला असतां तो आपला भाग आहे असें समजून सहदेव त्यावर चालून आला आणि आपले धनुष्यास प्रत्यंचा जोडून तो त्याचें आस्फालन करूं लागला ! नंतर त्यानें सौबलावर चाल करून आपले शिलाधौत तीक्ष्ण बाण त्या शकुनीवर मारिले आणि अंकुशांनीं जसें गजाला विद्ध करावें, त्याप्रमाणें पुनःपुनः त्याला बाणप्रहारांनीं अतिविद्ध केलें ! त्यासमयीं सहदेवानें शकुनीला पूर्वीचें स्मरण देऊन सांगितलें, "हे शकुने, आज तूं क्षात्रधर्माप्रमाणें वागून माझ्याशीं शौर्यानें युद्ध कर ! दुर्मते, पूर्वीं सभेमध्यें द्यूतप्रसंगीं जो तुला मोठा आनंद झाला होता, त्याचें फल आज तुला निःसंशय प्राप्त होईल. जे जे दुरात्मे पूर्वीं आम्हांला हसले, त्या सर्वांचा ह्यापूर्वींच वध झाला आहे ! तो कुलांगार दुर्योधन आणि त्याचा दुष्ट मातुल तूं एवढे आतां अवशिष्ट राहिले आहां ! वृक्षावर लगुडाचा प्रहार करून जसें त्याचें फल पाडावें, त्याप्रमाणें आज मी तुजवर क्षुर बाणांच्या आघातांनीं तुझें मस्तक छेदून टाकीन !" राजा, याप्रमाणें त्या प्रतापवान्

माद्रीपुत्र सहदेवानें भाषण केलें. नंतर तो मोठ्या क्रोधानें शकुनीवर धांवून गेला आणि आपल्या धनुष्याची कानाडी जोरानें ओढून त्याला दहा बाणांनीं विद्ध केलें. मग चार बाणांनीं त्याच्या चारहि अश्वांस विद्ध करून त्याचा ध्वज, छत्र आणि धनुष्य यांचा संहार केला आणि सिंहाप्रमाणें गर्जना केली. सहदेवानें आणखीहि अनेक बाण टाकून त्यांचीं सर्व मर्मस्थळें विद्ध केलीं! तें पाहून त्या सौबल शकुनीनें मोठ्या क्रोधानें त्या माद्रीपुत्र सहदेवाचा वध करण्याच्या उद्देशानें आपला सुवर्णभूषित प्रास घेऊन त्यावर धांवून गेला. तेव्हां सहदेवानें शकुनीच्या हातांतील प्रास आणि त्याचे बळकट बाहु तीन भल्ल बाणांनीं तोडून रणांगणामध्यें मोठ्यानें गर्जना केली. नंतर त्यानें एक बळकट सुवर्णपुंख भल्ल बाण घेऊन व उत्तम नेम साधून शकुनीचें मस्तक छेदून टाकिलें!

राजा धृतराष्ट्रा, अशा रीतीनें त्या सहदेवानें कौरवांच्या सर्व अनर्थांचें कारण असें तें शकुनीचें मस्तक खालीं पाडलें; त्याबरोबरच त्याचें धडहि भूमीवर कोसळून पडलें. शकुनीचें तें रुधिरदिग्ध शरीर रथांतून जमिनीवर पडलेलें पाहून तुझे योद्धे भयभीत झाले व आपापलीं शस्त्रास्त्रें घेऊन ते पळत सुटले! त्यासमयीं कौरववीरांचीं मुखें सुकून गेलीं, त्यांचें देहभानहि नष्ट झालें, आणि गांडीवधनुष्याचे घोषानें त्यांची स्थिति अत्यंत भयप्रद झाली! त्याप्रमाणें आपलें चतुरंग सैन्य भयव्याकुल होऊन गेल्याचें पाहून ते सर्व कौरववीर पळून गेले! राजा, सहदेवाच्या हस्तें शकुनीचा वध होऊन तो रथांतून खालीं पडला असतां सर्व पांडवांना अत्यंत हर्ष झाला; ते कृष्णासह समरांगणावर मोठ्या उत्साहानें शंख वाजवूं लागले; त्यांनीं सहदेवाचें आदरपूर्वक गौरव केलें आणि म्हटलें, 'वीरा, तूं त्या दुष्ट शकुनीचा व त्याच्या उलूक पुत्राचा वध केलास, ही किती मोठ्या भाग्याची गोष्ट आहे म्हणून सांगावी?' ९. १. २८.

येथें पहिलें शल्याभिषेकपर्व समाप्त झालें.

---

# ऱ्हदप्रवेशपर्व २.

## अध्याय २९ वा.

[ १ शकुनिसैन्याचा पांडवांनीं केलेला संहार. २ दुःखग्रस्त दुर्योधनानें पळून जाण्याचा केलेला निर्धार. ३ धृष्टद्युम्नाच्या हातून संजयाची सुटका. ४ संजय हस्तिनापुराला निघाला असतां वाटेंत दुर्योधनाशीं भेट. ५ दुर्योधन आपला ऱ्हद-प्रवेश धृतराष्ट्राला कळवितो. ६ कृप, अश्वत्थामा व कृतवर्मा यांना दुर्योधनाचा शोध. ७ वृद्धलोक व संजय राजस्त्रियांस नगराकडे घेऊन निघतात. ८ राजवाड्यांत सर्वत्र हाहाकार. ]

( १ ) **संजय—सहदेवानें शकुनीचा वध केल्यावर ते सौबलानुयायी अत्यंत क्रुद्ध झाले व जिवावर उदार होऊन पांडवांना त्यांनीं समरांगणांत वेढिलें. तेव्हां सहदेवाच्या जयाविषयीं उत्सुक असलेला अर्जुन व क्रुद्ध सर्पाप्रमाणें दिसणारा तेजस्वी भीमसेन त्यांवर धांवून गेले आणि ऋष्टि, शक्ति, प्रास इत्यादि आयुधें घेऊन सहदेवाचा वध करण्याच्या हेतूनें चालून येणाऱ्या त्या वीरांचा उद्देश अर्जुनानें आपल्या गांडीव धनुष्याच्या योगानें व्यर्थ घालविला. त्यानें आपल्यावर धांवून येणाऱ्या त्या सशस्त्र वीरांचे बाहु भल्ल बाणांनीं तोडले, मस्तकें छेदिलीं आणि त्यांच्या अश्वांचाहि वध केला. तेव्हां ते गतप्राण अश्व जमिनीवर पडले. नंतर आपल्या सैन्याचा नाश झालेला पाहून त्या क्रुद्ध झालेल्या दुर्योधनानें अवशिष्ट रथसमूह, गज, अश्व आणि पदाति यांना एकत्र केलें आणि तो बोलला, ' वीरहो, सर्व पांडव, त्यांचे सुहृद्गण आणि ससैन्य पांचाल्य धृष्टद्युम्न यांचा आधीं वध करा आणि नंतर मागें फिरा ! '**

( २ ) **राजा धृतराष्ट्रा, तेव्हां त्या युद्धदुर्मद कौरववीरांनीं दुर्योधनाचें भाषण शिरसा मान्य करून त्याच्या आज्ञेनुसार ते सर्व पांडवांवर चालून गेले ! त्यांवर पांडवांनीं सर्पाकार बाणांचा प्रहार केला व थोड्याच वेळांत तें सर्व सैन्य नाश पावलें ! त्यावेळीं त्यांना त्राता कोणीच सांपडला नाहीं. अंगांत कवचें घालून युद्धार्थ पुढें निघालेल्या त्या कौरववीरांनीं माघार घेतली नाहीं. धांवणारे अश्व आणि चालून जाणारे सैनिक यांच्यायोगें सर्वत्र धूळ उडून दिशा, उपदिशा समजणें कठीण झालें. यासमयीं अनेक पांडववीर सैन्यांतून बाहेर**

पडले आणि त्यांनीं मुहूर्तभर तुझ्या सैनिकांचा सारखा वध चालविला. राजा, तेव्हां तुझा असा कोणीच वीर अवशिष्ट राहिला नाहीं. हे भारता, तुझ्या पुत्राचें एकत्रित झालेलें अकरा अक्षौहिणी सैन्य पांडु-सृंजयांच्या हातीं वध पावलें ! तुझ्या पक्षाकडील सहस्त्रावधि नृपांपैकीं एकटा दुर्योधनच काय तो व्रणार्त होऊन अवशिष्ट राहिला होता. दुर्योधनानें सभोंवार नजर टाकून पाहिलें, तों सर्व पृथ्वी त्याला शून्यवत् भासूं लागली. आपले सर्व कौरव हत झाले आणि पांडव मात्र जीवंत असून आनंदानें गर्जना करीत आहेत, हें पाहून त्यांनीं चारी बाजूंनीं चालविलेला बाणांचा घोष ऐकून दुर्योधन अत्यंत कष्टी झाला आणि आपण बलवाहनहीन होऊन रहाण्यापेक्षां येथून निघून दूर जाणें बरें असा त्यानें निश्चय केला !

**धृतराष्ट्र**—सूता, पांडवांनीं माझ्या सर्व सैन्याचा वध करून शिबिर शून्य झालें असतां पांडवांचें किती सैन्य अवशिष्ट होतें ? संजया, ह्या कामीं तूं मोठा कुशल आहेस म्हणून मी विचारतों, तर तें मला सांग ! आपल्या सैन्याचा क्षय झालेला पाहून त्या माझ्या एकट्या मंद दुर्योधन पुत्रानें पुढें काय केलें तें सांग !

**संजय**—राजा, दोन हजार रथ, सातशें गज, पांच हजार अश्व आणि दहा हजार पदाति इतकें सैन्य पांडवांच्या विपुल सैन्यापैकीं अवशिष्ट राहिलें होतें, तें सर्व घेऊन धृष्टद्युम्न रणांत सज्ज होऊन राहिला होता. उलट बाजूला एकटा दुर्योधन होता. त्या रथिश्रेष्ठाला त्यावेळीं आपणाला साहाय्य करणारा कोणीच आढळून आला नाहीं. शत्रूंच्या गर्जना ऐकून आणि आपल्या सैन्याचा सर्व क्षय झालेला पाहून त्याला भीति वाटूं लागली आणि तो आपल्या हत अश्वांस रणांत सोडून पूर्वेकडे पळत सुटला ! अशारीतीनें तो एकादश अक्षौहिणींचा पति तुझा पुत्र दुर्योधन गदा घेऊन पायींच ऱ्हदाकडे निघाला ! तो अति दूर गेला नाहीं, तोंच त्याला धर्मशील व धीमान् विदुराच्या वचनाची आठवण झाली. 'त्या महाप्राज्ञ विदुरानें आमचा आणि सर्व क्षत्रियांचा नाश होणार असें पूर्वींच जाणविलें होतें,' अशाप्रकारचे विचार त्याच्या मनांत येऊं लागले ! आपल्या सैन्याचा क्षय झालेला पाहून तो अत्यंत दुःखसंतप्त झाला.

राजा, इतक्यांत धृष्टद्युम्नप्रमुख पांडववीर क्षुब्ध होऊन तुझ्या सैन्यावर धांवून आले. शक्ति, ऋष्टि, प्रास इत्यादि आयुधें घेऊन पांडवांवर चालून

जाणाऱ्या त्या कौरववीरांचा संकल्प अर्जुनानें गांडीव धनुष्याच्या योगानें विफल करून टाकिला आणि सर्वांचा अमात्य आणि बांधव यांसह तीक्ष्ण बाणांनीं वध केला; त्यावेळीं त्या श्वेतरथाधिष्ठित अर्जुनाला विशेषच शोभा आली होती. अश्व, गज आणि रथ यांसह शकुनीचा वध झाल्यावर तुझें सैन्य तोडून टाकिलेल्या वनाप्रमाणें दिसूं लागलें! दुर्योधनाच्या लक्षावधि सैन्यापैकीं आतां द्रोणपुत्र अश्वत्थामा, कृतवर्मा, कृपाचार्य आणि तुझा पुत्र दुर्योधन यांशिवाय दुसरा कोणीहि जीवंत वीर दिसला नाहीं!

( ३ ) राजा धृतराष्ट्रा, धृष्टद्युम्नानें मला पाहून हंसत सात्यकीला म्हटलें, 'ह्या संजयाला घेऊन काय करावयाचें आहे? हा जीवंत असून याचा काय उपयोग आहे? धृष्टद्युम्नाचें भाषण ऐकून महारथ सात्यकीनें आपलें तीक्ष्ण खड्ग उभारून तो माझा वध करण्यास तयार झाला, परंतु इतक्यांत महाप्राज्ञ कृष्णद्वैपायन तेथें आला आणि म्हणाला, 'अरे, या संजयाला जीवंत सोडून दे, याला वधणें कधींहि योग्य होणार नाहीं! कृष्णद्वैपायनाचें भाषण ऐकून सात्यकीनें मला मुक्त केलें आणि हात जोडून तो म्हणाला, 'संजया, तूं आतां जा, तुझें कल्याण असो!'

( ४ ) याप्रमाणें त्याची अनुज्ञा मिळाल्यावर मी कवचहीन, आयुधहीन आणि रक्तानें व्याप्त होऊन संध्याकाळचे वेळीं नगरास यावयाला निघालों. त्या रस्त्यानें कोसभर गेलों नाहीं तोंच अत्यंत विद्ध झालेला गदापाणि दुर्योधन एकटाच बसलेला माझ्या दृष्टीस पडला! त्याचे डोळे दुःखाश्रूंनीं भरून आले व त्याच्यानें मजकडे पाहवेना! शेवटीं त्यानें पुढें दीन होऊन राहिलेल्या मला पाहिलें. त्या शोकार्त एकट्या दुर्योधनाला पाहून माझ्यानें थोडा वेळ कांहीं बोलवेना! मग मला शत्रूंनीं कसें घेरलें आणि कृष्णद्वैपायनाच्या प्रसादानें तेथून माझी मुक्तता कशी झाली, हा सर्व वृत्तांत मीं त्याला निवेदन केला. तो ऐकून दुर्योधन किंचित्काल चिंतन करीत बसला. नंतर शुद्धीवर आल्यावर त्यानें आपले बंधु आणि सर्व सैन्यें यांची हकीकत मला विचारली. मी प्रत्यक्ष पाहिलें होतें, तें सर्व वृत्त त्याला सांगितलें आणि म्हटलें, 'दुर्योधना, तुझे सर्व बंधु आणि सैन्य याचा संहार झाला आहे आणि आतां तुझे अवशिष्ट असे तीनच रथी आहेत, असें कृष्णद्वैपायनानें निघतेवेळीं मला सांगितलें.'

( ५ ) राजा, माझें भाषण ऐकून दुर्योधनानें एक दीर्घ निश्वास सोडला आणि वरचेवर मजकडे पाहूं लागला. नंतर माझा हात धरून तो बोलला, ' संजया, तुझ्यावांचून ह्या युद्धांत कोणीच जीवंत राहिला नाहीं. मला साहाय्यकर्ता दुसरा कोणी वीर दिसत नाहीं आणि पांडव तर साहाय्यवान् आहेत ! म्हणून संजया, तूं जाऊन प्रज्ञाचक्षु धृतराष्ट्राला सांग कीं ' तुझ्या दुर्योधन पुत्रानें ऱ्हदप्रवेश केला ! आतां माझे सुहृज्जन, बंधुवर्ग आणि पुत्र यांचा वियोग मला होऊन माझें राज्य शत्रु पांडवांनीं घेतलें, अशा स्थितींत माझ्यासारखा कोण बरें जीवंत राहण्याची इच्छा करील ? हा सर्व वृत्तांत त्याला कथन कर आणि सांग कीं ' या महायुद्धांत मी अजून जीवंत राहिलों आहें आणि अतिविद्ध होत्साता या खोल डोहामध्यें येऊन गुप्तपणें राहिलों आहें ! ' असें बोलून दुर्योधनानें त्या ऱ्हदांत प्रवेश केला आणि मायेच्या योगानें तेथील जलाचें स्तंभन केलें !

( ६ ) याप्रमाणें दुर्योधनानें ऱ्हदप्रवेश केला असतां ज्यांचीं वाहनें अगदीं थकून गेलीं आहेत, असे तीन रथी त्याच रस्त्यानें येतांना मीं पाहिले. ते तीन रथी म्हणजे कृप, कृतवर्मा आणि रथिश्रेष्ठ अश्वत्थामा हे होते. ते अत्यंत शरविद्ध झाले होते. त्यांनीं मला पहातांच आपले अश्व वेगानें हांकले आणि मज-जवळ येऊन मला म्हणाले, ' संजया, तूं जीवंत आहेस, ही मोठ्या भाग्याची गोष्ट आहे ! ' नंतर त्यांनीं मला तुझा पुत्र दुर्योधन जीवंत आहेना, म्हणून विचारलें, तेव्हां तो खुशाल असल्याचें सांगून दुर्योधन माझ्याजवळ जें बोलला तें सर्व त्यांना सांगून तो डोहहि मीं त्यांना दाखविला. तें माझें भाषण ऐकून अश्वत्थामा त्या ऱ्हदाकडे दृष्टि लावून सारखा पहात राहिला आणि त्यानें मोठ्या कारुण्यानें शोक केला ! तो म्हणाला, ' हायहाय, दुर्योधन राजाला आम्ही जीवंत असल्याचें ठाऊक नाहीं, ही मोठ्या खेदाची गोष्ट होय ! नाहींतर तो आणि आम्ही मिळून शत्रूंशीं युद्ध करण्यास पुरेसे होतों ! '

( ७ ) राजा, अशाप्रकारें त्या महारथांनीं त्याठिकाणीं बराच वेळ विलाप केल्यावर रणांत पांडव येऊन ठेपल्याचें पाहून ते तत्काळ पळून गेले ! त्यांनीं मला कृपाचार्यांच्या रथांत बसवून ते तीन महारथी शिबिराला आले. सूर्यास्त झाला असतां त्रस्त झालेले सर्व सैनिक तेथें जमले आणि तुझ्या पुत्राचा सर्वत्र उडालेला संहार ऐकून मोठ्यानें आक्रोश करूं लागले. राजा, त्यावेळीं स्त्रीजनांच्या रक्षणार्थ ठेवलेलीं वृद्ध माणसें राजस्त्रियांस घेऊन नगराकडे

जाण्यास निघालीं ! कौरवसैन्याचा नाश झाल्याचें ऐकून त्या स्त्रियांनीं रडून मोठा आक्रोश केला ! एकसारखा आक्रोश करून त्या स्त्रियांनीं कुररींप्रमाणें सर्व महीतल निनादित केलें ! त्यांनीं हातांनीं आपलीं मस्तकें पिटण्यास आरंभ केला आणि त्या केंस उपटूं लागल्या असा सर्वत्र एकच हाहाकार केला ! त्या सारख्या आक्रोश करून ऊर बडवीत होत्या ! दुर्योधनाचे दुःखी अमात्य सद्गदित होऊन त्या राजस्त्रियांस घेऊन नगराकडे निघाले. हातांत राजदंड घेऊन सर्वत्र संचार करणारे द्वारपालहि त्वरेनें निघाले. उत्तमोत्तम आस्तरणांनीं सजविलेलीं शय्यासनें घेऊन स्त्रीरक्षक त्वरित नगराकडे परतले. कित्येक खेंचरें जोडलेल्या रथांत आपापल्या स्त्रियांस बसवून नगराला गेले ! पूर्वी राजवाड्यांत असतांना ज्या स्त्रियांचें दर्शन प्रत्यक्ष सूर्यकिरणांनाहि होत नसे, त्याच स्त्रिया नगराला जात असतां लोकांनीं पाहिल्या ! अशा त्या सौकुमार्यसंपन्न स्त्रिया आपले पति आणि बांधव हत होऊन हस्तिनापुराला गेल्या !

राजा, त्यावेळीं भीमसेनाच्या भीतीनें पीडित होऊन मेंढपाळांपासून सर्व मनुष्यें घाबरून जाऊन नगराकडे धांवत सुटलीं. त्यांना पांडवांची इतकी भीति वाटूं लागली कीं, ते एकमेकांकडे पहात नगराकडे सारखे धांवूं लागले ! अशाप्रकारें कौरवांची पळापळ सुरू झाली असतां त्या शोकसंमूढ युयुत्सूच्या मनांत प्राप्त कालाविषयीं चिंता सुरू झाली. तो मनांत म्हणाला, "एवढा अकरा सैन्यांचा स्वामी दुर्योधन, पण त्यालाहि भीमपराक्रमी पांडवांनीं रणांत जिंकिलें. त्याच्या बंधूंचा वध केला आणि भीष्म-द्रोणप्रभृति सर्व वीरांना हत केलें ! भाग्ययोगानें मीच तेवढा या संकटांत त्यांच्या हातून सुटलों ! सैन्यनाश होऊन हीं सर्व शिबिरें नष्ट झालीं आहेत. दुर्योधनाचे अवशिष्ट राहिलेले अमात्य राजस्त्रियांना घेऊन नगराला जात आहेत. तेव्हां युधिष्ठिर व वासुदेव यांची अनुज्ञा घेऊन यांच्याबरोबर आपणहि जावें, हेंच आपलें प्राप्तकाल कर्तव्य होय !"

राजा, असा विचार करून त्यानें आपलें म्हणणें युधिष्ठिर व वासुदेव यांस कळविलें. तेव्हां त्या दयाशील युधिष्ठिरानें त्या युयुत्सूला प्रेमपूर्वक आलिंगन देऊन जाण्यास अनुज्ञा दिली. नंतर रथांत बसून त्यानें मोठ्या वेगानें अश्व हांकले आणि त्या राजस्त्रियांस सूर्यास्ताच्या सुमारास नगरास आणून पोंचविलें. यावेळीं त्याचा कंठ भरून आला होता व डोळ्यांतून अश्रूहि येत होते. इतक्यांत राजाजवळून बाहेर पडलेला विदुर त्याच्या दृष्टीस पडला. त्या विदुराचेहि डोळे

अश्रुपूर्ण झालेले असून त्याचें हृदय शोकानें भरून गेलें होतें. त्याला पाहतांच युयुत्सूनें प्रणाम केला व तो जवळच उभा राहिला. तेव्हां तो सत्यधृति विदुर त्याला म्हणाला—

विदुर—पुत्रा संजया, सर्व कुरूंचा क्षय झाला असतां तूं जीवंत राहिलास ही मोठ्या सुदैवाची गोष्ट होय. परंतु राजाबरोबर यावयाचें सोडून तूं एकटाच येथें कसा आलास? याचें कारण काय तें मला सविस्तर सांग!

युयुत्सु—युद्धांत ज्ञातिजन, सुत आणि बंधु यांसह शकुनीचा वध झाला आणि जेव्हां राजाजवळील अवशिष्ट परिवाराचा घात झाला, तेव्हां त्या राजानें आपला अश्व सोडून दिला आणि तेथून पूर्वेकडे तोंड करून भयानें पळून गेला! राजा निघून गेल्यावर शिबिरांतील सर्व लोक भयव्याकुल होऊन नगराकडे पळत सुटले! राजाधिकारीहि भयभीत होऊन राजा आणि त्याचे बंधु यांच्या स्त्रियांस वाहनांत बसवून तेथून तत्काल पळून गेले! मग धर्मराज आणि श्रीकृष्ण यांची अनुज्ञा घेऊन त्या स्त्रियांचें रक्षण करीत मीहि हस्तिनापुराला आलों.

(८) याप्रमाणें युयुत्सूचें भाषण ऐकून त्या धर्मवेत्त्या विदुरानें प्रसंगानुरूप जें जें करणें इष्ट होतें तें सर्व यानें केलें आहे हें लक्ष्यांत आणून त्याची प्रशंसा केली आणि म्हटलें, "युयुत्सो, भरतांचा क्षय झाला असतां तूं जें कांहीं केलेंस तें सर्व कालाला अनुसरूनच केलें आहेस. आपल्या सदयतेनें तूं आज कुलधर्माचें रक्षण केलेंस; ह्या युद्धांत आपल्या सर्व वीरांचा संहार झाला असतां तूं एकटा नगरांत सुरक्षित आलास हें आमचें सुदैव होय! चंद्राला पाहून ज्याप्रमाणें प्रजांना आनंद होतो, त्याप्रमाणें तुझें दर्शन आज आम्हांला आह्लाददायक झालें आहे. पुत्रा, त्या लोभी, अदूरदर्शी, दुःखी, दुर्दैवानें नष्टबुद्धि झालेल्या, संकटग्रस्त अंधराजाची यष्टि आतां तूंच होणें योग्य आहे! आज येथें विश्रांति घेऊन उद्यां तूं युधिष्ठिराकडे जावें." असें बोलून विदुरानें त्या युयुत्सूला राजनगरांत नेलें. यावेळीं विदुराचे डोळे दुःखाश्रूंनीं भरून आले होते! ओढवलेल्या दुःखामुळें नगरभर सर्वत्र हाहाकार उडाला होता! तेथील आनंद व शोभा यांचा लोप होऊन गेला होता! कांठावरील आरामभूमि विध्वस्त झाल्यावर सरोवर जसें निस्तेज दिसतें, त्याप्रमाणें तें नगर भयाण दिसत होतें! तें शून्य व भयाण झालेलें नगर पाहून त्या सर्वधर्मज्ञ विदुराचेंहि अंतःकरण विह्वल झालें!

मग वरचेवर दीर्घ निश्वास टाकीत त्यानें नगरांत प्रवेश केला. युयुत्सूनेंहि ती रात्र आपल्या घरीं राहून काढली. तेथें स्वजनांनीं त्याचा सत्कार केला, परंतु भारतीय योद्ध्यांनीं परस्परांचा केलेला वध त्याच्या मनांत सारखा घोळत असल्यामुळें त्या दुःखी युयुत्सूला त्यापासून कांहींच आनंद झाला नाहीं ! ९. २. २९.

येथें दुसरें ऱ्हदप्रवेशपर्व पूर्ण झालें.

---

# गदापर्व ३.



## अध्याय ३० वा.

[ १ धृतराष्ट्रप्रश्न. २ कृपाचार्य, कृतवर्मा आणि अश्वत्थामा हे दुर्योधनाला युद्धाला प्रवृत्त करितात. ३ कांहीं व्याधांनीं त्यांचें भाषण ऐकून ते दुर्योधनाला ओळखतात व धर्मराजाला कळवितात. ४ धर्मराज कृष्णादिकांना घेऊन डोहाकडे जातो. ]

( १ ) **धृतराष्ट्र**—संजया, पांडवांनीं सर्व कौरवसैन्यांचा नाश केला असतांना माझ्या पक्षांतील अवशिष्ट राहिलेले कृपाचार्य, कृतवर्मा आणि वीर्यवान् द्रोणपुत्र अश्वत्थामा, त्याचप्रमाणें मंदात्मा दुर्योधन राजा यांनीं पुढें काय केलें तें सर्व मला सांग !

( २ ) **संजय**—मोठमोठ्या क्षत्रियस्त्रिया नगराला जाण्याकरितां निघाल्या आणि शिबिरांतून सर्व लोक पळून गेल्यामुळें तें उद्ध्वस्त झालेलें पाहून ते तीन रथी—कृपाचार्य, कृतवर्मा आणि अश्वत्थामा—अत्यंत दुःखी झाले ! तशांत विजयी पांडवांचे ते जयशब्द ऐकून आणि आपलें शिबिर त्यांनीं ध्वस्त केल्याचें पाहून त्या राजकल्याणेच्छु वीरांना सायाह्नीं तेथें राहणें आवडलें नाहीं आणि ते पुनः ऱ्हदाकडे गेले ! इतक्यांत दुर्योधनाचा वध करण्याच्या इच्छेनें हृष्ट युधिष्ठिर आपल्या बंधूंसह रणांत इकडे तिकडे फिरत होता. त्या पांडवांनीं तुझ्या पुत्राचा शोध अनेक प्रकारीं केला, परंतु तो दुर्योधन त्यांच्या दृष्टीस पडला नाहीं. जेव्हां तो रण सोडून निघाला, तेव्हां आपल्या मायेनें उदक स्तंभित करून तो ऱ्हदांत शिरला होता. त्याचा शोध करतां करतां पांडवांचीं वाहनें थकून गेलीं, तेव्हां ते आपल्या सैनिकांसह शिबिराला जाऊन स्वस्थ बसले !

पांडवांची हालचाल बंद पडल्याचें पाहून ते तिघे त्या न्हदाकडे हळूहळू गेले आणि त्या उदकामध्यें झोंपीं गेलेल्या त्या दुर्धर्ष राजाला म्हणाले, "राजा, ऊठ, आमच्यासह त्या युधिष्ठिर राजाशीं युद्ध कर ! तुझा जय झाल्यास पृथ्वीचा उपभोग घे किंवा युद्धांत हत झाल्यास स्वर्गसुखाचा तरी अनुभव मिळीव ! दुर्योधना, शत्रूंच्या देखील सर्व सैन्याचा तूं संहार केला आहेस आणि जे त्यांचे सैनिक अवशिष्ट राहिले आहेत, ते युद्धांत तुझा वेग सहन करण्यास किमपिहि समर्थ होणार नाहींत; शिवाय आम्ही तुझें रक्षण करण्यास तयार आहों, म्हणून हे भारता, आतां ऊठ !"

दुर्योधन—अशाप्रकारचा पुरुषक्षय झाला असतां त्यांतून तुम्ही मुक्त झालेले मी पाहात आहें, हें माझें मोठें सुदैव आहे ! आधीं विश्रांति घेऊन आम्ही श्रमपरिहार करूं आणि नंतर आपण शत्रूंवर चालून जाऊन त्यांना जिंकूं ! तुम्ही थकून गेलां आहां आणि आम्हीहि अतिविद्ध झालों आहों ! शत्रूंचें सैन्यहि बरेंच मोठें आहे, म्हणून सांप्रत संग्राम करणें मला योग्य दिसत नाहीं. तुमचें मन इतकें थोर असल्यास शत्रूंना जिंकणें मोठें अद्भुत आहे, असें नाहीं. आमच्या अंगींहि मोठी शक्ति आहे, परंतु सांप्रतचा काल पराक्रमाचा नाहीं. एक रात्र विश्रांति घेऊन उदयीक तुम्हांसह मी शत्रूंशीं रणांत युद्ध करीन, यांत संशय नाहीं.

संजय—अशाप्रकारचें दुर्योधनाचें भाषण ऐकून अश्वत्थामा बोलला, "राजा, ऊठ. तुझें कल्याण असो. आम्ही शत्रूंना निःसंशय जिंकूं. हे राजा, इष्टापूर्त, दान, सत्य आणि जय यांची शपथ घेऊन सांगतों कीं, मी आज सर्व सोमकांचा वध करीन ! त्याचप्रमाणें हे राजा, आजची रात्र संपण्यापूर्वीं जर सर्व शत्रूंचा वध माझ्या हातून झाला नाहीं, तर यज्ञादि कर्माचें सज्जनोचित सुख मला प्राप्त न होवो ! राजन्, सर्व पांचालांचा वध केल्याशिवाय मीं धारण केलेलें हें कवच कधींहि काढणार नाहीं, हें मी सत्य सांगत आहें, ध्यानांत ठेव !"

( ३ ) राजा, अशाप्रकारें त्यांचें भाषण चाललें असतां मांसाच्या भाराखालीं थकलेले कांहीं व्याध पाणी पिण्यासाठीं त्याच न्हदावर आले. ते व्याध नेहमीं परमभक्तीनें भीमसेनाला मांस पोंचवीत असत. ते सर्व व्याध तेथें एकत्र बसले असतां त्यांनीं दुर्योधनाशीं झालेलें त्या वीरांचें व दुर्योधनाचें भाषण ऐकिलें ! दुर्योधनराजाची इच्छा युद्ध करण्याची नसून ते तीन युद्धाकांक्षी वीर प्रतिज्ञापूर्वक

युद्धार्थ दुर्योधनाला प्रोत्साहन देत आहेत, असें त्यांनीं पाहिलें. उदकांत असलेला सुयोधन व बाहेरील वीर यांच्या भाषणावरून उदकांत असलेला राजा दुर्योधनच होय असें त्यांनीं जाणलें. थोड्या वेळापूर्वी भीमसेन दुर्योधनाच्या शोधांत असतां ते व्याध त्याला भेटले होते, तेव्हां 'दुर्योधन तुम्हांला कोठें दिसला काय ?' म्हणून त्यानें त्यांस विचारलें होतें. भीमसेनाच्या त्या शब्दांचें स्मरण होऊन ते व्याध आपसांत हळूहळू बोलले, "दुर्योधन कोठें आहे हें भीमसेनाला सांगितलें असतां तो आम्हांला विपुल धन देईल. तर दुर्योधन या डोहांत आहे, अशी बातमी आपण युधिष्ठिराला आणि भीमसेनाला जाऊन देऊं या! ह्या शुष्क व त्रासदायक मांसविक्रीनें आमचें काय होणार आहे?" असें बोलून ते धनेच्छु व्याध परम हर्षानें मांसाचीं ओझीं घेऊन शिबिराला गेले. इकडे शस्त्रास्त्रधारी पांडवांनीं रणांगणांत त्या दुष्ट व पापी दुर्योधनाचा शोध लावण्याचा प्रयत्न चालविला, परंतु तो त्यांस समरभूमीवर कोठेंहि सांपडला नाहीं. त्याच्या शोधार्थ पांडवांनीं चारी बाजूंना आपले दूत पाठविले, त्या सर्वांनीं येऊन दुर्योधन आपणांस सांपडत नाहीं, असें धर्मराजास सांगितलें.

हे भरतर्षभा, दूतांचें तें भाषण ऐकून धर्मराज अधिकच चिंतेंत पडला आणि तो निश्वास टाकूं लागला. अशाप्रकारें पांडव दीन स्थितींत बसले असतां ते व्याध त्या डोहापासून आनंदित मुद्रेनें मोठ्या त्वरेनें शिबिराला आले. द्वारपालांनीं अडथळा केला असतांहि भीमसेनाच्या देखत त्या सर्व व्याधांनीं शिबिरांत प्रवेश केला आणि त्यांनीं जें जें पाहिलें व ऐकिलें होतें तें सर्व भीमसेनाला निवेदन केलें. भीमसेनानें त्या व्याधांना विपुल धन दिलें आणि झालेलें सर्व वृत्त राजा युधिष्ठिराला निवेदन केलें. तो धर्मराजाला बोलला, 'राजन्, ज्याची तूं एवढी चिंता करीत बसला आहेस, त्या दुर्योधनाचा शोध माझ्या लुब्धकांनीं लावला आहे. तो जलाचें स्तंभन करून डोहांत लपून राहिला आहे!'

(४) राजा धृतराष्ट्रा, तें भीमसेनाचें भाषण ऐकून युधिष्ठिराला व त्याच्या बंधूंना मोठा हर्ष झाला. दुर्योधन ऱ्हदांत लपून राहिल्याचें समजतांच श्रीकृष्णाला घेऊन युधिष्ठिर तिकडे निघाला. राजा, मग ते आनंदित पांडव आणि पांचाल यांनीं सर्वत्र ओरडून एकच कोलाहल केला; सिंहनाद व रणघोष होऊं लागले; अशाप्रकारें ते क्षत्रिय वीर त्या डोहाकडे गेले. 'हा पापी दुर्योधन सांपडला,

आम्हीं त्याला प्रत्यक्ष पाहिलें,' अशा आरोळ्या सोमक सारखे मारूं लागले. त्या वेळीं त्यांच्या वेगवान् रथांचा ध्वनि आकाशास जाऊन भिडल्याचें वाटूं लागलें. त्यांचे अश्व अगदीं श्रांत होऊन गेले असतांहि दुर्योधनाला गांठावें, या इच्छेनें ते युधिष्ठिराच्या मागूनच मोठ्या त्वरेनें चालले होते. अर्जुन, भीमसेन, नकुल, सहदेव, पांचाल्य धृष्टद्युम्न, अपराजित शिखंडी, उत्तमौजा, युधामन्यु, सात्यकि, अवशिष्ट पांचाल वीर, द्रौपदेय, हय, नाग आणि शेंकडो पदाति निघाले. शेवटीं जेथें दुर्योधन होता, त्या द्वैपायनऱ्हदाकडे धर्मराज येऊन पोंचला! राजा, तेथें तुझा पुत्र अद्भुत मायेनें जलाचें स्तंभन करून बसला होता. त्या ऱ्हदाचें जल अत्यंत शीत, स्वच्छ आणि मनोहर असून तो ऱ्हद सागराप्रमाणें गंभीर दिसत होता. अशा ठिकाणीं राहण्याचा प्रसंग त्या दुर्योधनावर येणें म्हणजे त्याच्या दैवदुर्विलसिताचाच परिणाम होय. त्यानें खोल पाण्यांत शयन केलें असल्यामुळें तो मनुष्याच्या दृष्टीस पडणें शक्य नव्हतें. याप्रमाणें तो उदकामध्यें गुप्त बसला असतां मेघगर्जनेप्रमाणें तुमुल शब्द त्याच्या कानीं पडला आणि त्या शब्दाबरोबरच युधिष्ठिर आपल्या बांधवांसह तुझ्या पुत्राचा वध करण्याच्या हेतूनें मोठा शंखनाद करीत आणि रथघोषानें पृथ्वी कांपवीत तेथें येऊन पोंचला. राजा, युधिष्ठिराच्या सैन्याचा घोष ऐकतांच कृपाचार्य, कृतवर्मा आणि अश्वत्थामा हे महारथी राजाला म्हणाले, 'हे जयशाली पांडव आनंदित होऊन इकडेच येत आहेत, तरी आम्ही जातों, आम्हांला अनुज्ञा दे.'

राजा, त्या वीरांचें भाषण ऐकून दुर्योधनानें 'ठीक आहे' असें म्हटलें आणि मायेनें ऱ्हदांतील उदकाचें स्तंभन केलें. इकडे ते अत्यंत शोकपरायण विश्रांत झालेले कृपप्रभृति तिघे वीर तेथून निघाले, ते दूर अंतरावर एक पिंपळाचा वृक्ष पाहून तेथें बसले. त्यांना दुर्योधन राजाविषयीं मोठी चिंता वाटत होती. महाबलवान् दुर्योधन जलस्तंभ करून आंत निजून राहिला. इतक्यांत युद्धेच्छु पांडवहि त्या ठिकाणीं येऊन पोंचले. 'आतां युद्ध कसें होईल, त्यांत दुर्योधन राजाची अवस्था काय होईल आणि ह्या कौरवांच्या हातीं दुर्योधन कसा सांपडेल' अशा प्रकारचें चिंतन करीत आपले अश्व सोडून ते कृपादि वीर तेथेंच बसून राहिले. ९. ३. ३०.

---

## अध्याय ३१ वा.

[ १ दुर्योधन-युधिष्ठिरसंवाद. ]

( १ ) **संजय**—राजा धृतराष्ट्रा, ते तिघे वीर दूर गेल्यावर पांडव त्या दुर्योधन राहिलेल्या ऱ्हदाकडे येऊन पोंचले. त्या द्वैपायन ऱ्हदावर आल्यावर दुर्योधनानें आंतील जल स्तंभित केलेलें पाहून युधिष्ठिर कृष्णाला म्हणाला, "कृष्णा, ह्या दुर्योधन उदकावर माया टाकून निजला आहे, पहा ! याला आतां मनुष्यापासून भीति नाहीं. दैवी मायेचा उपयोग करून हा उदकामध्यें लपून राहिला आहे, तथापि हा कपटी अशाप्रकारच्या कपटप्रयोगानें माझ्या हातून जीवंत सुटणार नाहीं. जरी साक्षात् वज्रधारी इंद्र याच्या साह्यार्थ धांवून आला, तरी माधवा, आजच्या युद्धांत याला मरून पडलेला लोक पाहतील !"

**वासुदेव**—भारता, ह्या मायावी दुर्योधनाच्या मायेला मायेनेंच नाहींशी कर. युधिष्ठिरा, मायावी मायेनेंच मरावा हें सत्य आहे. म्हणून तूंहि अनेक मायाप्रयोग करून त्या कपटी दुर्योधनाला जिंकून टाक ! इंद्रानें अनेक युक्ति योजून दैत्यदानवांचा संहार केला. मोठमोठ्या कपटयुक्तिप्रयुक्तींनीं विष्णूनें बलीला बद्ध केलें; महासुर हिरण्याक्ष व हिरण्यकशिपु हे अशाच उपायांनीं मारले गेले ! वृत्रासुर अशाच कपटप्रयोगानें मारला गेला ! तसाच पौलस्त्यपुत्र रावण राक्षस आपल्या गणपरिवारासह श्रीरामाकडून मारला गेला, तसा तूंहि कपटप्रयोगाचा आश्रय करून शत्रूवर जय मिळीव ! राजा, पुरातनकालीं मीहि महादैत्य तारक व वीर्यवान् विप्रचित्ति यांचा मायाप्रयोगानें वध केला ! त्याचप्रमाणें वातापि, इल्वल, त्रिशिरा व सुंदोपसुंद राक्षसांचाहि मीं कपटानेंच नाश केला आहे. अशा क्रिया व असले उपाय यांच्या योगानेंच इंद्र स्वर्गाचें राज्य भोगीत आहे. राजन्, क्रिया ही अत्यंत बलवती आहे. तिच्यासारखें बल दुसरें कशांत नाहीं. युधिष्ठिरा, दैत्य, दानव आणि राक्षस, तसेच मोठमोठे राजे यांचा कपटप्रयोगानें वध झाला आहे. म्हणून तूंहि याचाच आश्रय कर !

**संजय**—असें श्रीकृष्णाचें भाषण ऐकून धर्मराज त्या उदकस्थ दुर्योधनाला हंसत म्हणाला, "सुयोधना, सर्व क्षत्रियांचा व स्वकुलाचाहि नाश करून पाण्यामध्यें लपून बसण्यांत तुझा काय उद्देश आहे ? जीविताची इच्छा करून तूं उदकामध्यें बसून राहिला आहेस ! सुयोधना, ऊठ आणि आमच्यांशीं युद्ध कर !

नरश्रेष्ठा, भयानें जलाचें स्तंभन करून तूं आंत लपून बसला आहेस, त्याअर्थी तुझा तो दर्प आणि मान आज कोठें गेला! सुयोधना, सर्व सभाजन तुला 'शूर' असें म्हणत असतात, परंतु उदकामध्यें लपून राहणाऱ्या तुझें तें शौर्य व्यर्थ आहे, असें मला वाटतें! राजा, ऊठ आणि युद्ध कर! तूं महाकुलोत्पन्न असून क्षत्रिय आहेस! विशेषेंकरून तूं कुरुकुलांत जन्मला आहेस, त्याअर्थी आपलें जन्म व कुल यांचें स्मरण ठेव! अरे, कौरववंशांत आपला जन्म झाल्याची तूं आढ्यता मिरवीत असतोस आणि आज युद्धाला भिऊन उदकांत लपून बसतोस हें कसें? युद्ध न करितां राहणें हें कधींहि प्रशस्त नव्हे, हा सनातन धर्म नव्हे! राजा, रण सोडून पळून जाणें हा अनार्यांनीं सेवन केलेला नरकप्राप्तीचा मार्ग आहे. अरे, हे आपले पुत्र, बंधु, पिते, संबंधी, मातुल आणि इतर आप्त यांचा रणांत घात करून युद्धाचा शेवट होण्यापूर्वींच जीवंत राहण्याच्या इच्छेनें ऱ्हदामध्यें सांप्रत लपून बसला आहेस हें कसें? तूं आपणाला शूर म्हणवितोस, परंतु तूं खरोखर शूर नव्हेस. हे दुर्बुद्धे, सर्व लोकांसमक्ष 'मी शूर' म्हणून तूं फुशारकी मारतोस, परंतु हें तुझें म्हणणें खोटें आहे. शत्रूंना पाहून शूरलोक कधींहि पळून जात नसतात!

"सुयोधना, तूं शूर असशील, तर युद्ध टाकून पळून जाण्यांत तुझा हेतु कोणता तें तरी सांग! सुयोधना, तूं ऊठ आणि सर्व भीति सोडून युद्ध कर! सर्व सैन्याचा व आपल्या बंधूंचा घात करून तूं सांप्रत जगण्याची इच्छा करावीस, हें धर्माला अनुसरून नाहीं. तुझ्या सारख्यानें क्षात्रधर्माचा स्वीकार करून आतां असें करणें शोभत नाहीं. अरे, ज्या त्वां कर्णाचा आणि सौबल शकुनीचा आश्रय करून त्यांच्या जिवावर मोहानें आपण कोण हेंहि विसरून गेलास, त्या तुला या महत्पापाबद्दल आतां युद्ध करणेंच योग्य आहे. त्वां मोहानें पलायनाचा विचार केलास हें कसें? सुयोधना, तुझा तो पराक्रम, तुझा तो अभिमान, तुझें तें शौर्य आणि तुझी ती प्रौढी आतां कोठें गेली? तुझी ती कृतास्त्रता आज कोठें आहे? तूं या जलाशयांत कां बरें निजून राहिला आहेस? भारता, तूं आतां ऊठ आणि क्षात्रधर्मानें युद्ध कर! आमचा पराजय करून तूं या पृथ्वीचें शासन कर! किंवा आमच्या हातीं मरण पावून भूमीवर शयन कर! त्या महात्म्या विधात्यानें तुझ्याकरितां उत्पन्न केलेला परमधर्म म्हणजे हाच होय. तर पौरुष धारण करून पराक्रम गाजीव!"

**संजय**—हे महाराजा, धर्मपुत्र युधिष्ठिराचें हें भाषण ऐकून तुझ्या पुत्रानें उदकांत बसूनच भाषण केलें. तो म्हणाला, “महाराजा, मनुष्याला भीति वाटणें यांत आश्चर्य तें काय ? हे भारता, मी जीवाच्या भयानें पळालों असें नाहीं. माझ्याजवळ रथ नाहीं, भाता नाहीं, पार्ष्णिसारथी मरून गेला, साहाय्यार्थ जवळ कोणी नाहीं, मी एकटा आहें, अशा स्थितींत मला विश्रांति घेणें आवश्यक वाटलें. प्राण वांचविण्याच्या इच्छेनें मी जलांत शिरलों असें नाहीं, भयानें नाहीं, किंवा विषादानेंहि नाहीं. केवळ मला झालेल्या श्रमांमुळेंच मी ह्या उदकांत प्रवेश केला आहे. कौंतेया, तूंहि थोडी विश्रांति घे आणि तुझ्या अनुचरांनाहि विश्रांति घेऊं द्या. मग मी उठून तुम्हां सर्वांबरोबर युद्ध करीन !”

**युधिष्ठिर**—सुयोधना, विश्रांति घेऊन आम्ही केव्हांपासून तुला शोधीत आहों. तर आतां ऊठ आणि येथेंच आमच्यांशीं युद्ध कर ! सर्व पांडवांचा वध करून हें मोठें राज्य संपादन कर किंवा रणांत आमच्या हातीं मृत्यु पावून वीरलोक तरी प्राप्त करून घे !

**दुर्योधन**—हे कुरुनंदना, मी ज्यांच्याकरितां राज्याची इच्छा करीत होतों, ते सर्व माझे बंधु निधन पावले. सांप्रत ह्या क्षीणरत्न, क्षत्रियश्रेष्ठरहित विधवा स्त्रियेप्रमाणें झालेल्या पृथ्वीचा उपभोग घेण्याची माझी इच्छा नाहीं. युधिष्ठिरा, मी एकटा राहिलों आहें, तरी अशा स्थितींतहि सर्व पांडव-पांचालांच्या उत्साहाचा भंग करून तुला जिंकावें, अशी मला मोठी आशा आहे. सांप्रत द्रोण व कर्ण हे वध पावले आहेत व भीष्महि निधन पावला आहे, अशा-समयीं युद्ध करून तरी मला काय कर्तव्य आहे ? ही सर्व ओसाड पृथ्वी आतां तुलाच प्राप्त होवो ! कारण, कोणता असहाय राजा राज्याची इच्छा करील बरें ? कर्ण-द्रोणांसारखे संबंधी, पुत्र, बंधु, पिते यांचा वध झाला असतां आणि तुम्हीं राज्य हरण केलें असतां माझ्यासारखा कोण वीर बरें जगण्याची इच्छा करील ? अजिन परिधान करून मी वनाला जाईन, माझ्या पक्षाचा सर्व क्षय झाल्यामुळें मला आतां राज्याची किमपि आवड नाहीं व जींतून माझे बरेचसे बांधव नष्ट झाले आहेत, तसेंच माझे अश्व आणि गज हेहि मारले गेले आहेत, अशी ही पृथ्वी आतां तूं खुशाल भोग ! मृगचर्म परिधान करून मी वनाला जाईन. मी मनुष्यहीन झाल्यामुळें मला आतां जगण्याचीहि आशा राहिली नाहीं. हे राजेंद्रा, तूं आतां जा आणि त्या राजहीन, हतयोध, नष्टरत्न व क्षत्र-हीन पृथ्वीचा यथेच्छ उपभोग घे !

**संजय**—अशाप्रकारचें करुण भाषण ऐकून महायश युधिष्ठिर त्या उदकस्थ दुर्योधनाला बोलला—

**युधिष्ठिर**—सुयोधना, उदकांत बसून अशाप्रकारचे आर्त प्रलाप काढूं नकोस ! कावळयाच्या शब्दाप्रमाणें ह्या तुझ्या भाषणाची मला कांहींच किंमत वाटत नाहीं. पृथ्वी दान देण्याविषयीं तूं समर्थ असतास, तरीहि तूं दिलेल्या त्या पृथ्वीवर राज्य करण्याची इच्छा मीं केली नसती ! तूं दिलेली पृथ्वी मीं अधर्मानें कधींहि घेतली नसती ! कारण राजा, क्षत्रियाला प्रतिग्रह हा धर्म म्हणून सांगितलेला नाहीं. सर्व पृथ्वी तूं मला दान दिली असतीस, तरी तिचा स्वीकार मीं केला नसता; कारण, तुला युद्धांत जिंकूनच मी ह्या पृथ्वीचा उपभोग घेणार आहें. तसेंच पृथ्वीचा पति नसतां तूं तिचें दान कसें बरें करूं इच्छितोस ? अरे, पूर्वी कुळामध्यें शांति नांदावी, ह्याच इच्छेनें आम्ही धर्माला अनुसरून याचना करीत असतां तूं ही पृथ्वी कां दिली नाहींस ! प्रथमतः त्या बलवान् श्रीकृष्णाचा अपमान करून आतां राज्य देण्याला तयार होतोस, ह्या तुझ्या चित्तभ्रमाला काय म्हणावें ? हातांत असलेलें राज्य कोणता राजा दुसऱ्याला दान देऊं इच्छील ? हे कौरवनंदना, आज तूं पृथ्वी देण्याला किंवा स्वपराक्रमानें घेण्यालाहि समर्थ नसतां तूं पृथ्वीदानाची इच्छा करतोस हें कसें ? आधीं तूं मला रणांत जिंक आणि नंतर पृथ्वीचें पालन कर !

हे राजा, जो तूं पूर्वी सूच्यग्राएवढीहि भूमि मला देण्याला तयार नव्हतास, तोच तूं आज एवढी पृथ्वी मला देत आहेस हें कसें ? सुईच्या अग्राएवढ्या जमिनीचाहि त्याग करण्याला जो तूं तयार नव्हतास, तोच आज पृथ्वीचा त्याग करण्याला सिद्ध झाला आहेस, हें कसें ? अशाप्रकारच्या ऐश्वर्याची प्राप्ति करून घेऊन आणि ह्या सर्व पृथ्वीवर राज्य करून कोणता मूर्ख तें राज्य शत्रूला देण्याला सिद्ध होईल ? तुझ्या मूर्खपणानें हें तुला समजत नाहीं. आतां तूं समग्र पृथ्वी देण्याची इच्छा केलीस, तरी तूं आमच्या हातून जीवंत सुटणार नाहींस. राजा, आतां आमचा पराभव करून ह्या पृथ्वीवर राज्य तूं चालवावें, अथवा आमच्या हातीं मृत्यु पावून उत्तम लोकीं जावें. राजन्, आम्ही दोघे जीवंत असतां आम्हांपैकीं कोणाचा विजय झाला याविषयीं सर्व प्राण्यांना शंका रहाणार ! आतां तूं फार वेळ जीवंत राहाणार नाहींस; कारण तुझें जीवित आतां माझ्या हातांत आहे. मी इच्छेनुसार वाटेल तितके दिवस जगेन, तूं मात्र आतां जगण्याला योग्य नाहींस ! अरे, तूं

आम्हांला जाळण्याचा प्रयत्न केलास, आम्हांला सर्प डसविलेस, पाण्यांत बुडविलेंस, आमचें राज्य हरण करून आम्हांला छळिलेंस, आम्हांला दुष्ट वचनांनीं दुःख दिलेंस आणि द्रौपदीला ओढीत नेवविलेंस ! ह्या कारणांमुळें आतां तुझे प्राण फार वेळ राहणें शक्य नाहीं. बाबा ऊठ, ऊठ आणि युद्ध कर, तुझें कल्याण आतां युद्धांतच आहे !

हे जनाधिपा ! याप्रमाणें त्या वीरांमध्यें पुष्कळ प्रकारचीं वीरश्रीयुक्त भाषणें वरचेवर चाललीं होतीं. ९. ३. ३१.

---

## अध्याय ३२ वा.

[ १ युधिष्ठिराच्या कटु भाषणानें संतप्त दुर्योधन गदा घेऊन ऱ्हदाबाहेर येतो. २ युधिष्ठिर व दुर्योधन यांचें भाषण. ]

( १ ) **धृतराष्ट्र**—संजया, माझा पुत्र जात्याच मोठा संतापी असल्यामुळें आपली निर्भर्त्सना होत असलेली पाहून त्या परंतप वीरानें काय केलें ? यापूर्वी लोकांकडून आपली निर्भर्त्सना त्यानें कधींहि ऐकून घेतली नव्हती. कारण सर्व लोकांमध्यें राजा म्हणून त्याला मोठा मान असे. सूर्यप्रभा आणि स्वकीय छत्रच्छाया या दोन्ही त्याला सारख्याच खेददायक वाटत असत. सूर्यप्रभा आपणाला तप्त करिते म्हणून त्यास खेद होत असे, तर 'छायेनें दुर्योधनाचें रक्षण होतें,' हा प्रवाद देखील त्याला असह्य होत असे ! इतका जो अभिमानी त्या दुर्योधनाला युधिष्ठिराचें तें भाषण कसें सहन होणार ? म्लेच्छदेशासकट सर्व पृथ्वीचें जीवित ज्याच्या प्रसादावर अवलंबून होतें, त्या माझ्या पुत्राची निर्भर्त्सना पांडुपुत्रांनीं तुझ्या समक्ष केली, तेव्हां त्या सेवकहीन दुर्योधनानें तीं वीरश्रीयुक्त कटु भाषणें वरचेवर ऐकून पांडवांस काय म्हटलें तें संजया, मला सांग !

**संजय**—युधिष्ठिरानें व त्याच्या बंधूंनीं निर्भर्त्सना केली असतां तीं त्यांचीं कटु वचनें ऐकून उदकांत असलेल्या दुर्योधनानें दीर्घ व उष्ण निश्वास सोडले ! तो जलस्थ असतांनाच त्याच्या हातवाऱ्यांवरून त्याचा युद्धनिश्चय कळून आला. नंतर तो युधिष्ठिराला बोलला, "तुम्ही सर्व पांडव सुहृज्जनांनीं युक्त असून तुमचीं रथवाहनेंहि तुम्हांकरितां सज्ज आहेत. मी तर एकटा, दुःखी, विरथ व वाहनहीन आहें ! रथांत बसून व शस्त्रें हातांत घेऊन अनेक वीरांनीं

वेढिलें असतां पादचारी व शस्त्रहीन एकट्यानें युद्ध करण्याचा उत्साह कसा धरावा ? युधिष्ठिरा, म्हणून तुम्हांपैकीं माझ्याशीं एकेकट्यानें युद्ध करावें ! कारण एकाशीं अनेक मनुष्यांनीं युद्ध करणें हें कधींहि न्याय्य होणार नाहीं. विशेषतः कवचहीन, श्रांत, विपद्ग्रस्त, विद्धगात्र ज्याचीं वाहनें आणि सैनिक अत्यंत थकून गेले आहेत, अशाशीं युद्ध करणें तर कधींच योग्य नाहीं ! राजा, तुझी भीति मला वाटत नाहीं, भीमाला मी भीत नाहीं, अर्जुनालाहि भीत नाहीं, वासुदेवापासूनहि मला भय वाटत नाहीं ! पांचालांपासून, नकुल-सहदेवांपासून, युयुधानापासून किंवा इतर सैनिकांपासून मला यत्किंचितहि भीति वाटत नाहीं ! क्रुद्ध होऊन रणांत उभा राहिलों असतां तुम्हां सर्वांचें निवारण करण्यास मी एकटा समर्थ आहें. हे जनाधिपा, सज्जनांची कीर्ति धर्ममूल आहे, म्हणून धर्म आणि कीर्ति या दोहोंचेंहि पालन करून मी असें म्हणतों कीं मी आज उठून तुम्हां सर्वांशीं युद्ध करीन, रात्रिक्षयाच्या कालीं सूर्य जसा नक्षत्रतेजाचा नाश करितो, त्याप्रमाणें मी अशस्त्र व विरथ असतांहि सरथ व वाहनयुक्त अशा तुम्हां सर्वांचा एकटा संहार करीन ! पांडवहो, उभे रहा ! युधिष्ठिरा, आज तुझा सर्व बांधवांसह वध करून बाल्हीक, द्रोण, भीष्म, कर्ण, जयद्रथ, भगदत्त, शल्य, भूरिश्रवा, माझे पुत्र, सौबल शकुनि तसेच माझे मित्र आणि सुहृज्जन या सर्वांचे ऋणांतून मी मुक्त होईन ! " असें बोलून दुर्योधन थांबला.

**युधिष्ठिर**—सुयोधना, क्षात्रधर्म तूं जाणतोस. व हे महाभुजा, तुझी बुद्धि युद्ध करण्याला प्रवृत्त झाली आहे, ही मोठ्या सुदैवाची गोष्ट आहे. गांधारे, तूं शूर आहेस, आणि ज्याअर्थी आम्हां सर्वांशीं युद्ध करण्यास तूं एकटा सज्ज झाला आहेस, त्याअर्थी युद्धकलेंतहि तूं अत्यंत निपुण आहेस, हेंहि तुझें मोठें भाग्य आहे ! तथापि तूं एकटा आहेस, तुला जें आयुध संमत असेल तें घेऊन आम्हांपैकीं वाटेल त्या एकट्याशीं युद्ध कर ! बाकीचे आम्ही प्रेक्षक होऊन राहूं ! आणखीहि तुझ्या हिताची गोष्ट सांगतों, ती ही कीं युद्धांत तूं आम्हांपैकीं कोणाहि एकाचा वध केलास, म्हणजे तूं आमचा राजा होशील ! उलट पक्षीं आमच्या हातून तुझा वध झाला तरीहि तुला स्वर्गप्राप्ति होईल !

**दुर्योधन**—रणामध्यें माझ्याशीं युद्ध करण्यास एकच वीर उभा राहणार असेल, तर तुम्हांमध्यें जो श्रेष्ठ असेल, तो येऊं द्या ! आयुधांमध्यें ही माझी गदाच मला सर्वदा प्रिय आहे. तुम्हां बंधूंमध्यें जो कोणी मजशीं युद्ध करण्यास समर्थ आहे, त्यानें पादचारी होऊनच माझ्याशीं युद्ध करावें. आजपर्यंत विचित्र

रणयुद्धें पदोपदीं झालीं आहेत, म्हणून आजचें हें गदायुद्ध सर्वांत मोठें आणि अत्यद्भुत असें होवो! ज्याप्रमाणें अन्नामध्यें पर्याय करण्याची इच्छा मनुष्यें करितात, त्याचप्रमाणें ह्या युद्धामध्येंहि तुझ्या अनुमतानें कांहीं पर्याय होऊं दे! हे महाबाहो, मी माझ्या गदेनें तुला, तुझ्या बंधूंना, पांचाल-सृंजयांना आणि जे कोणी तुझे दुसरे सैनिक असतील, त्या सर्वांना जिंकीन! युधिष्ठिरा, मला प्रत्यक्ष इंद्राचीहि भीति वाटत नाहीं!

युधिष्ठिर—गांधारे, ऊठ, ऊठ! माझ्याशींच युद्ध कर! सुयोधना, तूं बली आहेस, तरी आम्हांपैकीं एकेकट्याशींच सावधानपणें युद्ध करून तूं पुरुषत्व गाजीव! तुझ्या साहाय्यार्थ इंद्र धांवून आला, तरी आज तूं जीवंत राहणार नाहींस!

संजय—हें भाषण तुझ्या पुत्राला सहन झालें नाहीं. बिळांतून फूत्कार टाकणाऱ्या सर्पाप्रमाणें पाण्यांतून तो निश्वास सोडूं लागला! उत्तम जातीच्या अश्वाला ज्याप्रमाणें चाबुकाचा मार सहन होत नाहीं, त्याप्रमाणें त्या दुर्योधनाला तें भाषण सहन झालें नाहीं. वेगानें जलाचा क्षोभ करून आपली सुवर्णविभूषित लोहमय गदा घेऊन महासर्पाप्रमाणें फूत्कार सोडीत तो वेगानें वर येऊं लागला. खांद्यावर लोहगदा घेऊन त्यानें स्तंभित जलाचा भेद केला आणि सूर्याप्रमाणें तळपत वर आला! सुवर्णविभूषित गदा हातांत घेऊन आलेल्या सश्रृंग पर्वताप्रमाणें दुर्योधनाला पाहतांच प्रजांचा नाश करणारा क्रुद्ध शूलपाणिच उभा असल्याचा भास झाला! तो वीर सूर्याप्रमाणें तळपत वर आला, तेव्हां सर्व प्राण्यांना दंडधारी यमाप्रमाणें भासूं लागला! हे जनाधिपा, त्यावेळीं तुझा पुत्र सर्व पांचालांना वज्रधारी इंद्राप्रमाणें किंवा शूलपाणी शंकराप्रमाणें दिसला. दुर्योधन बाहेर आलेला पाहून सर्व पांचाल आणि पांडव यांना मोठा आनंद झाला आणि त्यांनीं परस्परांच्या हातांवर हात मारिले! तें पाहून दुर्योधनाला त्यांनीं आपली थट्टा केल्यासारखें वाटलें. त्यामुळें संतप्त होऊन तो पांडवांना जाळून टाकीतच आहे कीं काय अशा रीतीनें त्यानें डोळे वटारिले, भ्रुकुटी वक्र केल्या आणि दांतओंठ चावून तो कृष्णासह पांडवांस बोलला—

( २ ) दुर्योधन—पांडवहो, तुम्ही मला हंसत आहां, परंतु याचें फळ तुम्हांला लवकरच मिळेल. तुम्हां सर्वांला आतां लवकरच पांचालांसह यमलोकाची वाट धरावी लागेल!

**संजय**—राजा, तुझा तो रक्तदिग्ध गदापाणि पुत्र दुर्योधन जलाबाहेर आला व उभा राहिला, तेव्हां त्याचें रक्तानें माखलेलें व पाण्यानें भरलेलें शरीर, जलधारा स्रवणाऱ्या पर्वताप्रमाणें भासत होतें. त्यानें गदा उगारली असतां तो क्रुद्ध शूलपाणि यमच आहे, असें पांडवांस वाटलें. नंतर ज्याचा ध्वनि मेघासारखा गंभीर आहे, अशा त्या सुयोधनानें आनंदानें गोवृषाप्रमाणें आक्रोश केला आणि त्या वीर्यवंतानें आपली गदा घेऊन सर्व पांडवांस युद्धार्थ रणांत येण्याविषयीं आह्वान केलें !

**दुर्योधन**—तुम्ही एकेकटे माझ्याशीं युद्धार्थ या ! एकट्या वीरानें अनेकांशीं युद्ध करणें कधीं न्याय्य होणार नाहीं ! विशेषेंकरून कवचहीन, श्रांत, जलमग्न, युद्धांत विद्धगात्र झालेला, ज्याचीं वाहनें आणि सैनिक हत झाले आहेत, अशा वीराशीं अनेकांनीं युद्ध करणें अत्यंत अश्लाघ्य होय. असें असून तुम्हीं सर्वांनीं मिळून माझ्याशीं युद्ध करणें तुम्हांला योग्य वाटत असेल, तर ती अयुक्त गोष्ट आहे, हें तूं जाणतच आहेस !

**युधिष्ठिर**—सुयोधना, जेव्हां अभिमन्यूचा अनेक महारथांनीं वध केला, तेव्हां तुझी ही धर्मबुद्धि कोठें गेली होती ! क्षात्रधर्म हा अतिक्रूर, निरपेक्ष आणि अत्यंत निर्दय आहे. नाहींतर तुम्ही त्या अभिमन्यूला तशा स्थितींत कसें बरें मारिलें असतें ? तुम्ही सर्वज्ञ, शूर, प्राणांची पर्वा न करणारे होतां आणि न्यायानें युद्ध करणाराला इंद्रलोकाची प्राप्ति होते हेंहि तुम्हांला ठाऊक होतें ! मग अनेकांनीं तुझ्या संमतीनें अभिमन्यूचा वध केला हें कसें ? संकटांत मनुष्य सांपडला म्हणजे त्याला धर्माची आठवण होते ! परंतु चांगल्या स्थितींत असला म्हणजे त्याला परलोकाचीं द्वारें जणुंकाय बंदच आहेत असें दिसत असतें. हे वीरा, आपलें कवच अंगांत नीट घाल, केंस व्यवस्थित कर आणि हे भारता, तुला जें कांहीं पाहिजे असेल, तें घे ! वीरा, आणखी तुझी एक इच्छा मी पुरवितों; ती ही कीं, पांच पांडवांपैकीं ज्या कोणाशीं तुला युद्ध करावयाचें असेल, त्याचा तूं वध केला असतां तुला राज्यप्राप्ति होईल आणि त्याच्या हातून तुझा वध झाल्यास तुला स्वर्ग मिळेल ! वीरा, युद्धांत जीविता-वांचून दुसऱ्या कोणत्या दानानें आम्हीं तुझें प्रिय करावें ?

**संजय**—राजा, तेव्हां तुझ्या पुत्रानें अंगांत सुवर्णकवच घातलें आणि स्वर्णभूषित शिरस्त्राण मस्तकावर धारण केलें. कांचनाचें कवच व शिरस्त्राण

यांच्या योगानें तुझा पुत्र सुवर्णपर्वताप्रमाणें शोभूं लागला. याप्रमाणें सज्ज होऊन व गदा हातांत घेऊन तुझा पुत्र दुर्योधन रणाग्रभागीं आला आणि सर्व पांडवांस बोलला, "तुम्हांपैकीं वाटेल त्या एकानें मजशीं गदायुद्ध करावें ! मी सहदेवाशीं युद्ध करीन, भीमाशीं, नकुलाशीं, अर्जुनाशीं किंवा हे नरश्रेष्ठा, तुजबरोबरहि युद्ध करीन. मी रणांगणावर तुम्हांशीं युद्ध करीन आणि त्यांत विजय संपादीन ! हे पुरुषश्रेष्ठा, सुवर्णाच्या पट्टयांनीं विभूषित ह्या गदेच्या योगानें मी वैराच्या दुर्गम अंताला जाऊन पोंचेन. गदायुद्धांत माझी बरोबरी करणारा कोणी असेल, असें दिसत नाहीं. तुम्ही सर्व मजवर एकत्र मिळून आलां, तरी मी एकटाच या गदेनें तुम्हां सर्वांचा वध करीन. न्यायानें युद्ध करायाचें झाल्यास तुम्ही सर्व मजशीं युद्ध करण्यास समर्थ नाहीं. गर्वोद्धत भाषण आपण होऊन करणें हें कधींहि योग्य नव्हे, तथापि मी आतांच तुमच्या पुढें हें सर्व खरें करून दाखविणार आहें ! ह्याच घटकेला माझें भाषण खरें किंवा खोटें याचा निकाल होईल. माझ्याशीं आज ज्याला युद्ध करण्याची इच्छा आहे, त्यानें गदा उचलावी !" ९. ३. ३२.

## अध्याय ३३ वा.

[ १ 'आमच्यांपैकीं वाटेल त्याशीं युद्ध कर,' या बोलण्याबद्दल कृष्ण युधिष्ठिराला दोष देतो. २ भीम गदा उचलून युद्धाला सज्ज होतो. ३ भीम-दुर्योधनांचीं वीरत्वदर्शक भाषणें. ]

( १ ) संजय—राजा, याप्रमाणें दुर्योधनाची एकसारखी गर्जना चालू असतां श्रीकृष्ण युधिष्ठिरावर संतापला आणि म्हणाला, "युधिष्ठिरा, जर दुर्योधन तुला, अर्जुनाला, नकुलाला किंवा सहदेवाला युद्धार्थ वरील, तर काय होईल ? हे राजा, 'युद्धांत पांडवांपैकीं कोणाहि एकाचा वध करून तूं राजा हो' असें तूं म्हटलेंस, हें केवढें साहस केलेंस ? ह्या गदाधारी वीराबरोबर युद्ध करण्याला तुम्ही समर्थ नाहीं, असें मला वाटतें. कारण गेल्या तेरा वर्षांत भीमाचा वध करण्याच्या उद्देशानें लोखंडी प्रतिमा करून हा दुर्योधन त्याशीं नित्य गदाभ्यास करीत आहे. भरतर्षभा, हें कार्य आतां आपल्या हातून कसें होणार ? हे नृपोत्तमा, केवळ दयेमुळेंच तूं हें साहस केलें आहेस ! दुर्योधनाला प्रतियोद्धा भीमसेनावांचून दुसरा कोणी मला दिसत नाहीं आणि त्यानेंहि त्या कामीं फारसे श्रम केलेले नाहींत !

राजा, पूर्वी तूं शकुनीशीं जसें द्यूत खेळलास, त्याचप्रकारचें हें विषम द्यूत तूं पुनः सुरू केलें आहेस! भीम हा बलवान् असून समर्थ आहे, तसाच सुयोधन हा कृती असून अत्यंत चपल आहे. बलवान् आणि कृती यांमध्यें कृतीच श्रेष्ठ ठरतो! राजा, अशारीतीनें तूं शत्रूला चांगल्याच मार्गावर आणून ठेविलें आहेस! ह्या कृत्यानें तूं आपणाला आणि आम्हांलाहि संकटांत पाडून घेतलें आहेस! सर्व शत्रूंना जिंकून मोठ्या संकटानें प्राप्त झालेलें राज्य एका शत्रूकडून कोण हरवून घेईल बरें? तसेंच एका पणानें युद्ध करणें तरी कोणाला आवडेल? रणांत गदापाणि दुर्योधनाला जिंकील, असा वीर देवांतहि मला दिसत नाहीं! तूं, भीम, नकुल, सहदेव आणि अर्जुन ह्यांपैकीं कोणीहि त्या गदाकुशल दुर्योधनाला न्यायानें जिंकण्यास समर्थ नाहीं. असें असतां तूं शत्रूला 'गदा घेऊन युद्ध कर आणि आम्हांपैकीं कोणाहि एकाला युद्धांत मारून राजा हो,' असें शत्रूला सांगतोस हें कसें? वृकोदर भीमाला युद्धांत गांठून त्याच्याशीं जरी ह्याचें युद्ध जुंपलें, तरी आमचा जय होईल किंवा नाहीं, याचा मला संशयच आहे! धर्मयुद्ध केल्यास दुर्योधन हा मोठा बलवान् व गदायुद्धकुशल आहे! असें असून 'आम्हांपैकीं कोणाहि एकाचा वध करून तूं राजा हो' असें म्हणतोस, त्याअर्थीं पंडु आणि कुंती यांची संतती इला राज्यांत कांहींच भाग नसून वनवास आणि दारिद्र्य भोगण्याकरितांच तिचा जन्म आहे असेंच ना?"

भीमसेन—मधुसूदना यदुनंदना, विषाद करूं नकोस. मी वैराच्या अतिदुर्गम तीराला जाऊन आज त्या सुयोधनाचा रणांत वध करीन, ह्यांत संशय नाहीं. कृष्णा, धर्माचाच विजय होणार, असें दिसत आहे. माझ्या गदेचे गुण दुर्योधनाच्या गदेच्या दीडपटीनें आहेत. दुर्योधनाची गदा माझ्या गदेसारखी नाहीं! माधवा, त्यासंबंधीं तुला काळजी नको! ह्या गदेनें दुर्योधनाशीं युद्ध करण्याची मला मोठी हौस वाटत आहे! जनार्दना, तुम्ही सर्वजण प्रेक्षक होऊन मी कसें युद्ध करितों हें पहा! नाना शस्त्रें धारण करणाऱ्या देवांसुद्धां तिन्ही लोकांबरोबर मी युद्ध करीन; मग सुयोधनाची ती कथा काय?

संजय—राजा, भीमसेनाचें अशाप्रकारचें भाषण श्रवण करून वासुदेवाला मोठा आनंद झाला आणि त्यानें भीमसेनाची प्रशंसा करून म्हटलें, "हे महाबाहो, धर्मराज युधिष्ठिरानें तुझ्याच आश्रयानें सर्व शत्रूंचा संहार करून उज्ज्वल

श्री संपादन केली आहे, यांत संशय नाहीं. तूंच सर्व धृतराष्ट्रपुत्रांचा रणांत निःपात केला आहेस ! तसेंच हे पांडुनंदना, तूं राजे, राजपुत्र व मोठमोठे गज यांचाहि नाश केला आहेस ! कलिंग, मागध, प्राच्य, गांधार आणि कुरु ह्यांना रणांत गांठून तूंच वधिलेंस ! सांप्रत दुर्योधनाचा वध करून तूं विष्णूनें शचीपति इंद्राला सर्व राज्य दिलें, त्याप्रमाणें ही सर्व समुद्रवलयांकित पृथ्वी धर्मराजाला अर्पण कर ! रणांत तुजशीं भिडतांच तो पापी दुर्योधन नाश पावेल आणि तूं त्याची मांडी फोडून आपल्या प्रतिज्ञेंतून मुक्त होशील ! तुला त्या धृतराष्ट्रपुत्राबरोबर मोठ्या यत्नानें युद्ध केलें पाहिजे. कारण तो चपल, बलवान् आणि मोठा युद्धकुशल आहे !"

( २ ) राजा, नंतर सात्यकीनें भीमसेनाची अनेक प्रकारें स्तुति केली. त्याचप्रमाणें पांचाल आणि धर्मप्रभृति पांडव यांनींहि त्याची प्रशंसा केली. त्याचें भाषण सर्वांना आवडून त्याचा सर्वांनीं फार गौरव केला. त्या बलवान् भीमानें सृंजयांसह उभा असलेल्या व सूर्याप्रमाणें देदीप्यमान युधिष्ठिराला म्हटलें, "मी आज दुर्योधनाला गांठून त्याच्याशीं युद्ध करीन ! हा पुरुषाधम रणांगणावर मला जिंकण्याला किमपिहि समर्थ नाहीं ! खांडववनावर अर्जुनाप्रमाणें माझ्या हृदयांत इतके दिवस सांठवून ठेविलेला क्रोध मी आज दुर्योधनावर काढीन. हे राजा युधिष्ठिरा, त्या पापी दुर्योधनाला मी गदेनें मारिल्यावर तुझ्या हृदयांत आजवर राहिलेलें शल्य मी उपटून काढीन ! तूं आज सुखी हो ! हे अनघा, आज मी कीर्तिमयी माला तुझ्या गळ्यांत घालीन ! आज दुर्योधन आपले प्राण, श्री आणि राज्य यांना मुकेल ! आपल्या पुत्राचा मीं वध केल्याचें ऐकून आज धृतराष्ट्र राजाला शकुनीच्या नादाला लागून आपण केलेल्या सर्व अशुभ कर्मांची आठवण होईल !"

( ३ ) असें बोलून त्या भीमसेनानें वृत्राला इंद्रानें जसें आह्वान केलें, तसें दुर्योधनास करून तो युद्धास सिद्ध झाला. तुझ्या वीर्यवान् पुत्राला तें सहन न होऊन तो मदोन्मत्त गजापुढें जसा दुसरा मदोन्मत्त गज यावा, त्याप्रमाणें तत्काल त्याच्यासमोर आला ! तुझा गदापाणि पुत्र सज्ज होऊन युद्धार्थ उभा राहिला असतां तो सशृंग कैलासपर्वताप्रमाणें सर्व पांडवांना भासला. तो बलवान् दुर्योधन यूथभ्रष्ट गजाप्रमाणें एकटा सांपडल्यामुळें पांडवांना मोठा हर्ष झाला. दुर्योधनावर संभ्रम, भय, ग्लानि किंवा व्यथा यांपैकीं कोणताहि परिणाम झाल्याचें दिसत नव्हतें. तो रणांत सिंहासारखा उभा होता. त्या

गदाधारी दुर्योधनाला सशृंग कैलासाप्रमाणें पाहून भीमसेन म्हणाला, " दुर्योधना, राजा धृतराष्ट्रानें आणि तूं आमच्यांशीं जीं जीं दुष्कृत्यें केलींत, त्यांचें स्मरण कर पाहूं ! वारणावतांत काय काय घडलें, रजस्वला द्रौपदीवर भरसभेंत कसा बलात्कार करण्यांत आला, शकुनीच्या कपटानें धर्माला द्यूतांत कसें फसविलें, आणखीहि जीं जीं दुसरीं अनेक पापकृत्यें निरपराध पांडवांच्या छळाकरितां करण्यांत आलीं, त्यांचें फल आज तुला भोगलें पाहिजे ! आमचा सर्वांचा पितामह, महायश भरतश्रेष्ठ गंगानंदन भीष्म, तो तुझ्यामुळेंच निहत होऊन शरतल्यावर पडून राहिला आहे ! तुझ्यामुळेंच द्रोण, कर्ण आणि प्रतापवान् शल्य यांचा वध झाला ! या सर्व वैराग्नीचा आद्यजनक जो शकुनि तोहि मृत्युमुखीं पडला. तुझे मोठे शूर बंधु आणि पुत्र सैन्यांसह पतन पावले ! तसेच समरांतून कधींहि मागें न परतणारे अनेक राजे मारिले गेले ! हे व दुसरेहि क्षत्रियश्रेष्ठ युद्धांत हत झाले ! द्रौपदीचा छळ करणारा तो पापी प्रातिकामीहि पतन पावला ! आतां तूंच एकटा कुलघ्न अधम पुरुष राहिला आहेस ! त्या तुझा वध आज मी गदेनें करणार, यांत तिळमात्र संशय नाहीं. हे राजा, तुझा सर्व दर्प आज मी रणांत नाहींसा करून त्याबरोबर तुझी विपुल राज्याशा आणि पांडवांसंबंधीं द्वेषबुद्धि यांचाहि नाश करितों पहा !"

दुर्योधन—भीमा, विशेष बोलण्यांत काय अर्थ आहे ? माझ्याबरोबर आज युद्ध कर ! वृकोदरा, युद्ध करण्याची तुझी सारी हौस मी जिरवून टाकितों ! हिमालयशिखराकार प्रचंड गदा घेऊन युद्धार्थ सज्ज होऊन राहिलेल्या मला तूं पाहिलें नाहींस काय ? न्यायानें युद्ध करीत असतां देवश्रेष्ठ इंद्रहि मजसमोर उभा राहण्यास समर्थ नाहीं, तेथें कोण शत्रु गदायुद्धांत मला मारण्याविषयीं उत्साह धरील ? कुंतीपुत्रा, शरत्कालीन निर्जल घनाप्रमाणें व्यर्थ बडबड करण्यांत काय अर्थ आहे ? युद्धांत मी तुझें प्राणहरण केलें नाहीं, तोंपर्यंत तुझें सामर्थ्य काय आहे तें दाखीव पाहूं !

राजा धृतराष्ट्रा, मदोन्मत्त गजच कीं काय, अशा दुर्योधनाचें तें भाषण ऐकून सृंजयांसह त्या विजयेच्छु पांडवांनीं आनंदानें टाळ्या वाजवून त्या दुर्योधनाची फार प्रशंसा केली. गज चीत्कार करूं लागले, अश्व सारखे खिंकाळूं लागले आणि जयेच्छु पांडवांचीं शस्त्रें प्रदीप्त होऊन शोभूं लागलीं ! ९. ३. ३३.

## अध्याय ३४ वा.

[ १ बलभद्राचें आगमन. २ बलरामाची आपल्या शिष्यांचें गदायुद्धनैपुण्य पाहण्याची उत्सुकता. ]

( १ ) **संजय**—हे महाराजा, अशाप्रकारें तें अत्यंत दारुण युद्ध सुरू झालें आणि सर्व पांडव प्रेक्षक होऊन बसले. इतक्यांत आपल्या शिष्यांमध्यें गदायुद्ध सुरू झाल्याचें ऐकून तो तालध्वज बलराम तेथें पोंचला. बलराम आलेला पाहतांच श्रीकृष्ण आणि पांडव यांना मोठा आनंद होऊन ते त्याजवळ गेले, त्यांनीं त्याचें आतिथ्य केलें आणि यथाविधि त्याचें पूजन केलें. नंतर ते त्याला म्हणाले, 'रामा, आज आपल्या शिष्यांचें युद्धकौशल्य पहा !' नंतर कृष्ण, पांडव आणि कुरुपति गदाधारी दुर्योधन यांकडे पाहून बलराम बोलला—

( २ ) **बलराम**—मी प्रयाणाला निघालों असतां आज बेचाळीस दिवस झाले. मी पुष्य नक्षत्रावर निघून श्रवण नक्षत्रावर पुनः आलों आहें. कृष्णा, या माझ्या शिष्यांचें गदायुद्ध पाहण्याची मला मोठी हौस आहे !

इतक्यांत युधिष्ठिर राजानें बलरामाला आलिंगन देऊन त्याला कुशलप्रश्न विचारले. महाधनुर्धर कृष्णार्जुनांनींहि त्याला मोठ्या प्रेमानें आलिंगन दिलें. ते शूर माद्रीपुत्र नकुल-सहदेव आणि पांच द्रौपदीपुत्र हे त्या महाबली रौहिणेयाला अभिवंदन करून त्याच्याजवळ उभे राहिले. नंतर गदा उभारून राहिलेला बलवान् भीमसेन आणि तुझा पुत्र दुर्योधन यांनींहि त्या बलरामाचें पूजन केलें. याप्रमाणें सर्वांनीं त्याचा सत्कार व सन्मान केल्यावर ते म्हणाले, 'रामा, हें युद्ध आतां अवलोकन कर !' तेथें जमलेल्या राजांनींहि त्या बलरामाला तीच विनंती केली.

राजा धृतराष्ट्रा, नंतर बलरामानें सृंजयांस व पांडवांस आलिंगन दिलें आणि त्या अमितपराक्रमी राजांचें कुशल विचारिलें. त्यांनींहि त्याला भेटून अनेक कुशलप्रश्न विचारिले. मग बलरामानें त्या सर्व क्षत्रियांचा सत्कार करून व यथाधिकार त्यांना संतुष्ट करून श्रीकृष्ण आणि सात्यकि यांना मोठ्या प्रेमानें आलिंगन दिलें. त्यानें त्यांच्या मस्तकांचें अवघ्राण केलें आणि त्यांची खुशाली विचारली ! नंतर ज्याप्रमाणें इंद्र व उपेंद्र मोठ्या हर्षानें देवाधिपति ब्रह्मदेवाचें पूजन करितात, त्याप्रमाणें त्या कृष्ण-सात्यकींनीं गुरु बलभद्राचें विधिपूर्वक

पूजन केलें. मग भारता, त्या अरिंदम बलरामाला युधिष्ठिर म्हणाला, 'हे रामा, आतां भावाभावांचें हें युद्ध अवलोकन कर!' नंतर तो कृष्णाचा वडील बंधु महारथ बलराम मोठ्या आनंदानें त्या राजांमध्यें जाऊन बसला. तेव्हां त्याचा त्या सर्व महारथांनीं मोठा सत्कार केला. त्यावेळीं त्या राजमंडळीमध्यें तो नीलवस्त्र व श्वेतप्रभ राम आकाशांतील नक्षत्रांनीं परिवेष्टित चंद्राप्रमाणें शोभला! इतक्यांत सर्व वैराचा अंत करणारा व अंगावर रोमांच उभे करणारा असा तुमुल संग्राम भीमसेन-दुर्योधनांमध्यें सुरू झाला! ९. ३. ३४.

## अध्याय ३५ वा.

[ १ जनमेजयाचा बलरामाच्या तीर्थयात्रेसंबंधीं वैशंपायनाला प्रश्न. २ प्रभासोत्पत्तिकथन. ]

( १ ) **जनमेजय**—वैशंपायना, पूर्वीं हें युद्ध उपस्थित झालें असतां बलराम प्रभु कृष्णाचा निरोप घेऊन वृष्णींसह निघून गेला. 'केशवा, या युद्धांत मी दुर्योधनाला किंवा पांडवांनाहि साहाय्य करणार नाहीं. मी आतां येथून निघून जातों,' असें बोलून तो शत्रुसंहारक राम निघून गेला! तो राम परत माघारा कसा आला, तें सांग! ब्रह्मन्, तूं कुशल आहेस, तेव्हां तो कसा परतला आणि त्यानें तें युद्ध कसें निरीक्षण केलें, तें सर्व विस्तारानें मला सांग!

**वैशंपायन**—जनमेजया, पांडव उपप्लव्यास राहिले असतां त्यांनीं कृष्णाला शिष्टाई करण्याकरितां धृतराष्ट्राकडे पाठविलें. कौरव-पांडवांमध्यें शांति नांदावी आणि सर्व प्राण्यांचें कल्याण व्हावें, ह्या हेतूनें कृष्ण हस्तिनापुराला गेला व धृतराष्ट्राला भेटला. त्यानें तेथें केलेलें भाषण तथ्य व विशेषतः हितकारक असें होतें. परंतु कृष्णाचें भाषण धृतराष्ट्रानें मान्य केलें नाहीं. त्यामुळें हे जनाधिपा, पुरुषसत्तम श्रीकृष्ण संधि न करितां धृतराष्ट्राचा निरोप घेऊन उपप्लव्य नगराला परतला. कृष्ण पांडवांना म्हणाला, 'कालप्रेरित कौरव माझ्या वचनाप्रमाणें वागण्यास तयार नाहींत, म्हणून पांडवहो, पुष्यनक्षत्रावर तुम्ही सर्व युद्धार्थ निघा! नंतर सैन्याचे विभाग होत असतां शूरश्रेष्ठ बलराम आपल्या कृष्ण बंधूला बोलला, 'मधुसूदना, तूं कौरवांचेंहि साहाय्य कर!' बलरामाचें हें म्हणणें कृष्णानें मान्य केलें नाहीं; त्यामुळें बलराम क्रोधसंतप्त झाला आणि तो महायशस्वी यदुनंदन अनुराधा नक्षत्रावर सरस्वतीनदीकडे सर्व यादवांना

घेऊन तीर्थयात्रेकरितां गेला. शत्रुनाशन भोज दुर्योधनाच्या बाजूला बळला आणि सात्यकीसह कृष्ण पांडवांकडे आला. शूर बलराम पुष्यनक्षत्रावर पांडवांस सोडून गेला असतां कृष्ण पांडवांस पुढें करून कौरवांवर चालून गेला. इकडे बलराम वाटेंतच सेवकांना म्हणाला, 'तीर्थयात्रेचें साहित्य, उपकरणें, अग्नि आणि याजक द्वारकेहून आणा; सोनें, रुपें, धेनु, वस्त्रें, अश्व, गज, रथ, गर्दभ, उंट, वाहनें आणि तीर्थयात्रेला आवश्यक लागणाऱ्या सर्व वस्तु त्वरित घेऊन या; शीघ्रगामी लोक सरस्वतीच्या तीरावर सत्वर पाठवा आणि ऋत्विज व शेंकडो मोठमोठे ब्राह्मण यांस आणवा!'

इकडे कौरव युद्धमग्न झाले असतां बलरामानें सेवकांस अशी आज्ञा केली आणि आपण सरस्वतीप्रवाहाला प्रदक्षिणा घालण्याच्या उद्देशानें ऋत्विज, सुहृज्जन, मोठमोठे विद्वान् ब्राह्मण, रथ, गज, अश्व, सेवक, तसेच थकले भागलेले बाल व वृद्ध यांनीं भरलेलीं व बैल, गर्दभ आणि उंट जोडलेलीं अनेक वाहनें घेऊन तीर्थयात्रेला निघाला. देशोदेशीं जीं जीं विविध दानें देत असतात, तीं तीं सर्व त्यानें दिलीं. तसेंच याचकांच्या सत्कारार्थ त्यानें त्या त्या देशांतील चालींप्रमाणें अनेक दानें दिलीं. बुभुक्षितांकरितां समंततः सर्वदा अन्न सिद्ध ठेवलें. तेथें ज्या ज्या पदार्थांची इच्छा ब्राह्मण करीत असे, तो तो त्याला तत्काल मिळावा अशी योजना करण्यांत आली. बलरामाच्या आज्ञेनें ठिकठिकाणीं लोक उभे राहून भक्ष्य-भोज्यांच्या राशी क्षुधितांपुढें घालीत असत. जे ब्राह्मण सुखाच्या इच्छेनें येत असत, त्यांकरितां महार्ह वस्त्रें, पर्यंक आणि बिछाने सिद्ध करून ठेवलेले असत. जनमेजया, प्रवासांत सर्व लोक इच्छेनुसार चालत किंवा थांबत असत. जाण्याची इच्छा झाल्यास त्याच्या पुढें वाहन तयार असे. तृषितांकरितां पाण्याची उत्तम व्यवस्था ठेवली होती. त्याचप्रमाणें बुभुक्षितांकरितांहि ठिकठिकाणीं मिष्टान्नें मिळण्याची व्यवस्था होती. सत्पात्रांस देण्याकरितां सेवक लोक हातांत वस्त्रें घेऊन तत्पर असत.

राजा, तो मार्ग सर्व प्रवासी लोकांस स्वर्गासमान अत्यंत सुखदायक झाला. प्रवासू लोकांचा आनंद, ठिकठिकाणीं ठेविलेले भक्ष्य-भोज्य पदार्थ, नानाविध पदार्थांचीं दुकानें, त्यांत ठेविलेले विक्रीचे पदार्थ आणि अनेक शुभसूचक प्रकार यांनीं त्या मार्गाला मोठी शोभा आली होती. तो मार्ग शेंकडो लोकांनीं सर्वदा गजबजलेला असून दोहों बाजूंच्या द्रुमलतांनीं व विविध रत्नांनीं अपूर्व सुशोभित झाला होता. याप्रमाणें यात्रेला जात असतां त्या यदुप्रवीर हलधरानें पुण्य-

तीर्थांवर पुष्कळ द्रव्य, विपुल दक्षिणा, सुवर्णभूषित शृंगांच्या हजारों सवत्स दुभत्या गाई, नाना देशांत जन्मलेले अश्व, वाहनें, उत्तम दास, तशींच रत्नें, मोत्यें, पोंवळीं, उत्तम प्रकारचें सोनें, शुद्ध रुपें, लोखंडी व तांब्याचीं भांडीं ब्राह्मणांस दिलीं. याप्रमाणें त्या महात्म्यानें सरस्वती नदीच्या तीरावरील श्रेष्ठ तीर्थांच्या ठिकाणीं पुष्कळ दानधर्म केला. नंतर तो उदारधी व अमितपराक्रमी बलराम क्रमानें तीर्थें करीत कुरुक्षेत्राला आला.

**जनमेजय**—सरस्वती तीरावरील तीर्थांचें रमणीयत्व, त्यांची उत्पत्ति, तीर्थयात्राविधि वगैरे सर्व मला सांग ! भगवन्, सर्व तीर्थांची हकीकत मला क्रमवार कथन कर ! ती ऐकण्याची मला मोठी आवड आहे.

( २ ) **वैशंपायन**—राजा, या तीर्थांचें फल, त्यांचे गुण, त्यांची उत्पत्ति वगैरे सर्व पुण्यदायक गोष्टी तुला मी आतां सांगतों. राजेंद्रा, नीट लक्ष्य दे ! महाराज, तो यदुप्रवीर आपले ऋत्विज्, सुहृद्, विप्रगण यांसह निघाला, तो प्रथमतः जेथें नक्षत्राधिपति चंद्र क्षयरोगानें क्षीण होऊन राहिला होता, त्या पुण्यकारक प्रभासतीर्थावर गेला. पुढें चंद्र शापविमुक्त होऊन त्याला आपलें तेज प्राप्त झालें आणि सर्व जगताला तो प्रकाशित करूं लागला. नरेंद्रा, हें तीर्थ आपल्या अंगच्या तेजामुळें ' प्रभास ' ही संज्ञा पावून पृथ्वीवरील सर्व तीर्थांत श्रेष्ठ आहे.

**जनमेजय**—भगवन्, चंद्राला क्षयाची पीडा कशामुळें झाली, तसेंच त्या श्रेष्ठ तीर्थांत चंद्रानें कसें निमज्जन केलें आणि त्यांत स्नान केल्यावर तो पुनः पूर्ववत् वृद्धिंगत कसा झाला, हें सर्व मला विस्तारपूर्वक सांग !

**वैशंपायन**—राजेंद्रा, दक्षानें आपल्या सत्तावीस कन्या चंद्राला अर्पण केल्या होत्या, त्यावरून सत्तावीस नक्षत्रांचीं नांवें पडलीं आहेत. त्या चंद्रभार्या अत्यंत सदाचरणी होत्या. त्यांचे डोळे विशाल असून त्यांचें रूप अप्रतिम होतें. त्या सर्वांत रोहिणी आपल्या स्वरूपानें बाकीच्यांहून विशेष शोभत असे. त्यामुळें चंद्राचें तिजवर विशेष प्रेम जडलें. ती त्याला अत्यंत प्रेमपात्र होऊन तो सर्वदा तिच्याशींच रममाण होत असे. त्यामुळें त्या नक्षत्राख्य कन्या त्याजवर रागावल्या आणि आपल्या दक्षप्रजापति पित्याकडे जाऊन त्याला म्हणाल्या, ' चंद्र आमच्यांशीं कधीं रममाण होत नाहीं, तो सर्वदा रोहिणीच्या आश्रयास असतो. यास्तव हे प्रजानाथा, आतां आम्ही सर्व आहार वर्ज्य करून

तुझ्या सन्निध तप आचरीत बसतों !' त्या मुलींचें तें भाषण ऐकून दक्ष चंद्राला बोलला, 'सर्व स्त्रियांशीं सारख्या प्रेमानें वागत जा. नाहींतर तुला मोठा अधर्म लागेल !' नंतर त्या सर्व जणींस दक्ष म्हणाला, 'मुलींनो, तुम्ही आतां चंद्राकडे जा ! माझ्या शासनानें आतां तो तुम्हांला समभावानें वागवील !' याप्रमाणें पित्याचा निरोप घेऊन त्या सर्व चंद्रगृहीं आल्या. तथापि चंद्राचें रोहिणीवरील प्रेम यत्किंचितहि कमी न होतां तो तिच्याशींच रममाण होऊं लागला. तेव्हां त्या सर्वजणी पुनः पित्याकडे गेल्या आणि त्याला म्हणाल्या, 'बाबा, चंद्र आमच्याकडे रहात नाहीं, तुझें सांगणें तो ऐकत नाहीं, म्हणून आम्ही तुझी सेवा करून तुझ्या संनिधच राहूं.' त्यांचें हें बोलणें ऐकून दक्ष चंद्राला पुनः म्हणाला, 'विरोचना, मी तुला आज शाप देत नाहीं. तूं आपल्या सर्व भार्यांच्या ठिकाणीं समभाव ठेवून रहावें !'

राजा, दक्षाच्या या भाषणाचाहि चंद्रानें अनादर केला आणि तो रोहिणी-सह राहूं लागला. तेव्हां त्याच्या इतर स्त्रियांना पुनः क्रोध आला आणि त्या तत्काल पित्याकडे गेल्या. त्यांनीं त्याला शिरसा प्रणाम केला आणि म्हटलें, 'बाबा, अजूनहि चंद्र आमच्या येथें येऊन राहत नाहीं. म्हणून आतां तूंच आमचें रक्षण कर. तो सर्वदा रोहिणीशींच रममाण होतो. तो तुझ्या शब्दास जुमानीत नाहीं किंवा आमच्या स्नेहाचीहि इच्छा करीत नाहीं. म्हणून तूं आमचें रक्षण कर आणि चंद्र आमच्याकडे येईल असें कर !'

'राजा, मुलींचें हें भाषण ऐकून दक्ष अत्यंत क्रुद्ध झाला आणि त्यानें चंद्रा-वर क्षयरोग सोडला. तेव्हां तो क्षय चंद्राच्या शरीरांत शिरला. त्या क्षयाच्या विकारानें चंद्र दिवसेंदिवस क्षीण होत चालला. त्या रोगापासून आपली मुक्तता व्हावी, म्हणून चंद्रानें अनेक यज्ञयाग वगैरे केले. परंतु त्यांचा कांहीं उपयोग न होतां तो दिवसानुदिवस खंगत चालला. चंद्र क्षीण होऊं लागल्यामुळें ओषधी उगवत नाहींशा झाल्या. ज्या ओषधी जीवंत होत्या, त्यांचा आस्वाद व रस कमी होऊन त्या हतवीर्य झाल्या. ओषधींच्या क्षयाबरोबर प्राण्यांचाहि क्षय होऊं लागला. चंद्राच्या क्षयानें सर्व प्रजांचा क्षय होऊं लागला. हे राजा, तेव्हां सर्व देव एकत्र झाले आणि चंद्राला म्हणाले, 'अरे चंद्रा, तुझें हें शरीर इतकें क्षीण दिसतें, ह्याला काय बरें कारण असावें ? तुला एवढें भय कोणा-पासून उद्भवलें आहे, तें सर्व आम्हांला सांग, तुझ्याकडून कारण समजलें म्हणजे

त्यावर कांहींतरी उपाय योजण्यास आम्हांला सुचेल! देवांचें भाषण ऐकून चंद्रानें आपणाला शाप कसा झाला आणि त्यामुळें क्षय कसा जडला, तें सर्व त्यांस सांगितलें. तें चंद्राचें भाषण ऐकून देव दक्षाकडे गेले आणि म्हणाले, 'भगवन्, सोमावर दया करून आपल्या शापाची निवृत्ति कर! हा चंद्र अत्यंत क्षीण झाला असून किंचित् अवशिष्ट राहिला आहे. देवेशा, याच्या क्षयामुळें प्रजाहि क्षयी होत चालल्या आहेत आणि लता, ओषधी आणि वेगवेगळीं बीजें नष्ट होत चाललीं आहेत. त्याचप्रमाणें त्यांच्या नाशाबरोबर लोकांचाहि क्षय होत चालला आहे, म्हणून हे लोकगुरो, चंद्रावर प्रसाद कर!'

या प्रकारचें देवांचें भाषण ऐकून दक्ष प्रजापति त्यांस म्हणाला, "महाभागहो, माझें वचन सर्वस्वीं बदलणें कधींहि शक्य नाहीं. कांहींतरी हेतूनें तें बदलेल. ह्या चंद्रानें आपल्या स्त्रियांच्या ठिकाणीं समभावानें वागावें. असें वागूं लागल्यावर त्यानें सरस्वतीच्या पवित्र उदकामध्यें स्नान करावें. म्हणजे तो पुनः पूर्ववत् वृद्धिंगत होईल. देवहो, हें माझें भाषण सत्य आहे. हा चंद्र अर्ध मासपर्यंत क्षीण होत जाईल आणि पुढील अर्ध मासपावेतों वृद्धि पावेल. आतां ह्या चंद्रानें पश्चिम समुद्राकडे जाऊन सरस्वतीचा समुद्राशीं जेथें संगम होतो, तेथें जाऊन त्यानें देवेशाची आराधना करावी, म्हणजे त्याची कांति पूर्ववत् होईल!"

राजा, दक्षप्रजापतीच्या आज्ञेप्रमाणें चंद्र सरस्वतीच्या तीरावर गेला आणि तिच्या कांठचें पहिलें जें प्रभासनामक तीर्थ तेथें आला. त्या तीर्थांत अमावास्यादिनीं त्यानें अवगाहन केलें. त्याबरोबर त्याला शीतांशुत्व प्राप्त होऊन तो सर्व जगताला प्रकाशमान करूं लागला. मग सर्व देवहि तेथें आले आणि त्याच्यासह दक्षाकडे गेले. दक्षानें सर्व देवतांस निरोप दिला आणि प्रसन्न होऊन पुनः चंद्रास म्हणाला, 'पुत्रा, स्त्रियांचा तसाच विप्रांचा अपमान कधींहि करूं नकोस. आतां जा आणि माझ्या आज्ञेप्रमाणें वागत जा!'

राजा, मग चंद्र प्रजापतीचा निरोप घेऊन घरीं आला, तेव्हां सर्व प्रजा आनंदित होऊन पूर्वींप्रमाणें यजनादि क्रिया करूं लागल्या. याप्रमाणें चंद्रास शाप कसा झाला आणि सर्व तीर्थांत प्रमुख जें प्रभासतीर्थ त्याचीहि माहिती तुला सांगितली. ह्या उत्तम प्रभासतीर्थांत चंद्र प्रत्येक अमावास्येला स्नान करितो आणि कांतिमान् होतो. म्हणूनच ह्या तीर्थास 'प्रभास' हें नांव पडलें आहे. प्रभास तीर्थाहून बलराम 'चमसोद्भेद' तीर्थावर गेला. त्या ठिकाणीं

त्यानें विशिष्ट दानें दिलीं, विधिवत् स्नान केलें आणि तेथें एक रात्र राहून तो त्वरेनें उदपानास गेला. तेथेंहि त्यानें ब्राह्मणांस दक्षिणा देऊन त्यांचे आशीर्वाद घेतले. जनमेजया, तेथील वनस्पति व भूमि यांच्या स्निग्धपणावरून सिद्ध लोकांना गुप्त झालेली सरस्वती सहज ओळखतां येते. ९. ३. ३५.

## अध्याय ३६ वा.

[ १ त्रिताख्यान. ]

( १ ) **वैशंपायन**—राजा, बलभद्र त्या चमसोद्भेद तीर्थांहून पुढें निघाला, तो नदीजवळील कीर्तिमान् त्रिताच्या उदपानावर ( कूपावर ) आला. तेथें त्यानें ब्राह्मणांचें पूजन करून पुष्कळ द्रव्य त्यांना वांटलें. मग स्नान केल्यावर बलरामाला मोठा आनंद झाला. तेथें त्रित नांवाचा एक धार्मिक तपस्वी राहत असे. कूपांत पडला असतांहि त्या महात्म्यानें सोमदान केलें! त्याचे बंधू त्याला तेथें सोडून गृहीं गेले. त्यामुळें त्या ब्राह्मणसत्तमानें त्या आपल्या बंधूंस शाप दिला.

**जनमेजय**—हे ब्राह्मणा, तो महातपस्वी ब्राह्मण त्या उदपानांत ( कूपांत ) कसा पडला, त्याचा बंधूंनीं त्याग करण्याचें कारण काय, तसेंच त्याला कूपांत टाकून ते बंधु गृहीं कां गेले, त्रितानें तेथें यज्ञ कसा केला व सोमपान कसें केलें? ब्रह्मन्, हें श्रोतव्य आहे, असें तुला वाटत असल्यास मला सांग!

**वैशंपायन**—जनमेजया, पूर्वयुगामध्यें एकत, द्वित आणि त्रित या नांवांचे तीन मुनिबंधु असत. ते सूर्यसदृश तेजस्वी असून प्रजापतिसमान कुटुंबी होते. ते मोठे ब्रह्मवादी असून तपानें ब्रह्मलोक जिंकलेले असे होते. त्यांचें तप, नियम आणि दम पाहून त्यांच्या धर्मरत गौतम पित्यास सर्वदा संतोष होत असे. पुढें दीर्घ कालानें तो गौतमपिता त्या पुत्रांचें प्रेम संपादन करून आत्मानुरूप लोकीं गेला. मग ज्या राजांकडे तो गौतम यज्ञ करीत असे, त्यांनीं त्या पुत्रांकडून आपलीं तीं कृत्यें करविण्यास आरंभ केला. त्या तीन पुत्रांमध्यें त्रित हा आपल्या अध्ययनानें आणि कर्मानें आपल्या पित्याप्रमाणें श्रेष्ठता पावला. त्यामुळें ते सर्व पुण्यशील मुनि त्याला पित्याप्रमाणेंच मान देऊं लागले!

राजा, पुढें कोणी एके काळीं एकत व द्वित या दोघां बंधूंस यज्ञार्थ द्रव्य मिळविण्याची इच्छा उत्पन्न झाली. त्यांनीं विचार केला कीं, सर्व यज्ञकर्त्या

यजमानांस त्रितावरोबर जाऊन आपण भेटावें म्हणजे आपणांस धेनु मिळतील व एखादा महायज्ञ मिळून आनंदानें सोमप्राशनहि करावयास सांपडेल. हे राजा, मग त्या तिघां बंधूंनीं त्याप्रमाणें केलें. धेनुप्राप्त्यर्थ सर्व यज्ञकर्त्यांकडे ते फिरले आणि त्यांचे यज्ञ विधिपूर्वक संपादून त्यांनीं पुष्कळ धेनु मिळविल्या व ते पूर्वदिशेकडे निघाले. त्या तिघांमध्यें त्रित मोठ्या हर्षानें सर्वांपुढें चालला होता आणि एकत आणि द्वित हे गाई हांकीत मागाहून येत होते. ह्या सर्व धेनु त्रितावांचून आपणांसच कशा मिळतील, ही चिंता त्यांना लागली. ते म्हणाले, 'ह्या त्रित यज्ञांमध्यें मोठा कुशल आहे, तसाच वेदांतहि मोठा प्रवीण आहे. त्याला दुसऱ्या पुष्कळ धेनु मिळतील. तरी आपण दोघे एक होऊन ह्या गाई घेऊन पळून जाऊं. हा त्रित आतां वाटेल तिकडे जावो.'

राजा, याप्रमाणें रात्रीच्या वेळीं ते चालत असतां मार्गांवर एक लांडगा होता. सरस्वतीच्या तीरानें जाणाऱ्या त्या रस्त्यावर एक मोठा कूप होता. समोर लांडग्याला रस्त्यावर उभा असलेला पाहून तो त्रित भीतीनें बाजूला वळला आणि त्या अगाध, घोर आणि प्राणिमात्रास अत्यंत भयभीत करून सोडणाऱ्या कूपांत पडला. त्रितानें त्या कूपांतून मोठमोठ्यानें आरोळ्या मारल्या. त्या त्याच्या बंधूंनीं ऐकिल्या, परंतु लोभामुळें किंवा वृकाच्या भयामुळें ते त्याला तेथें सोडून निघून गेले. मग त्या पशुलुब्ध बंधूंनीं तेथें सोडलेला तो त्रित निर्जल व धुळीनें भरलेल्या कूपांत पडून राहिला! हे भरतश्रेष्ठा, नरककुंडांत पडलेल्या पापी मनुष्याप्रमाणें आपण या कुंडांत कसें पडलों, याचा त्यानें विचार केला. 'ज्याला सोमपान घडलें नाहीं, त्यासच मृत्यूची भीति असते. मला तर सोमपान प्राप्त झालें नाहीं. आतां मला येथें सोम कोठून मिळणार ?' असे विचार त्याच्या मनांत येऊं लागले.

राजा, याप्रमाणें त्याचे विचार चालले असतां त्या कूपांत एक लोंबत असलेला वेल त्याच्या दृष्टीस सहज पडला. त्या मुनीनें पांसुमय कूपामध्यें खणून उदक काढिलें, तेथें अग्नीची कल्पना केली, स्वतः होता झाला, त्या वेलीवर सोमाची कल्पना केली आणि ऋचा, यजुःसूक्तें आणि साम ह्यांचें मनानें चिंतन केलें. त्यानें धूलिकणांची शर्करास्थानीं योजना केली, सर काढला, पाण्याला आज्य मानिलें आणि देवांचे भाग कल्पिले. सोम काढतांना त्यानें अग्रभागीं मोठ्यानें तुमुल ध्वनि केला. तो त्रिताचा नाद स्वर्गास जाऊन पोंचला.

त्रिताचा यज्ञ सुरू असतां सर्व स्वर्गलोक उदास दिसूं लागला; कां तें मात्र कोणास समजलें नाहीं. मग तो तुमुल शब्द ऐकून बृहस्पति देवांस म्हणाला, ' देवहो, त्रिताचा यज्ञ चालला आहे, तर आपण सर्व तेथें जाऊं. तो महातपस्वी रागावला असतां दुसरे देवहि निर्माण करील ! '

राजन्, तें त्याचें भाषण ऐकून सर्व देव त्रित यज्ञ करीत होता, तेथें गेले आणि जातात तों यज्ञकर्मांची दीक्षा घेतलेला त्रित त्यांच्या दृष्टीस पडला. त्याच्या चेहेऱ्यावर परम कांति शोभत होती. त्याला पाहून देव म्हणाले, ' आम्ही आमचे भाग ग्रहण करण्याकरितां आलों आहों. ' मग त्रित त्यांस म्हणाला, ' अहो देवांनो, ह्या अत्यंत भयंकर कूपांत नष्टप्राय होऊन मी पडून राहिलों आहें, मजकडे पहा ! '

हे महाराजा, मग त्रितानें त्या देवांचे भाग त्यांस यथाविधि समंत्रक दिले. तेव्हां देव संतुष्ट झाले आणि त्यांनीं त्रिताला वर माग म्हणून सांगितलें. तेव्हां तो म्हणाला, ' मला तुम्ही येथून वर काढावें आणि या कूपामध्यें जो स्नान करील त्यानें देवलोकाला जावें ! ' इतक्यांत त्या कूपांतून ऊर्मियुक्त सरस्वती नदी उत्पन्न झाली. तिचे ओघाबरोबर त्रित मुनि बाहेर येऊन देवांसमोर उभा राहिला. त्यानें देवांची स्तुति केल्यावर देव तेथून निघून गेले. इकडे त्रित मुनिहि हर्षित होऊन आपल्या गृहीं गेला. तेथें आपल्या त्या दोन बंधूंस पाहतांच त्याला फार क्रोध आला, त्यानें त्यांच्यांशीं फार कठोर भाषण केलें आणि शेवटीं त्यांस शाप दिला कीं, ' पशूंच्या लोभानें तुम्ही मला सोडून पळून आलांत. या पापकर्माबद्दल तुम्ही आतां भयंकर दंष्ट्रांचे ऋक्ष होऊन सभोंवार फिरत राहाल, असा माझा तुम्हांला शाप आहे. तुमची संततीहि अस्वलें आणि वानर होईल !'

राजा, त्या सत्यवादी महामुनि त्रिताच्या तोंडून हीं अक्षरें बाहेर पडतांच ते तत्काळ तसे झालेले दिसले. या ठिकाणींहि त्या अमितविक्रमी बलरामानें उदकस्पर्श केला, पुष्कळ दानें दिलीं, योग्य ब्राह्मणांचें पूजन केलें, त्या कूपाकडे पाहून पुनः पुनः त्याची प्रशंसा केली आणि तेथून जवळ असलेले विनशननामक तीर्थावर तो उदारबुद्धि आला. ९. ३. ३६.

---

## अध्याय ३७ वा.

[ १ सरस्वती तीरावरील त्या त्या तीर्थांचा महिमा आणि गुणवर्णन. ]

( १ ) वैशंपायन—राजा, मग बलराम विनशन तीर्थावर आला. या ठिकाणीं शूद्राभीरांच्या द्वेषामुळें सरस्वती नष्ट झाली. म्हणून ऋषींनीं यास विनशन नांव ठेविलें. तेथें सरस्वतींत स्नान करून बलराम तिच्या तटावरील सुभूमिक तीर्थावर गेला. तेथें शुभ्रांग विमलानना अप्सरा मोठ्या दक्षतेनें नित्य क्रीडा करीत असतात. हे जनेश्वरा, त्या ठिकाणीं दर महिन्याला देव-गंधर्व येत असतात, असें तें तीर्थ अत्यंत पवित्र व ब्राह्मणसेवित आहे. येथें गंधर्व आणि अप्सरा यांचे गण एकत्र मिळून मोठ्या आनंदानें नृत्य करीत असतात. तेथील लतांवरील उत्तम दिव्य पुष्पांनीं देव आणि पितर आनंद पावतात. हे राजा, त्या अप्सरांची सरस्वती तीरावरील क्रीडाभूमि सुभूमिका या नांवानें प्रख्यात आहे. त्या बलरामानें तेथें स्नान करून ब्राह्मणांस द्रव्यदान केलें, दिव्यगान आणि वाद्यांचा नाद श्रवण केला, देव, गंधर्व, राक्षसांच्या पुष्कळ छाया अवलोकन केल्या आणि तेथून तो गंधर्वतीर्थास गेला. विश्वावसुप्रभृति तपोनिष्ठ गंधर्व तेथें अत्यंत मनोरम असें नृत्य, गायन, वादन करीत असतात. बलरामानें तेथें पुष्कळ वस्तु, शेळया, मेंढ्या, धेनु, गर्दभ, उंट, सुवर्ण आणि रौप्य दान केलें, ब्राह्मणांस भोजन घातलें आणि मोठमोठ्या दक्षिणांनीं त्यांस संतुष्ट केलें. नंतर स्तुति करणाऱ्या ब्रह्मवृंदांनीं युक्त तो राम त्या गंधर्वतीर्थाहून निघून गर्गस्रोत-नामक महातीर्थावर येऊन पोंचला.

जनमेजया, तेथें महात्म्या गर्गमुनीनें सरस्वतीच्या पवित्र तीरावर काल-ज्ञानगति, ताऱ्यांचा व्यतिक्रम आणि दारुण व शुभ उत्पात यांचें ज्ञान प्राप्त करून घेतलें. त्याच्या नांवावरूनच या तीर्थाला ‘ गर्गस्रोत ’ नांव पडलें आहे. हे प्रभो, त्या ठिकाणीं कालज्ञानप्राप्तीकरितां अनेक सुव्रत ऋषि महाभाग गर्गाची आराधना करितात. हे महाराजा, तेथें श्वेतानुलेपन बलरामानें जाऊन तेथील ब्रह्मनिष्ठ मुनींस विधिवत् द्रव्यार्पण केलें आणि मोठीं पक्वान्नें व साधीं अन्नें यांचें भोजन ब्राह्मणांस घातलें. तेथून तो नीलवस्त्र बलराम शंखतीर्थाला गेला. तेथें सरस्वतीच्या कांठावर वाढलेला, महामेरूसमान उंच, श्वेत पर्वताप्रमाणें शोभणारा, ऋषिसंघांनीं सेवित असा एक महाशंखनामक वृक्ष त्या तालध्वजानें—बलरामानें—पाहिला. त्या ठिकाणीं यक्ष, विद्याधर, वीर्यवान्

राक्षस, अमितबल पिशाच आणि सहस्रावधि सिद्ध आहार सोडून व्रतनियमादिकांनीं त्या वृक्षाचें फळ वेळोवेळीं भक्षण करीत असतात. ते अनेक प्रकारचे नियम धारण करून अदृश्यरूपानें पृथक् पृथक् भ्रमण करितात. हे नरव्याघ्रा, याप्रमाणें तो वृक्ष या लोकीं प्रख्यात आहे.

राजा, त्यापुढें सरस्वतीचें लोकविश्रुत पावनतीर्थ आहे. तेथें जाऊन त्या यदुशार्दूलानें पयस्विनी गाई, तांब्यालोखंडाचीं भांडीं आणि विविध प्रकारचीं वस्त्रें वांटलीं, ब्राह्मणांचें पूजन केलें आणि मग त्या तपोधनांनींहि त्याचा सत्कार केला. तेथून मग हलायुध पुण्यकारक द्वैतवनास आला. तेथें नाना वेषधारी मुनि त्या बलरामाच्या दृष्टीस पडले. येथेंहि त्यानें उदकस्नान करून ब्राह्मणपूजन केलें व त्यांस पुष्कळ उपभोग्य वस्तु दिल्या. तेथून बलरामानें सरस्वतीच्या उजव्या बाजूला प्रयाण केलें आणि जवळच असलेल्या नागधन्वा नांवाच्या तीर्थावर तो येऊन पोंचला. येथें पुष्कळ पन्नगांनीं वेष्टित अशा महातेजस्वी पन्नगराज वासुकीचें वसतिस्थान आहे. या ठिकाणीं नित्य चवदा सहस्र मुनि राहत असतात. येथें सर्व देवांनीं मिळून त्या पन्नगराज वासुकीला राज्यपदावर यथाविधि अभिषेक केला. हे पौरवा, या ठिकाणीं सर्पांपासून किमपि भीति नाहीं. तेथें ब्राह्मणांना अनेक रत्नें बलरामानें दिलीं आणि तेथून तो पूर्वदिशेकडे गेला. तेथें पदोपदीं लागणाऱ्या लक्षावधि तीर्थांवर जाऊन बलरामानें ऋषींच्या सांगण्याप्रमाणें स्नान केलें आणि मोठमोठ्या द्विजश्रेष्ठांना द्रव्यदान करून व तेथील ऋषिसत्तमांला अभिवंदन करून त्यानें तेथून प्रयाण केलें. पुढें तो सरस्वतीचें पात्र योजून उद्दिष्ट मार्गानें पूर्वेकडे गेला. इतक्यांत वायूनें फिरविलेल्या पर्जन्यवृष्टीप्रमाणें तो मागें फिरला आणि नैमिषेय श्रेष्ठ मुनींच्या अर्थसिद्ध्यर्थ सरस्वती मागें उलटलेली पाहून तो बलराम अत्यंत विस्मित झाला.

**जनमेजय**—ब्रह्मन्, पूर्वेकडे जाणारी सरस्वती मागें कां फिरली हें जाणण्याची मला फार इच्छा आहे. तर हे अध्वर्युसत्तमा, तें तूं मला नीट सांग! तसाच तो बलराम कोणत्या कारणानें विस्मित झाला आणि सरिद्वरा सरस्वती कोणत्या हेतूनें आणि कशी मागें फिरली तेंहि मला सांग!

**वैशंपायन**—राजा, पूर्वीं कृतयुगामध्यें अत्यंत मोठें असें द्वादशवार्षिक सत्र चालू होतें. तेथें नैमिषेय तपस्वी व पुष्कळ ऋषि आले होते. तें सत्र चालू असतां त्या ऋषींनीं तेथें वसति केली. तें सत्र समाप्त झाल्यावर पुष्कळ ऋषि

तीर्थवासाकरितां म्हणून तेथें येऊन राहिले. राजा, तेथें ऋषींची फार गर्दी झाल्यामुळें सरस्वतीच्या दक्षिण तीरावरील तीर्थांना मोठमोठ्या नगरांचें स्वरूप प्राप्त झालें होतें. तेथें नदीकांठावर समंतपंचक प्रांतभर ते सर्व ब्राह्मण तीर्थलोभामुळें येऊन राहिले. तेथें यज्ञ करणाऱ्या ब्रह्मनिष्ठ मुनींच्या स्वाध्यायपठनानें सर्व दिशा अगदीं दुमदुमून जात असत. त्या महात्म्यांच्या अग्निहोत्रांचीं कुंडें समंतात् प्रदीप्त असल्यामुळें त्या सरस्वती नदीला शोभा आली होती. हे महाराजा, वालखिल्य, जलाहारी, पर्णाहारी, स्थंडिलशायी इत्यादि नानाप्रकारचे नियम पाळणारे मुनि तेथें सरस्वतीच्या सान्निध्याला येऊन राहिले होते. जशी गंगेला देवांच्या योगें शोभा येते, त्याप्रमाणें त्या मुनींच्या योगानें ती सरिच्छ्रेष्ठ सरस्वती नदी शोभत असे.

राजा, पुढें आणखी शतशः सत्रयाजी ऋषि तेथें राहण्यास आले. परंतु त्या महाव्रतांस सरस्वतीच्या कांठीं जागा मिळाली नाहीं. तेव्हां त्यांनीं यज्ञोपवीतांनीं तें तीर्थ निर्माण केलें आणि अग्निहोत्रांचीं हवनें व दुसऱ्या पुष्कळ क्रिया तेथें केल्या. तो ऋषींचा समूह सरस्वतीतीरावर जागा न मिळाल्यामुळें निराश व चिंतायुक्त झाल्याचें पाहून सरस्वतीनें त्यांच्यासाठीं अनेक कुंज ( निवासस्थानें ) उत्पन्न केले आणि ती सरस्वती तेथून मागें परतली. त्या वेळेपासून ती पश्चिमाभिमुख वाहूं लागली. 'त्या मुनींचें आगमन सफल करून मी पुनः त्यांजकडे जाईन,' असें बोलून त्या नदीनें असें आश्चर्यकारक महत्कृत्य केलें. राजा, याप्रमाणें तो उत्पन्न झालेला कुंज नैमिषेय नांवानें प्रसिद्ध आहे. कुरुश्रेष्ठा, त्या कुरुक्षेत्रांत तूं कांहींतरी मोठें कृत्य करावेंस. त्या ठिकाणीं निर्माण केलेले ते अनेक कुंज व निवृत्त झालेली सरस्वती पाहून त्या बलरामास मोठें आश्चर्य वाटलें. त्या ठिकाणींहि त्यानें यथाविधि स्नान केलें. ब्राह्मणांना भांडीं आणि वेगवेगळ्या प्रकारचीं भक्ष्य-भोज्यें दिलीं आणि नंतर द्विजांनीं प्रशंसित तो बलराम अनेक द्विजगणांनीं युक्त, नानाविध वृक्षलतांनीं सुशोभित, कर्दळीवनानें वेष्टित, मनोहर, अत्यंत रमणीय, जलाहारी, पर्णाहारी, वायवाहारी इत्यादि मुनींनीं परिवारित, स्वाध्यायपठणघोषानें दुमदुमून राहिलेलें, शेंकडों मृगकुलांनीं व्याप्त, अहिंस्र व धर्मपर जनांनीं अत्यंत सेविलेलें आणि मंकणक नांवाच्या मुनीचें तपश्चर्यास्थान असें सप्तसारस्वतनामक जें तीर्थ त्या ठिकाणीं आला. ९. १. ३७.

---

## अध्याय ३८ वा.

[ १ सरस्वतीनदीचे सात विभाग होऊन त्यांचीं पडलेलीं सात नांवें. २ मंकणकमुनिचरित. ]

( १ ) **जनमेजय**—हे द्विजोत्तमा, सप्तसारस्वत तीर्थाची उत्पत्ति कशी झाली, मंकणक मुनि हा कोण होता, त्याला सिद्धि कशी प्राप्त झाली, त्याचा नियम काय होता, त्याचा जन्म कोणच्या वंशांत झाला आणि त्यानें अध्ययन काय केलें होतें, हें सर्व सविस्तर ऐकण्याची मला फार इच्छा आहे, तर महामुने, तें सर्व मला यथार्थ सांग !

**वैशंपायन**—जनमेजया, तेथें सरस्वतीनदीचे सात विभाग झाले असून त्यांनीं हें सर्व जगत् व्याप्त झालें आहे. ठिकठिकाणच्या थोर लोकांच्या आमंत्रणावरून ती सरस्वती त्या त्या ठिकाणीं सुप्रभा, कांचनाक्षी, विशाला, मनोरमा, ओघवती, सुरेणु आणि विमलोदका हीं सात नांवें धारण करून अवतीर्ण झाली. पितामह ब्रह्मदेवाच्या महायज्ञास आरंभ झाला असतां यज्ञमंडप उभारला आणि ब्राह्मणवर्ग सिद्ध झाले. विमल पुण्याहघोष आणि वेदनिनाद यांनीं देव त्या यज्ञांत व्यग्र झाले आणि प्रपितामह ब्रह्मदेवानें यज्ञदीक्षा घेतली. तेथें सर्वकामसमृद्ध सत्रानें यजन करण्यास त्यानें प्रारंभ केला. त्यावेळीं धर्मार्थकुशल लोकांनीं जे जे अर्थ मनांत आणले ते ते सर्व ब्राह्मणांना प्राप्त होत असत. तेथें गंधर्व गायन करीत असत, अप्सरा नाचत असत आणि वादक दिव्य वाद्यें वाजवीत असत. त्या यज्ञांतील संपत्तीनें देवता संतुष्ट होऊन अत्यंत आश्चर्यचकित होऊन गेल्या, तेथें मनुष्याची गोष्ट कशाला पाहिजे ? पुष्कर तीर्थावर ब्रह्मदेव असतां यज्ञप्रारंभ झाला. राजा, त्यावेळीं ऋषि म्हणाले, 'ह्या यज्ञाला महागुण यज्ञ म्हणतां येणार नाहीं; कारण येथें सरिच्छ्रेष्ठ सरस्वती नाहीं.'

राजा, तें ऐकून यज्ञकर्त्या ब्रह्मदेवानें प्रसन्न मनानें सरस्वतीचें चिंतन केलें. तेव्हां पुष्करदेशीं आह्वान केलेली सरस्वती सुप्रभा या नांवानें तेथें आली. पितामहाच्या शब्दास मान देऊन त्वरेनें आलेल्या सरस्वतीस पाहून सर्व मुनींस मोठा आनंद झाला आणि त्या यज्ञाला त्यांनीं श्रेष्ठ मानिलें. याप्रमाणें ही सरिच्छ्रेष्ठ सरस्वती पुष्करामध्यें ब्रह्मदेवासाठीं आणि मुनींच्या संतोषासाठीं उत्पन्न झाली.

राजा, कोणी एके समयीं नाना स्वाध्याय जाणणारे मुनि नैमिषारण्यांत बसले असतां त्यांच्यामध्यें वेदाविषयीं चमत्कारिक गोष्टी निघाल्या. त्यावेळीं त्या सर्व मुनींनीं सरस्वतीचें चिंतन केलें. तेव्हां त्या सत्रयाजींनीं चिंतलेली पवित्र सरस्वती त्या महात्म्यांच्या साहाय्यार्थ तेथें प्रगट झाली. याप्रमाणें नैमिषांत ती सरिच्छ्रेष्ठ कांचनाक्षी प्रगट झाल्यावर त्या मुनींनीं तिची पूजा केली. गयदेशांतील गय राजानें महायज्ञास आरंभ केला असतां त्यानें सर्व नद्यांत श्रेष्ठ सरस्वतीला आमंत्रण केलें. तेथें गयासाठीं प्रकट झालेली सरस्वती विशाला नांवानें प्रसिद्धि पावली. ही नदी हिमालय पर्वताच्या पार्श्व-भागापासून वेगानें बाहेर पडून तेथें आली होती. हे भारता, प्राचीन काळीं उत्तरकोसल देशांत औद्दालक यज्ञ करीत असतां व सभोंवार पवित्र मुनि बसले असतां त्या यज्ञकर्त्यानें सरस्वतीचें ध्यान केलें. तेव्हां ती सरस्वती मुनींच्या कारणासाठीं उद्भूत झाली. तिचें वल्कलाजिनवेष्टित मुनींनीं पूजन केलें व तिचें नांव मनोरमा ठेविलें. ऋषभद्वीपांत महात्मा कुरु यज्ञ करीत असतां महाभागा सरस्वती तेथें प्रगट झाली, तिला सुरेणु म्हणतात.

राजेंद्रा, त्या महात्म्या वसिष्ठानें कुरुक्षेत्रांत निमंत्रित केलेली दिव्योदका सरस्वती ओघवती नांवानें प्रसिद्ध आहे. गंगाद्वारामध्यें दक्षानें यज्ञ आरंभ केला असतां तेथें शीघ्र गतीनें प्रकट झालेली नदी सरस्वती सुरेणु म्हणून प्रसिद्ध आहे. पुनः त्या पवित्र हिमाचलावर ब्रह्मदेवानें यज्ञ चालविला असतां त्याच्या आमंत्रणावरून तेथें विमलोदका प्राप्त झाली. पुढें त्या सात नद्या एका तीर्थांत प्रकट होऊन तें स्थान सप्तसारस्वत नांवानें पृथ्वीवर प्रसिद्ध झालें. याप्रमाणें हे राजा, मी तुला सात नद्यांचीं नांवें सांगितलीं. त्याचप्रमाणें पवित्र सप्तसारस्वतांचेंहि तुला निवेदन केलें.

( २ ) राजा, आतां तीर्थांत स्नान करणाऱ्या बालब्रह्मचारी मंकणकाचें अद्भुत कृत्य सांगतों, श्रवण कर ! हे भारता, तो ब्रह्मचारी नदींत स्नान करीत असतां तेथें जवळच एक गुणवती व सर्वांगसुंदर नग्न स्त्री पाण्यामध्यें त्याच्या सहज दृष्टीस पडली. त्याबरोबर त्याचें रेत सरस्वतीच्या पाण्यांत पडलें. त्या तपस्व्यानें तें रेत कलशामध्यें धारण केलें. कलशांतील त्या रेताचे पुढें सात विभाग झाले. त्या विभागांपासून पुढें सात ऋषि जन्मले आणि त्यांपासून पुढें मरुद्गण उत्पन्न झाले. वायुवेग, वायुबल, वायुहा, वायुमंडल, वायुज्वाल, वायुरेता आणि वायु-चक्र हे सात त्या मरुद्गणांचे निर्माणकर्ते उत्पन्न झाले. राजेंद्रा, त्या मंकणक

ऋषीचें त्रैलोक्यांत विश्रुत असें अत्यद्भुत कृत्य सांगतों, श्रवण कर! त्या मंकणक सिद्धाच्या हाताला पूर्वी एकदां तीक्ष्ण दर्भांकुरानें क्षत पडलें होतें असें आमच्या ऐकण्यांत आहे. त्या क्षतांतून शाकरस वाहूं लागला. तो शाकरस पाहून मंकणक हर्षानें नाचूं लागला. त्यावेळीं त्याच्या तेजानें मोहित होऊन सर्व स्थावरजंगमात्मक सर्व विश्व नाचूं लागलें. राजा, तेव्हां ब्रह्मादिक सर्व देव आणि तपस्वी ऋषि यांनीं त्या मंकणकाविषयीं महादेवाला प्रार्थना केली कीं, 'देवा, हा मंकणक जेणेंकरून नाचणार नाहीं, असें कांहींतरी तूं कर!' त्याप्रमाणें महादेवानें त्या मंकणकाला हर्षभरित होऊन नाचतांना पाहिलें आणि त्यानें देवांच्या हितबुद्धीनें त्याला म्हटलें 'अरे धर्मज्ञ ब्राह्मणा, तूं नाचत आहेस, याचें काय बरें कारण? मुने, तपस्व्याप्रमाणें वागणाऱ्या तुला हा एवढा हर्ष होण्याचें कारण तरी काय?'

राजा, त्यावर तो ऋषि म्हणाला, 'ब्रह्मन्, माझ्या हातांतून गळणारा शाकरस तुझ्या दृष्टीस पडला नाहीं काय? हा पाहून मी हर्षभरानें नाचत असतों!' मग त्या प्रेममोहित मुनीला हंसून देव म्हणाला, 'मुने, मला यांत मोठेंसें आश्चर्य वाटत नाहीं. आतां मजकडे पहा!' असें बोलून त्या धीमान् महादेवानें नखानें आपल्या स्वतःच्या अंगठ्यास क्षत केलें. त्याबरोबर त्यांतून हिमाप्रमाणें पांढरें शुभ्र भस्म बाहेर पडलें! तें पाहून मंकणक मुनि लज्जित झाला आणि शंकराच्या पायां पडला. महादेवाची महती त्याच्या लक्षांत आली आणि तो म्हणाला, "रुद्रापेक्षां दुसरें श्रेष्ठ दैवत नाहीं असें मला वाटतें. हे शूलधारिन्, ह्या जगतामध्यें सर्व सुरासुरांची तूंच गति आहेस. विद्वान् लोक तूंच हें सर्व जग निर्माण केलें आहे, आणि पुनः युगक्षयीं हें सर्व तुझ्यामध्येंच प्रविष्ट होत असतें असें म्हणतात. तुझें स्वरूप जाणण्यास जेथें देवहि समर्थ नाहींत, तेथें माझी कथा काय? जगांत जे जे भाव आहेत, ते सर्व तुझ्यांत दिसतात. हे अनघा, ब्रह्मादि देव तुझी सर्वदा आराधना करीत असतात. देवांचा कर्ता, करविता, सर्व तूंच आहेस. तुझ्या प्रसादानें सर्व देवांचें भय नाहींसें होऊन ते येथें आनंदानें राहत आहेत."

याप्रमाणें महादेवाची स्तुति करून त्या मुनीनें त्याला अभिवंदन केलें आणि म्हटलें, 'देवा, मीं जो हा गर्व केला, तो माझ्या चंचल स्वभावाचा परिणाम आहे. तर देवा, माझ्या तपश्चर्येचा भंग होणार नाहीं, असा मजवर

प्रसाद कर!' तेव्हां महादेव संतुष्ट झाला आणि त्याला पुनः म्हणाला, "हे विप्रा, माझ्या प्रसादानें तुझें तप सहस्रधा वाढेल. मी सर्वदा तुझ्यासह याच आश्रमांत राहीन. जो मनुष्य या सप्तसारस्वतांत माझें अर्चन करील, त्याला इहलोकीं किंवा परलोकीं कांहींच दुर्लभ वाटणार नाहीं. ते सर्व अंतीं सारस्वतलोकींच जातील यांत संशय नाहीं."

राजा, त्या अतितेजस्वी मंकणकाचें चरित अशाप्रकारचें आहे. तो सुकन्येला मातरिश्व्यापासून झालेला पुत्र होता. ९. ३. ३८.

---

## अध्याय ३९ वा.

[ १ बलरामाचें औशनस तीर्थावर आगमन. २ औशनस तीर्थास कपालमोचन नांव कसें मिळालें ? ३ उषंगूच्या आश्रमास बलरामाचें गमन. ]

( १ ) **वैशंपायन**—जनमेजया, रामानें तेथें राहून आश्रमवासी मुनींचा आदरसत्कार केला. त्या मंकणकावर तर त्याचें फारच प्रेम जडलें. त्यानें ब्राह्मणांना पुष्कळ दानें दिलीं आणि त्या रात्रीं उपोषण केलें. त्या मुनींनींहि त्याचें योग्य आतिथ्य केल्यावर दुसऱ्या दिवशीं प्रातःकालीं उठून त्यानें सर्व मुनींची अनुज्ञा घेतली आणि उदकस्पर्श करून आणखी तीर्थें पाहण्याच्या इच्छेनें त्यानें तेथून त्वरित प्रयाण केलें. नंतर तो औशनस तीर्थावर आला. त्या तीर्थाला कपालमोचन असेंहि नांव आहे. कारण पूर्वी रामानें उडविलेलें राक्षसाचें मस्तक ज्याच्या जंघेवर आपटलें तो महोदर मुनि येथें मुक्त झाला. त्याचप्रमाणें पूर्वी शुक्राचार्यानें याच ठिकाणीं तपश्चर्या केली. याच ठिकाणीं त्याला सकल नीतिज्ञान झालें. येथेंच बसून त्यानें देवदानवांच्या युद्धाचे सर्व विचार केले. राजा, अशा त्या उत्तम तीर्थावर येऊन बलरामानें विद्वान् ब्राह्मणांस विधिपूर्वक द्रव्य अर्पण केलें.

( २ ) **जनमेजय**—ब्राह्मणा, जेथें महामुनि महोदर मुक्त झाला, तें कपालमोचन तीर्थ कसें आहे आणि त्या मुनीच्या पायाला तें मस्तक कसें आदळलें, तो सर्व प्रकार मला सांग !

**वैशंपायन**—हे राजशार्दूला, पूर्वी दंडकारण्यांत राम रहात असतां जनस्थानांत त्यानें एका दुष्ट राक्षसाचें मस्तक तोडिलें. तीक्ष्ण धारेच्या क्षुर बाणानें तोडलेलें तें मस्तक उडून महावनामध्यें महोदर नांवाचा ऋषि संचार करीत

असतां कर्मधर्मसंयोगानें तें त्याच्या पायावर आदळलें. त्याच्या आघातानें ऋषीच्या पायाचें हाड मोडलें आणि तें मस्तक तसेंच तेथें चिकटून स्फुरत राहिलें. त्यामुळें त्या महाप्राज्ञ ऋषीस तीर्थाला किंवा देवालयालाहि जाण्याचें सामर्थ्य राहिलें नाहीं. तथापि पाय वाहत असतां आणि तो वेदनांनीं आर्त झाला असतांहि त्या महामुनीनें पृथ्वींतील सर्व तीर्थें केलीं, असें आम्हीं ऐकिलें आहे. त्यानें सर्व तीर्थें आणि समुद्र यांवर फिरून तेथील मोठमोठ्या ऋषींना आपलें वृत्त निवेदन केलें. त्यानें सर्व तीर्थांत स्नान केलें, तरी त्याची त्या मस्तकापासून मुक्तता झाली नाहीं. पुढें बोलतां बोलतां मुनींकडून त्याला समजलें कीं, सर्व पापप्रशमन करणारें, सिद्धांचें निवासस्थान आणि सर्व क्षेत्रांत उत्तम असें सरस्वतीच्या तीरीं औशनस नांवाचें तीर्थ आहे. तें ऐकून तो ब्राह्मण त्या औशनस तीर्थावर गेला आणि तेथें त्यानें स्नान केलें तेव्हां तें शिर तत्काल त्याच्या पायापासून सुटून त्या पाण्यांत पडलें. अशाप्रकारें त्या मस्तकापासून मुक्तता झाल्यावर त्याला मोठें सुख झालें. इकडे तें मस्तकहि जलांत पडतांच अदृश्य झालें. नंतर पीडारहित होऊन तो पूतात्मा, कृतकृत्य महोदर मोठ्या आनंदानें आश्रमाला आला आणि त्यानें सर्व आत्मज्ञानी ऋषींस आपलें सर्व वृत्त कथन केलें. तो वृत्तांत ऐकून तेथें मिळालेल्या सर्व ऋषींनीं त्या तीर्थाचें नांव कपालमोचन असें ठेविलें. त्या ऋषीनें पुनः त्या श्रेष्ठ तीर्थावर जाऊन त्याचें विपुल जल प्राशन केलें. त्यामुळें त्याला मोठी सिद्धि प्राप्त झाली.

( ३ ) त्या ठिकाणीं येऊन बलरामानें विप्रांस पुष्कळ दानें दिलीं आणि मग तो उषंगूच्या आश्रमाला गेला. हे भारता, त्या ठिकाणीं आर्ष्टिषेणानें मोठी तपश्चर्या केली होती. तसेंच विश्वामित्र ऋषीनें तेथें ब्राह्मणत्व संपादन केलें होतें. हें आश्रमस्थान अत्यंत मोठें असून सर्वकामसमृद्धि करणारें आहे. अनेक ब्राह्मण व मुनि येथें सर्वदा राहत असतात. नंतर अनेक ब्राह्मणांनीं परिवारित तो बलराम जेथें उषंगूनें देह ठेविला, त्या ठिकाणीं गेला. हे भारता, त्या वृद्ध उषंगूनें नित्य तपाच्या योगानें आपला देह खंगत चालला आहे असें पाहून देहत्याग करण्याचा विचार केला. त्यानें आपल्या सर्व पुत्रांस जवळ बोलावून 'मला पृथूदकावर न्या,' असें त्यांस सांगितलें. आपल्या पित्याचे वार्धक्याचा विचार करून सरस्वती तीरावरील त्या तीर्थावर ते त्याला घेऊन गेले. त्या पुण्य तीर्थावर मुलांनीं आणतांच त्या उषंगूनें तेथें विधिपूर्वक स्नान केलें. सर्व तीर्थमहिमा त्याला ठाऊक असल्यामुळें तो ऋषिसत्तम आपल्या सर्व पुत्रांस

जवळ बोलावून म्हणाला, ‘पुत्रहो, सरस्वतीच्या उत्तर तीरावर या पृथूदक तीर्थावर जो कोणी ध्यानपर होऊन देह ठेवील, त्यास पुनः मरणाची पीडा होणार नाहीं.’ असें बोलून त्या मुनीनें तेथें देहत्याग केला.

राजा जनमेजया, त्या तीर्थांत हलधरानेंहि स्नान केलें आणि ब्राह्मणांस अनेक दानें दिलीं. जेथें लोकपितामह ब्रह्मदेवानें लोक निर्माण केले, जेथें आर्ष्टिषेणानें तीव्र तपश्चर्या करून ब्राह्मण्याची प्राप्ति करून घेतली, त्याप्रमाणें जेथें राजर्षि सिंधुद्वीप, महातपस्वी देवापि आणि उग्रतेजस्वी विश्वामित्र यांनींहि आपल्या तपश्चर्येनें ब्राह्मण्य प्राप्त करून घेतलें, त्या ठिकाणीं तो प्रतापी बलराम आला. ९. ३. ३९.

## अध्याय ४० वा.

[ १ आर्ष्टिषेणाला तपश्चर्येच्या योगानें सर्व वेदविद्याप्राप्ति. २ विश्वामित्राला तपश्चर्येच्या योगानें ब्राह्मण्यप्राप्ति. ३ बलभद्राचें स्नानादिपूर्वक पृथूदर तीर्थाहून बकाश्रमाला गमन. ]

(१) जनमेजय—वैशंपायना, आर्ष्टिषेणानें पुष्कळ तप कसें केलें आणि राजा सिंधुद्वीपाला ब्राह्मण्य प्राप्त कसें झालें? देवापीला व विश्वामित्रालाहि ब्राह्मणत्व कसें संपादतां आलें, तें सर्व मला सांग! तें वृत्त ऐकण्याचें मला मोठें कौतुक आहे.

वैशंपायन—पूर्वीं कृतयुगीं आर्ष्टिषेण नांवाचा एक ब्राह्मण गुरुगृहीं राहून आपल्या अध्ययनांत सर्वदा तत्पर असे. राजन्, तो ब्राह्मण गुरुकुलांत नित्य राहूनहि त्याची विद्या समाप्तीला गेली नाहीं किंवा वेदांचेंहि ज्ञान त्याला झालें नाहीं. त्यामुळें त्याला अत्यंत दुःख झालें आणि तो तपोनुष्ठान करूं लागला. तपश्चर्येच्या योगानें त्याला वेदांचें उत्तम ज्ञान झालें. नंतर त्या विद्वान्, वेदयुक्त आणि सिद्ध अशा ऋषिसत्तमानें त्या तीर्थाला तीन वर दिले. ते हे कीं ‘ह्या महानदीतीर्थांत आजपासून जो कोणी मनुष्य स्नान करील, त्याला अश्वमेधाचें मोठें फल प्राप्त होईल. यापुढें येथें सर्पादिकांची बाधा कोणालाहि होणार नाहीं आणि अल्प कालांत पुष्कळ फलप्राप्ति होईल.’

( २ ) याप्रमाणें सांगून तो महातेजस्वी मुनि स्वर्गलोकाला गेला. अशी त्या प्रतापवान् आर्ष्टिषेण राजाची कथा आहे. पुढें त्याच तीर्थांत राजा सिंधुद्वीप आणि

प्रतापी देवापि यांनीं वेदसमूह प्राप्त करून घेतले. त्याचप्रमाणें तपोनिष्ठ व जितेंद्रिय विश्वामित्र ऋषीनेंहि उत्तम प्रकारच्या तपश्चर्येनें ब्राह्मणत्व संपादन केलें. ह्या पृथ्वीवर गाधि नांवाचा एक प्रख्यात क्षत्रिय राजा होऊन गेला. प्रतापवान् विश्वामित्र हा त्याचा पुत्र होय. पुढें तो राजा मोठा योगी झाला. त्या तपस्व्यानें विश्वामित्राला गादीवर बसवून आपण देहत्याग करण्याचें ठरविलें. तेव्हां त्याची प्रजा त्याला नम्रपणें म्हणाली, 'हे महाप्राज्ञा, तूं आम्हांला सोडून जाऊं नये! तूं आमचें महाभयापासून रक्षण करावें!' तेव्हां त्या गाधीनें प्रजांस म्हटलें, 'माझा पुत्र साऱ्या विश्वाचा रक्षणकर्ता होईल!' असें बोलून गाधीनें विश्वामित्राला गादीवर बसविलें आणि तो स्वर्गाला गेला. नंतर विश्वामित्र राजा झाला. त्यानें त्याकामीं पुष्कळ यत्न करून पाहिला, तथापि तो राक्षसांपासून पृथ्वीचें रक्षण करूं शकला नाहीं. पुढें राक्षसांपासून महाभय उत्पन्न झाल्याचें त्यानें ऐकिलें, तेव्हां चतुरंग सैन्य घेऊन तो नगराबाहेर पडला! तो बराच मार्ग चालून गेल्यावर वाटेंत वसिष्ठाच्या आश्रमाला आला. तेथें त्याच्या सैनिकांनीं बरेच अत्याचार केले. नंतर वसिष्ठ आश्रमास आला, तेव्हां आपलें सर्व वन उध्वस्त झाल्याचें त्यानें पाहिलें. वसिष्ठमुनि संतप्त झाला आणि त्यानें आपल्या धेनूला 'घोर शबर निर्माण कर' म्हणून सांगितलें. तेव्हां त्या धेनूनें अति उग्र शबर उत्पन्न केले. मग त्या शबरांनीं त्या सैन्याला गांठलें व त्याचा पराभव करून चारी दिशांना पिटाळिलें!

आपलें सैन्य पळून गेल्याचें जेव्हां त्या गाधिपुत्र विश्वामित्राला समजलें, तेव्हां तप हेंच श्रेष्ठ आहे, असें त्याच्या मनाला पटलें व त्यानें तप करण्याचा निश्चय केला आणि सरस्वतीच्या ह्याच श्रेष्ठ तीरावर येऊन तो जलाहार, पर्णाहार आणि वायुभक्षण करून राहिला. त्यानें नियम व उपवास यांच्या योगानें आपला देह कृश करून घेतला. तो स्थंडिलावर शयन करीत असे. दुसरेहि जे नियम सांगितले आहेत, तेहि तो पाळीत असे. अशा रीतीनें त्यानें आपली तपश्चर्या चालविली असतां देवांनीं वरचेवर त्याच्या व्रताला विघ्नें आणिलीं. तरीहि त्या महात्म्याचें मन निश्चयापासून ढळलें नाहीं. नंतर यत्नपूर्वक मोठी तपश्चर्या करून तो विश्वामित्र सूर्यासारखा शोभूं लागला. तें त्याचें तप पाहून वरद ब्रह्मदेव त्यावर संतुष्ट झाला आणि त्याला वर देण्यास सिद्ध झाला. तेव्हां 'मीं ब्राह्मण व्हावें' हा वर त्यानें मागितला. त्यावर ब्रह्मदेवानें 'तथास्तु' म्हटलें. अशारीतीनें उग्र तपश्चर्येच्या योगानें ब्राह्मणत्व संपादून पूर्णकाम झालेल्या विश्वामित्रानें सर्व पृथ्वीवर संचार केला.

( ३ ) या तीर्थावर बलरामानें पुष्कळ धन वांटलें. त्याचप्रमाणें पयस्विनी धेनु, यानें, शयनें, वस्त्रालंकार आणि उत्तम भक्ष्य-पेयपदार्थ यांचीं दानें त्यानें मोठमोठ्या ब्राह्मणांचें पूजन करून त्यांस वांटलीं. नंतर जेथें बक दाल्भ्यानें मोठी तपश्चर्या केल्याचें प्रसिद्ध आहे त्या जवळच्या बकाश्रमाला तो बलराम गेला. ९. ३. ४०.

---

## अध्याय ४१ वा.

[ १ बकमुनिचरित्रकथन. २ बलभद्राचें यायाततीर्थावर गमन. ३ वसिष्ठापवाह-तीर्थगमन. ]

( १ ) वैशंपायन—राजा, मग तो यदुनंदन बलराम त्या ब्रह्मयोनि तीर्थावरून निघाला, तो जेथें महातपस्वी दाल्भ्य बकानें क्रोधाविष्ट होऊन धृतराष्ट्राचें राज्य हवन केलें, त्या अवाकीर्ण तीर्थाच्या ठिकाणीं आला. त्या दाल्भ मुनीनें खडतर तपश्चर्येच्या योगानें आपलें शरीर क्षीण केलें होतें. पूर्वीं नैमिषीय ऋषींचें द्वादशवार्षिक सत्र व विश्वजित् सत्राची समाप्ति झाली असतां ऋषि पंचाल देशाला गेले आणि त्यांनीं तेथील राजाकडे दक्षिणा मागितली. राजानें त्यांस बलसंपन्न, निरोगी आणि तरुण अशा एकवीस गाई दिल्या. मग दाल्भ बक बाकीच्या ऋषींस बोलला, 'ह्या पशूंची वांटणी तुम्ही करून घ्या. मी त्या नृपसत्तमाकडे जाईन आणि भिक्षा मागेन.' असें त्या ऋषींस सांगून तो प्रतापवान् मुनि धृतराष्ट्र राजाकडे गेला आणि त्यानें राजाकडे पशूंची मागणी केली. सहजगत्या मेलेले कांहीं पशू दाखवून धृतराष्ट्र रागानें त्याला बोलला, 'ब्रह्मबंधो, तुला इच्छा असेल तर हे पशू शीघ्र घेऊन जा.' राजाचें तें भाषण ऐकून तो धर्मवित् मुनि आपल्याशींच म्हणाला, 'अहो, राजा भरसभेंत मला असलें दुर्वाक्य बोलला!' तें ऐकून त्याला अतिसंताप आला आणि त्यानें धृतराष्ट्राचा विनाश करण्याचें मनांत योजिलें.

राजा, त्या मुनिसत्तमानें ते मृत पशु नेले आणि त्यांचें मांस काढून धृतराष्ट्राच्या राष्ट्राचें हवन केलें! याप्रमाणें हे महाराजा, सरस्वती नदीच्या तीरावर उदकानें सिंचन करून आणि अग्नि प्रदीप्त करून त्या परमव्रतस्थ दाल्भ्य मुनीनें धृतराष्ट्राच्या राष्ट्राचा नाश करणारें हवन सुरू केलें! तें सत्र विधिपूर्वक सुरू होतांच धृतराष्ट्राच्या राज्याचा क्षय होत चालला आणि त्या राष्ट्राची स्थिति

परशूनें नित्य तोडलें जाणाऱ्या महावनाप्रमाणें झाली. तें राष्ट्र आपद्गत, उध्वस्त आणि चेतनारहित होऊन गेलें. आपलें राष्ट्र उध्वस्त झालेलें पाहून राजाला फार दुःख झालें. चिंताग्रस्त होऊन त्यानें ब्राह्मणांचे साहाय्यानें राष्ट्राच्या मुक्ततेसाठीं यत्न करून पाहिला, परंतु त्यांत त्याला कांहींहि यश न येतां उलट राष्ट्र अधिकच क्षीण होत चाललें. तेव्हां राष्ट्राची मुक्तता होण्याचा कांहींच उपाय सुचेना, तेव्हां तो राजा आणि ते ब्राह्मण चिंतातुर झाले. पुढें त्या राजानें ज्योतिष्यांस त्यासंबंधीं विचारिलें असतां ते म्हणाले, " धृतराष्ट्रा, पशु मागितला असतां ज्याचा तूं अनादर केलास तो दाल्भ्य बक मांसाच्या योगानें तुझ्या राष्ट्राचें हवन करीत आहे आणि त्यामुळें हा तुझ्या राष्ट्राचा असा लय होत चालला आहे. सरस्वतीच्या कुंजांत तो बसला आहे. हे राजा, त्याला तूं प्रसन्न करून घे ! "

नंतर धृतराष्ट्र राजा सरस्वतीच्या तीरावर गेला, त्यानें त्या मुनीला साष्टांग प्रणिपात केला आणि हात जोडून म्हणाला, ' भगवन्, प्रसन्न हो. माझ्या अपराधाची क्षमा कर ! मी दीन, लोभी आणि मूर्ख असल्यामुळें माझ्या हातून ही गोष्ट झाली. आतां तूंच माझी गति व तूंच माझा नाथ आहेस ! मजवर कृपा कर ! '

राजा, याप्रमाणें दुःखग्रस्त होऊन शोक करणाऱ्या त्या राजाला पाहून त्या ऋषीला दया आली आणि त्यानें त्याचें राज्य मोकळें केलें. त्या ऋषीचा क्रोध जाऊन तो प्रसन्न झाला आणि त्याच्या राष्ट्राच्या मुक्ततेकरितां त्यानें पुनः हवन प्रारंभिलें. अशारीतीनें राष्ट्राची मुक्तता करून आणि राजापासून अनेक पशु घेऊन तो ऋषि आनंदानें नैमिषारण्यांत पुनः गेला. इकडे धर्मात्मा धृतराष्ट्रहि स्वस्थ होऊन आपल्या नगराला परत आला.

( २ ) राजा, याच तीर्थावर उदारधी बृहस्पतीनें देवांच्या स्थित्यर्थ व असुरांच्या नाशासाठीं मांसानें इष्टीचें हवन केलें. त्यामुळें त्या जयशील देवांच्या हातून असुरांचा क्षय होत चालला. येथेंहि त्या यशस्वान् बलरामानें ब्राह्मणांना यथाविधि अश्व, गज, खेचरें, रथ, मोठमोठीं महार्घ रत्नें आणि पुष्कळ धनधान्य दिलें. राजा, तेथून तो महाबाहु यायात तीर्थावर गेला. तेथें नहुषपुत्र ययातीच्या यज्ञांत सरस्वती दूध व तूप स्रवत असे. तेथेंच पुरुषव्याघ्र पृथिवीपति ययातीनें यज्ञ करून मोठ्या आनंदानें ऊर्ध्व प्रयाण केलें व उत्तम लोक मिळविले. ययाति यज्ञ करीत

असतां आत्म्याचे ठिकाणीं शाश्वत भक्ति ठेवून आणि परम औदार्य धारण करून ब्राह्मण ज्याची ज्याची म्हणून इच्छा करी तें तें तो त्यास अर्पण करीत असे. या यज्ञांत आमंत्रित ब्राह्मण ज्या ज्या ठिकाणीं उतरत असे, तेथें तेथें ती सरिच्छ्रेष्ठ सरस्वती त्याला गृह, अंथरूणपांघरूण, षड्रस भोजन, तशींच नाना प्रकारचीं दानें पुरवीत असे. तें देणें राजाचेंच आहे, असें मानून त्या ब्राह्मणांनीं राजाला शुभाशीर्वाद दिले. तेथील यज्ञसंपत्ति पाहून गंधर्व आणि देव यांस परम संतोष वाटला; मग ती संपत्ति पाहून मनुष्यें आनंद पावून किती आश्चर्यचकित झालीं असतील बरें ?

( ३ ) राजा, नंतर तो महाधर्मध्वज, थोर अंतःकरणाचा, महात्मा, नित्य-महादानशाली, कृतात्मा, मनोजयी, तालकेतु बलराम महाभयंकर वेगाच्या वसिष्ठापवाह तीर्थावर आला. ९. ३. ४१.

---

## अध्याय ४२ वा.

[ १ त्या तीर्थास वसिष्ठापवाह नांव पडण्याचें कारण. ]

( १ ) जनमेजय—ब्रह्मन्, त्या वसिष्ठापवाह तीर्थाचा वेग इतका भयंकर कां होता, तसेंच सरस्वतीनें त्या ऋषीस वाहून नेण्याचें कारण काय आणि पुढें तिचें त्याशीं कसें व कां वैर पडलें ह्याचें कारण मी तुला विचारीत आहें, तर तें मला सविस्तर सांग पाहूं ! हे महाप्राज्ञा, तूं कितीहि सांगितलेंस तरी तेवढ्यानें माझें समाधान होत नाहीं.

वैशंपायन—हे भारता, विश्वामित्र आणि वसिष्ठ यांजमध्यें तपःस्पर्धेनें भयंकर वैर पडलें होतें. वसिष्ठाचा आश्रम स्थाणुतीर्थावर होता. त्याच्या बाजूस पूर्व दिशेला धीमान् विश्वामित्राचा आश्रम होता. या तीर्थाला स्थाणुतीर्थ हें नांव पडलें होतें. त्याचें कारण असें होतें कीं येथें शंकरानें मोठी तपश्चर्या केली होती. तेथील मुनि अजून देखील त्याच्या त्या भयंकर कृत्याविषयीं सांगत असतात. भगवान् शंकरानें येथें भयंकर यज्ञ करून सरस्वतीचें पूजन केलें आणि स्थाणुतीर्थ म्हणून ह्या तीर्थाची स्थापना केली. हे नराधिपा, ह्याच तीर्थावर देवांनीं स्कंदाला असुरांच्या नाशाकरितां सैन्यापत्याचा अभिषेक केला. त्याच सारस्वत तीर्थावर विश्वामित्र ऋषीनें आपल्या उग्र तपःसामर्थ्याच्या योगानें वसिष्ठ ऋषीला कां घालविलें, तें सांगतों, श्रवण कर !

राजा, विश्वामित्र व वसिष्ठ या दोघां तपोनिधींमध्यें तपःसामर्थ्यावरून तीव्र स्पर्धा उत्पन्न झाली व ती दिवसेंदिवस वाढत गेली. त्या दोन मुनींमध्यें विश्वामित्र हा अधिक संतापी होता. वसिष्ठाचें तेज पाहून त्याला मोठी काळजी वाटूं लागली. त्यानें असा विचार केला कीं 'ही सरस्वती नदी त्या तपोनिष्ठ वसिष्ठाला आपल्या वेगानें मजकडे घेऊन येईल आणि तो द्विजश्रेष्ठ येथें येतांच मी त्याचा वध करीन.' भगवान् विश्वामित्रानें असा निश्चय करून क्रोधानें डोळे लाल केले आणि त्या श्रेष्ठ नदीचें स्मरण केलें. त्या मुनीनें ध्यान करितांच सरस्वती व्याकुल झाली आणि त्या महावीर्य व महाकोपी विश्वामित्रासमोर येऊन उभी राहिली. गतधवा स्त्रीप्रमाणें तिची स्थिति अतिदुःखित होऊन ती त्या मुनिसत्तमाला म्हणाली, 'मी काय करावें अशी तुझी इच्छा आहे?' त्यावर तो क्रुद्ध मुनि तिला म्हणाला, 'वसिष्ठाला तूं शीघ्र घेऊन ये, आज मी त्याचा वध करणार आहें!' तें ऐकून सरस्वती व्यथित झाली. तिनें हात जोडले आणि वायूनें जशी लता कांपावी, त्याप्रमाणें भयभीत होऊन ती कांपूं लागली. सरस्वतीची ती अवस्था पाहून विश्वामित्र त्या महानदीला बोलला, 'त्या वसिष्ठाला माझ्याजवळ घेऊन ये. विचार करीत बसूं नकोस!'

राजा, विश्वामित्राचें तें भाषण ऐकून आणि त्याचे पापी विचार जाणून ती वसिष्ठाजवळ गेली. तिला वसिष्ठाचा पृथ्वीवरील अप्रतिम प्रभाव माहीत होता. तेथें जाऊन तिनें विश्वामित्राचा उद्देश त्याला कळविला. उभयतांच्याहि शापभयामुळें ती सारखी कांपत होती. त्या विवर्ण, चिंताकुल आणि कृश सरस्वतीला धर्मात्मा वसिष्ठ बोलला, 'हे सरिच्छ्रेष्ठे, तूं शीघ्र गतीनें मला वाहून ने आणि तूं आपलें रक्षण कर! असें न केल्यास विश्वामित्र तुला शापील. माझ्याविषयीं तूं किमपि चिंता करूं नये.'

कौरव्या, त्या कृपाशील वसिष्ठाचें तें भाषण श्रवण करून सरस्वतीला चिंता पडली कीं, 'कसें वागलें असतां आपण आपलें कर्म नीट बजावल्यासारखें होईल. वसिष्ठ हा मजवर नित्य दया करणारा आहे, तेव्हां त्याचें कल्याण होईल, असें मला अवश्य केलें पाहिजे!' मुनिश्रेष्ठ विश्वामित्र आपल्या तीरावर जप करीत बसला आहे, असें पाहून व हाच वेळ योग्य आहे, असें जाणून त्या सरस्वतीनें आपल्या अतिवेगानें एकदम तीरापहार केला. त्या वेगानें तो मैत्रावरुणि वसिष्ठ वाहून

जाऊं लागला. वाहून जात असतां संतुष्ट चित्तानें त्यानें सरस्वतीची स्तुति केली कीं "हे सरस्वति, पितामह ब्रह्मदेवाच्या सरोवरापासून तूं निर्माण झाली आहेस आणि तुझ्या उत्तम जलांनीं हें संपूर्ण जगत् व्याप्त झालें आहे. हे देवि, तूंच आकाशगंगा असून मेघांमध्यें जल उत्पन्न करणारी तूंच आहेस. सर्व उदकें तूंच आहेस आणि तुझ्यामुळेंच आम्ही अध्ययन करितों. पुष्टि, द्युति, कीर्ति, सिद्धि, बुद्धि आणि उमा हीं सर्व तूंच आहेस. पाणी व स्वाहाहि तूंच असून तुझ्यावरच हें सर्व जगत् अवलंबून आहे. सर्व भूतांच्या ठिकाणीं तूं चतुर्विध रूपानें राहत असतेस."

राजा, याप्रमाणें तो महर्षि स्तुति करीत असतां वसिष्ठाला सरस्वतीनें विश्वामित्राश्रमावर आणिलें आणि मुनीला आणल्याचें तिनें विश्वामित्राला कळविलें. सरस्वतीनें वसिष्ठाला आणलेलें पाहतांच विश्वामित्र क्रुद्ध होऊन वसिष्ठाच्या वधाकरितां कांहीं हत्यार जवळपास शोधूं लागला. इतक्यांत विश्वामित्र अत्यंत संतप्त झाल्याचें पाहून ब्रह्मवधाच्या भीतीनें सरस्वतीनें वसिष्ठाला वेगानें पूर्व दिशेकडे वाहून नेलें. अशारीतीनें तिनें विश्वामित्राला फसवून दोघांचेंहि बोलणें पाळलें. त्या ऋषिसत्तम वसिष्ठाला सरस्वतीनें दूर वाहून नेल्याचें पाहून विश्वामित्राला संताप चढला आणि तो सरस्वतीला बोलला, 'सरिच्छ्रेष्ठे, ज्याअर्थीं मला फसवून तूं पुनः पुढें निघून गेलीस त्याअर्थीं ह्यापुढें तूं राक्षसांना प्रिय अशा रक्ताचा प्रवाह वहा !'

राजा, ह्याप्रमाणें विश्वामित्राचा शाप होतांच सरस्वती वर्षपर्यंत रक्त वाहूं लागली. सरस्वतीची ती स्थिति पाहून देव, ऋषि, गंधर्व आणि अप्सरा अत्यंत दुःखाकुल झाल्या. याप्रमाणें तें वसिष्ठापवाहतीर्थ लोकांत प्रसिद्धि पावलें. आणि ती सरस्वती पुनः आपल्या मार्गानें वाहूं लागली. ९. ३. ४२.

---

## अध्याय ४३ वा.

[ १ विश्वामित्राच्या शापानें रक्तवाही सरस्वतीच्या परित्राणार्थ ऋषींचे प्रयत्न. २ इंद्रानें सरस्वती व अरुणा यांच्या संगमावर यजनादि कृत्यांनीं केलेला ब्रह्महत्यापरिहार. ३ बलरामाचें तेथून सोमतीर्थाला गमन. ]

( १ ) **वैशंपायन**—त्या संतप्त विश्वामित्रानें शापिलेली सरस्वती त्या शुभ्र तीर्थांत रक्त वाहूं लागली. हे भारता, तेथें राक्षस आले आणि त्या रक्ताचें नित्य

प्राशन करून तेथें सुखानें राहिले. त्यांची काळजी दूर झाली आणि ते नाचूं व हंसूं लागले. त्यांना आपण स्वर्ग जिंकल्याप्रमाणें आनंद झाला. पुढें कांहीं कालानें त्या ठिकाणीं अत्यंत तपोनिष्ठ असे कित्येक ऋषि तीर्थयात्रेकरितां प्राप्त झाले. त्या सर्व मुनींनीं सरस्वतीतीरावरील सर्व तीर्थांवर जाऊन स्नानादि क्रिया केल्या आणि अशारीतीनें फिरतां फिरतां ते त्या रक्तवाही तीर्थावर येऊन पोंचले. त्या दारुण तीर्थावर येऊन पाहतात तों सरस्वतीचें उदक रक्तानें भरलेलें पाहून तें राक्षस पीत आहेत असें त्यांच्या दृष्टीस पडलें. हे राजा, तेथें राक्षसांना पाहून त्या तीक्ष्णतपोमय मुनींनीं सरस्वतीच्या रक्षणाचे पुष्कळ प्रयत्न केले. नंतर ते सर्व महाव्रत मुनि त्या श्रेष्ठ सरस्वतीला बोलावून म्हणाले 'हे कल्याणि, हा तुझा डोह रक्तमय होऊन अग्राह्य कां बरें झाला आहे? याचें कारण सांग, म्हणजे आम्ही त्यासंबंधीं प्रयत्न करूं!' मग सरस्वतीनें कांपत कांपत सर्व वृत्त त्या ऋषींस सांगितलें. त्या सरस्वतीला अति दुःखमग्न झालेली पाहून ते तपोधन म्हणाले, 'अनघे, तुझें दुःखाचें कारण आणि शाप आम्हीं ऐकिला. हे सर्व तपस्वी जें कांहीं करण्याचें असेल, तें करतील, आतां तुला काळजी नको.'

राजा, असें त्या सरस्वतीला कळवून त्यांनीं असा विचार केला कीं, आपण सर्व मिळून त्या सरस्वतीला शापविनिर्मुक्त करूं. नंतर त्यांनीं उपवास, विविध यमनियम, तप, कष्टकारक व्रतें इत्यादिकांच्या योगानें जगत्प्रभु पशुपति महादेवाचें आराधन केलें आणि त्या सरिच्छ्रेष्ठ सरस्वतीला मुक्त केलें. त्या मुनींच्या प्रसादानें सरस्वती नदी आपल्या पूर्व स्वरूपाला आली. तिचें जल पूर्ववत् निर्मल झालें आणि ती प्रथमच्यासारखी शोभूं लागली. त्या ऋषींनीं सरस्वती नदीचें उदक निर्मल केलेलें पाहतांच ते क्षुधित राक्षस त्याच ऋषींना शरण गेले आणि हात जोडून पुनः पुनः म्हणाले, "आम्ही क्षुधेनें पीडित झालों आहों, शाश्वत धर्मापासून आम्ही च्युत झालों आहों. आजपर्यंत केलेल्या पापकर्मांत पुढें राहण्याची आमची इच्छा नाहीं. आमच्या दुष्कृत्यांमुळें आणि तुमच्या अवकृपेनें आमचें पाप वाढत जाऊन आम्ही ब्रह्मराक्षस झालों आहों. स्त्रियांच्या पापानें आणि व्यभिचारकर्मांनीं ब्राह्मण ब्रह्मराक्षस होत असतात. ब्राह्मणांचा द्वेष करणाऱ्या क्षत्रिय, वैश्य व शूद्र यांना राक्षसयोनि प्राप्त होते. तसेंच आचार्य, ऋत्विज्, गुरु, वृद्धजन यांचा जे अनादर करितात, तेहि राक्षस होतात. म्हणून द्विजसत्तमहो, येथें आमचें तारण

होईल असें कांहीं करा; कारण तुम्ही सर्व लोकांचें तारण करण्यास समर्थ आहां."

राजा, त्या राक्षसांचें भाषण ऐकून त्या ऋषींनीं त्यांच्या मुक्ततेसाठीं मनःपूर्वक सरस्वतीची प्रार्थना केली आणि म्हणाले, 'क्षत झालेलें, किडलेलें, उच्छिष्टयुक्त, केसांनीं भरलेलें व रुधिरमय अन्न म्हणजे राक्षसांचा भाग होय. हें जाणून विद्वानानें सर्वदा असले पदार्थ वर्ज्य करावे. अशा प्रकारचें जो अन्न भक्षण करितो, तो राक्षसान्नच भक्षण करितो. नंतर त्या मुनींनीं तीर्थशुद्धि करून त्या राक्षसांच्या मोक्षार्थ सरस्वतीची प्रार्थना केली. सरस्वतीनें त्या ऋषींचा उद्देश जाणून अरुणेला आपल्या देहांत आणविलें. अरुणानदींत या राक्षसांनीं स्नान केलें व देहत्याग करून ते स्वर्गाला गेले. अरुणेंत स्नान केल्यानें ब्रह्महत्येचे पापापासून मुक्तता होते, हें जाणून इंद्रानेंहि ह्याच सरस्वतीजलांत स्नान केलें व आपली ब्रह्महत्येपासून मुक्तता करविली.

जनमेजय—वैशंपायना, भगवान् इंद्राला ब्रह्महत्येचें पातक कसें लागलें? आणि तो या तीर्थांत स्नान करितांच पापमुक्त कसा झाला?

(२) वैशंपायन—राजा, नमुचीशीं केलेल्या समयाचा इंद्रानें भंग कसा केला, हें उपाख्यान सविस्तर सांगतों, तें श्रवण कर. नमुचीनें वासवाच्या भीतीनें सूर्यकिरणांत प्रवेश करून इंद्राशीं संधि केला. तेव्हां त्या इंद्रानें नमुचीला समयपूर्वक असें सांगितलें कीं, 'हे मित्रा असुरश्रेष्ठा, मी तुझा वध कोणत्याहि आर्द्र किंवा शुष्क पदार्थानें करणार नाहीं! तसेंच रात्रीं किंवा दिवसासहि मी तुला मारणार नाहीं!'

इंद्रानें नमुचीला असें वचन दिलें व धुकें पडल्याचें पाहून जलफेनानें इंद्रानें त्याचें मस्तक उडविलें! तेव्हां तें नमुचीचें छिन्न मस्तक 'अरे मित्रघातक्या पाप्या' असें म्हणत त्याच्या पाठीला लागलें. अशा रीतीनें तें शिर आपल्या पाठीस लागलें आहे, असें पाहून इंद्रानें तो सर्व वृत्तांत ब्रह्मदेवास निवेदन केला. तेव्हां लोकगुरु ब्रह्मदेवानें त्याला असें सांगितलें कीं "तूं अरुणानदींत यथाविधि हवन कर व त्या पापभयहारक तीर्थांत स्नान कर! शक्रा, ही नदी मुनींच्या योगानें पुण्यजल झाली आहे. पूर्वीं नमुचि येथें गुप्तपणें येऊन सरस्वतीच्या उदकांत स्नान करीत असे. हा अरुणा-सरस्वतीसंगम महान् पुण्यकारक आहे. देवेंद्रा, तूं येथें यज्ञ कर, आणि पुष्कळ दानें दे. येथें तूं स्नान केल्यानें आपल्या

घोर पातकांपासून मुक्त होशील !" पितामहाचें हें भाषण श्रवण करून इंद्रानें यथाविधि सरस्वतीच्या कुंडांत हवन केलें व अरुणेंत स्नान केलें. तेव्हां ब्रह्महत्येच्या पापापासून त्याची मुक्तता झाली. नंतर तो मोठ्या आनंदानें स्वर्गाला निघून गेला. त्याच्या पाठीला लागलेलें नमुचीचें मस्तकहि त्याच तीर्थांत पडलें आणि हे राजसत्तमा, त्यालाहि अक्षय्य अशा इच्छित लोकांची प्राप्ति झाली !

( ३ ) राजा, त्याठिकाणीं स्नान करून त्या महात्म्या बलरामानें वेगवेगळीं दानें दिलीं व परमार्थाच्या इच्छेनें धर्म संपादून तेथून श्रेष्ठ सोमतीर्थावर गेला. हे पार्थिवेंद्रा, प्राचीन काळीं ह्या तीर्थावर भगवान् सोमानें राजसूय यज्ञ केला; त्यामध्यें धीमान् महात्मा अत्रि होता असून त्या यज्ञाच्या शेवटीं दानव, दैत्य व राक्षस यांबरोबर देवांचें मोठें युद्ध झालें. त्यांत स्कंदानें अतिक्रूर तारकासुराचा वध केला. येथेंच त्या दैत्यांतक स्कंदाला देवांचें सैन्यापत्य प्राप्त झालें. येथेंच तो मोठा वट वृक्ष असून नित्य कौमार्यांत राहणाऱ्या कार्तिकेयाचें तें वसतिस्थान होतें. ९. ३. ४३.

---

## अध्याय ४४ वा.

[ १ कुमारोत्पत्तिवर्णन. २ कार्तिकेयाला देवसैन्यापत्याधिकार. ]

( १ ) **जनमेजय**—वैशंपायना, मला तूं कुमाराच्या प्रभावाचें वर्णन सांगितलेंस, आतां त्याच्या अभिषेकाचें वर्णन कर ! तूं उत्तम वक्ता आहेस, तर कोणत्या देशीं, कोणत्या कालीं, कसा, कोणीं त्या कुमाराला अभिषेक केला, आणि स्कंदानें त्या युद्धांत दैत्यसैन्याचा कसा भयंकर संहार केला, तें सर्व मला सांग. तें ऐकण्याविषयीं मला मोठें कौतुक वाटत आहे.

**वैशंपायन**—तुला वाटणारें कौतुक कुरुकुलास योग्य असेंच आहे. जनमेजया, माझें भाषण ऐकून तुला हर्ष होईल. हे नराधिपा, मी तुला आतां त्या महात्म्या कुमाराचा अभिषेक आणि प्रभाव सांगतों, तो ऐक. पूर्वीं महेश्वराचें तेज स्खलित होऊन अग्नींत पडलें, भगवान् अग्नि सर्वभक्षक आहे, परंतु त्या अक्षय तेजाला दग्ध करण्यास अग्नि समर्थ नव्हता. त्या तेजानें अग्नि अति तेजस्वी व दीप्तिमंत झाला. अग्नीला तो तेजोमय गर्भ धारण करितां येईना. मग त्या अग्नीनें ब्रह्मदेवाच्या सांगण्यावरून गंगेशीं संयोग केला आणि तिच्या ठायीं त्या भास्करसदृश तेजस्वी गर्भाची स्थापना केली. गंगेला देखील तो गर्भ सहन न होऊन तिनें तो देवपूजित रम्य हिमालय पर्वतावर टाकिला. तो अग्निपुत्र

तेथें लोकांना व्यापून वृद्धिंगत होऊं लागला. तेथें तो ज्वलनाकार गर्भ अग्नि-स्त्रिया कृत्तिका यांनीं शरवनांत पाहिला. त्या पुत्रार्थिनी कृत्तिका 'हा माझा, हा माझा ' म्हणून मोठ्यानें ओरडल्या. त्या मातांचा भाव ओळखून त्या भगवान् प्रभूनें ( गर्भानें ) स्रवूं लागलेलें दुग्ध सहा मुखांनीं प्राशन केलें. त्या बाळकाचा प्रभाव पाहून त्या कृत्तिका देवींना परमाश्चर्य वाटलें. जेथें गंगेनें गिरि-शिखरावर त्या गर्भाला टाकिलें होतें, तो पर्वत मेरूप्रमाणें स्वर्णमय होऊन अत्यंत शोभायमान दिसूं लागला. गर्भ जसजसा वाढत गेला, तसतशी त्यानें जवळची भूमि स्वर्णमय केली आणि सर्व गिरी कांचनमय झाले. त्या महावीर्य कुमाराला कृत्तिकांवरून कार्तिकेय नांव पडलें. पूर्वीं त्याला गांगेय म्हणत असत.

तो कुमार योग, शम, तप, वीर्य यांनीं युक्त असून चंद्राप्रमाणें वाढूं लागला. तो प्रियदर्शन कुमार त्या दिव्यकाननांत दर्भांमध्यें नित्य पडलेला असे. तेथें गंधर्व आणि मुनि त्याची नित्य स्तुति करीत असत. तसेंच दिव्य नृत्य-वादन-कुशल अशा हजारों देवकन्या त्याच्याजवळ स्तुति गात नृत्य करीत. हे भारता, सरिच्छ्रेष्ठ गंगा त्याजपाशीं सर्वदा तिष्ठत असे. पृथ्वीहि सुंदर रूप धारण करून त्याला धारण करी. त्याच्या जातकर्मादि सर्व क्रिया ब्रह्मदेवानें केल्या. चतुर्मूर्ति वेद हात जोडून त्याजपुढें उभा असे. चतुष्पाद धनुर्वेद आणि ससंग्रह शास्त्रसमुदाय त्यापुढें सज्ज असे. शेवटीं साक्षात् वाणी-सरस्वती-त्याजपुढें प्राप्त झाली आणि देवाधिपति उमापति शंकरहि त्याच्या दृष्टीस पडला. त्या शंकराबरोबर शैलपुत्री-पार्वती होती आणि शेंकडो भूतसंघ त्यासभोंवतीं होते. भूतगणांचे ते संघ अत्यद्भुत दिसत होते. त्यांचे आकार, त्यांचीं रूपें, त्यांचे ध्वज व आभरणें सर्व कांहीं विलक्षण आणि आश्चर्यकारक होतीं. कित्येकांचीं मुखें, वाघ, सिंह व अस्वल यांसारखीं, तर कित्येकांचीं मार्जारांसारखीं होतीं. असे ते भूतगण नाना आकार व रूपें धारण करून तेथें जमले. कांहीं पर्वताकार तर कांहीं मेघसदृश होते. राजेंद्रा, सप्तमातृगण आणि नारदादि मोठमोठे देवगंधर्व, बृहस्पति वगैरे देवर्षि व सिद्ध तेथें आले होते. तसेच जगताचे सर्व पितर व देवांचेहि देव तेथें आले होते.

( २ ) राजा, याप्रमाणें तो देवाधिदेव येत असतां महायोगबलसंपन्न बालहि शूलपाणि शंकराला सामोरा गेला. तो आपल्याकडे येत असल्याचें पाहून शंकर,

पार्वती, गंगा व अग्नि या सर्वांच्या मनांत एकदम विचार आला कीं हा बाल प्रथमतःच कोणाचा गौरव करितो, तें पहावें. तो आपल्याचकडे प्रथमतः येईल, असें प्रत्येकाला वाटलें. हा त्या चौघांचाहि विचार लक्ष्यांत आणून स्कंदानें योगाचा आश्रय करून निरनिराळया तनू निर्माण केल्या. त्या प्रभूनें क्षणांत चार मूर्ति निर्माण केल्या. त्याच्या पाठीशीं शाख, विशाख आणि नैगमेय या तीन मूर्ति दिसूं लागल्या. त्यांत आपण चवथा अशा चार मूर्ति झाल्या. मग तो अद्भुतदर्शन स्कंद रुद्राकडे गेला. विशाख हिमालयात्मजा पार्वती येत होती त्या बाजूला गेला. वायुमूर्ति शाख अग्नीकडे निघाला आणि अग्नीप्रमाणें तेजस्वी कुमार नैगमेय हा गंगेकडे गेला. त्या चौघांचेहि देह अत्यंत तेजस्वी असून ते एकसारखे होते. चौघांकडे जाण्यास ते निघाले, तेव्हां तो एक अद्भुतच प्रकार तेथें घडला. तो अंगावर रोमांच उभा करणारा प्रसंग पाहून देव, दानव आणि राक्षस यांमध्यें मोठा हाहाकार झाला. तेव्हां गंगेसह रुद्र, देवी पार्वती व अग्नि या सर्वांनीं जगत्पति ब्रह्मदेवाला अभिवंदन केलें आणि प्रार्थिलें कीं ‘भगवन्, या बालकाला आपल्या इच्छेनुसार कांहींतरी आधिपत्य द्यावें. देवेशा, असें केल्यानें तूं आमचेंच प्रिय केल्यासारखें होईल.’

राजा, नंतर त्या कार्तिकेयाचें कल्याण करण्याच्या इच्छेनें ब्रह्मदेवानें आपल्या मनाशीं असा विचार केला कीं ‘याला आतां काय देणें योग्य आहे?’ राजा, देव, गंधर्व आणि राक्षस यांचीं सर्व ऐश्वर्यें, तशींच भूत, यक्ष, पक्षी आणि सर्प यांचींहि ऐश्वर्यें या कुमाराला पूर्वींच मिळालेलीं आहेत. यावेळीं महामति ब्रह्मदेवाला तो कुमार सर्व प्रकारच्या ऐश्वर्यांनीं संपन्न असल्याचें समजून आलें. नंतर देवांचें हित करण्याच्या उद्देशानें ब्रह्मदेवानें त्याला देवांचें सैन्यापत्य दिलें आणि सर्व देवांस त्याच्या सांगण्याप्रमाणें वागण्यास सांगितलें. मग त्या कुमाराला घेऊन ब्रह्मदेवादि देव त्या कुमाराच्या अभिषेकाला हिमालयावर आले आणि तेथून पुण्यकारक हैमवती आणि त्रैलोक्यविश्रुत सरिच्छ्रेष्ठ सरस्वती हिच्या सर्वगुणान्वित व पुण्यप्रद तीरावर ते पूर्णमनोरथ देवगंधर्व येऊन बसले. ९. ३. ४४.

## अध्याय ४५ वा.

[ १ कुमाराभिषेकवर्णन. ]

(१) **वैशंपायन**—जनमेजया, नंतर शास्त्रानुसार अभिषेकाची सर्व सामग्री सिद्ध करून ब्रह्मदेवानें अग्नीमध्यें यथाविधि अग्नीचें हवन केलें. नंतर मणिविभूषित आणि दिव्यरत्नखचित अशा हिमालयानें दिलेल्या सिंहासनावर तो कुमार बसला. नंतर सर्व मंगलसाहित्याच्या योगानें विधिमंत्रपुरस्कृत अभिषेकद्रव्य घेऊन देवसमुदाय त्याच्या सभोंवतीं उभे राहिले. इंद्र, विष्णु, सूर्य-चंद्र, धाता-विधाता, अनिलानल इत्यादिकांसह धीमान् रुद्र आणि त्याच्या सभोंवतीं अष्ट वसु, एकादश रुद्र इत्यादि देव, तसेच पितर, गंधर्व, असंख्य देवर्षि, ब्रह्मर्षि, भृगु, अंगिरा इत्यादि मोठमोठे ऋषि आणि पुण्यवंत योगसिद्ध उभे होते. दुसरीकडे पितामह, पुलस्त्य, अंगिरा, कश्यपादि ऋषि होते. त्याप्रमाणें ऋतु, ग्रह व तारेहि आले होते. नद्या स्त्रीरूपें घेऊन आल्या होत्या. सनातन वेद, समुद्र, विविध तीर्थें, पृथ्वी, आकाश, दिशा, हीं सर्व निरनिराळीं रूपें घेऊन आलीं होतीं. देवमाता अदिति, र्‍ही, श्री, सरस्वती आणि विंध्य, मेरु, ऐरावत, मास, पक्ष, ऋतु, दिवस-रात्र, वृक्ष, उच्चैःश्रवा, नागराज, वासुकि, अरुण, गरुड, यम, मृत्यु इत्यादि सर्व हजर होते. तसेच वेगवेगळया ठिकाणांहून कुमाराच्या अभिषेकार्थ विविध प्रकारचे देवतागण आले होते. त्या सर्वांनीं अभिषेकाचीं भांडीं व दुसरे मंगल पदार्थ घेतले होते. देवांनीं अत्यंत आनंदित होऊन त्या कुमाराला दिव्यसंभारयुक्त सुवर्ण कलशांनीं दिव्य तोयाचा अभिषेक केला. त्याच्या योगानें असुरांना भय वाटूं लागलें. पूर्वीं जसा जलेश्वर वरुणाचा अभिषेक झाला होता, तसाच त्या सर्वलोकपितामहानें स्कंदास अभिषेक केला. त्याचप्रमाणें कश्यपमुनि आणि तेथें असलेले कीर्तिमान् लोक यांनींहि स्कंदाला अभिषेक केला.

राजा, नंतर त्या संतुष्ट झालेल्या ब्रह्मदेवानें नंदिसेन, लोहिताक्ष, घंटाकर्ण आणि कुमुदमाली नांवाचे चार बलाढ्य सेवक त्यास दिले. स्थाणूनें स्वेच्छेनुसार पराक्रमी, देवशत्रूंचा संहारक असा कामनामक एक सेवक दिला. ह्या कामानें देवासुरांच्या युद्धांत क्रुद्ध होऊन चौदा प्रयुत भीमकर्मी असुरांचा बाहूंनीं संहार केला ! सर्व देवांनीं मिळून देवांच्या शत्रूंचा नाश करणारी व विष्णुरूपिणी सेना त्याला दिली आणि इंद्रासह सर्व देवांनीं मोठ्यानें जयनाद केला. त्याप्रमाणें

गंधर्व, यक्ष, राक्षस, मुनि यांनींहि मोठा जयशब्द केला. नंतर यमानें कालतुल्य उन्माथ व प्रमाथ या दोघां वीर्यवंतांना त्याला दिलें! तसेंच सूर्यानें प्रसन्न होऊन आपले दोघे सुभ्राज व भास्वर नांवाचे दोन अनुचर त्याला दिले. सोमानें आपले शुभ्र पुष्पें व गंध धारण करणारे मणि आणि सुमणि हे दोन अधिकारी त्याला दिले. परसैन्याचा संहार करणारे ज्वालाजिह्व व ज्योति हे दोन शूर अनुचर अग्नीनें दिले. परवीरांतक इंद्रानें उत्क्रोश व पंचक या नांवांचे दोन वीर त्या अग्निपुत्राला दिले. त्यांनीं इंद्राच्या पुष्कळ शत्रूंना मारिलें. विष्णूनें चक्र, विक्रमक आणि बलाढ्य संक्रम हे तीन सेवक दिले. भिषग्वर अश्विनीकुमारांनीं सर्व विद्यापारंगत वर्धन आणि नंदन ह्यांस दिलें. महायशस्वान् धात्यानें कुंद, कुसुम, कुमुद, डंबर आणि आडंबर हे पांच त्या कुमाराला सेवक म्हणून दिले. त्वष्ट्यानें चक्र व अनुचक्र नांवांचे दोन मायावी सरदार त्याजकडे पाठविले, तर मित्रानें तपोविद्यानिष्णात दोन सत्यसंध व सुव्रत नांवांचे वीर अर्पण केले. हे भारता, पूषानें त्या कुमाराला महामायावी कालिक व पाणीतक नांवाचे सेवक अर्पण केले. हे राजा, वायूनें बल आणि अतिबल नांवांचे दोन वीर त्या कुमाराला दिले, तर सत्यप्रतिज्ञ वरुणानें महाबलाढ्य यम व अतियम या दोघांस दिलें. हिमालयानें सुवर्चा व अतिवर्चा यांस दिलें. मेरूनें कांचन, मेघमाली, स्थिर आणि अतिस्थिर यांला दिलें. संग्रह आणि विग्रह नामक सेवक समुद्रानें त्या अग्निपुत्राला अर्पण केले. पार्वतीनें उन्माद, शंकुकर्ण आणि पुष्पदंत यांना पाठविलें, तर हे पुरुषव्याघ्रा, जय व महाजय नांवांचे दोन सर्प पन्नगेश्वर वासुकीनें स्कंदाच्या सेवेकरितां म्हणून पाठविले.

राजा, अशाप्रकारें सोध्य, रुद्र, वसु, पितर, सागर, सरिता व मोठमोठे पर्वत या सर्वांनीं मिळून शूल व पट्टे धारण करणारे, दिव्य आयुधसंपन्न आणि नानावेषविभूषित असे सैन्यविभागावरील अधिकारी स्कंदाच्या सैन्यांत पाठविले. राजा, यांशिवाय विविध आयुधधारी व चित्रविचित्र वस्त्रालंकारविभूषित असे शंकुकर्ण, निकुंभ, पद्म, कुमुद, अनंत, द्वादशभुज, कृष्ण, उपकृष्ण, अक्ष, इत्यादि अनेक वीर, तसेच ब्राह्मणांवर सर्वदा प्रेम करणारे, ब्रह्मदेवाचे आश्रित व

१ येथें स्कंदाचे पारिषद म्हणून अनेक नांवें आलीं आहेत. मराठी वाचकांस तीं वाचण्यास कंटाळवाणी वाटण्याचा संभव असल्यामुळें त्यांचा येथें बराच संक्षेप केला आहे.

मोठमोठे मानकरी, बाल, तरुण व वृद्ध असे सर्व प्रकारचे सभासद त्या स्कंद-कुमाराजवळ आले. यांशिवाय विविध प्रकारच्या तोंडांचे अनेक लोक तेथें जमले होते. कित्येक कांसव व कोंबड्यासारख्या मुखांचे, तर कित्येक वराहवदनाच्या आकाराचे, कित्येक खरमुखी, कित्येक उष्ट्रमुखी, कित्येक दीर्घमुखी होते. हे भारता, कित्येकांचीं तोंडें मांजरांप्रमाणें होतीं. त्यांचीं पोटें, पाय हे अवयव मोठे असून नेत्र ताऱ्यांप्रमाणें चमकत असत. कित्येकांचीं तोंडें पारव्यासारखीं, कित्येकांचीं बैलांसारखीं, कोणांचीं ससाण्यासारखीं, तर कोणांचीं तित्तिर पक्ष्या-सारखीं होतीं. कित्येकांचीं मुखें अक्राळविक्राळ स्वरूपाचीं होतीं, तर कित्येकांचीं अतिसुंदर होतीं. कोणाच्या माना बसलेल्या, तर कोणाचे कर्ण दीर्घ होते. कित्येकांनीं भूषण म्हणून अंगांवर सर्प धारण केले होते. कोणी गजचर्मधारी तर कोणी कृष्णाजिनधारी होते.

राजा, तेथें जमलेल्या कित्येकांचीं मुखें खांद्यांशीं आलेलीं होतीं, तर कित्ये-कांचीं पोटावरच होतीं. कोणी पाठीवर तोंडें असलेले, कोणाचीं हनुवटीशीं असलेले, तर कित्येक गुडघ्यांशींच तोंडें असलेले लोक होते. कित्येक पथका-धिकारी कीट पतंगांप्रमाणें मुखांचे, तर कित्येकांचीं तोंडें निरनिराळ्या जातींच्या सर्पांप्रमाणें होतीं. कित्येक अनेक हातांचे व अनेक मस्तकांचे होते. कोणांच्या हातांत वृक्ष होते. कित्येकांनीं नाना प्रकारचीं कवचें धारण केलीं होतीं, कित्ये-कांनीं आपले देह अनेक प्रकारच्या वस्त्रांनीं अवगुंठित केले होते, कांहींनीं मस्त-कावर पागोटीं, तर कांहींनीं किरीट घातलेले होते व कांहींनीं टोप घातले होते. कित्येकांचे केस सोन्यासारखे होते. कित्येकांनीं मुंडन केलें होतें, तर कित्येकांनीं जटा वाढविल्या होत्या. कांहींच्या गळ्यांत चित्रविचित्र माळा होत्या. कित्येकांनीं लांब मिशा वाढविल्या असून एका युद्धाशिवाय दुसऱ्या कशाचीहि त्यांना आवड नसे. ते मोठमोठ्या देवांसहि रणांगणांत कधीं हार जात नसत. कांहीं कृष्णवर्ण, कांहीं निस्तेज मुखांचे, कित्येक लंबहस्त, कित्येक ह्रस्वपृष्ठ असे अनेक प्रकारचे लोक तेथें जमले होते. कित्येकांचे कान व मस्तकें गजांसारखीं होतीं. कांहींचीं नाकें गजांसारखीं, कित्येकांचीं कांसवां-सारखीं तर कित्येकांचीं लांडग्यांसारखीं होतीं. कित्येकांचे दीर्घ उच्छ्वास चालले होते. राजा, दुसरे कित्येक गजेंद्रासारखे धिप्पाड दिसत असत. त्यांचे अवयव चांगले तेजःपुंज व सुशोभित होते.

हे भारता, त्या लोकांमध्यें कित्येक पिंगट डोक्यांचे, कित्येक शंकूसारख्या कर्णांचे तर कित्येक रक्तवर्ण नाकाचे होते. त्यांचे पाय, दाढा, ओंठ, हात व केंस यांमध्यें महदंतर होतें. नानाप्रकारच्या चर्मांनीं त्यांनीं आपलें अंग आच्छादित केलें होतें व त्यांच्या भाषाहि वेगवेगळया होत्या. पथकावरील अधिपतींचें देशभाषांत उत्तम प्रावीण्य होतें आणि ते एकमेकांशीं त्या भाषांत बोलत असत. अशाप्रकारें ते पारिषद् तेथें आनंदित मनानें फिरत होते. त्यांतील कित्येक वृकोदरासारखे, तर कित्येक काजळासारखे काळेकुट्ट दिसत होते. कांहीं जणांचे नेत्र पांढरे शुभ्र होते, तर कांहींचे पिंगट होते. पुष्कळांचे अंगांवर ठिपके असून त्यांचे वर्णहि चित्रविचित्र होते.

राजा, तुला यांचीं आयुधें आतां सांगतों, तीं श्रवण कर. कोणी हातांत पाश घेऊन युद्धार्थ सज्ज होते. पृष्ठाक्ष व नीलकंठ हे हातांत परिघ घेऊन उभे होते. कोणांचे हातांत शतघ्नी होत्या. कोणीं चक्रें धारण केलीं होतीं, तर कोणीं मुसळें घेतलीं होतीं. कित्येकांनीं खड्ग घेतले होते तर कित्येकांचे हातांत केवळ काठ्याच होत्या. कोणी गदा व भुशुंडी घेतल्या होत्या, तर कोणांचे हातांत तोमर होते. याप्रमाणें अतिघोर आयुधें घेऊन ते महानुभाव व महावेगी पारिषद कुमारास झालेला अभिषेक पाहून अत्यंत हृष्ट झाले आणि मोठ्या आनंदानें नाचूं लागले. राजा, हे व दुसरे अनेक पारिषद् त्या कार्तिकेयाजवळ होते. तसेच अंतरिक्षांतील अनलसदृश शूर राजे देवतांच्या आज्ञेनें कार्तिकेयाचे सेवक झाले आणि अशा प्रकारचे ते अनेक लाखों लोक त्या अभिषिक्त स्कंदाला वेष्टून राहिले ! ९. ३. ४५.

---

## अध्याय ४६ वा.

[ १ तारकासुराचा वध. २ सरस्वतीतीर्थमाहात्म्य. ]

( १ ) **वैशंपायन**—राजा, शत्रूंचा संहार करणारे जे मातृगण कुमाराचे अनुचर झाले होते, ते मी तुला सांगतों, श्रवण कर. ज्या कल्याणींनीं हें त्रैलोक्य भागशः व्यापलें आहे, त्या यशस्विनी मातांचीं नांवें आधीं सांगतों, तीं ऐक. प्रभावती, विशालाक्षी, पालिता, गोस्तनी, श्रीमती, बहुला, बहुपुत्रिका,

---

१ येथें स्कंदाच्या मातृगणांत वाचकांना अपरिचित असे अनेक स्त्रीवाचक शब्द आले आहेत. त्यांचाहि येथें बराच संक्षेप केला आहे.

ह्या व दुसऱ्या अनेक स्त्रिया कार्तिकेयाच्या अनुयायी झाल्या होत्या. त्यांचा आकार सुंदर असून त्यांचीं रूपेंहि विविध होतीं. कित्येक दीर्घनखी होत्या, कितीएकांचे दांत लाल होते व कित्येकींचीं तोंडें रक्तवर्ण दिसत होतीं. त्या इच्छित रूप धारण करणाऱ्या असून त्या प्रत्येकीचें कांहींना कांहीं पृथक् माहात्म्य होतें ! कांहीं शुभ्रवर्ण, कांहीं सुवर्णगौर, तर कांहीं कृष्णमेघाप्रमाणें श्यामवर्ण दिसत होत्या. जनमेजया, कांहीं अरुणवर्णाच्या होत्या. त्या दीर्घकेशी असून त्यांचीं वस्त्रें स्वच्छ होतीं. कित्येक मोठ्या पोटाच्या तर कित्येकांचे कान लांब होते. कितीएक बायकांचे स्तनप्रदेश लांब असून नेत्र लाल होते. कित्येक स्त्रियांचें सर्व शरीर रक्तवर्ण असून नयन हिरव्या रंगाचे होते. त्या वरदायिनी, सर्वदा आनंदित होत्या. याम्या, रौद्रा इत्यादिकांचें रूप अप्सरांसारखें असून त्या त्यांच्याचप्रमाणें मनोरम होत्या. त्यांची वाणी कोकिलेसारखी असून संपत्तीनें त्या कुबेरासारख्या होत्या. युद्धभूमीवर त्यांचा पराक्रम इंद्रासारखा असून त्यांचें तेज अग्नीप्रमाणें शोभत असे. युद्धांत त्या शत्रूला भीतीनें कांपवीत असत. त्या कामरूपिणी असून वायूसमान त्यांचा वेग होता. त्यांचें बल व वीर्य कल्पनातीत होतें. त्यांची वसति वृक्षचत्वर, गुहा, स्मशानभूमि, शैल किंवा पाणवठा यांवर असून त्या नानाविध भूषणें, पुष्पें व वस्त्रें यांनीं भूषित होत्या. तसेंच अनेक प्रकारचीं पुष्पें व विविध वस्त्रें यांनीं त्यांचीं अंगें सुशोभित झालीं होतीं. चित्रविचित्र पोषाखानें त्या सजल्या होत्या. त्यांच्या भाषाहि नानाप्रकारच्या होत्या. हे व दुसरेहि शत्रूंना भयभीत करून सोडणारे मातृगण इंद्राच्या संमतीनें त्या स्कंदाच्या मागून चालले होते !

हे राजशार्दूला, नंतर त्या इंद्रानें असुरांच्या विनाशार्थ त्या गुहास शक्ति व अस्त्र दिलें तशीच त्याला एक मोठी घंटा दिली. तिचा आवाज मोठा होता. हे भरतर्षभा, अरुणादित्य वर्णाची एक पताकाहि दिली. पशुपतीनें त्याला उग्र अशी एक भूतगणांची सेना दिली. ती अति उग्र असून तिचीं आयुधें विविध प्रकारचीं होतीं. ती अजेय असून तिजबरोबर अनेक शांकरगणहि होते. ती धनंजया या नांवानें प्रसिद्ध होती. तीमध्यें रुद्राप्रमाणें बलवान् असे तीन अयुत योद्धे होते. त्यांना रणांतून माघार घेणें कधींहि ठाऊक नव्हतें. विष्णूनें वैजयंती माळ दिली. सूर्यसदृश तेजस्वी दोन वस्त्रें उमेनें दिलीं. अमृताचा उद्भव करणारा एक दिव्य कमंडलु गंगेनें त्याला दिला. बृहस्पतीनें प्रेमपूर्वक त्याला एक दंड दिला. गरुडानें चित्रविचित्र मयूर प्रेमानें अर्पण केला. अरुणानें ताम्रचूड

व चरणायुध दिलें, वरुणानें एक बलवीर्ययुक्त नाग त्याला अर्पण केला, ब्रह्मदेवानें त्या ब्रह्मण्य कार्तिकेयाला कृष्णाजिन दिलें आणि लोकभावनानें त्याला रणभूमीवर जय अर्पण केला.

याप्रमाणें देवांचें सैनापत्य प्राप्त झाल्यावर तो स्कंद म्हणजे दुसरा ज्वालामाली अग्निच कीं काय असा शोभूं लागला. नंतर मातृगण आणि पारिषद यांस बरोबर घेऊन तो देवांना आनंदवीत दैत्यनाशार्थ बाहेर पडला. घंटांचे आवाज होत आहेत, भेरी, शंख आणि मुरज यांचे ध्वनि सर्वत्र निघत आहेत, ध्वज उभारले आहेत, अशी ती भयंकर सेना नक्षत्रविभूषित शरदृतूंतील आकाशाप्रमाणें शोभत होती. इतक्यांत देवसमूह व विविध भूतगण यांनीं भेरी, शंख, झांज आणि डिंडिमादि वाद्यें वाजविण्यास प्रारंभ केला. इंद्रप्रमुख सर्व देवांनीं त्या कुमाराला अनेक प्रकारांनीं संतुष्ट ठेवण्याचे यत्न केले. देव-गंधर्व गायन करूं लागले आणि अप्सरांचे समूह नृत्य करूं लागले. त्या संतुष्ट झालेल्या महासेनानें देवांना असा वर दिला कीं, ‘ देवहो, जे तुमचा नाश करूं पहात आहेत, त्या तुमच्या सर्व शत्रूंचा मी समरांगणांत वध करितों ! ’

राजा जनमेजया, त्या विबुधश्रेष्ठ कार्तिकेयानें असा वर देतांच देवांना मोठा हर्ष झाला आणि आतां आपले शत्रु मृत्यु पावले, असें ते मानूं लागले. त्या महात्म्या कार्तिकेयानें देवांना वरप्रदान केलें, तेव्हां त्यांनीं मारलेल्या आरोळ्यांनीं सर्व त्रैलोक्य दुमदुमून गेलें. ’

राजा, तो सेनावगुंठित कार्तिकेय देवांच्या रक्षणासाठीं व दैत्यांच्या वधाकरितां बाहेर निघाला, तेव्हां त्याच्या अग्रभागीं व्यवसाय, जय, धर्म, सिद्धि, लक्ष्मी, धृति आणि स्मृति चालल्या होत्या. हातांत शूल, मोगर, अलातचक्रें घेतलीं आहेत, अंगांत कवचें घालून आभरणें वर चढविलीं आहेत, जिची मदोन्मत्त सिंहाप्रमाणें गर्जना होत आहे, अशा सेनेस घेऊन तो गुह बाहेर निघाला, तेव्हां त्याला पाहून सर्व दैत्य, दानव व राक्षस भयभीत झाले व सर्व दिशांस पळूं लागले. विविध आयुधांनीं देव त्यांच्या पाठीस लागले. त्या दैत्यांस पाहून क्रोधाविष्ट झालेल्या स्कंदानें पुनःपुन त्यांवर शक्ति व अस्त्रें यांचा प्रयोग केला आणि हविर्द्रव्यांनीं सिद्ध झालेला अग्नि जसें आपलें स्वरूप प्रगट करितो, त्याप्रमाणें त्यानें आपलें तेज प्रकट केलें. स्कंदानें शक्ति व अस्त्रें यांचा सारखा प्रयोग

करतांच आकाशांतून उल्का पडूं लागल्या. त्यांचे भयंकर शब्द होऊं लागले आणि प्रलयकालाप्रमाणें सारखे धक्के बसूं लागले. त्या अग्निपुत्र स्कंदानें एकाच शक्तीचा प्रयोग केला, परंतु तीबरोबर कोट्यवधि शक्ति निर्माण झाल्या. त्या बलवान् स्कंदानें त्या बलसंपन्न व पराक्रमी तारकाचा त्याच्या वीर्यशाली दशायुत दैत्यसैन्यासह वध केला! महिषासुरासभोंवतीं आठ पद्में राक्षसांचा वेढा होता, तथापि त्याचाहि त्या सर्वांसह त्यानें युद्धांत संहार उडविला! एक सहस्र अयुत दैत्यांनीं परिवेष्टित त्रिपादाचा त्यानें वध केला आणि दश निखर्व दैत्यांनीं युक्त ह्रदोदरास त्याच्या अनुयायांसह यमलोकीं पाठविलें! अशाप्रकारें शत्रूंचा वध करीत कार्तिकेयाचे अनुचर दशदिशा दणदणावीत गर्जना करूं लागले, नाचूं लागले, आणि हर्षभरित होऊन मोठ्यानें हसूं लागले. त्या शक्त्यस्त्रांच्या तेजानें सर्व त्रैलोक्य भयभीत होऊन गेलें! हजारों दैत्य स्कंदाच्या नुसत्या शब्दानें दग्ध झाले. पताकांच्या वायूनें कित्येक असुर दूर उडविले जाऊन मृत्यु पावले, तर कित्येक केवळ घंटारवानें विह्वल होऊन भूमितलावर पडले! कित्येक शस्त्रांनीं गतप्राण झाले. अशाप्रकारें त्या बलवान् कार्तिकेयानें अनेक दैत्यांचा समरांगणावर वध केला!

राजा जनमेजया, बलि दैत्याचा बाणनामक एक महाबलाढ्य पुत्र होता. क्रौंच पर्वताचा आश्रय करून तो देवगणांस पीडित असे. त्या बाणावर कार्तिकेय धांवून गेला असतां तो क्रौंचाच्या उदरांत लपून बसला. तें पाहून कार्तिकेयानें अग्निदत्त शक्तीच्या योगानें तो क्रौंचपर्वत भग्न करून टाकिला. त्यामुळें त्या पर्वतावरील शालवृक्ष कोसळून पडले आणि त्यांच्या फांद्या सर्व पर्वतभर पसरून त्यावरील वानर व गज भयभीत झाले; पक्षी भयभीत होऊन उडून गेले; सर्प बिळांतून निघून धांवत सुटले; माकडें आणि अस्वलें भीतीनें पळूं लागल्यामुळें त्यांच्या शब्दांनीं तो पर्वत दुमदुमून गेला. कुरंगांच्या शब्दानें तें सर्व वन व्याप्त झालें. शरभ आणि सिंह बाहेर पडून पळूं लागले!

राजा, अशी सर्व प्रकारें भयप्रद स्थिति झाली असतांहि तो पर्वत शोभतच होता. त्याच्या मस्तकावरील विद्याधर निघून गेले. त्या शक्तिपातानें किन्नरहि उद्विग्न झाले. जेव्हां तो पर्वत पेटूं लागला, तेव्हां त्यांतून चमत्कारिक आभरणें आणि माला यांनीं विभूषित लक्षावधि दैत्य बाहेर पडले. त्यांचा कुमाराच्या अनुचरांनीं रणांत वध केला आणि इंद्रानें वृत्राचा वध केला, त्याप्रमाणें त्या

स्कंदानें दैत्येंद्रपुत्राचा त्याच्या बंधूंसह वध केला. नंतर त्या परवीरांतक स्कंदानें शक्ति टाकून त्या क्रौंचपर्वताचा भेद केला. समरांगणांत त्यानें एकवार टाकिलेली ती शक्ति वरचेवर त्याच्या हातांत येत असे. त्या स्कंदाचा पराक्रम अशाप्रकारचा असल्यामुळें आणि तेज, शौर्य आणि श्री या गुणांत इतरांपेक्षां तो द्विगुणित असल्यामुळें त्यानें क्रौंच पर्वताचे बारीक बारीक तुकडे केले, शेंकडो दैत्यांचा संहार केला आणि शेंकडो दैत्य मारिले!

याप्रमाणें त्या स्कंदानें असुरांचा निःपात उडविला, तेव्हां देवांनीं त्याची गौरवपूर्वक मोठी स्तुति केली; त्यामुळें स्कंदाला फार आनंद झाला. हे राजा, त्यावेळीं दुंदुभि वाजूं लागले, शंखांचा ध्वनि होऊं लागला आणि देवस्त्रियांनीं त्या योगिराज कार्तिकेयाच्या मस्तकावर सुंदर पुष्पवृष्टि केली. सुगंधयुक्त पुण्यकारक वायु वाहूं लागला आणि गंधर्व आणि यज्ञकर्ते हे त्याची स्तुति करूं लागले! कोणी त्याला पितामहाचा पुत्र, तर कोणी त्याला सनत् (नित्याचा) कुमार म्हणूं लागले; कोणी ब्रह्मयोनि, कोणी अग्रज, कोणी महेश्वरसुत, तर कोणी त्याला अग्निपुत्र म्हणत असत. कोणी गंगापुत्र, कोणी उमापुत्र तर कोणी कृत्तिकापुत्र या नांवांनीं त्याला ओळखत असत. लोक त्या महाबलाढ्य योगेश्वराला एक, दोन, चार इतक्याच नव्हे, तर लक्षावधि नांवांनीं संबोधीत असत.

(२) राजा, याप्रमाणें मीं तुला स्कंदाच्या अभिषेकाची कथा सांगितली. आतां त्या सरस्वतीच्या तीर्थाचें पुण्य कशा प्रकारचें आहे, तें सांगतों, ऐक. कुमारानें सुरशत्रूंचा वध केल्यावर दुसरा स्वर्गच कीं काय असें हें श्रेष्ठ तीर्थ उत्पन्न झालें. तेथें असतां त्या ईश कार्तिकेयानें आपलें ऐश्वर्य विभागून वांटलें आणि देवांस त्रैलोक्य दिलें. अशा रीतीनें येथें दैत्यकुलांतक भगवान् कार्तिकेयाला देवसेनापतित्वाचा अभिषेक देवांनीं केला. हे भरतर्षभा, या तीर्थाचें नांव तैजस असून जलपति वरुणाला सुरगणांनीं येथेंच अभिषेक केला होता. ह्या श्रेष्ठ तीर्थावर स्नान करून त्या बलभद्रानें स्कंदाचें पूजन केलें आणि ब्राह्मणांस सुवर्ण, वस्त्रें आणि अलंकर वांटले. तेथें तो एक रात्र राहिला आणि हलधर माधवाला त्या श्रेष्ठ तीर्थाचें स्नान घडल्यामुळें परमानंद झाला. राजा, भगवान् स्कंदाला सर्व देवांनीं एकत्र होऊन कसा अभिषेक केला, हें तूं विचारिल्याप्रमाणें तुला मीं निवेदन केलें आहे. ९. ३. ४६.

## अध्याय ४७ वा.

[ १ देवांनीं वरुणाला जलपति म्हणून केलेला अभिषेक. २ बलभद्राचें तीर्थयात्रागमन व त्या त्या तीर्थांचें माहात्म्यवर्णन. ]

( १ ) जनमेजय—ब्रह्मन्, तूं मला यथाविधि झालेल्या कुमाराच्या अभिषेकाचें विस्तारपूर्वक वर्णन करून सांगितलेंस. हे तपोधना, त्या अद्भुत अभिषेकवर्णनाच्या श्रवणानें मी पवित्र झालों असें समजतों. कुमाराचा अभिषेक आणि त्याच्या हातून झालेला दैत्यवध ऐकून मला मोठें समाधान व कौतुक वाटलें. आतां येथें पूर्वीं जलराज वरुणाला देवांनीं कशाप्रकारें अभिषेक केला तें ऐकण्याची मला मोठी उत्सुकता वाटत आहे, तरी हे महाप्राज्ञा, तो वृत्तांत मला निवेदन कर ! ह्या कामीं तूं मोठा कुशल आहेस !

वैशंपायन—राजा, पूर्वकालीं घडलेला हा अद्भुत कथाभाग मी तुला आतां सांगतों. नीट श्रवण कर ! पूर्वीं कृतयुगांत सर्व प्रकारें उत्तम व्यवस्था चालू असतां सर्व देवता जमून वरुणाकडे आल्या आणि त्याला म्हणाल्या, ‘ ज्याप्रमाणें सुरपति शक्र आमचें सर्वदा भयापासून रक्षण करीत असतो, त्याप्रमाणें तूंहि सर्व नद्यांचा पति हो, तूं मकरालय सागरांत सर्वदा रहावें, म्हणजे हा नदीपति समुद्र तुझ्या आज्ञेंत रहात जाईल आणि सोमाबरोबर तुझीहि क्षयवृद्धि होत जाईल. देवतांचें भाषण ऐकून वरुणानें ‘ठीक आहे’ असें म्हटलें, नंतर त्या सर्व देवतांनीं वरुणाला यथाविधि जलांचा अधिपति केलें. वरुणाला त्यांनीं अभिषेक केला आणि त्याचा मोठा सत्कार करून देवता स्वस्थानीं गेल्या. मग तो देवाभिषिक्त महायशस्वी वरुण देवांचें जसें शतक्रतु इंद्र सर्वदा पालन करितो, तसें नद्या, सागर, नद आणि सरोवरें यांचें विधिवत् पालन करूं लागला !

( २ ) राजा, बलरामानें या तीर्थांत स्नान केलें आणि ब्राह्मणांना विपुल द्रव्यदान दिलें. तेथून तो अग्नितीर्थाला गेला, तेथें शमीगर्भांत राहिलेला अग्नि नाहींसा होऊन दिसेनासा झाला आणि सर्व लोकांचा विनाशकाल येऊन ठेपला. त्यावेळीं सर्व देव लोकपितामह ब्रह्मदेवाजवळ गेले आणि म्हणाले, ‘ भगवन्, अग्नि नाहींसा झाला आणि त्याचें कारण तर कांहींच समजत नाहीं. विभो, सर्व भूतांचा क्षय चुकावा म्हणून त्या अग्नीचें आधीं संपादन कर !’

जनमेजय—वैशंपायना, सर्व जगाचा आधार असा तो भगवान् अग्नि नष्ट

होण्याचें कारण काय आणि पुढें त्याचा शोध देवांना कसा लागला, हें सर्व मला बरोबर सांग !'

**वैशंपायन**—राजा, भृगूच्या शापानें भयभीत होऊन अग्नि शमीगर्भांत शिरला आणि नाहींसा झाला. अग्नि नष्ट होतांच इंद्रादिक सर्व देव अत्यंत दुःखित होऊन त्याचा शोध करूं लागले. ते देव या अग्नितीर्थावर आले तों तेथें अग्नि शमीगर्भांत रहात असल्याचें त्यांना आढळून आलें. नंतर बृहस्पति व वासवप्रमुख सर्व देव आनंदित होऊन परत गेले. हे महाभागा, भृगूच्या शापामुळें तो अग्नि सर्वभक्षक झाला !

राजा, त्या अग्नितीर्थावर स्नान करून नंतर बलराम ब्रह्मयोनि तीर्थावर गेला. या ठिकाणीं पूर्वीं प्रभु ब्रह्मदेवानें देवांसह स्नान करून यथाविधि सर्व देवतीर्थें निर्माण केलीं होतीं. येथें स्नान करून बलरामानें पुष्कळ द्रव्यदान केलें. पुढें बलराम कौबेरतीर्थास गेला. या ठिकाणीं कुबेरानें मोठी तपश्चर्या करून धनाधिपतित्व मिळविलें. राजा, येथें असतां त्याला पुष्कळ द्रव्य व निधि प्राप्त झाले. बलरामानें या तीर्थावर यथाविधि स्नान करून ब्राह्मणांस धन वांटलें. मग कौबेरवनामध्यें जाऊन जेथें कुबेरानें मोठी तपश्चर्या करून अनेक वर, धनाधिपतित्व, रुद्राशीं सख्य, देवत्व, लोकपालत्व आणि नलकूबर पुत्र या गोष्टी संपादन केल्या, त्या ठिकाणीं बलराम गेला. ज्या ठिकाणीं कुबेराला वरादिकांची प्राप्ति झाली, त्याच ठिकाणीं देवांनीं त्याला अभिषेक केला, हंसयुक्त व मनोवेगानें जाणारें पुष्पकनामक दिव्य विमान त्यास वाहन म्हणून दिलें आणि त्याबरोबर देवांचें ऐश्वर्यहि त्यास दिलें. तेथें त्या श्वेतानुलेपन बलरामानें स्नान, दान वगैरे केलें आणि तो बदरपाचन या शुभतीर्थावर गेला. या ठिकाणीं नानर्तुक वृक्षांचीं वनें असून येथें सर्वदा फलपुष्पांची समृद्धि असते; त्यामुळें सर्व प्राणी सुखानें राहतात. ९. ३. ४७.

---

## अध्याय ४८ वा.

[ १ बलरामाचें बदरपाचन तीर्थाला गमन. २ श्रुतावती व अरुंधती यांच्या महिम्याचें वर्णन. ]

( १ ) **वैशंपायन**—राजा, नंतर तेथून बलराम तपस्वी आणि सिद्ध यांनीं सेवित अशा बदरपाचन तीर्थावर गेला. त्या ठिकाणीं भरद्वाजाची अप्रतिम सुंदर

कन्या श्रुतावती हिनें ब्रह्मचारिणी कुमारी राहून व अनेक नियम पाळून उग्र तपश्चर्या केली. हे कुरुकुलोद्वहा, 'देवराज इंद्र आपला पति झाला पाहिजे,' अशा निश्चयानें तिनें अनेक वर्षें तीव्र तपांत घालविलीं. तिनें स्त्रियांना पाळण्यास कठीण असे अनेक नियम आचरले. राजा, पुढें श्रुतावतीचें वर्तन, तिची तपश्चर्या आणि तिनें केलेली स्तुति यांच्या योगानें इंद्र संतुष्ट झाला आणि विप्रर्षि वसिष्ठाचें रूप धारण करून तो देवराज इंद्र तिच्या आश्रमाला गेला. हे भारता, श्रुतावतीनें तपस्विश्रेष्ठ वसिष्ठाला पाहून त्याची पूजा केली. नंतर ती प्रियंवदा श्रुतावती त्याला म्हणाली, 'मुनिशार्दूला, तुझी काय आज्ञा आहे ? हे सुव्रता, माझ्या एका पाणीशिवाय तुला वाटेल तें मी यथाशक्ति देईन. माझी इंद्रावर भक्ति जडली असल्यामुळें हा माझा पाणि तुला ग्रहण करूं देणार नाहीं. तपोधना, व्रतें, नियम आणि तपश्चर्या यांच्या योगानें मी त्या त्रिभुवनेश्वर इंद्रालाच संतुष्ट करणार आहें !'

( २ ) राजा श्रुतावतीचें भाषण ऐकून इंद्रानें तिजकडे पाहिलें आणि तिचा निश्चय जाणून सांत्वनपूर्वक तो तिला म्हणाला, 'सुव्रते, तूं उग्र तप चालविलें आहेस, तें मला ठाऊक आहे. हे वरानने, ज्या हेतूनें तूं हें व्रत आरंभिलें आहेस, तो तुझा मनोरथ सिद्धीस जाईल आणि तपानें तुझ्या इच्छेनुसार सर्व घडून येईल. हे शुभानने, देवांचीं जीं दिव्य स्थानें आहेत, तीं सर्व तपानेंच प्राप्त होणारीं आहेत. महासुख हें तपोमूलक आहे. म्हणून मनुष्यें घोर तप करून आणि देहाचा त्याग करून देवत्वाला पोंचतात. हे कल्याणि, आतां मी तुला सांगतों, तें ऐक. हे शुभव्रते, हीं पांच बोरें मीं आणलीं आहेत, तीं शिजवून दे !'

राजा, असें बोलून तो बलसूदन इंद्र तिचा निरोप घेऊन तेथून गेला आणि जवळच थोड्या अंतरावर जप करीत बसला. त्या श्रुतावतीच्या आश्रमापासून जवळच ती इंद्राची बसण्याची जागा असल्यामुळें ती 'इंद्रतीर्थ' नांवानें त्रिभुवनांत ख्यात आहे. त्या श्रुतावतीच्या सत्त्वाची परीक्षा पाहण्याच्या उद्देशानें तीं बदरें शिजूंच नयेत, असें इंद्रानें केलें. नंतर तीं बोरें अग्नीवर ठेवून ती शिजवूं लागली. ती महातपोनिष्ठ असून मौनव्रती होती. अशा त्या महाव्रता श्रुतावतीनें शुचिर्भूत होऊन बराच वेळ बदरें शिजविण्याचा प्रयत्न केला, परंतु तीं कांहीं शिजेनात. दिवस मावळण्याच्या बेतांत आला. तिच्याकडील सर्व काष्ठ-

संचयहि संपला. चुलींत लावण्याला काष्ठ उरलें नाहीं, असें पाहून तिनें आपलें शरीरहि जाळून घेतलें !

हे अनघा, त्या सुंदरीनें प्रथमतः आपले पाय चुलींत घातले. ते जळूं लागले असतां ती त्यांस आंत सारूं लागली. पाय जळत असतां त्या अनिंदितेला यत्किंचितहि वाईट वाटलें नाहीं. महर्षीचें प्रिय करण्याच्या इच्छेनेंच ती तें दुष्कर कर्म करण्यास प्रवृत्त झाली होती. तिच्या मनाला वाईट वाटलें नाहीं किंवा मुखावर दुःखाची किमपिहि छाया दिसत नव्हती. शरीर पेटवून जणुंकाय पाण्यांतच उभी असल्याप्रमाणें ती आनंदमग्न दिसत होती. बदरें शिजविण्याचा तिचा निश्चय वृद्धिंगत होत गेला. ऋषीचें वाक्य मनांत ठेवून ती बदरें शिजवीत बसली, परंतु तीं शिजलींच नाहींत. भगवान् अग्नीनें तिचे दोन्ही पाय जाळून टाकिले, तरीहि तिला त्याबद्दल यत्किंचित्हि दुःख झालें नाहीं !

राजा, असें तें तिचें साहसकर्म पाहून त्रिभुवनेश्वर इंद्र तिजवर प्रसन्न झाला आणि त्यानें आपलें खरें स्वरूप प्रकट केलें. नंतर त्या दृढव्रत कन्येला इंद्र बोलला, "हे कल्याणि, तुझी भक्ति, तप आणि नियम पाहून मी तुजवर अत्यंत संतुष्ट झालों आहें. तुझा इच्छित मनोरथ लवकरच सिद्धीला जाईल ! हे महाभागे, तूं ह्या देहाचा त्याग करून माझ्यासह स्वर्गांत राहशील. हे सुभ्रु, सर्वपापक्षयकर, त्रिभुवनप्रख्यात आणि ऋषिजनसेवित असें हें बदरपाचन तीर्थ त्रैलोक्यांत स्थिर होऊन राहील. हे अनघे, ह्याच शुभ तीर्थावर अरुंधतीला सोडून ते सात ऋषि हिमाचलावर गेले. ते पुण्यवान् ऋषि तेथें राहात असतां उदरनिर्वाहासाठीं फळांकरितां म्हणून ते बाहेर जात असत. ऋषि याप्रमाणें वृत्त्यर्थ हिमालयावर राहिले असतां बारा वर्षेपर्यंत अवर्षण पडलें. ते तपस्वी वनांतच आश्रम करून राहिले आणि इकडे अरुंधती ह्या तीर्थावर नित्य तपश्चर्या करीत राहिली. अरुंधती तीव्र नियम पाळून तपश्चर्या करीत असल्याचें पाहून भगवान् महादेव तिजवर प्रसन्न झाला आणि ब्राह्मणवेष धारण करून तिजजवळ येऊन म्हणाला, 'हे शुभे, मला भिक्षा घाल.' त्यावर अरुंधती बोलली, 'मुने, आमचा अन्नसंचय संपला, तर बदरें आहेत, तीं भक्षण कर !' तेव्हां 'हे सुव्रते, ठीक आहे. तीं शिजव,' असें महादेव बोलला. तें ऐकून ब्राह्मणाचें प्रिय

करण्याच्या इच्छेनें ती बदरें अरुंधतीनें अग्नि तयार करून त्यावर ठेविलीं आणि तीं शिजत असतां त्या ऋषीच्या तोंडून पुष्कळ पुण्यकारक आणि दिव्य कथा ऐकिल्या

राजा, अशा रीतीनें निराहार बसून तीं बदरीफलें शिजवीत असतां व त्या पवित्र कथा ऐकत असतां ती द्वादशवार्षिकी घोर अनावृष्टि निघून गेली. तिला तो बारा वर्षांचा दारुण काल म्हणजे एका दिवसासारखा वाटला. इतक्यांत ते मुनि पर्वतावरून फळें घेऊन आले. तेव्हां तो भगवान् संतुष्ट होऊन अरुंधतीला म्हणाला, 'अरुंधति, पूर्वीप्रमाणें तूं ह्या ऋषींस सामोरी जा! धर्मज्ञे, तुझ्या तपाच्या व नियमांच्या योगानें मी संतुष्ट झालों आहें!' असें म्हणून शंकरानें आपलें स्वरूप प्रगट केलें आणि ऋषींस अरुंधतीचें सर्व चरित्र सांगून म्हणाला, 'ऋषिहो, तुम्हीं सर्वांनीं हिमालयावर जें तप केलें, तें अरुंधतीच्या तपाच्या बरोबरीचें होणार नाहीं. ह्या तपस्विनीनें निराहार राहून अत्यंत दुश्चर तप करीत बारा वर्षें घालविलीं.' नंतर पुनः त्या शंकरानें अरुंधतीला म्हटलें, 'अरुंधति, तुझ्या मनांत जो वर मागायाचा असेल तो माग!' तेव्हां ती अरुंधती सप्तर्षि सभोंवार बसले असतां म्हणाली, 'भगवन्, आपण जर मजवर प्रसन्न असाल, तर हें एक अद्भुत तीर्थ व्हावें. हें देव, ऋषि, सिद्ध यांचें प्रियस्थान होऊन याचें नांव बदरपाचन व्हावें. हे देवेशा, जो कोणी ह्या तीर्थावर त्रिरात्र शुचिर्भूत होऊन राहील, त्याला बारा वर्षें उपोषण केल्याचें फल प्राप्त व्हावें.' तिला महादेवानें 'तथास्तु' असें म्हटलें. सप्तर्षींनींहि त्या महादेवाची स्तुति केल्यावर तो आपल्या लोकीं गेला. एवढ्या तपानेंहि ती अरुंधती थकलेली, शुष्कमुख झालेली किंवा क्षुधातृष्णेनें व्याकुल झालेली किमपि दिसली नाहीं, याचें त्या ऋषींस परमाश्चर्य वाटलें. हे महाव्रते, तूं मजसाठीं आचरण केलेंस, असेंच करून त्या सच्छील अरुंधतीनें मोठी सिद्धि प्राप्त करून घेतली. हे भद्रे, ह्या व्रतनिष्ठेमध्यें तिजपेक्षांहि तुझ्यांत विशेष गुण दिसून आल्यामुळें संतुष्ट होऊन तुला मी अधिक वर देत आहें. त्या अरुंधतीला जो वर महात्म्या शंकरानें दिला आहे, त्याच्या प्रभावानें आणि हे कल्याणि, तुझ्या तेजानें मीहि या तीर्थास असा वर देतों कीं, जो कोणीं एक रात्र या तीर्थावर शुचिर्भूत होऊन राहील आणि स्नान करील, त्याला देहत्याग केल्यावर दुर्लभ लोक प्राप्त होतील!"

राजा, तो सहस्राक्ष त्या श्रुतावतीला असें सांगून पुनः स्वर्गाला निघून गेला. इंद्र गेल्यावर त्या ठिकाणीं दिव्य पुष्पवृष्टि झाली. तसेच देवदुंदुभि मोठ्यानें वाजूं लागले आणि पुष्पगंध वायुहि वाहूं लागला. मग आपल्या उग्र तपश्चर्येनें ती कल्याणी देहत्याग करून इंद्राशीं रममाण झाली !

जनमेजय—भगवन्, त्या श्रुतावतीची माता कोण आणि ती शोभना कोठें वाढली, हें ऐकण्याची माझी मोठी इच्छा आहे. तो कौतुकास्पद वृत्तांत केव्हां ऐकेन असें मला वाटत आहे.

वैशंपायन—राजा, कोणी एके वेळीं विशालाक्षी घृताची नांवाची अप्सरा येत असतां विप्रर्षि भरद्वाजाचें रेत स्खलन पावलें. त्या तपस्व्यानें तें रेत हातांत घेतलें, परंतु तें पर्णपुटांत पडलें आणि तेथें ही मुलगी उत्पन्न झाली. त्या तपोधन भरद्वाजानें जातकर्मादि तिचे सर्व संस्कार केले आणि देवर्षिगणसभेंत तिचें श्रुतावती असें नांव ठेविलें. नंतर भरद्वाज तिला आश्रमांत ठेवून हिमालयावरील अरण्यांत निघून गेला.

या तीर्थावरहि त्या वृष्णिप्रवर बलरामानें स्नान केलें आणि ब्राह्मणांस पुष्कळ द्रव्यदान केलें. तेथून तो महानुभाव पुढें शक्रतीर्थास गेला. ९. ३. ४८.

---

## अध्याय ४९ वा.

[ १ बलरामाचें इंद्रतीर्थादिकांवर गमन. २ त्या त्या तीर्थाचें माहात्म्यवर्णन. ]

( १ ) वैशंपायन—राजा जनमेजया, नंतर इंद्रतीर्थाला गेल्यावर त्या यदुप्रवीर बलभद्रानें यथाविधि स्नान केलें आणि ब्राह्मणांना धन-रत्नें वांटिलीं. ह्याच तीर्थावर देवराज इंद्रानें शंभर यज्ञ केले आणि बृहस्पतीला विपुल धन दिलें. वेदपारंगतांनीं सांगितल्याप्रमाणें त्यानें केलेले सर्व यज्ञ निर्विघ्नपणें शेवटास गेले. हे भरतश्रेष्ठा, त्या महातेजस्व्यानें ते यज्ञ विधिवत् केल्यामुळें त्याला शतक्रतु नांव प्राप्त झालें. तें सर्वपापहर, पुण्य, पवित्र आणि सनातन तीर्थ त्याच्याच नांवावरून इंद्रतीर्थ या नांवानें प्रसिद्ध आहे. येथें हलधर बलरामानें विधिवत् स्नान केलें, ब्राह्मणांना वस्त्रें व भोजन वगैरे घालून तेथून तो सर्व तीर्थांत श्रेष्ठ असें जें शुभावह रामतीर्थ तेथें आला. त्या ठिकाणीं महाभाग भार्गवानें मोठमोठ्या क्षत्रियांचा अनेकवार संहार केला. त्यानें आपला उपाध्याय मुनिश्रेष्ठ

कश्यप याच्या नेतृत्वाखालीं एक वाजपेय व शंभर अश्वमेध यज्ञ केले आणि आचार्यांना समुद्रवलयांकित पृथ्वी दक्षिणा दिली. तेथें रत्नें, गाई, गज, वगैरे दानें देऊन तो वनाला निघून गेला. या तीर्थावर बलरामानें यथाविधि स्नान करून ब्राह्मणांना अभिवादन केलें व दक्षिणा दिल्या; नंतर तो यमुनातीर्थावर गेला.

( २ ) राजा, तेथें पूर्वी सितप्रभ वरुणानें मनुष्यें आणि देव यांना संग्रामांत जिंकून राजसूय यज्ञ केला. यज्ञ समाप्तीला गेल्यावर त्रैलोक्य भयभीत करून सोडणारा देवदानवांचा संग्राम सुरू झाला. सर्व यज्ञांत श्रेष्ठ असा राजसूय झाल्यानंतर क्षत्रियांमध्यें अत्यंत घोर संग्राम होत असतोच. याहि ठिकाणीं बलभद्रानें ऋषींचें पूजन केलें आणि इतर याचकांनाहि द्रव्यदान केलें. नंतर महर्षींनीं स्तुति केलेला तो बलराम अत्यंत हृष्ट होऊन तेथून आदित्यतीर्थाला गेला. हे राजसत्तमा, येथें पूर्वी भगवान् आदित्यानें यजन केलें आणि नक्षत्रांचें आधिपत्य आणि मोठा प्रभाव संपादन केला. या सरस्वती नदीच्या पुण्यावह तीर्थावर इंद्रासह सर्व देव, मरुतांसह विश्वेदेव, गंधर्व आणि अप्सरा, द्वैपायन, शुक, कृष्ण, यक्ष, राक्षस, पिशाच्च हे व सहस्रावधि इतरहि योगसिद्ध होऊन महत्व पावले आहेत. हे भरतश्रेष्ठा, याच तीर्थावर प्राचीन काळीं विष्णूनें स्नान करून मधु व कैटभ या नांवांच्या दोन राक्षसांचा वध केला. तसेंच या तीर्थावर धर्मात्म्या द्वैपायनानें स्नान करून परमयोग व महासिद्धि प्राप्त करून घेतली. असित आणि देवल ऋषींनींहि याच ठिकाणीं योग संपादन केला. ९. ३. ४९.

## अध्याय ५० वा.

[ १ देवल-जैगीषव्यचरित्रकथन. २ बलभद्राचें आदित्यतीर्थावरून सोमतीर्थावर गमन. ]

( १ ) वैशंपायन—जनमेजया, याच ठिकाणीं पूर्वी तपोधन असित देवल गार्हस्थ्यानें राहिला होता. तो सर्वदा धर्मपरायण, शुचि, दमशील असून त्यानें ब्रह्मचर्य संपतांच दंडन्यास केला होता. सर्व प्राण्यांच्या ठिकाणीं कर्मानें, वाणीनें आणि मनानें तो समभावानें वागत असे. हे महाराजा, त्याला कधीं क्रोध येत नसे, निंदा किंवा स्तुति, तसेंच प्रिय व अप्रिय हीं दोन्हीहि त्याला

सारखींच वाटत असत. तो यमाप्रमाणें समदृष्टि होता. कांचन आणि मृत्तिका ह्या दोन्हीची किंमत त्याला सारखीच होती. देव, अतिथि आणि ब्राह्मण यांचें तो नित्य पूजन करीत असे. तो सर्वदा ब्रह्मचर्यरत असून अत्यंत धर्मपरायण होता.

हे महाभागा, कोणी एके वेळीं जैगीषव्य नांवाचा एक धीमान् योगी भिक्षुकाच्या रूपानें देवलाच्या आश्रमांत येऊन राहिला. तो महाद्युति, नित्ययोगी व प्राप्तसिद्धि असा महातपस्वी होता. देवल त्या जैगीषव्य महामुनीला तेथें रहात असतां नित्य पाहत असूनहि त्यानें त्याचें धर्मतः कांहींच आतिथ्य केलें नाहीं. जनमेजया, असा बराच काळ गेल्यावर एकदां भोजनाच्या वेळीं त्या देवलाला जैगीषव्य मुनि दिसला नाहीं. भिक्षेच्या वेळीं तो देवलाच्या दृष्टीस पडला. भिक्षुरूपानें आलेला तो महामुनि पाहून देवलानें त्याचा उत्तम सत्कार केला. त्याची जैगीषव्यावर मोठी प्रीति जडली आणि त्यानें त्याचें पुष्कळ वर्षेपर्यंत ऋषिदृष्ट विधीनें यथाशक्ति पूजन केलें. ' मी पुष्कळ वर्षेपर्यंत याचा सत्कार करीत असतांहि हा अलसमुनि यत्किंचितहि मजशीं बोलत नाहीं,' असें पाहून त्या जैगीषव्याची अवहेलना करीत आपला कलश घेऊन देवल अंतरिक्षांतून सरितापति समुद्रावर गेला. हे भारता, समुद्रावर देवल जाऊन पहातो तों आपल्या पूर्वीं जैगीषव्य तेथें जाऊन बसल्याचें त्याच्या दृष्टीस पडलें. तेव्हां त्या अमितप्रभावी देवलाला मोठा विस्मय वाटला. त्याचे मनांत विचार आला कीं, ' हा भिक्षु येथें आला केव्हां आणि यानें स्नान तरी केव्हां केलें ?' असें चिंतन करून त्या शुचिर्भूत देवलानें समुद्रांत स्नान केलें आणि विधिवत् जप केला. जपादि आह्निककर्म संपल्यावर तो जलपूर्ण कलश घेऊन आपल्या आश्रमाला गेला.

राजा, कलश घेऊन तो देवल मुनि आपल्या आश्रमाला येतो तों तेथें जैगीषव्य बसलेला त्याच्या दृष्टीस पडला. जैगीषव्य त्या देवलाशीं किमपिहि बोलला नाहीं. तो केवळ काष्ठासारखा आश्रमांत बसलेला दिसे ! समुद्राप्रमाणें गंभीर त्या मुनीनें सागरांत आपल्या पूर्वीं स्नान केलें आणि आश्रमांतहि आपल्या पूर्वीं तो आला, हें पाहून त्या देवलाला मोठी चिंता उत्पन्न झाली. त्या जैगीषव्याच्या तपाचा प्रभाव पाहून तो मुनिसत्तम देवल मोठ्या विचारांत पडला. 'हा जैगीषव्य मला समुद्रावर आणि आश्रमांत दिसला हें कसें !' हें जाणण्याच्या

च्छेनें तो देवल आश्रमांतून उंच अंतरिक्षांत उडाला, तों तेथें अंतरिक्षांत फिर-
ारे अनेक सिद्ध एकत्र होऊन जैगीषव्याचें पूजन करितांना त्याच्या दृष्टीस
डले. तें पाहून देवल अगदीं भांबावून गेला. मग त्या दृढनिश्चयी व उद्योग-
ील देवलानें तेथून जैगीषव्य पितृलोकाला गेला असल्याचें पाहिलें. पितृ-
ोकाहून तो यमलोकाला गेल्याचें त्याला दिसलें. देवलहि तेथून उड्डाण करून
मलोकाला जातो, तों जैगीषव्य सोमलोकाला गेल्याचें त्याला आढळून आलें.
थून तो एकांतयाजी लोकांच्या शुभलोकीं, तेथून तो अग्निहोत्र्यांचे लोकीं
थून दर्शपौर्णमासयजन करणाऱ्यांच्या लोकीं, आणि तेथून पशुयाजींचे लोकीं
ो देवपूजित मुनि गेला, असें देवलानें पाहिलें. मग अनेक चातुर्मास्ययाग
रणाऱ्या तपोधनांचे लोकीं, तेथून अग्निष्टोम करणाऱ्यांचे लोकीं आणि तेथून
ाग्निष्टुत करणाऱ्यांचे लोकीं जैगीषव्य गेलेला देवलानें पाहिला.

राजा, नंतर जे महाप्राज्ञ वाजपेय यज्ञ करितात, तसेंच जे बहुसुवर्णक नांवाचा
ज्ञ करितात, त्यांच्या लोकांमध्यें जैगीषव्य गेलेला त्या देवलानें पाहिला. मग
ाजसूय यज्ञ किंवा पुंडरीक यज्ञ करणाऱ्यांच्या लोकीं तो देवलाला दिसला. तेथून
ाश्वमेध करणाऱ्यांचे लोकीं व तेथून नरमेध करणाऱ्यांचे लोकीं तो गेला. तेथून
ष्प्राप अशा सर्वमेध आणि सौत्रामणि यज्ञ करणाऱ्यांचे लोकीं देवलानें त्याला
ाहिलें. हे राजा, नंतर द्वादशाह सत्रें करणाऱ्यांच्या लोकीं तो गेलेला देवलानें
ाहिला. नंतर मित्र, वरुण आणि सूर्य यांच्या लोकांत त्या जैगीषव्याला सलो-
ता प्राप्त झाली आहे, असें त्या देवलाला आढळून आलें. तेथून रुद्र, वसु आणि
ृहस्पति यांचीं स्थानें ओलांडून तो पलीकडे गेल्याचें त्या असित देवलाच्या दृष्टीस
डलें. त्यानंतर गोलोकाला जाऊन तेथून ब्रह्मसत्रींच्या लोकीं देवलानें जाऊन
ाहिलें, तों जैगीषव्य पुढेंच जात आहे आणि आपल्या तेजानें तो तीन अपर-
ोक उल्लंघून गेल्याचें त्याला समजून आलें. नंतर तो पतिव्रतांच्या लोकीं
ेलेला देवलानें पाहिला; परंतु तेथून पुढें तो कोठें गुप्त झाला, हें त्या देवलाला
दिसलें नाहीं. तेव्हां त्या जैगीषव्याचा प्रभाव, सुव्रत व योगाची अतुल सिद्धि
ीं अवलोकन करून देवलानें त्या लोकांतील प्रमुख सिद्धांकडे त्यासंबंधीं
वेचारिलें. हात जोडून देवल नम्रपणें त्या ब्रह्मसत्र करणाऱ्या मुनींला म्हणाला,
मुनिहो, महासामर्थ्यवान् जैगीषव्य मला कोठें दिसत नाहीं, तर तो कोठें
ाहे, तें सांगा. त्याचा आश्चर्यकारक वृत्तांत ऐकण्याची मला मोठी इच्छा
त्पन्न झाली आहे !'

सिद्ध—हे दृढव्रत देवला, ऐक ! तो जैगीषव्य आतां शाश्वत ब्रह्मलोकीं गेला आहे, ही खरी गोष्ट आहे.

वैशंपायन—राजा, ब्रह्मसत्री सिद्धांचें तें भाषण ऐकून देवलानें त्वरेनें ब्रह्मलोकीं जाण्याकरितां उड्डाण केलें, परंतु तो तत्काल खालीं पडला. तेव्हां ते सिद्ध त्याला पुनः म्हणाले, 'तपोधना देवला, जैगीषव्य गेला आहे, त्या ब्रह्मलोकीं जाण्याचें सामर्थ्य तुझ्या अंगीं नाहीं.'

वैशंपायन—त्या सिद्धांचें तें भाषण श्रवण करून ज्या क्रमानें देवल अंतरिक्षांत गेला होता, त्याच क्रमानें पक्ष्याप्रमाणें ते सर्व लोक उतरत उतरत आपल्या पुण्याश्रमाला आला. तेथें प्रवेश करतो, तों तेथें जैगीषव्य त्याच्या दृष्टीला पडला ! मग देवलानें त्या जैगीषव्याच्या तपाचा व योगाचा प्रभाव पाहून धर्मदृष्टीनें त्याचा विचार केला आणि विनयपूर्वक त्या जैगीषव्याजवळ जाऊन बोलला, 'भगवन्, मोक्षधर्म समजून घेण्याची माझी इच्छा आहे.' तें त्याचें भाषण ऐकून जैगीषव्यानें त्याला उपदेश केला. योगाचा श्रेष्ठ विधि, व शास्त्राप्रमाणें कार्याकार्य कोणतें ह्याचा उपदेश त्यानें देवलास केला. संन्यासग्रहणाची त्याची प्रबल इच्छा जाणून त्या तपस्व्यानें शास्त्रानुसार उत्सर्गेष्ट्यादि सर्व क्रिया केल्या. देवलानें संन्यासग्रहणाचा विचार केल्याचें पाहून भूतें आणि पितर मोठ्या काकुळतीनें 'आमचे विभाग आतां आम्हांला कोण देईल,' म्हणून आक्रोश करूं लागलीं. दाही दिशांना चाललेला त्यांचा आक्रोश श्रवण करून संन्यास सोडण्याचा देवलानें विचार केला. तेव्हां पवित्र फलमूलें, पुष्पें आणि वनस्पति यांनीं आक्रोश चालविला कीं 'हा दुर्मति क्षुद्र देवल पुनः आमचा छेद करील ! सर्व भूतांना यानेंच अभय देऊन तें तो आतां विसरून गेला आहे !'

राजा, मग त्या मुनिश्रेष्ठ देवलानें संन्यास व गार्हस्थ्य या दोन धर्मांमध्यें अधिक श्रेयस्कर धर्म कोणता याचा पुनः विचार केला आणि गृहस्थाश्रमापेक्षां संन्यासधर्मच श्रेष्ठ आहे, असें निश्चित करून गार्हस्थ्याचा त्याग केला. अशा निश्चयानें त्या देवलानें परमसिद्धि आणि श्रेष्ठयोग हीं संपादन केलीं. नंतर बृहस्पतिप्रमुख देव तेथें आले आणि त्यांनीं जैगीषव्य तपस्वी आणि त्याचें तप यांची स्तुति केली. तेव्हां ऋषिश्रेष्ठ नारदमुनि देवांस म्हणाला, 'अहो, ज्यानें देवलास इतकें आश्चर्यचकित केलें, त्या जैगीषव्याचें तप तर कांहींच

ाहीं.' असें बोलणाऱ्या त्या नारदाला जैगीषव्याची स्तुति करीत देव म्हणाले, या जैगीषव्याचें तेज, तप, प्रभाव आणि योग यांच्याशीं बरोबरी करणारा ोण आहे ? जैगीषव्याचा प्रभाव अशा प्रकारचा आहे आणि तो धर्मात्मा सित देवलहि तशाच योग्यतेचा आहे. त्या दोघां महात्म्यांचें हें तीर्थ श्रेष्ठ-थान होय.'

( २ ) राजा, महात्म्या हलधरानें त्या तीर्थावर स्नान केलें, ब्राह्मणांना वित्त ्लें, धर्म जोडला आणि मग तो परमार्थकर्ता बलराम सोमाच्या महातीर्थावर ाघून गेला. ९. ३. ५०.

---

## अध्याय ५१ वा.

[ १ दधीचि-सारस्वतांचें चरित्र. ]

( १ ) **वैशंपायन**—भारता, या सोमतीर्थावर नक्षत्राधिपति चंद्रानें राज-्य यज्ञ केला आणि तारकासुराशीं जो मोठा संग्राम झाला, तोहि येथेंच ाला. येथें आत्मज्ञानी बलरामानें स्नान केलें, दानें दिलीं आणि नंतर तो र्मात्मा सारस्वत मुनीच्या तीर्थाला गेला. या ठिकाणीं बारा वर्षें अनावृष्टि ाली असतां त्या सारस्वतमुनीनें द्विजोत्तमांना वेद शिकविला.

**जनमेजय**—वैशंपायना, द्वादश वर्षें अनावृष्टि झाली असतां त्या द्विज-ष्ठांना सारस्वतानें वेद शिकविले हें कसें ?

**वैशंपायन**—महाराज, पूर्वीं दधीचि नांवाचा एक धीमान् महातपस्वी नि होता. तो मोठा ब्रह्मचारी आणि जितेंद्रिय होता. इंद्र त्याच्या तपाला सर्वदा ीत असे. त्याला अनेक फलाशा दाखवून इंद्रानें भुलविण्याचा यत्न केला, तो ाद्धीस गेला नाहीं. तेव्हां त्यानें अलंबुषा नांवाची एक दिव्य, पवित्र व सुंदर प्सरा पाठविली. तो महात्मा दधीचि सरस्वतीतीरावर देवतर्पण करीत सतां, ती सुंदरी त्याच्याजवळ येऊन उभी राहिली. त्या दिव्य देहधारी दरीला पाहतांच त्याचें रेत स्खलन पावलें. सरस्वती नदीनें पुत्रहेतु मनांत रून तें रेत आपल्या उदरांत ठेविलें. पुढें योग्य समयीं प्रसूत होऊन तिला त्र झाला. मग सरस्वती त्या पुत्राला घेऊन दधीचि ऋषीकडे गेली. त्यावेळीं मुनि ऋषिमंडळींत बसला होता. त्या मुलाला ऋषीच्या हातीं देऊन सर-ाती म्हणाली, " ब्रह्मर्षे, तुजवरील भक्तीमुळें मीं ह्या तुझ्या पुत्राचें धारण

केलें, अलंबुषा अप्सरेला पाहून तुझें रेत स्खलन पावलें, तें तुझें वीर्य व्यर्थ जाऊं नये, म्हणून मीं त्याला माझ्या उदरीं ठाव दिला. आतां हा तुझा अनिंदित पुत्र मी तुझ्या स्वाधीन करीत आहें, त्याचा स्वीकार कर!"

राजा, सरस्वतीचें भाषण श्रवण करून दधीचीनें त्या पुत्रास जवळ घेतलें. पुत्रास पाहून त्याचे मनांत अतिशय प्रेम उद्भूत झालें. त्या द्विजोत्तमानें प्रेमभरांत त्याचें मस्तक हुंगिलें व त्याला पोटाशीं दृढ धरून ठेविलें. त्या महामुनीनें मग मोठ्या संतोषानें सरस्वतीनदीला वर दिला आणि म्हटलें, 'हे शुभगे, तुझ्या उदकानें तर्पण केल्यास विश्वेदेव, पितर आणि गंधर्वाप्सरसांचे गण तृप्त होतील!' असें बोलून त्या ऋषीनें परम हृष्ट होऊन सरस्वतीची पुनः स्तुति केली, ती श्रवण कर. तो म्हणाला, 'हे महाभागे, पूर्वीं तूं ब्रह्मसरोवरापासून वाहूं लागलीस. हे सरिच्छ्रेष्टे, सर्व व्रतनिष्ठ मुनि तुझा महिमा जाणतात. हे प्रियदर्शने, तूं सर्वदा माझें प्रिय करणारी आहेस. म्हणून हा तुझा पुत्र तुझ्याच नांवानें प्रसिद्धी पावेल. हा महातपस्वी होईल व लोकांत सारस्वत नांवानें प्रख्यात होईल. हे महाभागे, ह्या द्वादशवार्षिक अनावृष्टीच्या कालीं हा द्विजोत्तमांला वेद शिकवील आणि तूंहि सदोदित सर्व पुण्यनद्यांमध्यें अत्यंत पवित्र होऊन शोभशील!"

अशाप्रकारें दधीचीनें स्तुति केल्यावर व त्यापासून वर मिळाल्यावर ती सरस्वती पुत्रास घेऊन मोठ्या आनंदानें तेथून गेली. ह्याच कालाच्या सुमारास देवदानवांमध्यें मोठें वितुष्ट पडलें. तेव्हां आयुधें शोधीत इंद्र तिन्ही लोकांत हिंडला, परंतु देवशत्रूंचा वध करण्याचे कामीं समर्थ, असें शस्त्र त्याला कोठेंच मिळालें नाहीं. तेव्हां इंद्र देवांस म्हणाला, 'जे महासुर देवांचे शत्रू आहेत, त्यांचा वध दधीचीच्या अस्थींवांचून होणें मला शक्य नाहीं. म्हणून सुरश्रेष्ठहो, तुम्ही ऋषिश्रेष्ठाकडे चला आणि त्याच्या अस्थींची याचना करा!' तें ऐकून देव दधीचि ऋषीकडे गेले आणि म्हणाले, 'दधीचे, तुझ्या अस्थि आम्हांला दे, त्यांच्या योगानें आम्ही शत्रूंचा वध करणार आहों.' अशी देवांनीं याचना केली असतां दधीचीनें कोणताहि विचार न करितां एकदम प्राणत्याग केला. अशाप्रकारें देवांचें प्रिय करण्याऱ्या त्या दधीचीला अक्षय्य लोक प्राप्त झाले.

राजा जनमेजया, नंतर इंद्रानें परम हृष्ट होऊन त्याच्या अस्थींची गदा, वज्रें, चक्रें, मोठमोठे दंड अशा प्रकारचीं आयुधें करविलीं. राजा, तीव्र तपश्चर्येच्या

योगानें त्या ऋषीनें आपला देह बळकट बनविला होता. प्रजापतिपुत्र भृगूनें त्याला लोककल्याणकर्ता, बलवान्, तेजस्वी व सर्व लोकांहून विशेष सामर्थ्याचा बनविलें होतें. तो पर्वताप्रमाणें उंच असून आपल्या मोठेपणानें प्रसिद्धीस आलेला होता. त्याच्या प्रभावामुळें इंद्रहि नेहमीं उद्विग्न होत असे. हे भारता, ब्रह्मतेजामुळें उत्पन्न झालेल्या व क्रोधानें फेंकलेल्या वज्रानें दैत्य-दानवांचे नव्याण्णव वीर मारिले. असा कांहीं काळ लोटल्यावर अत्यंत भयंकर अशी द्वादशवार्षिकी अनावृष्टि आली. त्या अनावृष्टीच्या कालीं बारा वर्षेपर्यंत मोठेमोठे ऋषि वृत्तीकरितां सर्व दिशांना संचार करीत असत. सर्व मुनि वृत्तीसाठीं निघून गेलेले पाहून सारस्वत मुनीनेंहि तेथून जाण्याचा विचार केला. तेव्हां त्याला सरस्वती म्हणाली, ‘पुत्रा, तूं येथून जाऊं नकोस. तुझ्या आहाराकरितां मी सर्वदा उत्तम उत्तम मत्स्य आणून देईन. तूं येथेंच रहा!’

राजा, याप्रमाणें सरस्वती नदीनें सांगितलें असतां तो सारस्वत तेथेंच राहिला. तो सरस्वतीदत्त आहार खात असे. त्यानें पितर व देवता यांचें नित्य तर्पण करून प्राण आणि वेद यांचें रक्षण केलें. पुढें ती अनावृष्टि निघून गेल्यावर त्या महर्षींनीं अध्ययनासाठीं आपणांस वेद शिकविण्याविषयीं अन्योन्यांना विचारिलें. कारण क्षुधेनें व्याकुल होऊन चारी दिशांस भटकत असल्यामुळें ते सर्व वेद विसरून गेले होते. नंतर त्यांपैकीं कोणीएक सारस्वताच्या आश्रमाला गेला. तेव्हां तो ऋषिसत्तम उत्तम रीतीनें वेद पठण करीत असल्याचें त्याच्या दृष्टीस पडलें. तेव्हां तो ऋषि जाऊन महर्षींस म्हणाला, ‘कोणी सारस्वत नांवाचा देवतुल्य मुनि या विजन वनामध्यें वेदपठण करीत आहे. मग ते सर्व ऋषि त्या सारस्वताच्या आश्रमाला गेले आणि ‘आम्हांला वेद शिकीव’ असें त्याला बोलले. त्यावर तो मुनि बोलला, ‘विधिवत् माझें शिष्यत्व पत्करिल्यास मी तुम्हांस शिकवीन.’ तें ऐकून मुनिगण म्हणाले, ‘पुत्रका, तूं बाल आहेस, आम्हीं तुझें शिष्य व्हावें हें उचित नव्हे.’ यावर सारस्वत त्या मुनींस पुनः म्हणाला, ‘माझा धर्म कधीं नष्ट होऊं नये. जो अधर्मानें शिकवील व जो अधर्मानें अध्ययन करील, ते दोघेहि शीघ्र मृत्यु पावतात किंवा परस्परांचे शत्रु होतात. पुष्कळ वर्षें वांचल्यानें, पांढऱ्या केंसांनीं, वित्तानें, किंवा बंधुजन यांच्या योगानें मोठेपणा कधीं येत नसतो. जो विद्वान् तोच मोठा होय, असें ऋषींनीं सांगितलें आहे.’ हें त्याचें भाषण ऐकून त्या ऋषींनीं त्याच्यापासून विधानपूर्वक वेदग्रहण करून आपला धर्म चालू केला. याप्रमाणें साठ हजार मुनि सारस्वताचें शिष्यत्व पत्क-

रून वेदपठण करीत असत आणि त्या बाल विप्राकरितां एक एक मूठभर दर्भ आणून त्याचें आसन तयार करून ठेवीत असत !

राजा, कृष्णाचा वडील बंधु बलराम, यानें येथेंहि मोठा दानधर्म केला आणि तेथून तो परमहर्षित होऊन वृद्धकन्याश्रमतीर्थाला निघून गेला. ९.३.५१.

## अध्याय ५२ वा.

[ १ वृद्धकन्याचरित्रकथन. ]

( १ ) **जनमेजय**—वैशंपायना, प्राचीनकालीं ती कुमारी तपस्वी कशी झाली ? तिनें तप किमर्थ केलें आणि तिचा नियम काय होता ? ब्रह्मन्, तुझ्यापासून ही अत्यंत दुष्कर व उत्तम गोष्ट मी ऐकत आहें. तरी ती तप कां करूं लागली, तें सर्व वृत्त मला निवेदन कर !

**वैशंपायन**—राजा, कुणिगर्ग नांवाचा एक महायशस्वी तपस्विश्रेष्ठ ऋषि होता. त्यानें बरेंच तप केल्यावर एक सुंदर मानसकन्या निर्माण केली. तिला पाहून ऋषि अत्यंत संतुष्ट झाला आणि कांहीं काळानें देहत्याग करून स्वर्गाला गेला. पुढें त्या सुंदरीनें उग्र तपश्चर्या आणि उपवास यांच्या योगानें देव व पितर यांची आराधना केली आणि बराच काल आश्रमधर्म चालविला. पित्यानें तिच्याकरितां पती योजिला असतांहि त्या पवित्र कन्येला तो आवडला नाहीं. पुढेंहि तिला अनुरूप पति मिळाला नाहीं. विजन अरण्यामध्यें उग्र तपश्चर्येच्या योगानें आपलें शरीर कष्टवून पितर आणि देव यांच्या अर्चनांत ती रत होऊन राहिली. आपण कृतकृत्य झालों असें तिला वाटत असूनहि ती श्रमपूर्वक तपश्चर्या करीत होती. वार्धक्यानें आणि तपानें तिला एक पाऊलहि टाकण्याची शक्ति नाहींशी झाली, तेव्हां परलोकाला जाण्याचा विचार तिनें केला. देहत्याग करण्याचा तिचा विचार असल्याचें जाणून नारद तिला बोलला, 'हे अनघे, संस्कार न झालेल्या तुला उत्तम लोक कसे मिळतील ? हे महाव्रते, तूं मोठी तपश्चर्या केलीस खरी, तरी तूं पुण्यलोक जिंकिले नाहींस !'

राजा, नारदाचें भाषण ऐकून ती ऋषींच्या सभेंत गेली आणि म्हणाली, 'श्रेष्ठहो, जो माझें पाणिग्रहण करील, तो माझ्या तपश्चर्येच्या अर्ध्या भागाचा मालक होईल.' तिचें तें भाषण ऐकून मालवपुत्र प्राक्शृंगवान् यानें एका अटीवर तिचें ग्रहण करण्याचा विचार केला आणि म्हणाला, 'हे शोभने, तुझ्या बरो-

बर मी एकच रात्र वास करीन.' 'ठीक आहे' असें म्हणून ती त्याशीं विवाहास सिद्ध झाली. मग त्या मालवीनें यथाविधि होमादि कृत्यें करून तिचें पाणिग्रहण केलें. त्या रात्रीं ती तपस्विनी दिव्य वस्त्राभरणें धारण करून सुंदर तरुणी झाली. उत्तम गंधानुलेपनानें व सौंदर्यानें ती अधिकच शोभूं लागली. आपल्या सौंदर्यानें सर्व भवन दीप्तिमंत करून टाकणाऱ्या तिला पाहतांच तो मालवि अत्यंत संतुष्ट झाला. रात्र संपतांच प्रभातकालीं ती स्त्री त्याला म्हणाली, 'हे विप्रा, तुझ्या समयाप्रमाणें मी एक रात्र तुझ्याशीं राहिल्यें. तुझें कल्याण असो! आतां मी जात्यें.' ती जातांना आणखी म्हणाली, 'जो कोणी या तीर्थावर देवतर्पण करून एक रात्र वसति करील, त्याला अठ्ठावन्न वर्षें ब्रह्मचर्य करणाऱ्याइतकें फल प्राप्त होईल!'

राजा, असें बोलून ती साध्वी देहत्याग करून स्वर्गाला गेली. तो गालवि ऋषि तिचें रूप आठवून दीन झाला. त्यानें तिच्या प्रतिज्ञेप्रमाणें अर्धें तप ग्रहण करून कष्टपूर्वक आत्मसाधन केलें आणि हे भरतश्रेष्ठा, तिच्या रूपानें मोहित होऊन दुःखी झालेला तो मुनिहि देहत्याग करून लवकरच तिच्या गतीला गेला. याप्रमाणें त्या वृद्ध कन्येचें चरित्र मीं तुला सांगितलें. तसेंच तिचें ब्रह्मचर्य व पुण्यप्रद स्वर्गगति यांचेंहि निवेदन केलें. या तीर्थावर बलराम असतांना त्यानें तेथें ब्राह्मणांना द्रव्यदान केलें. शल्यवधाची वार्ता तेथेंच त्याला समजली. पांडवांनीं शल्याचा रणांत वध केल्याचें समजतांच त्यानें मोठा शोक केला. नंतर तो समंतपंचकाच्या द्वारांतून बाहेर पडला आणि त्यानें तेथील ऋषींस कुरुक्षेत्राचें फल विचारलें. तेव्हां त्या महात्म्यांनीं तें सर्व त्याला याथातथ्य सांगितलें. ९. ३. ५२.

---

## अध्याय ५३ वा.

[ १ कुरुक्षेत्रमाहात्म्यवर्णन. ]

ऋषि—बलरामा, सनातन समंतपंचकाला प्रजापतीची उत्तरवेदि असें म्हणतात. येथें पूर्वीं देवांनीं मोठें सत्र करून यजन केलें. पूर्वीं सर्व राजर्षींमध्यें श्रेष्ठ, धीमान् व महात्म्या कुरूनें हें अनेक वर्षें यत्नपूर्वक नांगरिलें; म्हणून याला कुरुक्षेत्र म्हणत असतात.

राम—तपोधनहो, त्या महात्म्या कुरूनें हें क्षेत्र कां नांगरिलें, हें ऐकण्याची माझी फार इच्छा आहे; तर तें आपण सांगावें.

ऋषि—पूर्वीं कुरु हें क्षेत्र सतत नांगरीत असतां एकदां इंद्र स्वर्गांतून खालीं उतरला आणि त्यानें कुरूला त्याचें कारण विचारिलें.

इंद्र—कुरो, हा मोठा प्रयत्न तूं कशाकरितां करीत आहेस ? राजर्षे, कोणत्या उद्देशानें तूं ही पृथ्वी नांगरीत आहेस ?

कुरु—शतक्रतो, या क्षेत्रामध्यें जे लोक मृत्यु पावतील, ते पापविवर्जित पुण्यलोकाला जातील. यावर इंद्रानें त्याचा उपहास केला आणि तो स्वर्गाला गेला. त्याचें त्या कुरुराजास कांहींच वाईट वाटलें नाहीं. तो सारखा पृथ्वी नांगरीत राहिला. इंद्र वरचेवर तेथें येऊन त्याला पुनः पुनः तोच प्रश्न विचारीत उपहास करून निघून जात असे. कुरुराजाचा भूमि नांगरण्याचा क्रम मात्र नित्य चालला होता. पुढें जेव्हां त्या राजानें उग्र तपाच्या योगानें पृथ्वी नांगरली, तेव्हां इंद्रानें त्याचें कृत्य देवांस सांगितलें. त्यावर देव इंद्राला म्हणाले, 'इंद्रा, शक्य असेल तर त्या राजर्षीस वर देऊन संतुष्ट करावें. येथें मेलेले सर्व लोक यज्ञांनीं आमचें यजन केल्यावांचून जर स्वर्गाला जातील, तर आपणाला हविर्भाग मिळणार नाहींत.' मग इंद्र पृथ्वीतलावर येऊन त्या राजाला बोलला, 'राजा, खेद करूं नकोस, माझें बोलणें ऐक. जे कोणी उपोषित राहून येथें सावधानपणें देहत्याग करितील आणि जे युद्धांत मरतील, ते तिर्यग्योनींतील असले, तरी हे राजेंद्रा, स्वर्गाला जातील.' त्यावर त्या कुरुराजानें 'तथास्तु' असें म्हटलें. मग इंद्रानें त्या कुरूला आशीर्वाद दिला आणि संतुष्ट मनानें तो स्वर्गाला गेला.

हे यदुश्रेष्ठा, अशाप्रकारें त्या कुरुराजानें हें क्षेत्र प्राचीन काळीं नांगरून निर्माण केलें; इंद्र आणि ब्रह्मादिक देवांनीं अशाप्रकारचें दुसरें पुण्यस्थान पृथ्वीतलावर नाहीं, अशी याची शिफारस केली आहे. जे कोणी येथें मोठें तप करतील, ते देहत्यागानंतर ब्रह्मलोकीं जातील. जे पुण्यवान् येथें दानधर्म करितील, ते सहस्रपटीनें संपत्ति मिळवितील. जे शुभचिंतक लोक येथें नित्य राहतील, ते यमलोक कधींहि पाहणार नाहींत. मोठे यज्ञ करून जे राजे यजन करितील ते ही पृथ्वी असेपर्यंत स्वर्गांत राहतील. येथें सुराधिप इंद्रानें कुरुक्षेत्राविषयीं गाथा गाइली आहे, ती हे हलधरा, सांगतों, श्रवण कर ! 'कुरुक्षेत्राहून वायूनें

उडालेले धूलिकणहि पाप्यांना परम गतीला नेतात. बलरामा, येथें मोठमोठे देव, ब्राह्मण व नृगादि राजे मोठे यज्ञ करून व देह ठेवून सुगतीला पोंचले. तरंतुकापासून अरंतुकापर्यंतचा भाग आणि रामऱ्हदापासून मचक्रुकापर्यंतची जागा हें कुरुक्षेत्र म्हणजे समंतपंचक होय. याला ब्रह्मदेवाची उत्तरवेदि म्हणतात. हें स्थान अत्यंत मंगलकारक, पुण्यप्रद, देवांना संमत आणि सर्व गुणांनीं युक्त आहे. येथें रणांत मृत्यु पावलेले सर्व राजे सर्वदा पुण्यावह व अक्षय्य गतीला जातात.'

जनमेजया, असें इंद्र ब्रह्मादिकांसह बोलल्यावर ब्रह्माविष्णुमहेशांनींहि त्यास अनुमोदन दिलें. ९. ३. ५३.

---

## अध्याय ५४ वा.

[ १ मित्रावरुणाश्रमांत भीम-दुर्योधनांमध्यें गदायुद्ध चालल्याचें नारदमुखें ऐकून तें पाहण्याला बलरामाचें कुरुक्षेत्राला गमन. ]

( १ ) वैशंपायन—राजा जनमेजया, कुरुक्षेत्र पाहून आणि दानें देऊन तो बलराम एका मोठ्या व पुण्यकारक अशा आश्रमाला आला. मधूक आणि आम्र वृक्षांच्या तेथें राई लागल्या होत्या, प्लक्ष आणि न्यग्रोध वृक्ष रांगेनें शोभत होते, चिर आणि बिल्ववृक्षहि तेथें दिसत होते आणि पनस व अर्जुन यांनीं तो व्यापून गेलेला होता. अशा त्या श्रेष्ठ व पुण्यलक्षणयुक्त आश्रमाला पाहून तेथील सर्व ऋषींस 'हा आश्रम कोणाचा' म्हणून बलरामानें प्रश्न केला. तेव्हां त्या सर्वांनीं महात्म्या बलरामाला सांगितलें कीं, 'पूर्वीं हा आश्रम कोणाचा होता, तें सर्व विस्तारपूर्वक सांगतों. नीट लक्ष दे. या ठिकाणीं प्राचीनकाळीं विष्णु देवानें उत्तम तपश्चर्या केली; येथें त्याचे सर्व सनातन यज्ञ सिद्धीला गेले. येथें एक ब्राह्मण ब्रह्मचारिणी कुमारी स्वर्गस्थ झाली. ती तपस्विनी मोठी योगसंपन्न होती. ती महात्म्या शांडिल्याची कन्या होती. ती साध्वी व्रतनिष्ठ, दमनशील आणि ब्रह्मचारिणी होती. ती आपल्या योगबलानें देवब्राह्मणपूजित होऊन येथेंच उत्तम स्वर्गलोकाला गेली.'

राजा, ऋषींचें हें भाषण ऐकून बलराम त्या आश्रमाला गेला आणि आपलीं संध्यादि सर्व कृत्यें हिमाचलाच्या पार्श्वभागीं आटपून व ऋषींना अभिवंदन करून तो पर्वतावर चढला. तेथून फार दूर गेला नाहीं, तों एक पुण्यकारक

तीर्थ त्याच्या दृष्टीला पडलें. तें प्लक्षप्रस्रवणतीर्थ आणि तेथें सरस्वतीचा प्रभाव पाहून बलरामाला मोठा विस्मय वाटला. तेथून तो बलराम कारपवननामक एका उत्कृष्ट तीर्थावर आला. तेथेंहि बलरामानें दानधर्म केला. तेथें पुण्यकारक, सुशीत आणि विमल उदकामध्यें स्नान करून त्या रणदुर्मद बलरामानें आपले पितर व देव यांचें संतर्पण केलें. तेथें रात्रभर यति व ब्राह्मण यांसह राहून तो बलराम मित्रावरुणाश्रमाला आला. जेथें पूर्वीं इंद्र, अग्नि आणि अर्यमा यांची मैत्री झाली, त्या यमुनातीर्थावर कारपवनाहून बलराम आला. त्या ठिकाणीं त्या धर्मात्म्यानें स्नान केलें, त्यामुळें त्याला मोठें समाधान वाटलें. तेथें ऋषि आणि सिद्ध यांच्यामध्यें बसून बलरामानें अनेक शुभ व पुण्यकारक कथा ऐकिल्या.

राजा, याप्रमाणें तेथें बसून त्यांच्या गोष्टी चालत असतां नारदमुनि तेथें पोंचला. त्या महातपस्वी नारदानें मस्तकावर जटाभार धारण केला होता, त्यानें स्वर्णवस्त्र परिधान केलें होतें, त्यानें हेमदंड आणि कमंडलु हातांत धारण केले होते. मधुर शब्द करणारी कच्छपी वीणा त्यानें हातांत घेतली होती, देव व ब्राह्मण सर्वदा त्याची पूजा करीत असत व तो नृत्य-गीतांमध्यें अत्यंत कुशल होता. तो कलहप्रिय असून कलह उत्पन्न करण्यांत त्याला मोठा आनंद होत असे. बलरामानें उठून नारदाचें यथोचित आदरातिथ्य केलें आणि त्या देवर्षीला कौरवांकडील समाचार विचारला. हे राजा, मग त्या सर्वधर्मवेत्त्या नारदानें कौरवांचा झालेला मोठा भयंकर संहार वगैरे सर्व गोष्टी त्या बलरामास निवेदन केल्या. नंतर बलभद्रानें दीनवाणीनें नारदाला विचारिलें, ‘भगवन्, त्या क्षेत्राची स्थिति काय आहे, तेथें कोण राजे झाले, हें सर्व पूर्वींच मीं ऐकिलें आहे; तरी विस्तारपूर्वक तें वृत्त ऐकण्याची मला मोठी हौस आहे !’

**नारद**—बलरामा, भीष्म आरंभींच पडला, नंतर द्रोण, सिंधुपति जयद्रथ, वैकर्तन कर्ण आणि त्याचे महारथी पुत्र पतन पावले. तसेंच भूरिश्रवा आणि वीर्यवान् मद्रराज शल्यहि निधन पावला. हे व दुसरेहि युद्धांत कधीं माघार न घेणारे राजे आणि राजपुत्र कौरवराजाच्या जयाकरितां आपले प्राण टाकून ठिकठिकाणीं मृत होऊन पडले ! महाबाहो माधवा, आतां कोण वीर जीवंत राहिले आहेत, तें सांगतों. धार्तराष्ट्रसैन्यामध्यें युद्धदुर्मद असे तीनच वीर राहिले आहेत. कृप, कृतवर्मा आणि द्रोणपुत्र अश्वत्थामा हे ते तीन वीर होत.

या युद्धप्रसंगीं तेहि भीतीनें दशदिशांना पळून गेले आहेत. शल्याचा वध होऊन कृपादिकांनीं पलायन केलें असतां दुर्योधन अत्यंत दुःखी झाला व त्यानें द्वैपायन न्हदामध्यें प्रवेश केला आणि जल स्तंभित करून त्यांत तो निजून राहिला. तेथें पांडव व कृष्ण जाऊन त्यांनीं कठोर शब्दांनीं त्याला त्रासवून सोडिलें. हे रामा, अशाप्रकारें चारी बाजूंनीं वाक्शरांनीं ताडित होऊन तो दुर्योधन आपली मोठी गदा घेऊन बाहेर पडला. सांप्रत तो भीमसेनाशीं युद्ध करण्याला सिद्ध झाला आहे. आज त्या दोघांमध्यें दारुण युद्ध होईल. तुला तें पाहण्याची उत्कंठा असेल, तर आपल्या शिष्यांचें तें युद्ध तूं अवलोकन कर !

वैशंपायन—नारदाचें तें भाषण ऐकून बलरामानें ब्राह्मणांचें पूजन केलें. आपल्याबरोबर आलेल्यांस निरोप दिला आणि आपल्या अनुयायांना द्वारकेस जाण्याची आज्ञा केली. नंतर तो प्लक्षप्रस्रवणनामक पर्वतश्रेष्ठावरून खालीं उतरला आणि मोठा तीर्थमहिमा श्रवण करून संतुष्ट मनानें विप्रांदेखत खालील श्लोक म्हणाला:—

[1]सरस्वतीवाससमा कुतो रतिः । सरस्वतीवाससमाः कुतो गुणाः ॥
सरस्वतीं प्राप्य दिवं गता जनाः । सदा स्मरिष्यन्ति नदीं सरस्वतीम् ॥
सरस्वती सर्वनदीषु पुण्या । सरस्वती लोकशुभावहा सदा ॥
सरस्वतीं प्राप्य जनाः सुदुष्कृतं । सदा न शोचन्ति परत्र चेह च ॥

राजा, नंतर त्या सरस्वतीकडे वारंवार प्रेमपूर्वक नजर टाकून अश्व जोडून सिद्ध केलेल्या रथामध्यें तो परंतप राम बसला आणि तो यदुपुंगव त्या शीघ्रगामी रथाच्या योगानें आपल्या शिष्यांचें जेथें युद्ध प्रवृत्त झालें होतें, त्या ठिकाणीं शीघ्र आला. ९. ३. ५४.

---

१ सरस्वतीच्या तीरीं वास करणाऱ्यांना होणाऱ्या आनंदासारखा आनंद इतरत्र कसा मिळणार ? सरस्वतीवर वास करण्यांत जे गुण आहेत ते दुसऱ्या ठिकाणीं कोठून आढळणार ? सरस्वतीवर एकदां वास घडून जीं माणसें दिवंगत झालीं, त्यांना स्वर्गांत देखील सरस्वतीचें स्मरण झाल्याशिवाय राहत नाहीं. सर्व नद्यांमध्यें सरस्वती अत्यंत पुण्यकारक आहे, ती सर्वदा जनांचें कल्याण करणारी आहे. सरस्वतीची प्राप्ति झाली असतां लोकांना आपल्या भयंकर पापांचा शोक करण्याचा प्रसंग इहलोकीं व परलोकीं कधींहि येत नसतो.

## अध्याय ५५ वा.

[ १ गदायुद्धार्थ सिद्ध झालेल्या भीम-दुर्योधनांचें वर्णन. ]

**वैशंपायन**—राजा जनमेजया, अशाप्रकारें तें तुमुल युद्ध उपस्थित झालें असतां दुःखी झालेल्या धृतराष्ट्रानें विचारिलें—

**धृतराष्ट्र**—संजया, राम तेथें येऊन ठेपला आणि गदायुद्ध सुरू झालें असतां माझ्या पुत्रानें भीमसेनाशीं कसें युद्ध केलें ?

**संजय**—हे भारता, बलराम सन्निध आलेला पाहून तुझा पुत्र महाबाहु दुर्योधन आनंदित झाला. बलरामाला पाहतांच युधिष्ठिर राजानें त्याला अभ्युत्थान दिलें आणि आदरपूर्वक यथाविधि त्याचें पूजन केलें. त्याला बसण्याला आसन दिलें, आणि त्याचें कुशल विचारिलें. तेव्हां युधिष्ठिराला बलराम मधुर, धर्मयुक्त आणि शूरांना हितकारक असें बोलला. तो म्हणाला, ' राजसत्तमा, मी ऋषींकडून असें ऐकिलें आहे कीं कुरुक्षेत्र हें अत्यंत पुण्यकारक, परम पावन आणि स्वर्गदायक आहे. देव, ऋषि आणि मोठमोठे ब्राह्मण यांना त्याचा मोठा आधार होता. त्या ठिकाणीं युद्ध करणारे जे पतन पावतील, त्यांना स्वर्गामध्यें इंद्रासह वास घडेल, हें सत्य आहे. म्हणून राजा, आपण आतां येथून समंतपंचकास जाऊं. देवलोकांत ती प्रजापतीची उत्तरवेदि म्हणून प्रसिद्ध आहे. त्रैलोक्यांतील अत्यंत पुण्यप्रद अशा त्या सनातन क्षेत्रांत युद्ध करीत असतां जो मृत्युवश होतो, त्याला स्वर्गलोक मिळतो.

हे महाराजा, यावर युधिष्ठिर ' ठीक आहे ' असें बोलून समंतपंचकाकडे जाण्यास निघाला. इकडे आपली मोठी गदा घेऊन तो अमर्षी व द्युतिमान् दुर्योधन पांडवांसह पायींच निघाला. अशा रीतीनें तो कवचधारी व गदापाणि वीर जात असतां अंतरिक्षसंचारी देवांनीं ' साधु, साधु ' म्हणून त्याची प्रशंसा केली. जे वातिक आणि चारण तेथें आले होते, त्यांनाहि दुर्योधनाला पाहून मोठा हर्ष झाला. त्यावेळीं तुझा पुत्र दुर्योधन पांडववेष्टित असूनहि मत्तगजेंद्राप्रमाणें धिमेपणानें जात होता. तेव्हां शंखनिनाद, भेरींचे महास्वन आणि शूरांचे सिंहनाद यांनीं सर्व दिशा भरून गेल्या. याप्रमाणें ते नरवीर कुरुक्षेत्रावर येऊन पोंचले. तेथें तुझ्या पुत्राच्या इच्छेप्रमाणें पश्चिमेकडच्या बाजूला ते आले. सरस्वतीच्या दक्षिण तीरावर असलेल्या स्वयननामक तीर्थांतील जागा सपाट असल्यामुळें तेथें युद्ध करणें त्यांस आवडलें. नंतर भीमानें कवच धारण

करून आपली तीक्ष्ण धारांची गदा उचलली. तेव्हां तो गरुडासारखा दिसूं लागला.

राजा, इकडे शिरस्त्राण बांधून व सुवर्णकवच अंगांत चढवून रणांगणांत तुझा पुत्रहि, सुवर्णानें जसा मेरुपर्वत शोभतो, त्याप्रमाणें शोभूं लागला. दोघेहि वीर कवचबद्ध होऊन क्षुब्ध गजांप्रमाणें शोभूं लागले. रणमंडलाच्या मध्यभागीं असलेले ते नरश्रेष्ठ भ्राते उदय पावलेल्या चंद्रसूर्यांप्रमाणें दिसत होते. क्रुद्ध महागजांप्रमाणें परस्परवधाच्या इच्छेनें ते एकमेकांकडे पाहत होते. त्या दोघांसहि मोठा क्रोध चढला होता. ते दोघेहि बलरामाचे शिष्य असून गदायुद्धांत अत्यंत निष्णात होते. दुर्योधनानें दांतओंठ खात व क्रोधानें लाल डोळे करीत ज्याप्रमाणें गजानें गजाला आह्वान करावें, त्याप्रमाणें भीमसेनाला पाहून त्याला आह्वान केलें. वीर्यवान् भीमानेंहि अद्रिसार गदा घेऊन सिंहानें जसें सिंहाला तसें दुर्योधनाला आह्वान केलें. भीम-दुर्योधन त्यावेळीं आपापल्या गदा उभारून सशिखर पर्वतांप्रमाणें शोभूं लागले. ते अतिक्रुद्ध भीमपराक्रमी बलरामाचे शिष्य इंद्र व यम यांसारखे पराक्रमी होते. त्या दोघांचें युद्धनैपुण्य वरुणाप्रमाणें होतें. युद्धामध्यें ते वासुदेव, बलराम किंवा कुबेर यांसमान होते. राजा, मधु आणि कैटभ, सुंद आणि उपसुंद, राम आणि रावण किंवा वालि आणि सुग्रीव यांच्या जोड्यांप्रमाणें ते समानपराक्रमी होते. पराक्रमांत ते काल आणि मृत्यु यांप्रमाणें होते. मदोन्मत्त गजांप्रमाणें ते परस्परांवर धांवूं लागले. ते दोघेहि गदायुद्धविशारद असून सिंहाच्या अंगाप्रमाणें त्यांच्या अंगावर चालून जाणें अतिदुर्घट होतें. ते वीर नखें व दांत या आयुधांनीं युद्ध करणाऱ्या व्याघ्रासमान भासत होते. प्रलयकाळीं क्षुब्ध झालेले ते दोन दुस्तर समुद्रच होते. मंगळासारखे लाल झालेले ते दोघे क्रुद्ध वीर म्हणजे वर्षाकालीं गर्जना व वृष्टि करणारे पूर्वपश्चिम मेघच अन्योन्यांवर आदळत आहेत, असा भास होत होता. ते महाबलवान् तेजस्वी वीर म्हणजे उगवलेले दोन कालसूर्यच होत असें वाटत होतें. व्याघ्रांप्रमाणें खवळलेले व मेघांसमान गर्जणारे ते भीम-दुर्योधन एकमेकांवर तुटून पडतांना जसे सिंह-केसरी हर्ष पावतात त्याप्रमाणें हृष्ट झाले होते. ते वीर म्हणजे अतिसंतप्त दोन गजच किंवा प्रदीप्त झालेले दोन अग्निच किंवा शृंगयुक्त दोन पर्वतच दिसत होते. ते गदापाणि वीर एकमेकांकडे तीक्ष्ण दृष्टीनें पहात होते. तेव्हां त्यांचे ओंठ क्रोधानें हालत होते. असे ते नरश्रेष्ठ एकमेकांशीं मोठ्या आवेशानें भिडले. सदश्वांप्रमाणें खिंकाळणारे, गजांप्रमाणें चीत्कार कर-

णारे आणि वृषभांप्रमाणें डुरकणारे ते भीम-दुर्योधन परस्परांशीं भिडले. त्यावेळीं ते वीर बलोन्मत्त दैत्यांप्रमाणें भासले.

हे राजा, तेव्हां कृष्ण, राम, केकय, सृंजय, पांचाल आणि आपले बंधु यांसह विजयानें आनंदित झालेल्या युधिष्ठिरास दुर्योधन गर्वयुक्त असें बोलला कीं, 'पांडवहो, तुम्हीं व सर्व नृपश्रेष्ठ यांनीं येथें जवळ बसून मी व भीम यांमध्यें चाललेलें हें युद्ध पहावें.' राजा, दुर्योधनाचे भाषणाप्रमाणें त्या सर्वांनीं केलें. तेव्हां तें खालीं बसलेलें राजमंडळ गगनांतील सूर्यमंडळासारखें सुशोभित दिसूं लागलें. त्या सर्वांच्या मध्यभागीं पूज्य बलराम बसला होता. त्यानें नील वस्त्र परिधान केलें होतें व त्याची कांति शुभ्र होती. तो तेजस्वी राम तेव्हां नक्षत्रांच्या योगें शोभणाऱ्या पूर्णचंद्रासारखा दिसत होता. हे महाराजा, तेव्हां ते गदापाणि भीम-दुर्योधन परस्परांना कठोर भाषणानें ताडण करूं लागले. अन्योन्यांना अप्रिय भाषण करून ते कुरुसत्तम वृत्र-शक्रांप्रमाणें रणभूमीवर परस्परांचें निरीक्षण करूं लागले ! ९. ३. ५५.

---

## अध्याय ५६ वा.

[ १ भीम-दुर्योधनांचें गदायुद्ध. ]

( १ ) **वैशंपायन**—जनमेजया, नंतर त्या दोघां वीरांमध्यें तुमुल वाग्युद्ध झालें; त्यावेळीं दुःखी धृतराष्ट्र राजा काय बोलला तें ऐक. तो म्हणाला, 'बा संजया, असा परिणाम होणाऱ्या मनुष्यत्वाला धिक्कार असो ! एकादश चमूंचा भर्ता जो माझा पुत्र सर्व राजांना आज्ञा करीत असे आणि ज्यानें ह्या सर्व वसुंधरेचा उपभोग घेतला, तो आज गदा घेऊन रणांत पायीं जावा ना ? जगाचा नाथ असा माझा पुत्र आज अनाथाप्रमाणें गदा घेऊन पायीं जात आहे. तेव्हां हा त्याचा दैवयोगच म्हटला पाहिजे. हे संजया, माझ्या पुत्रावर हें मोठेंच संकट कोसळलें आहे. असें बोलून तो दुःखार्त राजा धृतराष्ट्र थांबला !

**संजय**—मेघाप्रमाणें गंभीर आवाजाच्या त्या वीर्यवान् दुर्योधनानें वृषभाप्रमाणें डुरकण्या देत पृथापुत्रास समरांगणांत युद्धास आव्हान केलें, त्यावेळीं नानाविध दुश्चिह्नें होऊं लागलीं. सोसाट्याचा वारा वाहूं लागला, धूलीची वृष्टि होऊं लागली, सर्व दिशा अंधकारानें व्याप्त झाल्या, अंगावर रोमांच उठविणारे झंझावात सुटले, आकाशांतून शेंकडो उल्का पडूं लागल्या. राजा,

अमावास्या नसतांहि राहूनें सूर्यास ग्रासिलें; वृक्ष व अरण्यें यांसुद्धां सर्व पृथ्वी, कांपूं लागली; वाऱ्याचे योगानें धूलिकण सर्वत्र उडूं लागले व पर्वतांचीं शिखरेंहि कोसळून भूमीवर पडलीं; मृग मोठ्या वेगानें दशदिशांस पळत सुटले, अतिभीषण शिवा ओरडूं लागल्या. त्या भयंकर दिवशीं अशुभवेत्ते मृग बाहेर पडले; सर्वत्र विहिरींचें पाणी वाढलें आणि अशरीर महानाद सर्वत्र ऐकूं येऊं लागले !

राजा, अशा प्रकारचीं झालेलीं दुश्चिह्नें पाहून आपला ज्येष्ठ बंधु जो युधिष्ठिर धर्मराज त्याला भीमसेन बोलला, "धर्मा, हा मंदात्मा सुयोधन रणांत मला जिंकण्याला किमपिहि समर्थ नाहीं. खांडववनावर सोडलेल्या अग्नीप्रमाणें हृदयांत बराच काळ सांठविलेला क्रोध मी त्या सुयोधनावर टाकीन ! युधिष्ठिरा, आज ह्या कुरुकुलाधम दुर्योधनाचा वध करून तुझ्या हृदयांतील शल्य मी काढून टाकीन ! ह्या पाप्याला रणाग्रभागीं गदेनें मारून आज तुझ्या गळयांत कीर्तिरूप माळ मी घालीन ! या गदेनें मी आज त्याचा देह शतशः भिन्न करीन ! हे अनघा, यापुढें हा कांहीं हस्तिनापुरांत प्रवेश करूं शकणार नाहीं ! यानें आमच्या शयनावर सर्प सोडून, अन्नांत विष घालून, प्रमाणकोटींत पाण्यांत टाकून, लाक्षागृहांत जाळून, सभेंत उपहास करून आणि सर्वस्व हरण करून आम्हांस जें दुःख दिलें, त्याचप्रमाणें बारा वर्षें वनवास आणि पुनः एक वर्ष वनवास भोगवून आमचे जे हाल केले, त्या सर्वांचा मी आज शेवट करीन ! आज त्याचा वध करून मी स्वतःच्या ऋणांतून मुक्त होईन. या अकृतात्म्या दुष्ट धार्तराष्ट्राचें आयुष्य संपलें आहे. आतां ह्याला आपल्या मातापितरांचेंहि दर्शन होणार नाहीं. आज त्या दुष्ट दुर्योधनाचें सर्व सौख्य आणि त्याबरोबर स्त्रीजनांचें दर्शनहि त्याला अंतरलें ! कुरुराज शंतनु वंशांतील हा पातकी कुलकलंक आज आपले प्राण, संपत्ति आणि राज्य हीं सोडून भूतलावर शयन करील ! आज आपल्या पुत्राचा वध झाल्याचें ऐकून शकुनीच्या नादानें आपण केलेलें सर्व अशुभ कर्म धृतराष्ट्राला आठवेल !"

'हे राजशार्दूला, असें बोलून तो वीर्यवान् भीम हातांत गदा घेऊन वृत्रास आह्वान करणाऱ्या इंद्राप्रमाणें युद्धास रणांत उभा राहिला. दुर्योधनहि सशृंग कैलासाप्रमाणें रणांगणांत स्थित झाला. दुर्योधनास पाहून क्षुब्ध झालेला भीमसेन पुनः त्याला बोलला, "दुर्योधना, तूं आणि धृतराष्ट्र राजानें वारणावता-

मध्यें जें दुष्ट कृत्य केलें तें सर्व आतां आठव; त्याचप्रमाणें रजस्वला द्रौपदीला राजसभेंत तुम्हीं छळिलेंत, तूं आणि सौबल शकुनीनें मिळून दोघांनीं युधिष्ठिर राजाला द्यूतांत फसविलें, वनामध्यें तुजमुळें आम्हांला जें दुःख भोगावें लागलें, आणि विराट नगरामध्यें वेषांतर करून आम्ही राहिलों असतां जे कष्ट सोसले त्या सर्वांचा मी आज तुजवर सूड घेईन! दुर्मते, तूं बरा सांपडला आहेस! तुझ्या साठीं हा रथिश्रेष्ठ गांगेय शिखंडीच्या हातून निधन पावून शरतल्पावर पडला आहे! तुझ्यामुळें द्रोण निधन पावला, तुझ्यामुळेंच कर्ण व शल्य हत झाले, वैराग्नीचा आदिकर्ता जो सौबल शकुनि तो आणि द्रौपदीला क्लेश देणारा तो पापी प्रातिकामी तोहि पतन पावला! तुझे सर्व शूर व युद्धविशारद बंधु निधन पावले! हे व दुसरे पुष्कळ राजे तुझ्यासाठींच रणांत पडले आणि तुझाहि मी आज या गदेनें वध करणार, हें पक्कें समज!"

राजेंद्रा, याप्रमाणें उच्च स्वरानें बोलणाऱ्या त्या भीमसेनाला तुझा सत्यविक्रमी पुत्र दुर्योधन निर्भयपणें बोलला, "वृकोदरा, पुष्कळ बडबड करण्यांत काय अर्थ आहे? कुलाधमा, तुझी युद्धाची हौस आज मी जिरवून टाकितों! एकाद्या यःकश्चित् मनुष्याप्रमाणें तुझ्यासारख्या क्षुद्र मनुष्याच्या ओरडीनें भिण्या-सारखा हा दुर्योधन खास नाहीं. देवांपासून संपादन केलेलें गदायुद्ध तुझ्याशीं एकदां खेळावें, अशी माझ्या मनांत फार दिवसांपासून इच्छा होती, ती सफल होण्याचा आज सुदैवानें प्रसंग आला आहे! दुर्मते, आत्मस्तुति कशाला करितोस? बोलाप्रमाणें कृति करून दाखीव, व्यर्थ वेळ दवडूं नकोस!"

दुर्योधनाचें तें भाषण ऐकून तेथील सर्व राजांनीं आणि सोमकांनींहि त्याची फार वाहवा केली. त्या स्तुतीनें दुर्योधनाचे अंगावरील केंस स्फुरण पावले आणि त्यानें युद्ध करण्याचा निश्चय केला. मग उन्मत्त मातंगाप्रमाणें त्या राजांनीं केलेल्या टाळयांच्या गजरानें त्याला दुप्पट स्फुरण चढलें; इतक्यांत पंडुपुत्र भीमसेन आपली गदा घेऊन त्या धार्तराष्ट्रावर धांवून आला! त्यावेळीं गजांच्या गर्जना सुरू झाल्या, अश्व खिंकाळूं लागले आणि जयैषी पांडवांचीं प्रदीप्त शस्त्रें शोभूं लागलीं! ९. ३. ५६.

## अध्याय ५७ वा.

[ १ भीम-दुर्योधनांचें गदायुद्ध. ]

(१) संजय—राजा, आपल्यावर भीमसेन चालून आलेला पाहतांच दुर्योधनहि त्याच्यावर मोठ्या वेगानें चालून गेला. मग दोन शृंगयुक्त वृषभांप्रमाणें एकमेकांना गांठून त्यांनीं अन्योन्यांवर प्रहार केले. त्यावेळीं प्रचंड वायु सुटला असतां होणाऱ्या आवाजाप्रमाणें भयंकर आवाज झाला आणि अंगावर रोमांच उठण्यासारखें त्या उभयतांमध्यें दारुण युद्ध सुरू झालें. धृतराष्ट्रा, ते दोघे इंद्र-प्रल्हादांप्रमाणें परस्परांस जिंकूं पहात होते. ते उभय गदापाणि वीर सर्वांग रक्तदिग्ध होऊन युद्ध करीत असतां फुललेल्या किंशुक वृक्षांप्रमाणें शोभूं लागले. तें अतिदारुण युद्ध सुरू झालें असतां आकाश गदाप्रहारांनीं ठिणग्या उडून काजव्यांनीं व्याप्त झाल्यासारखें दिसूं लागलें. अशाप्रकारें प्रवृत्त झालेलें तें युद्ध कांहीं वेळ चालून दोघेहि वीर श्रांत होऊन गेले. मुहूर्तभर विश्रांति घेऊन झाल्यावर ते परंतप योद्धे आपापल्या गदा घेऊन परस्परांवर धांवले. ते वीर्यवान् उभय वीर त्यावेळीं तरुण करिणीकरितां परस्परांवर चालून जाणाऱ्या मदोत्कट गजांसारखे दिसत होते. समानपराक्रमी त्या गदाधारी वीरांना पाहून देव, गंधर्व आणि मानव यांना यांपैकीं कोण विजयी होईल, याविषयीं मोठी शंका उत्पन्न झाली.

राजा, भीमसेनाची यमदंडाप्रमाणें प्रचंड गदा पाहून प्रेक्षकांना तें इंद्राचें उगारलेलें वज्रच होय असें वाटलें. रणभूमीवर भीमसेन गदा फिरवीत असतां त्याचा तुमुल आणि घोर आवाज मुहूर्तभर होत होता. ती अतुल वेगाची गदा भीमसेन फिरवीत असतांना त्याला पाहून दुर्योधनहि विस्मयचकित झाला. भारता, अशाप्रकारें तो वीर वृकोदर त्यासमयीं नानाविध मंडलें व मार्ग करीत असतां फारच शोभला !

नंतर भक्ष्यार्थ एकमेकांवर चालून जाणाऱ्या मार्जारांप्रमाणें ते परस्परांवर वरचेवर गदाप्रहार करूं लागले. तेव्हां भीमसेनानें अनेक प्रकारचे मार्ग, विचित्र मंडलें, शत्रुसंमुख गमन, अपसरण इत्यादि युद्धप्रकार दाखविले. तसेंच विचित्र अस्त्र-यंत्रें, विविध प्रकारचीं स्थानें, पवित्रे, शस्त्रें शत्रूंवर फेंकणें, शत्रूंचे शस्त्रप्रहार चुकविणें, सव्यापसव्य घालणें, वेगानें शत्रूसमोर धांवून जाणें, प्रतिरोध करणें, इत्यादि अनेक प्रकारची युद्धक्रीडा त्या वीरांनीं दाखविली. उभयतांनीं परस्परांवर गदा-

प्रहार चालविले, तेव्हां रक्तदिग्ध दोन गजच अन्योन्यांवर शुंडप्रहार करीत असल्याचें दिसून आलें. हे परंतपा, याप्रमाणें त्यांचें घोररूप युद्ध सायंकाळचे वेळीं वृत्र-वासवांचे युद्धाप्रमाणें झालें. मग त्या गदाधारी वीरांनीं पुनः मंडलें घालण्यास सुरवात केली. दुर्योधन उजव्या बाजूनें तर भीम डाव्या बाजूनें मंडलें घालूं लागला. भीम याप्रमाणें रणांत संचार करीत असतां दुर्योधनानें त्याच्या पार्श्वदेशीं प्रहार केला. त्या प्रहाराचें भीमास कांहींच वाटलें नाहीं. नंतर भीम आपली इंद्राशनीप्रमाणें घोर व यमदंडाप्रमाणें भयंकर गदा फिरवूं लागला. तीवर तुझ्या पुत्रानेंहि आपल्या गदेचा प्रहार केला. हे भारता, तुझा पुत्र त्यावेळीं गदा फिरवीत असतां तिजपासून वायु उत्पन्न होऊन त्याचा तुमुल ध्वनि आणि तेज उत्पन्न झालें. दुर्योधन विविध मार्ग आणि मंडलें करीत फिरत होता. त्यावेळीं तो वीर भीमसेनापेक्षां विशेष चतुर दिसला. भीमसेनहि आपली गदा प्रचंड वेगानें फिरवूं लागला. त्यामुळें धूम व अग्नि उत्पन्न होऊन त्यांचा मोठा भीषण नाद होऊं लागला !

राजा, भीमसेनानें आपल्यावर गदा सोडल्याचें पाहून सुयोधनानेंहि आपली गदा फिरविण्यास आरंभ केला. त्यावेळीं तो फारच शोभला. दुर्योधनाच्या त्या गदामारुतवेगानें पांडव आणि सर्व सोमक भयभीत झाले. ते दोघे वीर समरांत युद्धक्रीडा दाखवीत असतां एकमेकांवर गदाप्रहार करूं लागले. त्यावेळीं ते वीर दंतांनीं युद्ध करणाऱ्या गजांप्रमाणें शोभले ! त्यामुळें त्यांच्या अंगांतून रक्तस्राव होऊं लागला. नंतर भीम व्यवस्थित उभा असल्याचें पाहून तुझा पुत्र चित्रविचित्र मार्गांनीं त्यावर धांवून आला. त्यावेळीं ते दोघेहि वीर अत्यंत क्षुब्ध झालेले दिसत होते. भीमानें दुर्योधनाच्या सुवर्णपरिष्कृत व अत्यंत वेगवान् गदेवर भयंकर प्रहार केला, त्याबरोबर दोन वज्रांच्या आघाताप्रमाणें मोठा आवाज उत्पन्न होऊन सर्वत्र ठिणग्या उडाल्या. राजा, भीमसेनानें सोडलेली गदा वेगानें खालीं येऊं लागली, तेव्हां पृथ्वीहि भयकंपित झाली. त्यावेळीं आपल्या गदेचा भीमानें केलेला प्रतिकार दुर्योधनाला सहन झाला नाहीं. मदोन्मत्त गज दृष्टीला पडतांच जसा दुसरा मत्त गज त्यावर तत्काळ तुटून पडतो, त्याप्रमाणें त्यानें उजवें मंडळ घेऊन भीमसेनाच्या मस्तकावर मोठ्या जोरानें गदाप्रहार केला ! गदेचा तो भयंकर प्रहार सोसून भीम यत्किंचितसुद्धां हालला नाहीं. तो पाऊलभरहि पुढें मागें वळला नाहीं, हें पाहून सर्वांस मोठें आश्चर्य वाटलें आणि त्यांनीं भीमाची मोठी प्रशंसा केली. मग त्या भीमपराक्रमी भीमानें आपली सुवर्णपरिष्कृत प्रचंड गदा

दुर्योधनावर सोडली. परंतु त्या बलवान् दुर्योधनानें मोठ्या चपलतेनें तो प्रहार व्यर्थ केला! तें पाहून लोकांना अत्यंत विस्मय वाटला! ती गदा व्यर्थ होऊन जेव्हां वेगानें भूमीवर येऊं लागली, तेव्हां पृथ्वी थरथर कांपूं लागली! भीमाच्या गदेचा प्रहार व्यर्थ जाऊन ती खालीं पडल्याचें पाहून त्या कुरुसत्तम दुर्योधनानें त्याच्या वक्षःस्थळावर मोठ्या संतापानें पुनः गदाप्रहार केला! गदेचा प्रहार होतांच भीमसेन रणांगणावर क्षणभर मूर्च्छित झाला. आतां पुढें काय करावयाचें हें त्यास समजेना. तें पाहून सोमक व पांडव हे अगदीं निराश झाले आणि त्यांचा सर्व आनंद मावळला!

हे राजा, भीमसेन त्या प्रहारानें अत्यंत क्षुब्ध झाला आणि ज्याप्रमाणें एका गजावर दुसरा गज धांवून जातो, त्याप्रमाणें दुर्योधनावर चालून गेला. नंतर सिंह जसा वनगजावर उडी मारून जातो, तसा तो भीम दुर्योधनावर तुटून पडला आणि मोठ्या वेगानें त्याच्या पार्श्वभागावर त्या गदाविशारदानें जोराचा गदाप्रहार केला! त्या प्रहारानें दुर्योधन विह्वल झाला आणि खालीं गुडघ्यांवर पडला. तो कुरुकुलश्रेष्ठ तसा पडतांच सृंजयांनीं मोठा हर्षनाद केला. तो ऐकतांच तुझा पुत्र अत्यंत संतप्त झाला आणि महासर्पाप्रमाणें सुसकारे टाकीत भीमाकडे पाहूं लागला. तेव्हां जणुंकाय तो आपल्या नेत्रांनीं त्याला जाळूनच टाकीत आहे कीं काय असा भास झाला. मग तो गदाधारी भरतश्रेष्ठ दुर्योधन भीमावर धांवून गेला. त्यावेळीं दुर्योधन हा भीमसेनाचें मस्तकच रणांगणांत चूर्ण करून टाकीत आहे कीं काय असा भास झाला. त्या भीमपराक्रमी दुर्योधनानें भीमसेनाच्या ललाटावर प्रहार केला, परंतु तो पर्वतसमान वीर यत्किंचितहि ढळला नाहीं! दुर्योधनाच्या गदेनें तो भीमसेन ताडित होऊन त्याच्या मस्तकांतून रक्तस्राव होऊं लागला आणि गंडस्थळांतून मदस्राव होणाऱ्या गजाप्रमाणें तो भीमसेन विशेषच शोभूं लागला!

राजा, नंतर त्या शत्रुसंहारक पार्थाग्रजानें आपल्या इंद्रधनुष्याप्रमाणें शब्द करणाऱ्या गदेनें शत्रूवर मोठ्या पराक्रमानें प्रहार केला. त्यामुळें तुझ्या पुत्राचें कवच सैल होऊन वनांत वायुवेगानें कोसळून पडणाऱ्या सुपुष्पित शालवृक्षाप्रमाणें तो धाडकन् पडला. तुझा पुत्र पडलेला पाहून पांडवांना मोठा हर्ष झाला आणि ते मोठमोठ्या गर्जना करूं लागले. कांहीं वेळानें तुझा पुत्र शुद्धीवर आला आणि ऱ्हदांतून ज्याप्रमाणें गज बाहेर पडतो, तसा एकाएकीं उभा राहिला.

कोणाचेंच वर्चस्व सहन न करणाऱ्या त्या दुर्योधनाचा जन्मस्वभाव असल्यामुळें तो आपल्यासमोर उभा असलेल्या भीमसेनाला भिडला आणि एक जोराचा प्रहार त्यानें केला. त्यामुळें तो भीमसेन व्यथित होऊन भूमीवर पडला. अशाप्रकारें त्या दुर्योधनानें भीमास जमिनीवर पाडून मोठ्यानें सिंहनाद केला आणि एका गदाप्रहारानें त्याचें कवचहि भेदून टाकिलें! तें पाहून अंतरिक्षांत देव आणि अप्सरा यांचा एकच मोठा कोलाहल होऊन त्यांनीं त्या दुर्योधनावर चित्रविचित्र पुष्पांची उत्तम वृष्टि केली! तो नरश्रेष्ठ भीम भूमीवर भिन्नकवच होऊन पडला आणि कांहीं केल्यानें शत्रूचें सामर्थ्य कमी होत नाहीं, असें पाहून पांडवांस मोठी भीति उत्पन्न झाली. मुहूर्तभरानें भीमसेन सावध झाला, त्यानें आपलें रुधिरदिग्ध मुख धुवून स्वच्छ केलें, धैर्याचा अवलंब केला आणि बलानें देह स्तंभित करून तो उभा राहिला! ९. ३. ५७.

---

## अध्याय ५८ वा.

[ १ दुर्योधनाचें ऊरुभेदन. ]

( १ ) संजय—राजा, अशाप्रकारें त्या कुरुमुख्यांमध्यें युद्ध चालू असतां अर्जुन कृष्णाला म्हणाला, 'कृष्णा, युद्धामध्यें या दोन वीरांमध्यें तुझ्या मताप्रमाणें कोणता वीर कोणत्या गुणानें दुसऱ्यापेक्षां अधिक आहे तें मला सांग!'

वासुदेव—अर्जुना, युद्धशिक्षण दोघांचें सारखेंच आहे. भीम अधिक बलवान् आहे, तर दुर्योधन भीमसेनापेक्षां अधिक कर्तृत्ववान् आणि यत्नशील आहे. भीमसेन दुर्योधनाशीं धर्मानें युद्ध करूं लागल्यास त्याला जयप्राप्ति होणार नाहीं. न्याय सोडून भीमसेनानें कपटाचा अवलंब केल्यासच हा दुर्योधनाचा वध करूं शकेल. मायेनेंच देवांनीं दैत्याला जिंकिलें, असें आमच्या ऐकण्यांत आहे. इंद्रानें विरोचनास मायेनें जिंकिलें आणि मायेनेंच त्यानें वृत्राच्याहि तेजाचा लोप केला आहे. म्हणून या युद्धांत भीमानें कपटाचा स्वीकार करून पराक्रम करावा! शिवाय द्यूतकालींहि भीमानें 'युद्धांत गदेनें मी तुझा ऊरुभेद करीन' म्हणून दुर्योधनाशीं प्रतिज्ञा केली आहे! म्हणून ती आपली प्रतिज्ञा भीमसेनानें पूर्ण करावी. ह्या मायावी दुर्योधनाचा भीमानें मायेनेंच नाश करावा, हें योग्य आहे. भीम आपल्या बलावर अवलंबून राहून केवळ न्यायानें युद्ध करील, तर राजा युधिष्ठिराचा निःसंशय पराभव होईल!

अर्जुना, मी तुला पुनः एकदां सांगतों कीं, धर्माच्या चुकीमुळेंच आपण पुनः संकटांत पडलों आहों. आपण एवढा मोठा पराक्रम केला, भीष्मादि कौरव-वीरांचा संहार केला, जय मिळविला, यश संपादन केलें आणि वैराची फेड केली. अशा रीतीनें विजय प्राप्त करून घेतला, तरी शेवटीं धर्मानें तो संशयित केला! अर्जुना, धर्मराजाला खरोखर ही दुर्बुद्धिच सुचली म्हटलें पाहिजे. 'आम्हांपैकीं कोणाहि एकाला जिंकलें असतां आम्ही सर्व हरलों,' असें म्हणून हें युद्ध त्यानें पणाला लावलें आहे! दुर्योधन हा कर्तृत्ववान् वीर असून शिवाय आतां एकटाच राहिल्यामुळें त्याला कोणाची आशा नाहीं! पूर्वीं शुक्राचार्यानें एक श्लोक म्हटला आहे. त्यांतील तत्त्वार्थ लक्ष्यांत ठेवण्यासारखा असल्यामुळें तो मी तुला सांगतों, नीट ध्यानांत घे. 'युद्धांत एकदां पराभव पावून जे जिवाच्या आशेनें पुनः उलटून येतात, ते शत्रुपक्षीय लोक थोडे असले तरी जिवावर उदार होऊन युद्ध करीत असतात, त्यामुळें त्यांना भ्यालें पाहिजे. कारण, त्यांचा विषय एकच असतो! जीविताविषयीं निराश होऊन जे केवळ साहसानें अंगावर येतात, त्यांच्यापुढें उभा राहण्यास प्रत्यक्ष इंद्रहि समर्थ होणार नाहीं!'

अर्जुना, दुर्योधनाचें सर्व सैन्य हत होऊन राज्यप्राप्तीसंबंधीं तो निराश झाला आहे. तो पराभव पावून ऱ्हदांत जाऊन बसला आहे. आशा करण्यासारखें कांहीं नसल्यामुळें तो वनाला जाण्याला निघाला आहे. अशाशीं युद्ध करण्यास कोणता शहाणा मनुष्य तयार होईल आणि त्याला द्वंद्वयुद्धास आह्वान करील? ह्या दुर्योधनानें तेरा वर्षें गदायुद्धाची संवय ठेवली असून भीमसेनाच्या वधाच्या इच्छेनें त्याची सारी खटपट चालली आहे. तर जेणेंकरून आपल्या हातीं आलेलें राज्य हा सुयोधन परत घेणार नाहीं, असें केलें पाहिजे. पार्था, महाबाहु भीमसेन याला कापट्यानें न मारील, तर हाच कौरव दुर्योधन आमचा राजा होईल!

धृतराष्ट्रा, कृष्णाचें हें भाषण ऐकून अर्जुनानें भीमाचें आपल्याकडे लक्ष आहेसें पाहून आपल्या मांडीवर हस्तानें प्रहार केला. भीमानें ती संज्ञा जाणली आणि गदा घेऊन तो संचार करूं लागला. त्यानें नानाविध मंडलें आणि इतर यमकें केलीं. अशाप्रकारें प्रतिपक्षाला मोह पाडीत भीमसेन रणांत संचार करीत होता. तुझाहि गदाविशारद पुत्र भीमाचा वध करण्याच्या इच्छेनें चित्रविचित्र मार्ग दाखवूं लागला. त्या दोघांनींहि हातांत गदा घेतल्या होत्या; चंदनागरूची

उटी अंगास चर्चिली होती; ते यमाप्रमाणें अगदीं क्षुब्ध झाले होते; परस्परांचा वध हाच त्यांचा उद्देश होता आणि अशारीतीनें युद्ध करून वैराचा अंत करून घेण्याची त्यांची इच्छा दिसून येत होती. राजा, ते उभय वीर विचित्र मंडलें घेत नागरूपी आमिषाकरितां भांडणाऱ्या दोन गरुडांप्रमाणें भासले ! त्या दोघांच्या गदा एकमेकींवर आदळून ज्वाला उठत असत. वादळानें क्षुब्ध झालेले समुद्र जसे एकमेकांवर आपटतात, त्याप्रमाणें ते भीम-दुर्योधन परस्परांशीं भिडून अन्योन्यांवर प्रहार करीत असत. मदोन्मत्त[1] गजांप्रमाणें त्या तुल्यबल वीरांच्या गदांच्या प्रहारांचे आवाज होत असत. तशा प्रकारचा भयंकर रणसंग्राम चालला असतां ते दोघेहि शत्रुसंहारक वीर थकून गेले. घटकाभर विश्रांति घेऊन पुनः त्यांनीं आपापल्या गदा घेतल्या आणि ते मोठ्या वेगानें परस्परांवर धांवून गेले. त्यांचें तें युद्ध मोठें भयंकर व अमर्याद झालें. गदाप्रहारांनीं ते परस्परांस विद्ध करूं लागले. ते वृषभाक्ष वीर एकमेकांवर धांवून गेले आणि पंकांत उभे असलेले दोन महिष ज्याप्रमाणें परस्परांशीं युद्ध करितात, त्याप्रमाणें त्यांनीं परस्परांवर गदाप्रहार केले ! तेव्हां त्यांचें सर्व अंग गदाप्रहारांनीं जर्जर झालें, आणि ते रुधिरदिग्ध होऊन हिमालयपर्वतावरील पळसांप्रमाणें दिसूं लागले !

राजा, अशाप्रकारें त्या दोघांमध्यें गदायुद्ध चाललें असतां भीमसेनाकडून थोडी संधि सांपडतांच दुर्योधनाला कांहींसा हर्ष झाला आणि तो पुढें सरसावला. आपल्याजवळ आलेल्या दुर्योधनाला पाहून भीमानें त्यावर आपली गदा वेगानें फेंकली ! आपल्यावर भीमाची गदा येत असल्याचें पाहून दुर्योधन बाजूला सरला; तेव्हां ती गदा विफल होऊन जमिनीवर पडली. याप्रमाणें तो प्रहार चुकवून तुझ्या पुत्रानें मोठी त्वरा करून त्या भीमावर एक गदेचा प्रहार केला. त्याबरोबर रक्ताचा प्रवाह सुरू होऊन त्यामुळें भीमाला मूर्च्छा आल्यासारखें वाटलें. परंतु भीमसेन आपलें अतिव्यथित शरीर संभाळून तसाच राहिला, त्यामुळें दुर्योधनाचे लक्षांत आलें नाहीं, व भीमसेन आपल्यावरच प्रहार करण्याच्या विचारांत असल्याचें वाटून त्याला विनाकारण भय वाटलें आणि त्यामुळें भीमसेनावर त्यानें पुनः मार केला नाहीं. मुहूर्तभर विसांवा घेऊन नंतर तो प्रतापी

१ यासंबंधी समानार्थक उतारा:–धांवति अन्योन्यांवरि ते दोघे आठवूनि अपकार । जाणों ते मदमत्त क्रोधोद्धत दंपतीच अपकार ॥—कविवर्य मोरोपंत.

भीमसेन त्या दुर्योधनावर धांवून गेला ! भीमसेन क्षुब्ध होऊन आपल्यावर चालून येत असल्याचें पाहून त्याचा प्रयत्न व्यर्थ करण्याची इच्छा दुर्योधनानें केली, आणि उंच उडी मारून भीमसेनाला फसविण्याचें त्यानें योजिलें. परंतु त्या दुर्योधनाचा बेत भीमसेनाच्या लक्षांत आला. त्यानें एकदम जोरानें धांवून सिंहासारखी मोठी गर्जना केली आणि त्या दुर्योधनाच्या मांड्यांवर मोठ्या वेगानें गदा मारिली ! भीमानें फेंकलेल्या त्या वज्रसमान गदेनें दुर्योधनाच्या दोन्ही सुंदर मांड्या चूर्ण झाल्या आणि हे राजा, अशा रीतीनें भीमहस्तें ऊरु चूर्ण होऊन तो तुझा पुत्र दुर्योधन पृथ्वी दणाणवीत खालीं पडला !

राजा, दुर्योधन पडतांच वारे मोठ्या वेगानें वाहूं लागले, सर्वत्र धूळ उडूं लागली आणि लहानमोठे वृक्ष, पर्वत यांसुद्धां पृथ्वी कांपूं लागली. तो सर्व राजांचा अधिपति दुर्योधन याप्रकारें पतन पावतांच एक भयंकर आणि दीप्त उल्का मोठी गर्जना करीत पृथ्वीवर पडली ! तो तुझा पुत्र पडला असतां इंद्रानें रक्त व धूलि यांची वृष्टि केली आणि अंतरिक्षांत यक्ष, राक्षस आणि पिशाच्च यांचा होणारा महानाद ऐकूं येऊं लागला ! त्यांत मृग आणि पक्षी यांचे आवाज मिळून तो भयंकर शब्द चारी दिशांना माजून राहिला ! तेथें अवशिष्ट असलेले गज, अश्व आणि मनुष्यें यांनीं आक्रोश आरंभिला. भेरी, शंख आणि मृदंग यांचे सर्वत्र प्रचंड आवाज होऊं लागले. अनेक पाद व अनेक बाहू असलेलीं भयंकर कबंधें रणांगणांत येऊन नृत्य करूं लागलीं. हे राजा, ध्वज, अस्त्रें आणि शस्त्रें धारण करून राहिलेले वीर तुझ्या पुत्राचें पतन होतांच कांपूं लागले ! हे नृपसत्तमा, विहिरी, कूप यांतून रक्त वाहूं लागलें आणि नद्या फार वेगानें वाहूं लागल्या ! स्त्रिया पुरुषांसमान व पुरुष स्त्रियांसमान झाले ! राजा, तुझा पुत्र दुर्योधन पतन पावला असतां हे अद्भुत उत्पात पाहून पांडव आणि पांचाल या सर्वांचीं मनें भयविह्वल होऊन गेलीं ! मग देव, गंधर्व आणि अप्सरा तुझ्या पुत्राचें अद्भुत युद्ध कथन करीत आपापल्या स्थानीं निघून गेले ! तसेंच सिद्ध, वातिक आणि चारण हेहि त्या नरश्रेष्ठांची प्रशंसा करीत आले तसे आपापल्या वाटेनें गेले ! ९. ३. ५८.

## अध्याय ५९ वा.

[ १ भीमसेनाकडून डाव्या पायानें दुर्योधनाचें शिरस्ताडन. २ युधिष्ठिराचा विलाप. ]

( १ ) संजय—राजा, त्या दुर्योधनाला भीमानें रणांगणांत पाडलेला पाहून सर्व पांडवांना मोठा हर्ष झाला. सिंहानें पाडलेल्या उन्मत्त गजाप्रमाणें त्या दुर्योधनाला पडलेला पाहून सोमकहि आनंदपूर्ण झाले. दुर्योधनास मारल्यावर प्रतापवान् भीमसेन त्या भूमीवर पडलेल्या कौरवाधीशाजवळ गेला आणि म्हणाला, "अरे मंदा, पूर्वी भरसभेंत आम्हांला हंसून एकवस्त्रा द्रौपदीस 'गायरे गाय' म्हणून म्हणाला होतास, याची तुला आठवण आहे काय ? दुर्मते, त्या उपहासाचें फळ तूं आज हें घे !" असें म्हणून त्यानें आपल्या डाव्या पायानें दुर्योधनाच्या मस्तकावर लाथ मारली आणि त्या राजश्रेष्ठाचें तें मस्तक पायानें भिरकाविलें ! तेव्हां त्या क्रोधसंतप्त भीमसेनानें त्याला जें म्हटलें, तें श्रवण कर ! तो म्हणाला, "जे मूढ आमच्यापुढें 'गायरे गाय' करून नाचले, त्यांच्याच पुढें त्यांना 'गायरे गाय' म्हणून आज आम्ही नाचत आहों ! कपटप्रयोग, वह्नि, अक्षद्यूत किंवा कोणत्याहि प्रकारची फसवणूक न करितां स्वतःच्या बाहुबलाचा आश्रय करून शत्रूंना आम्हीं जेरीस आणिलें आहे !"

( २ ) राजा, नंतर वैराचे शिखरास गेलेला तो वृकोदर हंसतच युधिष्ठिर, कृष्ण, संजय, अर्जुन आणि नकुल-सहदेव यांस बोलला, "ज्यांनीं रजस्वला द्रौपदीला सभेंत आणविली आणि तेथें तिला वस्त्रहीन केलें, त्या सर्वांचा द्रौपदीच्या तपश्चर्येनें पांडवांच्या हातून वध झाला आहे पहा ! तसेंच जे क्रूर धार्तराष्ट्र आम्हांला 'षंढतिल' म्हणून हंसले, त्या सर्वांचा सगण सपरिवार आम्हीं वध केला आहे ! आम्हांला त्याबद्दल स्वर्ग मिळो अथवा नरकप्राप्ति होवो !" नंतर त्या भीमानें पुनः जमिनीवर पडलेल्या दुर्योधनाच्या खांद्यावरील गदा घेऊन आणि आपला डावा पाय त्याच्या मस्तकावर ठेऊन त्याची अनेक प्रकारें निर्भर्त्सना केली ! हे राजा, हृष्ट होऊन त्या क्षुद्रात्म्या भीमसेनानें आपला पाय दुर्योधनाच्या मस्तकावर दिलेला पाहून सोमकांमधील श्रेष्ठ धर्मात्म्या वीरांना तें कृत्य आवडलें नाहीं. तुझ्या पुत्राचा याप्रमाणें वध करून आत्मस्तुति करीत भीमसेन नाचत असतां धर्मराज त्याला बोलला, "भीमसेना, शुभ किंवा अशुभ कर्मानें कां असेना, तूं आपली प्रतिज्ञा शेव-

टास नेलीस आणि वैराचा सूड उगविलास, आतां हें पुरें कर! त्याच्या मस्तकावर पाय देऊं नकोस! तेणेंकरून तूं धर्म उल्लंघिल्यासारखें होईल! हे अनघा, हा पतन पावलेला दुर्योधन राजा असून आपला बंधु आहे! त्याच्याशीं अशा प्रकारचें वर्तन न्याय्य होणार नाहीं. हा एकादश चमूंचा भर्ता असून कौरवांचा अधिपति आहे. हा आपला बंधु आणि कौरवांचा राजा आहे. याचे मस्तकास पादस्पर्श करूं नकोस!

"भीमा, ह्याचे सर्व बंधु हत झाले आहेत, अमात्य मृत झाले आहेत, सर्व सैन्य नष्ट झालें आहे, आणि हा युद्धभूमीवर पतन पावला आहे! म्हणून हा सर्व प्रकारें अनुकंपनीय आहे. त्याचा उपहास करणें तुला कधींहि योग्य होणार नाहीं! ज्याचे अमात्य, बंधुजन आणि प्रजा नष्ट होऊन गेल्या आहेत, तो हत राजा आमचा बंधु आहे, त्याचा अपमान केलास, हें न्याय्य झालें नाहीं! ज्या तुला पूर्वीं 'धार्मिक भीमसेन' म्हणून लोक म्हणत असत, तोच तूं राजाच्या मस्तकावर पाय देऊन उभा आहेस, हें कसें?"

राजा, याप्रमाणें धर्मराज भीमसेनाला बोलत असतां त्याचा कंठ दाटून आला आणि तो त्या अरिंदम दुर्योधनाजवळ गेला आणि अति दीनपणें त्याला म्हणाला, "दुर्योधना, तूं आमच्यावर राग करूं नकोस! आपणां स्वतःलाहि दूषण देऊन तूं शोक करूं नकोस! हें घोर पूर्वसंचितच तुला भोगावें लागत आहे! हे कुरुसत्तमा, तूं आमचा किंवा आम्ही तुझा वध करण्याची इच्छा धरिली, हें विषम फल ब्रह्मदेवानेंच आमच्या माथीं लिहिलें होतें. हे भारता, लोभ, मद आणि बाल्य यामुळें आणि आपल्या स्वतःच्या अपराधामुळें हें महासंकट तूं आपणावर ओढून आणलें आहेस. तूं प्रथमतः आपले मित्र, बंधु, वडील, पुत्र, पौत्र आणि दुसरेहि अन्य लोक यांचा घात केलास आणि नंतर स्वतःहि मृत्यु पावलास! या तुझ्या अपराधामुळें आम्हीं तुझ्या बंधूंचा आणि इतर ज्ञातिजनांचा वध केला! एकंदरींत दैवच दुर्लंघ्य आहे असें माझें मत आहे. तूं आपणाला वाईट वाटून घेऊं नकोस! कारण, हे अनघा, तुला आलेला मृत्यु हा अत्यंत श्लाघ्य आहे.

"हे कौरवा, आमची स्थिति मात्र सांप्रत अतिशोचनीय झाली आहे. त्या प्रियबांधवांवांचून आम्हांला सर्वत्र औदासीन्य वाटत आहे. पुत्र व बांधव यांच्या शोकानें विह्वल झालेल्या त्या विधवा स्त्रियांना मीं आतां कसें भेटावें? हे

राजा, तुला स्वर्गांत स्थान मिळून तुझी एकट्याची स्थिति चांगली झाली आहे. आम्ही मात्र नरकसंज्ञक दारुण दुःख भोगणार आहों ! ह्या धृतराष्ट्राच्या विधवा सुना आणि नातसुना शोकविह्वल होऊन आमची सदैव निंदा करीत राहणार !"

**संजय**—राजा, असें बोलून तो अतिदुःखित युधिष्ठिर राजा निश्वास टाकीत राहिला आणि त्यानें चिरकाल शोक केला. ९. ३. ५९.

---

## अध्याय ६० वा.

[ १ भीमसेनानें अधर्मानें दुर्योधनाला मारिलें हें पाहून बलराम क्रोधसंतप्त होतो. २ कृष्णाकडून त्याचें सांत्वन. ३ बलराम द्वारकेला जातो. ४ श्रीकृष्ण धर्माला दोष देतो. ५ श्रीकृष्णाचें भीमाच्या कृतीला मोठ्या संकटानें अनुमोदन. ]

( १ ) **धृतराष्ट्र**—हे सूता, राजा दुर्योधनाला भीमानें अधर्मानें मारिल्याचें पाहून माधवश्रेष्ठ बलराम काय म्हणाला ? संजया, तो बलराम केवळ गदायुद्ध विशारद आहे, इतकेंच नव्हे, तर त्यांतील सर्व विशेष तो उत्तम प्रकारें जाणणारा आहे. तर या प्रसंगीं त्या रौहिणेय बलरामानें काय केलें तें मला सांग !

**संजय**—राजा, तुझ्या पुत्राला भीमानें मस्तकावर मारल्याचें पाहून तो बलिश्रेष्ठ बलराम अत्यंत संतप्त झाला. त्यानें सर्व राजांच्या मध्यें हात उभारून व घोर आर्तनाद करून 'भीमा, तुला धिक्कार असो, धिक्कार असो,' असें बोलला. "अहो, धर्मयुद्धांत यानें नाभीच्या खालीं दुर्योधनावर प्रहार केला ! गदायुद्धांत असलें कृत्य दुसऱ्यानें कोणीं केलेलें अवलोकनांत नाहीं. गदायुद्धांत नाभीच्या खालीं कोणीं प्रहार करूं नये, असा शास्त्रनिश्चय आहे. हा भीम शास्त्रवेत्ता नव्हे; हा मूढ असून स्वच्छंद रीतीनें वागणारा आहे !" असें बोलत असतां बलरामाला अत्यंत क्रोध चढला. त्यानें दुर्योधनाकडे पाहिलें आणि क्रोधानें डोळे लाल करून म्हटलें, 'कृष्णा, गदायुद्धांत ह्याचासारखा दुसरा कोणी नसून हा माझ्या समान पराक्रमी आहे. हा पडला असें समजूं नको ! आश्रिताचे दौर्बल्यामुळें यजमान उपहासास्पद होतो !'

( २ ) असें बोलून तो बलराम नांगर उचलून भीमावर धांवून गेला, तेव्हां त्या ऊर्ध्वबाहु बलरामाचें स्वरूप अतिविचित्र अशा विशाल श्वेतपर्वतासमान दिसलें. तेव्हां भीमावर धांवून येणाऱ्या त्या बलरामाला केशवानें मोठ्या

विनयानें आपल्या पुष्ट बाहूंनीं घट्ट धरिलें. हे राजन्, त्यावेळीं एक श्वेतवर्ण व एक श्यामवर्ण असे दोघे यदुश्रेष्ठ पौर्णिमेला दिनक्षयीं शोभणाऱ्या चंद्रसूर्यांप्रमाणें अधिकच शोभले. तेव्हां श्रीकृष्ण बलरामाचें सांत्वन करीत बोलला, " दादा, वृद्धि सहा प्रकारची सांगितली आहे. आपली स्वतःची वृद्धि, शत्रूचा क्षय, आपल्या मित्राची वृद्धि, शत्रुमित्राचा नाश, आपल्या मित्राच्या मित्राचा उदय, शत्रुमित्राच्या मित्राचा नाश, असे ते सहा प्रकार होत. याच्या उलट आपली किंवा आपल्या मित्राची जेव्हां स्थिति होते, तेव्हां मनोग्लानि होणें स्वाभाविक आहे. आजची आमची अवस्था लवकरच शांतिप्रद होईल. शुद्धपौरुषी पांडव हे आमचे स्वाभाविक मित्र आहेत. ते आपले आतेभाऊ असून त्यांस शत्रूंनीं अतिशय गांजिलें आहे. या प्रसंगीं प्रतिज्ञापालन हाच क्षत्रियाचा धर्म मी समजतों. 'मी महायुद्धांत गदेनें सुयोधनाच्या मांड्यांचा भंग करीन!' अशी भीमानें सभेमध्यें प्रतिज्ञा केली होती. शिवाय मैत्रेय महर्षीनें 'हे परंतपा, तुझ्या मांड्या भीमसेन गदेनें फोडील,' असा दुर्योधनास शापहि दिला होता. यास्तव यांत भीमसेनाचा कांहीं दोष आहे, असें मला वाटत नाहीं. हे प्रलंबघातिन्, तूं भीमावर याबद्दल रागावणें योग्य होणार नाहीं. शिवाय आमचा पितामह तोच पांडवांचा मातामह असल्यामुळें आपला निकट संबंध जडला आहे. तसाच अर्जुन हा आमचा मेहुणा आहे, त्यामुळें तर हा संबंध विशेष सुखप्रद झाला आहे. त्यांचा उत्कर्ष तोच आमचा उत्कर्ष होय. म्हणून हे पुरुषश्रेष्ठा, तूं रागावूं नये!"

वासुदेवाचें भाषण ऐकून तो धर्मवेत्ता हलधर म्हणाला, " संतांनीं आचरिलेला धर्म, अर्थ आणि काम या दोन गोष्टींनीं हीनता पावतो. अतिलोभ्याचा अर्थ आणि अतिप्रसंगी मनुष्याचा काम हे धर्माची हानि करणारे होत. जो कोणी सुखलालसेनें धर्मार्थांना बुडवीत नाहीं, अर्थाच्या इच्छेनें धर्मकामांची पायमल्ली करीत नाहीं, किंवा केवळ धर्माची हांव धरून कामार्थांना सोडीत नाहीं, तर धर्म, अर्थ आणि काम या तिघांचेंहि समतेनें सेवन करितो, तोच अत्यंत सुख भोगतो. गोविंदा, तूं आम्हांला कितीहि सांगितलेंस तरी, भीमानें आपल्या धर्माविरुद्ध आचरणानें आम्हांला व्याकुल करून सोडलें आहे!"

कृष्ण—दादा, तुम्ही धर्मात्मे असून मोठे धर्मवत्सल आहां. शिवाय तुम्हांला क्रोध कधींच येत नसतो, अशी तुमची कीर्ति आहे. म्हणून यावेळीं

शांत व्हा, क्रोध करूं नका; घोर कलियुगाला प्रारंभ झाला आहे, ही गोष्ट तशीच भीमाची प्रतिज्ञाहि लक्ष्यांत घ्या. म्हणजे तो वैऱ्याच्या आणि आपल्या प्रतिज्ञेच्या ऋणांतून एकदांचा पार पडो, असेंच आपणांस वाटेल !

(३) **संजय**—हे राजा, केशवाचे मुखानें धर्माचा असा छळ होत असल्याचें पाहून बलरामास बरें वाटलें नाहीं. तो सभेंत म्हणाला, "अधर्मानें धर्मात्म्या राजा दुर्योधनाचा रणांत वध करून हा भीमसेन कपटयोधी म्हणून या लोकांत प्रसिद्धि पावून याची निंदा होईल आणि हा धर्मात्मा दुर्योधन राजा शाश्वत गतीला जाईल ! राजा दुर्योधन सरळपणें युद्ध करीत असतां मारला गेला ! युद्धदीक्षा घेऊन, रणांत प्रवेश करून, रणयज्ञाचा विस्तार करून आणि आपलें स्वतःचें हवन शत्रुरूपी अग्नींत करून घेऊन त्यानें यशोरूपी अवभृथस्नान संपादन केलें आहे !" असें बोलून तो प्रतापवान् बलराम रथांत जाऊन बसला आणि द्वारकेला निघून गेला. राम द्वारवतीला गेल्याचें पाहून वार्ष्णेय, पांचाल आणि पांडव यांना वाईट वाटलें. युधिष्ठिर सचिंत होऊन दीनपणें अधोमुख बसला होता. शोकामुळें त्याची निश्चयबुद्धि नष्ट झाल्याचें पाहून श्रीकृष्ण त्याला बोलला—

(४) **वासुदेव**—धर्मराजा, तुझ्याकडून अधर्माला अनुमोदन कसें मिळालें ? हा हतबांधव दुर्योधन मरून पडला असतां त्याचें मस्तक भीमानें लाथेनें तुडवावें व तूं मोठा धर्मज्ञ असून तें पाहत रहावें हें कसें ?

**युधिष्ठिर**—कृष्णा, भीमानें दुर्योधन राजाचे मस्तकावर क्रोधानें पादस्पर्श केला, ही गोष्ट मला आवडली नाहीं ! ह्या कुलक्षयानें मला आनंद होण्यासारखें कांहीं आहे, असें वाटत नाहीं ! धृतराष्ट्रपुत्रांनीं आम्हांला नित्य छळिलें आणि अनेक प्रकारचीं कठोर भाषणें करून आम्हांला वनवासाला घालविलें हें दुःख भीमसेनाच्या मनांत वसत होतें आणि म्हणूनच त्याच्या त्या कृत्याची मीं उपेक्षा केली !

(५) **संजय**—धर्मराजाचें असें भाषण श्रवण करून त्या यदुकुलश्रेष्ठ श्रीकृष्णानें भीमाचें प्रिय व हित करण्याच्या इच्छेनें मोठ्या संकटानें 'तसें कां होईना !' असें म्हटलें आणि भीमानें रणांत जें जें कांहीं केलें त्या सर्वांला अनुमोदन दिलें. इकडे भीमसेन तुझ्या पुत्राचा रणांत वध करून हर्षपूर्ण झाला होता. त्याचे डोळे आनंदानें उत्फुल्ल झाले होते; जयाभिमानानें तो धर्मराजापुढें आला आणि हात

जोडून व धर्माला अभिवंदन करून मोठ्या आनंदानें म्हणाला, "महाराज, आज ही सर्व निष्कंटक व क्षेमकारक पृथ्वी तुझी आहे. तिचें शासन कर व स्वधर्माचें पालन कर! हे पृथिवीपते, या वैराचा जनक जो नीच कपटप्रिय दुर्योधन तो येथें मरून पडला आहे! आणि कठोर भाषण करणारे ते दुःशासनादि बंधु आणि कर्ण, शकुनि इत्यादि सर्व शत्रु हत झाले आहेत. ही रत्नमय निखिल पृथ्वी वनपर्वतांसह सर्व शत्रु मारले जाऊन आज तुझी झाली आहे!"

**युधिष्ठिर**—आज सुयोधन राजा मरून त्याच्याबरोबर आमच्या वैराचाहि अंत झाला. श्रीकृष्णाच्या मताप्रमाणें वागून आम्हीं ही पृथ्वी जिंकिली. सुदैवानें तूं कुंती आणि द्रौपदी या दोघांच्या कोपांतून मुक्त झालास आणि तुझा शत्रु मारला जाऊन तुला जय मिळाला, ही मोठ्या सुदैवाची गोष्ट आहे. ९. ३. ६०.

---

## अध्याय ६१ वा.

[ १ धृतराष्ट्रप्रश्न. २ संजयकृत युद्धवर्णन. ३ पांडव, कृष्ण आणि दुर्योधन यांचा संवाद. ]

( १ ) **धृतराष्ट्र**—हे संजया, भीमसेनानें दुर्योधनाचा रणांत वध केल्याचें पाहून पांडव आणि सृंजय यांनीं पुढें काय केलें?

( २ ) **संजय**—सिंहानें मत्त वनगज मारावा, त्याप्रमाणें भीमसेनाकडून दुर्योधन रणभूमीवर मारल्याचें पाहून कृष्णासह पांडव, पांचाल आणि सृंजय हे अतिहर्षित झाले. कुरुराज दुर्योधन पतन पावतांच त्यांनीं आपलीं उत्तरीय वस्त्रें फडकावलीं आणि मोठ्यानें सिंहनाद केले. त्या हर्षभरित वीरांस धारण करणेंहि पृथ्वीस जड वाटूं लागलें! कोणीं धनुष्यें घेतलीं तर कोणी धनुर्ज्या ओढूं लागले; कित्येकांनीं महाशंख फुंकण्यास आरंभ केला, कित्येक दुंदुभि वाजवूं लागले आणि दुसऱ्या कित्येकांनीं आनंदानें क्रीडा करण्यास सुरवात केली. तसेच तुझे कित्येक शत्रु तुला मोठ्यानें हंसूं लागले. त्यासमयीं ते वीर भीमास वारंवार बोलले, 'भीमसेना, युद्धांत कसलेल्या कौरवेंद्र दुर्योधनास गदेनें मारून तूं आज रणांत मोठें दुष्कर कर्म केलेंस! तूं आज केलेला शत्रूचा वध म्हणजे इंद्रानें केलेल्या वृत्रवधासारखाच होय असें लोकांस वाटतें! युद्धांतील विविध मार्ग जाणणाऱ्या आणि सर्व मंडलें करणाऱ्या त्या शूर दुर्योधनास वृको-

दरावांचून मारणारा दुसरा कोण होता ? इतरांस सुदुर्गम अशा वैराच्या अंताला तूं जाऊन पोंचलास ? हे वीरा, संग्रामाच्या अग्रभागीं मत्त गजाप्रमाणें जो तूं पराक्रम गाजविलास, त्यासारखा पराक्रम दुसऱ्या कोणाच्याहि हातून होणें अशक्य आहे. तूं सुयोधनाचें मस्तक पायानें लाथाडलेंस, तसेंच सिंहानें महिषाशीं टक्कर मारून जसें त्याचें रक्तप्राशन करावें, त्याप्रमाणें तूंहि दुःशासनाशीं उत्तम प्रकारचें युद्ध करून त्याचें रक्त प्राशन केलेंस ! ज्यांनीं धर्मात्म्या युधिष्ठिर राजाला गांजिलें, त्यांच्या मस्तकावर तूं अशा प्रकारचा आपला पराक्रम गाजवून पाय दिलास, ही मोठ्या भाग्याची गोष्ट होय ! हे भीमा, तुझें मोठें यश सर्व पृथ्वीवर पसरलें आहे. वृत्रासुराच्या वधकालीं ज्याप्रमाणें बंदिजनांनीं इंद्राची स्तुति केली, तसेंच हे भारता, आज आम्ही शत्रुसंहार करणाऱ्या तुझें अभिनंदन करीत आहों ! हे भारता, दुर्योधनाचा तूं वध केल्यामुळें आमच्या रोमरोमीं जो आनंद भरून राहिला आहे, तो अजूनहि नाहींसा होत नाहीं !"

राजा, भीमासभोंवतीं जमलेल्या त्या हर्षोन्मत्त लोकांनीं भीमसेनाची अशी स्तुति केली. पांडवांसह पांचालहि हर्षभरानें त्याची प्रशंसा करून दुर्योधनाची अवास्तव्य निंदा करूं लागले. तेव्हां श्रीकृष्ण त्यांस म्हणाला, " नराधिपहो, निहत झालेल्या शत्रूवर पुनः प्रहार करणें कधींहि न्याय्य होणार नाहीं. आमच्या उग्र भाषणांनीं हा मंदधि आधींच मेला आहे ! हा निर्लज्ज, लोभी, पापसहाय, सुहृदांचा उपदेश न ऐकणारा आहे; विदुर, द्रोण, कृप, भीष्मादिकांनीं वरचेवर प्रार्थना केली असतांहि पांडवांस वडिलार्जित राज्याचा भाग देत नाहीं, असें म्हणाला, तेव्हांच हा मेला आहे ! अत्यंत नम्र होऊन काष्ठवत् पडलेल्या या दुर्योधनाशीं बोलून काय करायाचें आहे ? नृपहो, आपापल्या रथावर आरूढ व्हा ! आपण आतां सत्वर जाऊं या ! हा पापात्मा आपले अमात्य आणि ज्ञातिबांधव यांसह मरून पडला आहे !"

( २ ) राजा, कृष्णानें आपली अशी निंदा केलेली ऐकून दुर्योधन अत्यंत संतप्त झाला आणि त्यानें आवेशानें उठण्याचा यत्न केला. कमरेवर नेट देऊन आणि आपले दोनी हात जमिनीवर टेंकून व भुंवया चढवून तो वासुदेवाकडे पाहूं लागला. त्यावेळीं छिन्नपुच्छ सर्पाप्रमाणें अर्धवट बसून राहिलेल्या त्या क्रुद्ध राजाचें रूप दिसलें. त्याला प्राणांतिक वेदना होत होत्या, तरी तिकडे दुर्लक्ष करूम तो कृष्णाला उग्र वाणीनें टोंचून म्हणाला, " अरे कंसदासाच्या दायादा,



**बलराम**—भीमा, तुला धिक्कार असो, धिक्कार असो ! गोविंदा, भीमानें आपल्या धर्मविरुद्ध आचरणानें आम्हांला लज्जित केलें आहे.

( शल्यपर्व पृष्ठ २६८. )

ह्या गदायुद्धामध्यें तूं अधर्मानें मला पाडविलेंस, ह्याची तुला लाज वाटत नाहीं काय ? अर्जुनाशीं बोलतांना ‘ याची मांडी फोड ’ म्हणून भीमाला कपटानें जें स्मरण करून दिलेंस, तें मला समजलें नाहीं, असें तुला वाटत आहे काय ? सरळ मार्गानें युद्ध करणाऱ्या हजारों राजांना कपटप्रयोगानें तूं मारविलें आहेस, त्याबद्दल तुला लाज किंवा दयाहि वाटत नाहीं. प्रत्येक दिवशीं तूं शूर वीरांचा असाच भयंकर घात केला आहेस. शिखंडीला पुढें करून तूं पितामह भीष्माला मारविलेंस ! हे सुदुर्मते, अश्वत्थामा नांवाच्या गजाला मारून नामसादृश्यानें आचार्याला फसवून त्याच्याकडून शस्त्र खालीं ठेवायाला लावलेंस, हें मला कळलें नाहीं, असें तुला वाटत आहे काय ? त्या नृशंस धृष्टद्युम्नानें वीर्यवंत आचार्यांचा शिरच्छेद केला असतां तूं पाहत बसला होतास, त्याचें निवारण केलें नाहींस ! पांडुपुत्र अर्जुनाचे वधाकरितांच मिळविलेली शक्ति तूं घटोत्कचावर घालविण्यास भाग पाडलेंस, तेव्हां तुझ्यापेक्षां अधिक पापी कोण बरें आहे ? बलवान् भूरिश्रवा हात तुटून प्रायोपवेशन करून बसला असतां तूं पाठविलेल्या महात्म्या सात्यकीनें त्याचा वध केला ! पार्थाला जिंकण्याच्या हेतूनें कर्ण थोर पराक्रम गाजवीत असतां अर्जुनरथ खालीं दाबून कर्णभात्यांतील पन्नगेंद्र अश्वसेनाला तूं व्यर्थ घालविलेंस, आणि नंतर त्याचें चक्र जमिनींत रुतून नरश्रेष्ठ कर्ण तें बाहेर काढण्याचा यत्न करीत असतां त्याला तूं पाडविलेंस ! मी, कर्ण आणि भीष्म-द्रोण यांच्याशीं जर तूं सरळपणें युद्ध करितास, तर तुमचा जय खरोखरच झाला नसता ! परंतु त्वां अनार्यानें स्वधर्मानें वागणाऱ्या आमचा आणि इतर राजांचाहि घात केला आहेस ! ”

वासुदेव—गांधारे, तूं पापमार्गानें आपले बंधु, सुत, आप्त आणि इष्टमित्र यांसह मारला गेलास ! तुझ्याच दुष्कृत्यांमुळें वीर भीष्म-द्रोण मारले गेले ! तुझ्या शीलाप्रमाणें वागणारा कर्णहि तुझ्याच गुणांमुळें रणांत पडला ! हे मूढा, मीं याचना केली असतां शकुनीच्या नादाला लागून पांडवांस त्यांचें स्वतःचें राज्य व वडिलार्जित संपत्तीचा भाग दिला नाहींस ! दुष्टा, भीमसेनाला विष चारलेंस आणि जतुगृहांत सर्व पांडवांस व त्यांच्या मातेस जाळून टाकण्याचा तूंच प्रयत्न केलास ! हे दुरात्मन्, द्यूतसमयीं रजस्वला द्रौपदीस सभेमध्यें ओढून नेलेंस, तेव्हांच निर्लज्जा, तुझा वध केला पाहिजे होता ! अनक्षज्ञ धर्मराजाला अक्षपटु शकुनीकडून द्यूतांत हारविलेंस, म्हणून तुझा आम्हीं रणांत वध केला ! वनांत पापी जयद्रथानें पांडव मृगयेला गेले असतां तृणबिंदूच्या आश्रमांत

द्रौपदीला क्लेश दिले आणि तुझ्याच दोषामुळें अनेकांनीं एकट्या बाल अभिमन्यूचा वध केला, म्हणून आम्हीं तुझा वध केला. दुर्योधना, जीं जीं अकार्यें आम्हीं केलीं म्हणून तूं म्हणत आहेस, तीं तीं सर्व तुझ्या नीचपणानेंच घडवून आणलीं आहेत ! उशना बृहस्पतीचा उपदेश तूं ऐकिला नाहींस, वृद्धांची उपासना तूं कधीं केली नाहींस, किंवा त्यांचें हितकर सांगणेंहि तूं मानलें नाहींस ! अत्यंत लोभ आणि तृष्णा यांना वश होऊन तूं अकार्यें केलींस, त्यांचें फळ आतां भोग !

**दुर्योधन**—मीं अध्ययन केलें आहे, विधिवत् दानें दिलीं आहेत आणि समुद्रवलयांकित पृथ्वीचा उपभोग घेतला आहे. तसाच शत्रूंच्या मस्तकावर पायहि दिला आहे ! माझ्यापेक्षां उत्तम मरण कोणाला येणार आहे ! स्वधर्मानें वागणाऱ्या क्षत्रियांना इष्ट असा जो युद्धांत मृत्यु जो मला प्राप्त झाला आहे; याहून उत्तम मरण तें कोणाला येणार ? राजांस दुर्लभ असे अनेक देवार्ह भोग मीं भोगिले, तसेंच उत्कृष्ट ऐश्वर्यहि उपभोगिलें; अशा मजहून उत्तम प्रकारचें मरण कोणाला बरें येणार ? अच्युता, मी माझे सुहृत् आणि सर्व अनुचर यांसह स्वर्गास जाणार ! तुम्ही मात्र विफलमनोरथ होऊन येथें शोक करीत रहाणार !

**संजय**—राजा, अशा प्रकारचें त्या कुरुराजाचें भाषण होतांच त्यावर पुण्यगंधी पुष्पांची वृष्टि झाली ! गंधर्वांनीं मनोहर वाद्यें वाजविण्यास आरंभ केला, अप्सरा त्याचें सुंदर यश गाऊं लागल्या आणि सिद्धांनींहि ‘ पार्थिवा, साधु, साधु’ म्हणून त्याचा गौरव केला ! पुण्यगंधयुक्त असा मृदु आणि सुखकारक वारा वाहूं लागला. दिशा प्रसन्न होऊन शोभूं लागल्या आणि स्वच्छ आकाश वैडूर्यासारखें दिसूं लागलें !

राजा, ह्या अत्यद्भुत गोष्टी आणि दुर्योधनाचा झालेला गौरव पाहून ते वासुदेवप्रमुख पांडव अतिलज्जित झाले ! त्यांनीं भीष्म, द्रोण, कर्ण आणि भूरिश्रवा यांचा अधर्मानें वध झाल्याचें ऐकून त्याबद्दल शोक केला. नंतर अत्यंत दीनचित्त व चिंताकुल होऊन पांडव बसल्याचें पाहून मेघ किंवा दुंदुभि यांसारख्या आवाजाचा श्रीकृष्ण त्यांना म्हणाला, “ पांडवहो, हा राजा दुर्योधन किंवा ते सर्व भीष्मप्रमुख महाधनुर्धर महारथी धर्मयुद्धानें मारले जाणें तुम्हांला कधींहि शक्य नव्हतें ! तुमच्या हिताकरितां मीं अनेक उपाय योजून त्यांचा कपटानें वध करविला आहे ! रणांत मीं जर अशा कुटिल मार्गांची योजना केली नसती,

तर तुमचा विजय कसा झाला असता ? आणि मग तुम्हांला राज्य व धन तरी कोठून मिळालें असतें ? ते भीष्मादि चार महात्मे म्हणजे पृथ्वीवरील अतिरथी होते ! प्रत्यक्ष लोकपालहि खालीं आले असते तरी ते धर्मयुद्धानें यांचा वध करूं शकले नसते ! तसेंच या गदाधारी व युद्धांत कधींहि न थकणाऱ्या दुर्योधनाला दंडपाणि यमाच्यानेंहि धर्मयुद्धानें कधीं जिंकविलें नसतें ! या शत्रूला मीं अशा रीतीनें मारविलें, याबद्दल तुमच्या मनाला वाईट वाटूं नये ! आपल्यापेक्षां अधिक बलवान् आणि अनेक शत्रु झाले म्हणजे त्यांचा असाच कपटानें वध करावा लागतो ! असुरघाती देवांनींच ह्या मार्ग आम्हांस दाखवून दिला आहे आणि संतांनीं अनुसरलेल्या याच मार्गानें सर्व जात असतात ! आम्ही कृतकृत्य झालों, आतां सायंकाळीं आपण आपल्या शिबिराला जाऊं ! नृपहो, अश्व, गज आणि रथ यांसह आपण सर्व आतां विश्रांति घेऊं ! ”

वासुदेवाचें भाषण ऐकून पांडव आणि पांचाल यांस मोठा हर्ष झाला; त्यांनीं सिंहाप्रमाणें गर्जना करण्यास प्रारंभ केला. हे पुरुषर्षभा, दुर्योधन हत झाल्याचें पाहून त्यांनीं मोठ्या आनंदानें शंख वाजविले आणि माधवानेंहि आपला पांचजन्य वाजविला. ९. ३. ६१.

---

## अध्याय ६२ वा.

[ १ पार्थरथज्वलन. २ कृष्णाकडून निःशत्रु झालेल्या युधिष्ठिराचें अभिनंदन. ३ युधिष्ठिर गांधारीच्या सांत्वनार्थ श्रीकृष्णाला पाठवितो. ]

( १ ) संजय—राजा, मग ते सर्व मोठ्या हर्षानें शंख वाजवीत दुर्योधन राजाच्या निवासस्थानाकडे जाण्यास निघाले. पांडव त्या शिबिराकडे जाण्यास निघाले, तेव्हां त्यांच्यामागून युयुत्सु आणि सात्यकि हे दोन धनुर्धर जात होते. धृष्टद्युम्न, शिखंडी, द्रौपदीपुत्र आणि इतर सर्व धनुर्धर आपापल्या निवासस्थानीं गेले होते. पांडव त्या निस्तेज व राजहीन अशा दुर्योधनाच्या शिबिराकडे आले, त्यावेळीं तें प्रेक्षकरहित रंगभूमीप्रमाणें हर्षरहित, सर्व उत्सव बंद पडलेल्या नगरासमान उदासीन आणि नाग काढून टाकलेल्या ऱ्हदाप्रमाणें भयरहित दिसत होतें. तेथें त्यांस केवळ स्त्रिया, षंढ पुरुष आणि कांहीं वृद्धमंत्री आढळले. पांडव त्या ठिकाणीं पोंचतांच दुर्योधनापुढें उभे असणारे सेवक त्यांच्यापुढें

हात जोडून उभे राहिले. त्यांच्या अंगांत काषायमलिन वस्त्रें होतीं. कुरुराजाच्या शिबिराला पोंचतांच ते रथिश्रेष्ठ आपापल्या रथांतून खालीं उतरले. तेव्हां अर्जुनाचें प्रिय व हित करण्यांत सर्वदा तत्पर अशा त्या श्रीकृष्णानें त्यास म्हटलें, ‘ हे भरतसत्तमा, आपलें गांडीव धनुष्य आणि अक्षय्य भाते आधीं खालीं घे, म्हणजे मी रथांतून उतरेन. हे अनघा, तूंहि खालीं उतर; हेंच करणें तुला श्रेयस्कर आहे ! ’ पांडुपुत्र अर्जुनानें तसें केलें; नंतर कृष्ण अश्वांचे रज्जु सोडून खालीं उतरला. तो महात्मा भूतनाथ श्रीकृष्ण रथाखालीं उतरतांच अर्जुनाच्या ध्वजावरील कपि अंतर्धान पावला. इतक्यांत द्रोण-कर्णांनीं आपल्या दिव्यास्त्रांनीं दग्ध केलेला तो रथ अग्नीवांचून एकाएकीं प्रज्वलित झाला. राजा, मग तो अर्जुनरथ अश्व, रश्मि, जूं आणि दांड्या यांसह भस्म होऊन एकाएकीं जमिनीवर पडला !

याप्रमाणें तो रथ भस्म झालेला पाहून पांडव विस्मयचकित झाले. नंतर हात जोडून अर्जुनानें श्रीकृष्णाला नमस्कार घातला आणि नीतिपूर्वक म्हटलें, ‘ हे भगवन् गोविंद, हा रथ एकदम अग्नीवांचून पेटण्याचें कारण काय असावें ? महाबाहो यदुनंदना, ही आश्चर्याची गोष्ट एकाएकीं कशी घडली, हें मला श्रोतव्य आहे, असें तुला वाटत असल्यास सांग ! ’

वासुदेव—अर्जुना, नानाविध अस्त्रांनीं हा रथ आधींच दग्ध झाला होता. परंतु हे परंतपा, मी त्यांत बसलों असल्यामुळें रणांत त्याचा नाश झाला नाहीं. सांप्रत कौंतेया, तूं कृतकार्य झालास आणि मीहि खालीं उतरलों. तेव्हां ब्रह्मास्त्रतेजानें आधींच दग्ध झालेला हा रथ मी खालीं उतरतांच असा नाश पावला आहे !

( २ ) नंतर तो शत्रुतापन श्रीकृष्ण किंचित् हंसून व युधिष्ठिर राजाला आलिंगन देऊन म्हणाला, “ हे कौंतेया, तुझा जय झाला आहे आणि तूं सर्व शत्रूंना जिंकिलें आहेस, ही मोठ्या भाग्याची गोष्ट आहे ! तसेंच गांडीवधारी अर्जुन, भीमसेन, तूं आणि माद्रीपुत्र नकुल-सहदेव या सर्वांचें कुशल आहे, हीहि मोठ्या भाग्याचीच गोष्ट समजली पाहिजे ! तुम्ही सुदैवानें या वीरक्षय करणाऱ्या संग्रामांतून शत्रूंचा वध करून मुक्त झालां, ही आनंदाची गोष्ट आहे ! हे भारता, यापुढील कार्यें सत्वर कर ! मी पूर्वीं एकदां अर्जुनाबरोबर उपप्लव्यास जात असतां तूं मधुपर्क घेऊन आलास आणि म्हणाला होतास

कीं, 'कृष्णा, हा माझा बंधु धनंजय तुझा मित्र आहे. म्हणून हे प्रभो, त्याचें सर्व आपत्तींमध्यें तूंच रक्षण केलें पाहिजे.' तेव्हां मी 'होय करीन,' असें म्हटलें होतें. त्याप्रमाणें हे जनेश्वरा, मी त्या विजयी सव्यसाचीचें रक्षण केलें. हे राजेंद्रा, तो शूर व सत्यपराक्रमी अर्जुन आपल्या बंधूंसह या अंगावर रोमांच उभे करणाऱ्या व वीरसंहारक संग्रामांतून मुक्त झाला आहे !" अशा प्रकारें युधिष्ठिर धर्मराजाला कृष्ण बोलला असतां त्या धर्मांचे अंगावर हर्षानें रोमांच उभे राहिले आणि तो कृष्णाला म्हणाला—

युधिष्ठिर—हे अरिमर्दना, द्रोण व कर्ण यांनीं सोडलेलें ब्रह्मास्त्र तुझ्या, शिवाय साक्षात् वज्रधारी पुरंदरालाहि सहन करण्याची शक्ति नव्हती. कृष्णा-तुझ्याच प्रसादानें संशप्तकगण जिंकले गेले ! महारणामध्यें प्रविष्ट झालेला पार्थ मागें फिरला नाहीं, तो तुझ्याचमुळें ! तसेंच हे कृष्णा, मीहि अनेक संकटांतून तुझ्याच प्रसादानें मुक्त झालों आहें ! उपप्लव्य नगरामध्यें कृष्णद्वैपायन मला म्हणाला, 'जेथें धर्म तेथें कृष्ण असतो आणि जेथें कृष्ण तेथें जय असतो !'

( ३ ) हे भारता, असें धर्मराज बोलल्यावर ते वीर तुझ्या शिबिरांत शिरले. तेव्हां तेथील भांडारांतील सर्व रत्नसंचय त्यांच्या हातीं लागला ! रुपें, सोनें, मणी, मोत्यें, मोठमोठीं भूषणें, शाली, अजिनें, असंख्य दासदासी आणि पुष्कळ राज्योपयोगी वस्तु त्यांना मिळाल्या. हे भरतर्षभा, तुझें अक्षय्य धन त्यांचे हातांत जातांच ते जयशील वीर मोठ्या हर्षानें आरोळया देऊं लागले. त्या वीरांनीं आनंदानें अश्व सोडले आणि पांडव व सात्यकि हे रथांतून खालीं उतरून तेथेंच उभे राहिले ! नंतर तो महायशस्वी श्रीकृष्ण बोलला, 'मंगल-प्राप्त्यर्थ शिबिराच्या बाहेरच आम्ही रहावें हें बरें ! असें बोलून ते सर्व पांडव, सात्यकि आणि वासुदेव मंगलार्थ शिबिराच्या बाहेर गेले आणि ते शत्रुसंहारक पांडव पुण्यकारक ओघवती नदीवर जाऊन रात्रभर तेथें राहिले. त्या ठिकाणीं धर्मराजानें आतां पुढें काय करावयाचें याचा विचार केला. तो श्रीकृष्णाला म्हणाला, 'क्रोधसंतप्त गांधारीच्या सांत्वनार्थ हे अरिंदम कृष्णा, तूंच जावें, हें मला बरें वाटतें. हे महाभागा, तूं आपल्या सकारण व कालानुरूप भाषणानें गांधारीचें त्वरित समाधान करिशील. हे महाभागा, यावेळीं पितामह भगवान् व्यासहि तेथें असण्याचा संभव आहे.'

राजा, असें बोलून धर्मराजानें श्रीकृष्णाला हस्तिनापुराला पाठविलें. तो प्रतापी वासुदेव त्वरित दारुकाला रथावर बसवून धृतराष्ट्राकडे निघाला. शैल्य आणि सुग्रीव नांवाचे ज्याचे अश्व आहेत, अशा त्या श्रीकृष्णाला पांडव म्हणाले, 'कृष्णा, त्या कीर्तिमती गांधारीचे पुत्र हत झाले असल्यामुळें तिला फार शोक झाला असेल, तरी तूं तिचें सांत्वन कर!' पांडवांचें भाषण ऐकून तो सात्वतश्रेष्ठ श्रीकृष्ण हस्तिनापुराला गेला आणि त्या हतपुत्रा गांधारीच्या जवळ शीघ्र येऊन पोंचला. ९. ३. ६२.

---

## अध्याय ६३ वा.

[ १ धृतराष्ट्र आणि गांधारी यांचें सांत्वन. ]

( १ ) **जनमेजय**—हे द्विजश्रेष्ठा, त्या धर्मराज युधिष्ठिरानें परंतप वासुदेवाला गांधारीकडे पाठविण्याचें कारण काय होतें? पूर्वीं कृष्ण शिष्टाईकरितां कौरवांकडे गेला होता, परंतु त्यावेळीं त्याच्या इच्छेप्रमाणें कांहीं न होतां हें युद्ध झालें व त्यांत सर्व योद्धे हत झाले व दुर्योधनाचाहि वध झाला! युद्धांत सर्व शत्रूंचा नाश होऊन कौरवांची पळापळ झाली, त्यांचें शिबिरहि ओस पडलें आणि पांडवांस उत्तम प्रकारचें यश प्राप्त झालें. हे ब्रह्मन्, असें असतां कृष्ण पुनः तिकडे गेला याचें कारण काय? ज्याअर्थीं अमेयात्मा जनार्दन स्वतः तिकडे गेला, त्याअर्थीं त्याचें कारणहि अल्प नसावें, असें मला वाटतें. हे अध्वर्युश्रेष्ठा, तें कारण काय असावें, तें मला तत्त्वतः सर्व सांग!

**वैशंपायन**—राजा, हा प्रश्न तूं मला विचारलास, हें योग्यच झालें. हे भरतर्षभा, मी तुला तें सर्व नीट सांगतों, श्रवण कर! भीमसेनानें रणांगणांत केलेल्या समयाचें उलंघन करून कपटानें गदायुद्धांत दुर्योधनाचा वध केला, हें पाहून युधिष्ठिराला मोठें भय पडलें आणि महाभागा गांधारीविषयीं त्याला मोठी चिंता वाटूं लागली! त्यानें विचार केला, "ही गांधारी मोठी तपोनिष्ठ आहे. आपल्या घोर तपाच्या योगानें ही त्रैलोक्याचेंहि भस्म करील! त्या क्रोधसंतप्त गांधारीचें आधीं सांत्वन झालें पाहिजे. आम्हीं तिच्या पुत्राचा असा वध केला, हें ऐकून ती अत्यंत संतप्त होईल आणि मानसिक अग्नीनें ती आम्हांला जाळून भस्मसात् करील! सरळ मार्गानें युद्ध करणाऱ्या आपल्या

पुत्रास कपटानें मारिल्याचें ऐकल्यावर त्या गांधारीला हें तीव्र दुःख कसें सहन होणार ! ”

राजा, भय आणि शोक यांनीं युक्त होऊन त्या धर्मराजानें या गोष्टीचा पुष्कळ विचार केला आणि मग तो कृष्णाला बोलला, “ गोविंदा, केवळ तुझ्या प्रसादानें हें निष्कंटक राज्य आम्हांला प्राप्त झालें ! हे महाबाहो, वास्तविक ह्याची मनांत इच्छा करणें देखील अशक्य होतें. हे यादवनंदना, तूं अंगावर रोमांच उभे करणाऱ्या या युद्धांत शत्रूचा बराच मोठा संहार केलास ! पूर्वी देवासुरांच्या युद्धकालीं देवशत्रूंच्या वधार्थ तूं जसें देवांना साहाय्य केलेंस आणि दैत्यांचा वध केलास, त्याचप्रमाणें आमचें सारथ्यहि स्वीकारून तूं आमचें रक्षण केलेंस ! तूं जर या महायुद्धांत अर्जुनाचा साहाय्यकर्ता झाला नसतास, तर तो बलार्णव अर्जुन शत्रूस जिंकण्यास कसा बरें समर्थ झाला असता ? हे वार्ष्णेया, आमच्याकरितां विपुल गदाप्रहार, परिघांचा मार, तसेंच शक्ति, भिंदिपाल, तोमर आणि परशु यांचे प्रहार तुला सहन करावे लागले ! हे कृष्णा, आमच्यासाठीं तुला पुष्कळ कठोर भाषणें सोसावीं लागलीं ! त्याचप्रमाणें वज्रासारखे तीक्ष्ण शस्त्रनिःपातहि रणांत सहन करावे लागले ! हे अच्युता, दुर्योधन राजाचा रणांत वध होऊन या सर्वांची सफलता झाली आहे ! कृष्णा, हें सर्व आतां व्यर्थ जाणार नाहीं, असें कांहीं कर ! कृष्णा, आम्हांला जयप्राप्ति झाली आहे, तरी आमचें चित्त संदेहांत झोंके खात आहे ! महाबाहो माधवा, गांधारीचा क्रोध किती खडतर आहे, हें लक्षांत आण ! त्या महाभागेनें उग्र तपश्चर्येच्या योगानें आपला देह कृश करून घेतला आहे ! आपल्या पुत्र-पौत्रांचा वध झाल्याचें ऐकून ती खरोखरच आम्हांला जाळून भस्म करील ! म्हणून हे वीरा, तिचें सांत्वन आधीं केलें पाहिजे, असें मला वाटतें ! हे पुरुषोत्तमा, क्रोधानें तप्त झालेल्या आणि पुत्रदुःखानें कष्टी झालेल्या तिजकडे पाहण्यास तुजवांचून दुसऱ्या कोणाची शक्ति आहे ? म्हणून माधवा, तूंच त्या क्रोधसंतप्त गांधारीच्या सांत्वनाकरितां जावें हें मला योग्य दिसत आहे ! हे अरिंदमा, तूंच कर्ता-विकर्ता असून प्रभव व अव्ययहि तूंच आहेस ! कालाला अनुरूप भाषण करून हेतु व कारणें यांच्या योगानें हे महाबाहो, तूं गांधारीचा कोप तेव्हांच शांत करशील ! भगवान् पितामह व्यासहि तेथें असेल. हे सात्वतश्रेष्ठा, तूं पांडवांचा सर्वथा हितकर्ता असल्यामुळें गांधारीचा क्रोध नाहींसा करणें हें तुझें कर्तव्य आहे !

धर्मराजाचें भाषण श्रवण करून त्या यदुकुलश्रेष्ठ श्रीकृष्णानें दारुकाला हाक मारिली आणि त्याला रथ सिद्ध करण्यास सांगितलें ! केशवाचें बोलणें ऐकून दारुकानें रथ तत्काल तयार केला आणि रथ तयार असल्याचें कृष्णाला कळविलें. मग तो परंतप यादवश्रेष्ठ केशव त्या रथांत बसून त्वरेनें हस्तिनापुराला गेला. हे महाराजा, तो बलवान् माधव आपल्या रथघोषानें नगर दणदणावीत आंत शिरला, तेव्हां कृष्ण आल्याचें धृतराष्ट्रासहि समजलें. इकडे कृष्ण आपल्या उत्तम रथांतून उतरून धृतराष्ट्राच्या वाड्यांत गेला. जाऊन पाहतो, तों ऋषिसत्तम कृष्णद्वैपायन आधींच तेथें येऊन बसलेले त्याच्या दृष्टीस पडले. कृष्णानें व्यासाचे व धृतराष्ट्राचे पाय धरिले आणि अव्यग्र मनानें गांधारीलाहि अभिवंदन केलें. नंतर त्या यादवश्रेष्ठानें धृतराष्ट्राचा हात धरून मोठ्यानें रड- ण्यास आरंभ केला. मुहूर्तभर सारखा शोक करून त्यानें अश्रू पुसले, पाण्यानें डोळे धुतले आणि यथाविधि आचमन करून तो अरिंदम श्रीकृष्ण धृतराष्ट्राला प्रस्तुत प्रसंगाला अनुसरून बोलला, "हे भारता, तूं वृद्ध झाला आहेस, त्यामुळें तुला ठाऊक नाहीं असें कांहीं नाहीं. हे प्रभो, कालानें जें जें घडून आलें तें तें सर्व तुला ठाऊक आहे. हे भारता, तुझ्या चित्तानुरोधानें वागून सर्व पांड- वांनीं तुझ्या आज्ञा मानिल्या, परंतु त्याचा उपयोग न होतां कुलक्षय व क्षत्रिय- संहार मात्र येऊन ठेपला ! धर्मवत्सल व क्षमाशील युधिष्ठिरानें कपटद्यूतांत जिंकिला गेल्यावर आपल्या बंधूंना शपथ घालून भ्रात्यांसह वनवास स्वीकारिला. नाना तऱ्हांचे वेष धारण करून त्यांनीं अज्ञातवास अंगिकारिला ! तसेंच दुर्बलां- प्रमाणें दुसरेहि पुष्कळ क्लेश सोसले ! पुढें युद्धकाल येऊन ठेपला असतां मीं स्वतः येऊन सर्व लोकांच्या समक्ष पांच गांव पांडवांना देण्याविषयीं याचना केली, परंतु तुमचा कालच फिरला असल्यामुळें लोभामुळें तितकें देखील तुम्हीं त्यांना दिलें नाहीं !

राजा, तुझ्या अपराधामुळें सर्व क्षत्रियांचा क्षय झाला ! भीष्म, सोमदत्त, बाल्हीक, कृप, द्रोण आणि त्याचा पुत्र अश्वत्थामा, तसाच धीमान् विदुर यांनीं साम करण्याकरितां नित्य तुझी याचना केली असतांहि तूं त्यांचे सांगण्याप्रमाणें केलें नाहींस ! हे भारता, कालानुसार सर्व चित्तभ्रम होऊन मोहित होतात ! तुझ्यासारख्यानें असला मूढपणा करावा, त्याअर्थीं याला कालयोगाहून दुसरें काय म्हणावयाचें ? एकंदरींत दैवच बलवत्तर आहे ! हे महाप्राज्ञा, ह्या सर्व गोष्टींचा दोष पांडवांवर लादूं नकोस ! हे परंतपा, महात्मे पांडवांनीं धर्म, नीति आणि

स्नेह यांचा यत्किंचितहि अतिक्रम केलेला नाहीं ! जें कांहीं झालें, तें सर्व तुझ्याच दोषामुळें आहे, हें जाण. पांडवांची असूया करणें तुला योग्य नाहीं ! तुम्ही एकाच कुलांतले, एकाच वंशांतले व एकाच पिंडाचे आहांत ! तुझ्या पुत्राच्या कृतीचा व गांधारी आणि तूं यांच्या चुकीचा दोष पांडवांवर घातला जात आहे ! हे कुरुशार्दूला, तूं आणि यशस्विनी गांधारी पांडवांवर विनाकारण दोष लावून शोक करीत बसूं नका ! हा सर्व आपल्याच कृतीचा परिणाम आहे, हें ध्यानांत आणून पांडवांवर कृपादृष्टि ठेवा आणि त्यांचें रक्षण करा ! हे भरतर्षभा, तुला मी नमस्कार करितों ! हे महाबाहो ! धर्मराजाची स्वाभाविकच तुजवर केवढी भक्ति आणि किती स्नेह आहे, हें तूं जाणतच आहेस ! अपकार करणाऱ्या शत्रूंचा अशा रीतीनें संहार करूनहि त्याला त्यांत समाधान न वाटतां रात्रंदिवस तो दुःखानें जळत आहे ! हे नरशार्दूला, तुझ्याकरितां व यशस्विनी गांधारीकरितां तो सारखा शोक करीत राहिल्यामुळें त्याला समाधान म्हणून कसें तें मुळींच ठाऊक नाहींसें झालें आहे ! पुत्रशोकानें संतप्त आणि व्याकुलचित्त झालेल्या तुजकडे इच्छा असूनहि तो लज्जेनें येत नाहीं !"

हे महाराजा, अशाप्रकारें त्या धृतराष्ट्राशीं बोलून यदूत्तम श्रीकृष्णानें त्या शोकसंतप्त गांधारीशींहि गोड भाषण केलें. तो म्हणाला, "हे सुबलकन्ये गांधारि, मी बोलतों, तें लक्ष देऊन ऐक ! हे शुभे, या लोकांत तुझ्यासारखी स्त्री दुसरी कोणी नाहीं. हे राज्ञि, तूं माझ्या देखत सभेमध्यें दोन्ही पक्षांस हितप्रद आणि धर्मार्थसहित जें भाषण केलेंस, तें तुला स्मरत आहेच ! तुझा उपदेश चांगलाच होता, परंतु तुझ्या पुत्रांनीं तसें वर्तन केलें नाहीं ! त्यावेळीं दुर्योधनाला तूं असेंहि कठोर बोलली होतीस कीं, 'मूढा, माझें भाषण ऐक, जिकडे धर्म, तिकडे जय हा व्हावयाचाच !' हे राजकन्ये, तें तुझें भाषण आज अनुभवाला आलें आहे, असें जाणून हे कल्याणि, आतां तूं शोक करूं नकोस ! पांडवांचा विनाश करण्याची बुद्धि तुला कधींहि होऊं नये ! हे महाभागे, ही सर्व सचराचर पृथ्वी आपल्या तपोबलानें क्रोधसंतप्त होऊन तूं दग्ध करून टाकण्यास समर्थ आहेस !"

श्रीकृष्णाचें भाषण श्रवण करून गांधारी म्हणाली, "वासुदेवा, तूं म्हणतोस तें सर्व योग्य आहे. मानसिक व्यथांनीं दग्ध होऊन माझ्या बुद्धीला भ्रम झाला होता, परंतु तुझें बोलणें ऐकून माझें समाधान झालें आहे ! नरश्रेष्ठ केशवा,

आतां ह्या अंध, वृद्ध व पुत्रहीन राजाला तूं आणि पांडववीर हेच कायते आधार आहां !"

असें भाषण करून त्या गांधारीनें पुत्रशोकानें व्याप्त होऊन मुखावर पदर घेतला आणि मोठ्यानें रडण्यास प्रारंभ केला ! तेव्हां त्या शोकविह्वल गांधारीचें कृष्णानें कार्यकारणयुक्त भाषणानें सांत्वन केलें ! अशाप्रकारें श्रीकृष्ण गांधारी आणि धृतराष्ट्र यांचें सांत्वन करीत आहे तों अश्वत्थाम्यानें पांडवांविषयीं केलेला संकल्प त्याचे ध्यानांत आला. नंतर तो त्वरित उठला आणि व्यासाचे पायांवर मस्तक ठेवून धृतराष्ट्राला बोलला, "हे कुरुश्रेष्ठा, मी आतां तुझा निरोप घेतों ! तूं शोक करूं नकोस ! अश्वत्थाम्यानें पांडवांविषयीं पापी विचार योजिला आहे, त्यामुळें मी त्वरित उठलों. पांडवांचा रात्रिसमयीं वध करण्याचा आपला विचार त्यानें प्रदर्शित केला होता !" कृष्णाचें भाषण ऐकून गांधारी व धृतराष्ट्र हीं एकदम त्या केशिसूदन कृष्णाला म्हणालीं, 'कृष्णा, जा, शीघ्र जा आणि पांडवांचें पालन कर ! जनार्दना, तुझी आमची पुनः लवकरच गांठ पडेल !'

असें त्याचें भाषण ऐकून श्रीकृष्ण दारुकासह त्वरेनें निघून गेला. तो निघून गेल्यावर सर्वनमस्कृत व्यासानें धृतराष्ट्र राजाचें आश्वासन केलें. इकडे धर्मात्मा श्रीकृष्णहि कृतकृत्य होऊन हस्तिनापुराहून पांडवांकडे जाण्याकरितां त्यांच्या शिबिराकडे निघाला, तो रात्रौ शिबिरास येऊन पांडवांस भेटला व त्यांस सर्व वृत्त सांगून त्यांसह मोठ्या सावधपणें राहिला. ९. ३. ६३.

---

## अध्याय ६४ वा.

[ १ दुर्योधनविलाप. २ गदायुद्धांतून परतलेल्या लोकांनीं द्रोणपुत्रास केलेलें सर्व गोष्टींचें निवेदन. ]

( १ ) **धृतराष्ट्र**—संजया, शत्रूनें माझ्या शौर्याभिमानी पुत्राच्या मस्तकावर जेव्हां पाय ठेवला व तो मांड्या भग्न होऊन भूमीवर पडला, तेव्हां तो काय म्हणाला ? राजा दुर्योधन अत्यंत क्रोधी असून पांडवांशीं त्याचें हाडवैर होतें, तेव्हां हें मोठें संकट प्राप्त झालें असतां रणांत पडल्यावर तो काय बोलला ?

**संजय**—हे नराधिपा, रणांगणांत घडलेला प्रकार तुला जशाचा तसा सांगतों. त्या संकटकालीं राजा दुर्योधन मांड्या मोडून पडला असतां जें कांहीं

बोलला, तें श्रवण कर ! मांड्यांचा भंग होऊन सर्व अंग धुळीनें भरून गेलें आहे, अशा त्या दुर्योधनानें आपले केंस आंवळले आणि दाही दिशांकडे नजर फेंकली. मग सर्पाप्रमाणें सुसकारे टाकीत मोठ्या त्वेषानें त्यानें आपल्या अश्रुपूर्ण नेत्रांनीं मजकडे पाहिलें. अत्यंत मदोन्मत्त गजाप्रमाणें त्यानें आपले हात जमिनीवर चोळले आणि विस्कटलेले केंस हालवीत दांत-ओंठ खात व ज्येष्ठ पांडव धर्मराजाची निंदा करीत म्हटलें, "शांतनव भीष्म, शस्त्रधराग्रणी कर्ण, गौतम, शकुनि, अस्त्रधरांमध्यें श्रेष्ठ द्रोणाचार्य, अश्वत्थामा, शल्य आणि शूर कृतवर्मा हे माझे साहाय्यकर्ते असूनहि मला अशी दशा प्राप्त झाली, त्याअर्थीं 'काल हाच दुरतिक्रम' होय ! जो एकादश अक्षौहिणी सैन्याचा पति, त्या मला ही दशा प्राप्त झाली ! एकंदरींत काल प्राप्त झाला असतां त्याचें अतिक्रमण कोणाच्यानेंहि करवणार नाहीं ! ह्या युद्धांत माझ्याकडील जे कोणी जीवंत राहिले असतील, त्यांस भीमसेनानें प्रतिज्ञेचा भंग करून माझा कसा वध केला हें सांग ! त्याचप्रमाणें पांडवांनीं भूरिश्रवा, कर्ण, भीष्म, द्रोण इत्यादिकांसंबंधीं जीं अनेक दुष्कृत्यें केलीं, त्यांपैकींच हें एक अकीर्तिकारक कृत्य त्या नृशंसांनीं केलें आहे ! या कृत्याच्या योगानें त्यांचा सज्जनमंडळींत सर्वदा धिक्कारच होईल, असें मला वाटतें. कपटानें जय मिळविणाऱ्यांवर कोणता सत्त्वशील मनुष्य प्रेम करील ? तसेंच प्रतिज्ञाभंग करणाऱ्याला कोण ज्ञाता पुरुष अशाप्रकारें चांगलें म्हणेल ! पांडुपुत्र वृकोदराप्रमाणें अधर्मानें जय मिळविल्याबद्दल कोणता पंडित हर्ष पावेल ? आज माझा ऊरुभंग होऊन मी पडलों असतां माझें कांतियुक्त मस्तक माझ्या बंधूनें--क्रुद्ध भीमसेनानें--आपल्या पायानें तुडविलें, याहून आश्चर्यकारक तें कृत्य काय आहे ? आणि हे संजया, अशाप्रकारचें कृत्य करणारा मनुष्य आज मोठा मान पावत आहे ! युद्धधर्म बरोबर जाणणारे म्हणजे माझा पिता व माता हीं होत. त्या दुःखितांना तूं माझें म्हणणें सांग कीं, मीं यजन केलें, आश्रितांचें रक्षण केलें, समुद्रवलयांकित पृथ्वीचें उत्तम पालन केलें आणि शत्रु चांगल्या स्थितींत असतांना त्यांच्या मस्तकावर पाय देऊन उभा राहिलों. मीं शक्त्यनुसार दानधर्म केला, मित्रांचें प्रिय केलें, आणि सर्व शत्रूंना पीडा केली ! माझ्यापेक्षां उत्तम मरण कोणाला येणार आहे ? सर्व बंधुजनांचा उत्तम मान मीं ठेविला, मला वश होऊन राहिलेल्यांचा सत्कार केला, त्रिविध धर्म, अर्थ आणि काम या पुरुषार्थांचें सेवन केलें, तेव्हां माझ्यापेक्षां उत्तम मरण कोणाला येणार आहे ? मीं

मोठमोठ्या राजे लोकांना आज्ञा केल्या आणि लोकांमध्यें दुर्लभ मान मिळविला. मी उत्कृष्ट जातिवंत अश्वांच्या वाहनांतून फिरलों, तेव्हां मजपेक्षां उत्तम मरण कोणाला येणार आहे ! मी परराष्ट्रें जिंकलीं, राजेलोकांकडून दासांप्रमाणें सेवा घेतली, प्रियकरांचें सर्वतोपरी कल्याण केलें, तेव्हां मजपेक्षां उत्तम मरण तें कोणाला येणार ? मीं अध्ययन केलें, यथाविधि दान केलें, निरोगी आयुष्य संपादन केलें आणि स्वधर्मानें लोक जिंकिले. तेव्हां मजपेक्षां उत्तम मरणारा कोण आहे ?"

"संजया, मी समरांत जिंकला जाऊन शत्रूंचा दास होऊन राहिलों नाहीं, ही मोठ्या भाग्याची गोष्ट होय. स्वधर्मानें वागणाऱ्या क्षत्रियांना जें मरण इष्ट असतें, तेंच मला प्राप्त झालें आहे, तेव्हां मजहून उत्तम मरण कोणाला येणार ? एकाद्या सामान्य मनुष्याप्रमाणें जिंकला जाऊन मी वैरापासून परावृत्त झालों नाहीं किंवा कोणतीहि दुर्बुद्धि स्वीकारून पराजितहि झालों नाहीं, हें माझें मोठें भाग्य मी समजतों. निजलेल्याला किंवा प्रमत्त झालेल्याला मारावें किंवा एकाद्याचा विषप्रयोगानें घात करावा, त्याप्रमाणें प्रतिज्ञेचा भंग करून अधर्मानें मी मारला गेलों ! महाभाग अश्वत्थामा, सात्वत कृतवर्मा व शरद्वतीसुत कृपाचार्य, यांस माझें सांगणें सांग कीं अनेक वीर अधर्म प्रवृत्त झालेल्या व समयभंग करणाऱ्या पांडवांचा तुम्ही कधींहि विश्वास धरूं नका !"

राजा धृतराष्ट्रा, नंतर तुझा सत्यविक्रमी पुत्र दुर्योधन हेरांना म्हणाला, "भीमसेनानें मला अधर्मानें रणांत मारिलें आहे; आतां मी द्रोण, कर्ण, शल्य, महावीर वृषसेन, सौबल शकुनि, वीर्यवान् जलसंध, राजा भगदत्त, महाधनुर्धर सोमदत्त, सिंधुपति जयद्रथ, माझ्या स्वतःसारखे दुःशासनादिक बंधु, पराक्रमी दौःशासनि व लक्ष्मण आणि दोघे पुत्र, तसेच दुसरे माझे सहस्रशः आप्त यांच्या मागून सार्थहीन पथिकाप्रमाणें जाईन ! माझी बहीण दुःशला ही बंधूंस व भर्त्यास मारल्याचें ऐकून दुःखानें मोठा हंबरडा फोडील ! माझा वृद्ध पिता राजा धृतराष्ट्र आणि गांधारी ह्यांची आपल्या सुनानातसुना ह्यांसह आतां काय बरें अवस्था होईल ? ती विशालाक्षी लक्ष्मणमाता कल्याणी पति आणि पुत्र निधन पावल्याचें ऐकून दुःखानें त्वरित प्राण सोडील ! वाग्विशारद परिव्राजक चार्वाकाला ही गोष्ट समजेल, तर तो महाभाग खरोखर याचा सूड घेईल ! तिन्ही लोकांत प्रख्यात अशा समंतपंचकांत निधन पावून मला शाश्वत लोकांची निश्चयानें प्राप्ति होईल !"

( २ ) हे महाराजा, नंतर हजारों लोक अश्रुपूर्ण नयनांनीं राजाचा तो विलाप ऐकून दाही दिशांस निघून गेले ! तेव्हां समुद्र, वनें व चराचर पदार्थांसुद्धां सर्व पृथ्वी थरथर कांपूं लागून घोर भासूं लागली. दिशा सर्वत्र उदास दिसूं लागल्या ! तेथून आलेल्या लोकांनीं द्रोणपुत्रास गदायुद्धांतील दुर्योधन राजाचें पतन वगैरे सर्व वृत्तांत सांगितला. नंतर ते बराच वेळ सचिंत उभे राहून मोठ्या दुःखानें तेथून निघून गेले ! ९. ३. ६४.

---

## अध्याय ६५ वा.

[ १ अश्वत्थाम्यास सैन्यापत्याभिषेक. ]

( १ ) **संजय**—वार्तिकांच्या मुखानें दुर्योधन हत झाल्याचें ऐकून कौरवांकडील अवशिष्ट राहिलेले, गदा, तोमर, शक्ति इत्यादि आयुधांनीं विद्ध झालेले अश्वत्थामा, कृपाचार्य आणि सात्वत कृतवर्मा हे आपले जयशाली अश्व पिटाळीत सत्वर रणभूमीवर प्राप्त झाले. तेथें वनांत येतांच वायुवेगानें कोसळून पडलेल्या शालवृक्षाप्रमाणें पतन पावलेला दुर्योधन त्यांच्या दृष्टीस पडला. व्याधानें वनांत पाडलेल्या महागजाप्रमाणें तो रक्तानें भरला असून जमिनीवर विवळत पडला होता. तेव्हां तो धुळीनें भरलेल्या गजेंद्रासारखा दीर्घबाहु वीर यदृच्छेनें आकाशांतून पडलेल्या सूर्यमंडलासारखा किंवा अभ्रपटलाच्छादित पूर्ण चंद्रासारखा, दिसत होता. ज्याप्रमाणें धनेच्छु सेवक सर्वदा राजेंद्राला वेढून असतात, त्याप्रमाणें त्या दुर्योधनाभोंवतीं घोर भूतगण व मांसाहारी श्वापदें गोळा झालीं होतीं. त्याच्या भ्रुकुटी वक्र झाल्या असून क्रोधानें त्यानें डोळे विस्तीर्ण केले होते. पतन पावलेल्या व्याघ्राप्रमाणें क्रोधाविष्ट झालेल्या त्या नरव्याघ्राला भूमीवर पडलेला पाहतांच त्या कृपप्रभृति महारथींस अत्यंत दुःख झालें आणि ते रथांतून उतरून त्या राजाजवळ जाऊन जमिनीवर बसले.

हे महाराजा, नंतर द्रोणपुत्र अश्वत्थामा डोळ्यांत आंसवें आणून सुसकारे टाकीत त्या भरतश्रेष्ठ नृपसत्तमाला बोलला, " हे पुरुषश्रेष्ठा, ज्याअर्थीं तूं येथें धुळींत पडून राहिला आहेस, त्यापेक्षां ह्या मनुष्यलोकीं कांहींएक सत्य नाहीं ! पूर्वीं राजपद भोगून आणि सर्व पृथ्वीचें शासन करून या निर्जन वनांत तूं आज एकटा राहिला आहेस हें कसें ? हे राजेंद्रा, आज मला दुःशासन कोठें दिसत नाहीं, तसा महारथी कर्णहि दृष्टीस पडत नाहीं ! आणि ते तुझे सर्व सुहृदहि कोणी आढळत नाहींत ! हे भरतर्षभा, ह्याचें कारण काय बरें ? तूं असा येथें

धुळींत लोळत पडलेला दिसशील, अशी पूर्वी कोणाला तरी कल्पना होती काय? कृतांताची गति लोकांस समजणें हें खरोखर अत्यंत कठिण होय! कारण, तुझ्यासारखा परंतप पुरुष मूर्धाभिषिक्त राजांचें अग्रस्थान संपादन करून आज येथें गवत व तृण खात पडला आहे! हे पार्थिवा, तें तुझें अमल छत्र आणि चामर आज कोठें आहे? हे पार्थिवोत्तमा, तुझी ती मोठी सेना आज कोठें गेली आहे! दृष्ट गोष्टींवरून आपण वारंवार कार्यांची सिद्धि ठरवीत असतों, परंतु अदृष्ट गोष्टींकडून दृष्ट कार्य व्यर्थ जातें असाहि अनुभव आहे! तूं सर्वलोकश्रेष्ठ असूनहि तुझी अशी अवस्था झाली यावरून हें उघड होत आहे! इंद्राशींहि अत्यंत स्पर्धा करणाऱ्या तुझें हें दुःख अवलोकन करून सर्व मर्त्य प्राण्यांची संपत्ति अशाश्वत आहे हेंच दिसून येत आहे!"

राजा, तें भाषण श्रवण करून आणि विशेषेंकरून तो आपल्याकरितां अत्यंत दुःखित झाल्याचें पाहून तुझ्या पुत्रानें आपले डोळे हातांनीं पुसले आणि शोकोत्पन्न अश्रू गाळून त्या कृपादिक वीरांना कालानुरूप बोलला, "अहो, काल उलटला असतां सर्व भूतांचा विनाश व्हावयाचाच, असा ब्रह्मदेवानें लोकांना नियम लावून दिला आहे! तोच विनाश आज तुमच्या समक्ष मला येत आहे! पृथ्वीचें पालन करीत असतां मला ही स्थिति प्राप्त झाली आहे! युद्धांत कोणतीहि आपत्ति आली असतां मी परावृत्त झालों नाहीं, ही सुदैवाची गोष्ट आहे! पाप्यांनीं मला कपटानें मारिलें आहे. युद्धांत मी सर्वदा उत्साहच धरून युद्ध केलें आणि युद्धांत सर्व ज्ञातिबांधवांचा वध झाल्यावरच पडलों, हें मी सुदैवच समजतों. जनक्षयांतून तुम्ही जीवंत सुटलेत, हें माझें मोठें भाग्य होय. तुम्ही सुखरूप राहून तुमचें कल्याण व्हावें, याहून दुसरें प्रिय मला कांहींच नाहीं. मजवरील स्नेहानें माझ्या मृत्यूबद्दल तुम्ही शोक करीत बसूं नका! जर तुम्हांला वेद प्रमाण वाटत असतील, तर मीं अक्षय लोक जिंकिले हें सत्य आहे. अमिततेजस्वी कृष्णाचा पराक्रम मला ठाऊक आहे. त्याच्यानेंहि उत्तम प्रकारें आचरिलेल्या क्षात्रधर्मापासून मला च्युत करवलें नाहीं! मी क्षात्रधर्माचें उत्तम पालन केल्यामुळें कोणत्याहि प्रकारें शोच्य नाहीं! तुम्हींहि आपल्या शक्त्यनुरूप माझ्याकरितां जें करायाचें तें केलें! माझा विजय व्हावा म्हणून तुम्हीं सर्वदा यत्न केला, परंतु दैव हें सर्वदा दुरतिक्रमच होय!"

राजेंद्रा, अशाप्रकारचें भाषण केल्यावर त्याचे डोळे अश्रूंनीं भरून आले आणि तो थांबला. वेदनांनीं तो अत्यंत व्याकुल झाला होता. त्या शोकाकुल

राजाचे डोळ्यांतून अश्रू गळतांना पाहून अश्वत्थामा जगत्प्रलयकालच्या अग्नीप्रमाणें संतप्त झाला. त्यानें क्रोधानें हातावर हात चोळले आणि सद्गदित स्वरानें राजाला म्हटलें, "राजा, त्या पाप्यांनीं कपटमार्गानें माझ्या पित्याचा वध केला, या गोष्टीनेंहि मला दुःख झालें नाहीं, इतकें दुःख आज तुजमुळें होत आहे! हे प्रभो, मी सत्यभाषण करून सांगत आहें, तें श्रवण कर! मी माझें इष्टापूर्त, दान, धर्म आणि सुकृत यांची शपथ घेऊन सांगतों कीं, वासुदेवासमक्ष मी आज सर्व पांचालांना वाटेल त्या उपायांनीं यमलोकीं पाठवीन! हे महाराजा, या कामीं तूं मला अनुज्ञा दे!"

राजा, द्रोणपुत्राचें असें आल्हाद्जनक भाषण श्रवण करून राजा कृपाचार्याला बोलला, 'आचार्या, जलपूरित कलश शीघ्र आण!' राजाच्या आज्ञेनें तो ब्राह्मणश्रेष्ठ कृपाचार्य एक उदकपूर्ण कलश घेऊन राजाकडे आला. हे महाराजा, तेव्हां तुझा पुत्र त्या कृपाचार्याला बोलला, "हे द्विजश्रेष्ठा, माझें प्रिय करण्याची तुझी इच्छा असल्यास माझ्या आज्ञेनें या द्रोणपुत्राला सैन्यापत्याचा अभिषेक कर! तुमचें कल्याण असो! राजाच्या आज्ञेनें सर्वांनीं व विशेषतः क्षात्रधर्माचें पालन करणाऱ्या ब्राह्मणांनीं युद्ध करावें, असें धर्मवेत्त्यांचें मत आहे!"

राजा, दुर्योधनाचें भाषण श्रवण करून शारद्वत कृपाचार्यानें द्रोणपुत्राला राजाज्ञेनें सैन्यापत्याचा अभिषेक केला! हे महाराजा, अश्वत्थाम्याला अभिषेक होतांच त्यानें दुर्योधनाला आलिंगन दिलें आणि मोठा सिंहनाद करून सर्व दिशा दणदणावीत तो निघून गेला! हे राजेंद्रा, तो रक्तदिग्ध दुर्योधन सर्व भूतांस भयावह अशा त्या रात्रीं तेथेंच पडून राहिला! नंतर ते कृपप्रभृति वीर रणांगणांतून शीघ्र दूर गेले आणि शोकानें उद्विग्न होऊन चिंतन करीत बसले. ९. ३. ६५.

( येथें तिसरें उपपर्व गदापर्व संपलें. )

[ येथें नववें शल्यपर्व संपलें. ]

---

ह्याच्यापुढें सौप्तिक पर्व लागेल, त्याचा आद्य श्लोक असा आहेः—

**संजय**—ततस्ते सहिता वीरा प्रयाता दक्षिणामुखाः ।
उपास्तमयवेलायां शिबिराभ्याशमागताः ॥

# श्रीमन्महाभारतार्थ

## ( महाभारताचें मराठी सुबोध भाषांतर )



## १०. सौप्तिकपर्व.



**नारायणं नमस्कृत्य नरं चैव नरोत्तमम् ।**
**देवीं सरस्वतीं चैव ततो जयमुदीरयेत् ॥**

### अध्याय १ ला.

[ १ संजय-धृतराष्ट्रांचा संलाप. २ अश्वत्थामा, कृपाचार्य आणि कृतवर्मा यांची वनमध्यभागीं एका न्यग्रोधवृक्षाखालीं बैठक. ३ कावळ्यांचा वध करणाऱ्या उलूकाला पाहून आपणहि त्याप्रमाणेंच पांडवांचा वध करावा, असा अश्वत्थाम्यानें केलेला निश्चय. ४ अश्वत्थाम्याकडून कृपाचार्य व कृतवर्मा यांस स्वकर्तव्यकथन. ]

( १ ) **संजय**—राजा, तेव्हां ते तिघे वीर दक्षिणाभिमुख होऊन चालूं लागले आणि सूर्यास्ताचे वेळीं शिबिराजवळ आले. अत्यंत भयभीत होऊन त्यांनीं आपले अश्व शीघ्र सोडले आणि घनदाट झाडीची जागा पाहून ते तेथें लपून बसले. त्यांचीं अंगें शस्त्रप्रहारांनीं क्षत झालीं होतीं. ते सेनानिवेशाजवळ लपून दीर्घ व उष्ण उसासे टाकीत पांडवांसंबंधीं विचारांत गढून गेले होते. जयशील पांडव एकसारख्या गर्जना करीत असल्याचें ऐकून कदाचित् आपलाच पाठलाग ते करीत असतील अशा भीतीनें ते पूर्व दिशेकडे पळूं लागले! कांहीं वेळानें त्यांचे अश्व थकून गेले व ते स्वतः तृषार्त झाले असतां एका जागीं बसून राहिले ! राजा, दुर्योधनाच्या वधानें संतप्त होऊन त्यांचा क्रोधाग्नि अत्यंत भडकला आणि त्यांना आपली स्थिति दुःसह वाटूं लागली !

**धृतराष्ट्र**—संजया, दशसहस्र गजांचें बळ असणाऱ्या माझ्या पुत्राला भीमानें वधिलें म्हणून सांगतोस, हें तुझें म्हणणें मला अश्रद्धेय वाटतें. संजया, सकल प्राण्यांना अवध्य, वज्रदेही व तरुण असा माझा पुत्र पांडवांनीं समरांगणांत मारला ना ! सर्व पांडवांनीं माझ्या पुत्राचा रणांत वध केला, त्याअर्थी दैव टाळणें हें मनुष्याला कधींहि शक्य नाहीं. संजया, माझे शंभर पुत्र पांडवांनीं रणांत मारल्याचें ऐकूनहि ज्याअर्थी माझें हृदय सहस्रधा भिन्न होत नाहीं, त्याअर्थी तें दगडाचेंच केलें असलें पाहिजे ! हे शंभर पुत्र मेल्यावर आम्हां दोघां वृद्धांची स्थिति काय होईल बरें ? ह्या पांडवांच्या राज्यांत आतां राहण्याला माझें मन घेत नाहीं ! संजया, मी राजाचा पिता असून आणि स्वतः राजपद भोगून आतां पांडवांचा सेवक होऊन त्यांच्या आज्ञा कशा बरें पाळाव्या ? ज्या ह्या भीमानें माझे शंभर पुत्र मारले व जो सर्वांच्या मस्तकावर पाय देऊन ह्यापुढें सर्व पृथ्वीवर सत्ता चालविणार, त्याच्या आज्ञेंत मीं आतां रहावें काय ? संजया, माझ्या पुत्रानें महात्म्या विदुराचे भाषणाप्रमाणें न वागून त्याचें सर्व भविष्य खरें करून दाखविलें ! ह्या भीमाचा मीं आतां सेवक होऊन दुर्मरण पत्करावें काय ? हे संजया, त्या भीमाचीं कर्णकटु वाक्यें मीं आतां कशीं सोसून घ्यावीं ? संजया, माझ्या पुत्रांचा अधर्मानें वध केला असतां पुढें कृतवर्मा, कृप व अश्वत्थामा यांनीं काय बरें केलें ?

( २ ) **संजय**—राजा, तुझे वीर निघाले ते जवळच जाऊन थांबले आणि पाहतात तों वृक्षलतांनीं आच्छादित असें एक अरण्य त्यांच्या दृष्टीस पडलें. तेथें मुहूर्तभर विश्रांति घेऊन त्यांनीं आपल्या अश्वांना पाणी पाजलें आणि तेथून सूर्यास्ताचे वेळीं ते दुसऱ्या एका मोठ्या वनांत येऊन पोंचले. तें वन नानाप्रकारच्या मृगगणांनीं व पक्षिसमुदायांनीं व्याप्त होतें. तेथें अनेक प्रकारचे वृक्ष व लता असून असंख्य जातींच्या सर्पांचीहि वसति होती. तेथें सर्वत्र पाणी वाहत असून नाना जातींच्या पुष्पांनीं त्या प्रदेशास विचित्र शोभा आली होती. जिकडेतिकडे पद्मिनी शोभत असून नील कमलेंहि असंख्य दिसत होतीं. त्या घोर अरण्यांत प्रवेश करून ते पाहूं लागले, तों हजारों शाखांचें एक मोठें वडाचें झाड त्यांच्या दृष्टीस पडलें. राजा, तेव्हां ते महारथ त्या झाडाजवळ गेले आणि त्यांनीं तें निरखून पाहिलें.

राजा, नंतर ते रथांतून खालीं उतरले आणि अश्व सोडून त्यांनीं यथाशास्त्र मुखप्रक्षालन व संध्यावंदन केलें. मग सूर्य अस्ताचलाला गेला आणि सर्व-

जगाची धात्रीच कीं काय अशी रात्र येऊन ठेपली. सर्वत्र ग्रह, नक्षत्रें आणि तारा यांचा उदय होऊन आकाश नील अंशुकाप्रमाणें अपूर्व शोभत होतें. रात्रीं निशाचर प्राण्यांचा भयप्रद आवाज सर्वत्र होत होता, तर दिवससंचारी प्राणी निद्रावश होऊन गेले होते. हिंस्रपशु प्रमुदित झाले होते. तेणेंकरून ती रात्र अत्यंत भयंकर वाटूं लागली. त्या रात्रीच्या समयीं दुःखशोकानें व्याप्त होऊन कृपाचार्य, कृतवर्मा आणि अश्वत्थामा हे तिघे जवळजवळ बसले होते. त्या वटवृक्षाजवळ बसून ते कुरु-पांडवांच्या क्षयाची आठवण काढून काढून शोक करीत होते तेथें ते विविध शरांनीं आधींच विद्ध झालेले असून आणखी त्यांत श्रमांची भर पडून ते अत्यंत निद्रावश झाले आणि तेथेंच धरणीवर आडवे झाले! राजा, सर्वदा सुखांत वाढलेले व ज्यांना कधीं दुःखाचे प्रसंगाची माहिती नव्हती, ते महारथ कृपाचार्य आणि कृतवर्मा आज दुःखशोकाकुल होऊन धरणीतलावर पडतांच त्यांना गाढ झोंप आली. नेहमीं उंची बिछान्यावर ज्यांना निजण्याची संवय, ते आज अनाथांप्रमाणें भूमितलावर झोंपीं गेले !

( ३ ) राजा, याप्रमाणें कृप व कृतवर्मा हे निद्रित झाले असतां त्या क्रोध-संतप्त अश्वत्थाम्याला मात्र त्या रात्रीं झोंप मुळींच आली नाहीं ! सर्पाप्रमाणें निश्वास टाकीत तो बसला होता. संतापानें सारखा पेटत असल्यामुळें त्याला झोंप म्हणून येईना ! त्यानें त्या भयंकर अरण्याकडे नजर फेंकली, तों तेथें नाना जातींच्या सर्पांची वस्ती असून त्या वटवृक्षावर असंख्य कावळे बसलेले त्याच्या दृष्टीस पडले. राजा, ते हजारों कावळे पृथक् पृथक् जागीं सुखानें निर्भयपणें निद्रा घेत पडले असतां, तेथें एक भयंकर घुबड आलेलें त्याच्या दृष्टीस पडलें. त्या घुबडाचें शरीर पुष्ट असून त्याचा आवाज भयंकर होता. त्याचे डोळे हिरवे असून तो पिंगटसर वर्णाचा होता. घोणेचा भाग दीर्घ असून त्याचीं नखें तीक्ष्ण होतीं. त्याचा वेग गरुडासारखा होता. हे भारता, त्या घुबडानें हलक्या शब्दांनीं वटवृक्षाच्या शाखेची प्रार्थना केली आणि लपून बसलेल्या पक्ष्याप्रमाणें तें एकदम त्या वृक्षाच्या शाखेवर तुटून पडलें आणि अशा रीतीनें त्या कावळयांच्या अंतकानें झोंपीं गेलेल्या अनेक कावळयांचा नाश केला ! त्यानें कित्येकांचे पंख उपटिले, कित्येकांचीं मस्तकें तोडून टाकिलीं आणि कांहींचे पाय मोडिले ! त्यानें आपले पायांचें आयुध करून क्षणांत जे जे कावळे त्याच्या दृष्टिपथांत आले, त्या सर्वांचा संहार केला ! राजेंद्रा, त्या कावळयांच्या शरीरांनीं व विच्छिन्न होऊन पडलेल्या शरीरावयवांनीं त्या वटवृक्षाच्या सभोंवतालचा सर्व

प्रदेश व्यापून गेला. अशा रीतीनें त्या सर्व कावळ्यांचा निःपात केल्यावर त्या घुबडाला मोठा आनंद झाला !

अशा रीतीनें तो शत्रुसूदन घुबड आपल्या शत्रूंचा यथेच्छ सूड उगवत असतां तें त्याचें रात्रीचें कपटाचरण अश्वत्थाम्यानें पाहिलें आणि त्याच्या कपटगुणाचें अनुकरण आपणहि करण्याचा निश्चय करून त्यानें मनांत म्हटलें, "या युद्धप्रसंगीं या पक्ष्यानें मला चांगलाच उपदेश केला आहे ! शत्रूंचा नाश करण्याला हाच उत्तम काल होय, असें मला वाटत आहे. ह्या जयशाली पांडवांचा वध आज माझ्या हातून होणें शक्य नाहीं. हे मोठे सामर्थ्यवान् व उत्साही आहेत, त्यांचा नेम कधीं चुकत नसतो, तसाच यांचा प्रहारहि असह्य आहे. मी तर त्यांचा वध करण्याची प्रतिज्ञा राजाच्या देखत केली आहे. त्यांच्याशीं धर्मयुद्ध करावें, तर दिव्यावर झडप घालणाऱ्या पतंगाप्रमाणें माझी आत्मविनाशिनी स्थिति होऊन मला प्राणत्याग करावा लागेल, यांत संशय नाहीं. आतां कपटानेंच सिद्धि होऊन शत्रूंचा निःसंशय मोठा क्षय होईल ! संशयित मार्गापेक्षां निःसंदेह मार्गच श्रेष्ठ, असें शास्त्रविशारद माणसांचें मत आहे. म्हणून आतां शास्त्रदूषित किंवा लोकनिंदित मार्गाचा देखील क्षत्रियधर्मानें वागणाऱ्या मनुष्यानें अवलंब करणें योग्य आहे. ह्या दुष्ट पांडवांनींच सर्वप्रकारचीं निंदित व कुत्सित कृत्यें पदोपदीं केलीं आहेत ! प्राचीन काळच्या धर्मशोधक व तत्त्ववेत्त्या विचारी लोकांनीं ह्याविषयीं जें लिहिलें आहे, ते असें आहे कीं, 'शत्रुसैन्य श्रांत झालेलें असो, वैऱ्यांकडून पराभूत झालेलें असो, भोजन करीत असो, कोठें बाहेर जात असो किंवा गृहप्रवेश करीत असो, त्यावर चालून जाऊन त्याचा मोड करावा; तसेंच मध्यरात्रीच्या वेळेस शत्रुसैन्य निद्रिस्थ असतां, त्याचा नायक नष्ट झाला असतां, त्याच्या योद्ध्यांत बेबनाव होऊन द्विधाभाव झाला असतां, त्या सैन्यावर चालून जाऊन त्यास मारावें !' "

( ४ ) राजा, अशाप्रकारें त्या प्रतापवान् द्रोणपुत्रानें रात्रीच्या वेळीं पांचालांसह पांडव झोंपेंत असतां त्यांचा वध करण्याचा निश्चय केला. तो भयंकर विचार मनांत आणून आणि वरचेवर त्यासंबंधीं निश्चयबुद्धि ठरवून त्यानें आपला

१ दुर्जनाचरितं मार्गं प्रमाणं कुर्वते खलाः ।
विश्वस्तान् हिंसितुं द्रौणिरुलूकमकरोद्गुरुम् ॥

मामा कृपाचार्य आणि भोज या दोघांना निद्रेतून उठविलें आणि ते जागे झाल्यावर त्यानें आपला विचार त्यांना कळविला ! त्यांनीं लज्जित होऊन अश्वत्थाम्यास नीटसें उत्तर दिलें नाहीं. नंतर थोडा वेळ विचार करून व डोळयांत अश्रू आणून अश्वत्थामा त्यांस म्हणाला, " सर्व वीरांमध्यें एकवीर असा महाबलिष्ठ दुर्योधन राजा हत झाला; त्याच्याचकरितां आम्हीं पांडवांशीं वैर आरंभिलें. अकरा अक्षौहिणी सैन्याचा अधिपति जो दुर्योधन राजा त्याला युद्धांत एकटा गांठून त्या नीच पांडवांनीं भीमसेनाच्या हातून त्याचा वध करविला ! मूर्धाभिषिक्त झालेल्या राजाचे मस्तकावर त्या अधम भीमसेनानें पाय देऊन हें अत्यंत दुष्ट कृत्य केलें ! आतां पांचाल आनंदित होऊन मोठ्यानें ओरडत आहेत, उड्या मारीत आहेत, हंसत आहेत, शतशः शंख फुंकीत आहेत आणि दुंदुभि वाजवीत आहेत. शंखांच्या निनादांत वाद्यांचा गजर मिसळून त्यांचा तुमुल घोष होत आहे. तो वाऱ्यानें सर्वत्र पसरून त्यानें सर्व दिशा भरून गेल्या आहेत ! अश्वांचें खिंकाळणें, गजांचे चीत्कार आणि शूरांचे सिंहनाद ऐकूं येत आहेत ! पूर्व दिशेकडे मोठ्या आनंदानें जाणाऱ्या योद्धयांच्या रथांचा ध्वनि ऐकूं येत आहे, त्यामुळें अंगावर रोमांच उभे राहत आहेत. ह्या घोर युद्धांत पांडवांनीं कौरवांचा जो भयंकर संहार केला आहे, त्यांतून आम्ही तिघेच काय ते उरलों आहों ! कित्येक नागशतांइतके सामर्थ्यवान् तर कित्येक सर्वास्त्रविशारद अशा अनेक वीरांचा ह्या पांडवांनीं वध केला ! हा काळाचाच फेरा होय, असें मला वाटतें ! कोणतेंहि कार्य अमक्याच रीतीनें झालें पाहिजे, असा एकदां कालाचा निश्चय झाला म्हणजे मग तें कार्य कितीहि दुष्कर असलें, तरी तें तसें व्हावयाचेंच ! या महासंकटांत तुमची बुद्धि मोहित होणार नसेल, तर कोणत्या मार्गानें गेलें असतां आमचें कल्याण होईल, तें सांगा !" १०. १. १.

---

## अध्याय २ रा.

[ १ कृपाचार्यांचा अश्वत्थाम्यास कर्तव्योपदेश. ]

( १ ) **कृपाचार्य**—हे महाभुजा, तूं जें जें कांहीं भाषण केलेंस, तें सर्व मीं ऐकिलें. आतां मला तुला जें कांहीं थोडें सांगावेंसें वाटत आहे, तें तूं ऐकून घे ! सर्व मनुष्यें दैव व प्रयत्न या दोन प्रकारच्या कर्मांनीं बद्ध झालीं आहेत यापलीकडे तिसरें कांहीं नाहीं. जगांत नुसत्या एकट्या दैवानें कार्यें साध्य होत नाहींत किंवा नुसत्या प्रयत्नानेंहि तीं होत नसतात, तर दोहोंचा संयोग होऊनच

तीं साधत असतात. जगांतील सर्व चांगल्या वाईट गोष्टी ह्या दोहोंच्या योगानें प्रवृत्त किंवा निवृत्त झालेल्या दिसून येतात. पर्जन्य पर्वतावर पुष्कळ पडून काय फल देत असतो ? त्याचप्रमाणें नांगरलेल्या क्षेत्रावर पडला असतां तो काय फल देत नाहीं ? दैव सबळ आहे आणि उद्योग नाहीं, तरीहि दैव व्यर्थ होय, हा सिद्धांत पूर्वीपासून चालत आला आहे. शेत चांगल्या रीतीनें नांगरून ठेविलें आणि दैवानें त्यावर चांगली पर्जन्यवृष्टि करावी, म्हणजे ज्याप्रमाणें उत्तम प्रकारचें पीक येतें, त्याप्रमाणेंच मनुष्याच्या कोणत्याहि कार्याची सिद्धि समजावी. आतां त्या दोहोंमध्यें दैव बलवत्तर असल्यामुळें एखादी गोष्ट घडवून आणण्याचा त्यानें एकदां संकल्प केला असतां तें स्वतः प्रयत्नावांचून ती गोष्ट सिद्धीस नेतें. परंतु सुज्ञ लोक प्रयत्नावर भरंवसा ठेवून व दैवाचा आश्रय करून चालतात. हे नरर्षभा, मनुष्याचीं सर्व कार्यें या दोहोंच्याच योगानें सफल किंवा विफल होतात. प्रयत्न केला असतां तो दैवानें सिद्धीस जातो. तसेंच उत्तम प्रकारें प्रयत्न केला असूनहि तो उद्योग व्यर्थ गेल्याचें आपण पहातों. यावरून मनुष्यांमध्यें जे मूर्ख किंवा आळशी असतात, ते प्रयत्नाची थट्टा करितात. परंतु शहाण्यांना तें आवडत नाहीं. उद्योग केला असतां तो व्यर्थ गेल्याचें प्रायशः दिसत नाहीं आणि मनुष्यानें उद्योग केला नाहीं, तर त्याला दुःख प्राप्त होतें. एखाद्या मनुष्याला उद्योग न करितां लाभ होतो किंवा एखाद्याला पुष्कळ उद्योग करून कांहींच लाभत नाहीं, असेंहि होतें. परंतु ह्या दोन्ही गोष्टी घडून येत असतात. जो मनुष्य उद्योगी असतो, तो पोट भरूं शकतो आणि आळशी मनुष्याला सुख कधींच मिळत नाहीं. या लोकामध्यें उद्योगी मनुष्यांचेंच हित झालेलें दिसतें. उद्योगी मनुष्याला उद्योगापासून कदाचित् कांहीं फलप्राप्ति झाली नाहीं, तरी तो लोकांच्या निंदेस पात्र होत नाहीं. उलट उद्योग फलप्रद झाला, तर इष्ट वस्तु मिळते. जो कोणी उद्योगावांचून फल मिळवितो, त्याची जनांत निंदा होते आणि तो दुसऱ्यांच्या द्वेषास पात्र होतो. या गोष्टीकडे दुर्लक्ष्य करून जो भलत्या मार्गानें जातो, तो आपल्यावर संकटें ओढवून आणतो, असें सुज्ञ लोकांचें म्हणणें आहे.

उद्योग आणि दैव यांतून कोणतीहि एखादी बाजू लंगडी पडल्यास कार्यसिद्धि होत नाहीं. ज्यांत उद्योग नाहीं, असें कोणतेंहि कार्य सिद्धि पावत नाहीं. म्हणून प्रथमतः देवतांना नमस्कार करून जो दक्षतेनें कार्यारंभ

करितो, त्याला अपयश म्हणून येणार नाहीं. योग्य रीतीनें कोणतेंहि कार्य करणें म्हणजे वृद्ध व वडील माणसांकडे जाऊन कोणती गोष्ट श्रेयस्कर होईल हें त्यांस विचारावें आणि ते सांगतील त्याप्रमाणें करावें. उद्योगी मनुष्यानें वडील मनुष्यांचा उपदेश पदोपदीं घ्यावा. कार्यसिद्धि करून घेण्यास तेंच योग्य साधन असून त्याच्याच योगें यशःसिद्धि होत असते. वृद्धांचें वचन ऐकून जो आपल्या प्रयत्नाची योजना करितो, त्याला उद्योगाचें फल त्वरित मिळतें. जो कोणी प्रेमभावानें, संतापानें, भयानें किंवा लोभानें एकाद्या वस्तूवर लोभ ठेवून तीविषयीं यत्न करितो, तो निरर्गल व अवमानी लौकरच वैभवाला मुकतो !

अशाच तऱ्हेचा उद्योग ह्या लुब्ध आणि अदूरदर्शी दुर्योधनानें कोणत्याहि प्रकारचा विचार न करितां मूर्खपणानें केला. आपल्या कल्याणकर्त्यांचा उपदेश न ऐकतां असाधु जनांच्या मसलतीनें तो वागला. आपल्यापेक्षां गुणवत्तर अशा पांडवांशीं सर्वांनीं निवारण केलें असतांहि त्यानें वैर केलें ! हा पूर्वींपासूनच दुःशील असल्यामुळें त्याच्या हातून कोणतेंहि कार्य धैर्यानें होईनासें झालें आणि संकटकाल प्राप्त झाला असतां संताप करून तो आपल्या मित्रांचाहि सल्ला घेईना. त्या पापी पुरुषाचा पक्ष स्वीकारून आम्ही वागल्यामुळें आमच्यावर हा असा भयंकर प्रसंग येऊन ठेपला ! त्या संकटामुळें मी इतका संतप्त झालों आहें कीं कितीहि विचार केला तरी स्वतःचें कल्याण कशांत आहे, तेंच समजत नाहीं ! ज्याच्या बुद्धीला मोह होत असतो, तो आपल्या इष्टमित्रांचा उपदेश घेत असतो. कारण त्यांच्या उपदेशामध्यें ह्याला आवश्यक असें बुद्धिकौशल्य व धोरण सांठविलेलें असतें आणि त्यामुळेंच ह्याला आपला कल्याणमार्ग दिसून येतो. अशा शहाण्या सुहृज्जनांचा उपदेश घेतल्यानें ते ह्याच्या कार्यभागाचा विचार करतील, मग ते जें कांहीं करायला सांगतील, त्याप्रमाणें करावें. तर आपण आतां सर्व मिळून धृतराष्ट्र, गांधारी आणि महामति विदुर यांजकडे जाऊं आणि त्यांचें मत घेऊं. ते आपणाला जो कल्याणाचा मार्ग दाखवितील, तो आपण स्वीकारावा, असें माझें मत आहे. आपण कार्याला आरंभच केला नाहीं, तर कार्यसिद्धि कधींहि होणार नाहीं. प्रयत्न करूनहि ज्यांचें कार्य होत नाहीं, ते हतभागीच समजले पाहिजेत; त्याबद्दल जास्त विचार करण्याचें कारण नाहीं ! १०. १. २.

---

## अध्याय ३ रा.

[ १ कृपाचार्यांच्या वचनाचा अनादर करून कृप आणि कृतवर्मा यांपुढें झोंपीं गेलेल्या पांडवांचा आणि पांचालांचा वध करण्याची अश्वत्थाम्याची प्रतिज्ञा. ]

( १ ) **संजय**—हे राजा, कृपाचार्यांचें धर्मार्थयुक्त व शुभ भाषण ऐकून अश्वत्थामा दुःखव्याकुळ व शोकपूरित होऊन गेला. अग्नीप्रमाणें तो नखशिखांत पेटला आणि मोठ्या निष्ठुरतेनें त्या दोघांना म्हणाला, "प्रत्येक मनुष्यामध्यें जी म्हणून बुद्धि सांठविली असते तिच्यावरच तो संतुष्ट असतो. प्रत्येक मनुष्य आपणाला मोठा बुद्धिवान् समजत असतो आणि आपणाला धन्य समजून आपली प्रशंसा करीत असतो. अशी प्रत्येकाची बुद्धि आपली स्वतःची प्रशंसा करून घेण्यांत मग्न असते. सर्वजण परबुद्धीची निंदा करून आपलीच स्तुति करीत असतात. कारणपरत्वें जे एकचित्त होऊन कांहीं कालपावेतों एकमेकांवर संतुष्ट राहतात आणि परस्परांबद्दल प्रेम दाखवितात, ते कालांतरानें एकमेकांचे विरोधी होतात. विशेषेंकरून मनुष्याचे चित्तवैचित्र्यामुळें मन विह्वल झालें असतां प्रत्येकाला वेगवेगळी बुद्धि सुचत असते. ज्याप्रमाणें एखादा कुशल वैद्य व्याधीची परीक्षा करून यथाशास्त्र उपाययोजना करितो, त्याप्रमाणें आपल्या बुद्ध्यनुसार इष्टकार्यसिद्ध्यर्थ दुसरीं मनुष्यें त्याला नांवें ठेवीत असलीं तरी तो युक्त्या योजीत असतो. तारुण्यांत मनुष्याची बुद्धि एक प्रकारची असते, मध्यम वयांत तिला वेगळें वळण लागतें व वृद्धावस्थेंत त्याला तिसरीच बुद्धि पसंत पडते."

"हे भोजा, एखादें मोठें संकट किंवा भाग्यकाल प्राप्त झाला असतां मनुष्याच्या बुद्धींत फरक होतो. एकाच मनुष्यामध्यें प्रथम जी बुद्धि असते, ती पुढें समयानुरूप त्याला नापसंत होते. आपल्या मनाशीं ताडून पाहून जी मति त्याला योग्य वाटेल, तिचा अवलंब करून तो आपलें कार्य करीत असतो आणि अशाच रीतीनें त्याचा उद्योग चाललेला असतो. हे कृतवर्मन्, प्रत्येक मनुष्य हें कृत्य चांगलें असें एकदां निश्चित करून मग जिवावर उदार होऊन कार्य करण्यास प्रारंभ करितो. आपल्या मनाशीं निश्चित बुद्धि ठरवून मनुष्यें वेगवेगळे उद्योग करीत असतात व त्यांतच आपलें हित आहे, असें त्यांस वाटत असतें !

"आतां या संकटकालीं मला जी बुद्धि सुचली आहे व जीमुळें माझा

शोकहि नाहींसा झाला आहे, ती तुम्हांला सांगतों. ब्रह्मदेवानें सर्व प्रजा निर्माण करून त्यांच्या मागें वेगवेगळें कर्म लावून दिलें आहे. त्यानें वर्णा-वर्णांच्या ठिकाणीं एकएक गुण नेमून दिला आहे. ब्राह्मणाच्या ठिकाणीं श्रेष्ठ-प्रकारची विद्या, क्षत्रियाच्या ठिकाणीं उत्तम तेज, वैश्यामध्यें उद्योगाविषयीं दक्षता आणि शूद्रामध्यें वरील तीनहि वर्णांविषयीं प्रेमबुद्धि त्यानें ठरवून दिली आहे. ज्यानें मनोविकार दमन केले नाहींत तो ब्राह्मण असाधु होय, पराक्रम-हीन क्षत्रिय अधम होय, असावध वैश्य निंद्य होय आणि तिन्ही वर्णांशीं प्रति-कूलतेनें वागणारा शूद्र नीच होय !

"मी ब्राह्मणाच्या श्रेष्ठ व पूज्य कुलामध्यें जन्मलों असून माझ्या मंद भाग्यानें मी क्षात्रधर्माचा स्वीकार केला आहे. क्षत्रिय धर्म एकदां स्वीकारून मी ब्राह्मण्याला अनुसरून शमदमादि मोठमोठीं साधनें करूं लागेन, तर ती गोष्ट सज्जनांना मान्य होणार नाहीं. दिव्य अस्त्रें धारण करून पित्याचा वध रणांगणांत झालेला पाहून मी आतां सभेमध्यें काय बरें सांगावें ? आज मी क्षत्रियधर्माचें मनःपूर्वक आचरण करून दुर्योधन राजाचा व माझ्या महात्म्या पित्याचा उतराई होईन ! आज विजयी पांचाल योद्धे रथ, कवचें इत्यादि युद्धसामग्री बाजूला ठेवून मोठ्या हर्षानें निद्रा घेत असतील. ते श्रमानें श्रांत होऊन विजयानंदामुळें आपल्या शिबिरांत स्वस्थ निद्रावश होऊन पडले असतां त्यांवर वेगानें छापा घालीन आणि इंद्रानें दैत्यांचा ज्याप्रमाणें संहार उडविला, त्याप्रमाणें सर्वांना मारून त्यांच्या प्रेतांचे ढीग करून पृथ्वीतलावर पाडीन! वणवा पेटला असतां ज्याप्रमाणें तो सर्व रान खाक करून टाकतो, त्याप्रमाणें धृष्टद्युम्नादि सर्व वीरांचा मी निःपात करीन ! अशारीतीनें त्या पांचालांचा वध केल्यानेंच माझ्या मनाला शांति मिळेल !

"ज्याप्रमाणें पिनाकपाणि रुद्र क्रुद्ध होऊन पशूंचा संहार करितो, त्याप्रमाणें मी आज सर्व पांचालांचा व पांडुपुत्रांचाहि वध करीन आणि मोठ्या संतोषानें त्यांचीं प्रेतें ओढून टाकीन ! मी सर्व पांचालांच्या प्रेतांचें आज भूमातेला दान करीन ! अशा प्रकारें त्यांपैकीं प्रत्येकाचा वध करून मी पित्याच्या ऋणांतून मुक्त होईन ! त्याबरोबरच दुर्योधन, कर्ण, भीष्म आणि जयद्रथ यांचाहि ती उतराई होईन ! मी आज पांचालांची दुर्दशा उडविणार ! आज रात्रीं त्या पांचालराज धृष्टद्युम्नाचें शीर्ष पशूच्या मस्तकाप्रमाणें मी क्षणांत

फोडीन! हे गौतमा, आज पांचाल आणि पांडव यांचीं मुलें निजलीं असतील, त्या सर्वांचा या तीक्ष्ण खड्गानें संहार करीन! हे महामते, आज रात्रीं सर्व पांचालसेनेचा संहार झोंपेंत करून मी कृतकृत्य व सुखी होईन!" १०. १. ३.

---

## अध्याय ४ था.

[ १ अश्वत्थामा व कृपाचार्य यांचा संवाद. ]

( १ ) कृपाचार्य—हे अश्वत्थामन्, शत्रूंचा सूड घेण्याची तुला जी बुद्धि सुचली ती खरोखरच स्तुत्य आहे. वज्रपाणि इंद्र जरी स्वतः आला, तरी तो तुझें निवारण करूं शकणार नाहीं. आम्हीहि तुझ्या मदतीकरितां प्रभातकालीं येऊं! कवचादि काढून तूं आज रात्रभर विश्रांति घे. मी आणि सात्वत कृतवर्मा कवचें घालून रथावर बसूं व उद्यां तूं शत्रूंवर पराक्रम गाजविण्यास निघशील तेव्हां तुझ्यामागून येऊं. तूं आपल्या पराक्रमानें शत्रू व त्यांचे अनुचर या सर्वांचा वध करशील. कारण तुझा पराक्रम तसाच आहे. एवढी रात्र तूं विश्रांति घे. तुला रात्रीं फार जागरण झालें आहे. म्हणून तूं ह्या रात्रभर झोंप घे. हे मानदा, तूं रात्रभर विश्रांति घेऊन स्वस्थचित्त झाल्यावर आम्हांसहित शत्रूंवर जाऊन त्यांचा वध करशील, यांत संशय नाहीं. बाबा, वीरांमध्यें तूं श्रेष्ठ आहेस, तूं आपलीं श्रेष्ठ आयुधें घेऊन युद्धाला निघालास, म्हणजे साक्षात् देवराज इंद्रहि तुला जिंकूं शकणार नाहीं. अरे, हा कृपाचार्य बरोबर असतां आणि कृतवर्मा तुझें रक्षण करीत असतां क्षुब्ध झालेल्या तुजपुढें इंद्र जरी आला, तरी तो काय करणार? म्हणून आम्ही एवढी रात्र झोंप घेऊं आणि विश्रांति घेतल्यावर अगदीं पहांटेला मोठ्या हुशारीनें शत्रूंचा वध करूं. तुझीं अस्त्रें दिव्य आहेत. माझींहि तशींच आहेत आणि हा सात्वत कृतवर्मा मोठा धनुर्धर असून युद्धांतहि तसाच कुशल आहे. तर आम्ही सर्व एकत्र होऊन जमून आलेल्या सर्व शत्रूंचा रणांत वध करून आनंदित होऊं. वत्सा, रात्रभर स्वस्थ मनानें खुशाल निद्रा घे.

हे नरोत्तमा, तूं रथांत बसून निघालास म्हणजे मी आणि कृतवर्मा दोघेहि कवचें धारण करून व रथांत बसून तुजबरोबर येऊं. नंतर तूं त्यांच्या शिबिरांत जाऊन आपलें नांव त्यांस सांग आणि युद्धांत सर्व शत्रूंना गांठून समरांगणांत

त्यांचा संहार कर! मग प्रभात होतांच इंद्रानें महासुरांचा वध करून जसा आनंद केला तसा तूंहि कर! जसा तो दैत्यशत्रु इंद्र क्रुद्ध होऊन सर्व दैत्यसेनेला जिंकण्याविषयीं समर्थ होता, तसा तूंहि सर्व पांचालसेना रणांगणांत जिंकूं शकशील! माझ्यासहित तूं रणांत प्रवेश केला असतां आणि कृतवर्मा तुझें रक्षण करीत असतां साक्षात् वज्रपाणि इंद्र जरी उतरून आला, तरी त्याचाहि तुजपुढें टिकाव लागणार नाहीं! वत्सा, समरांगणांत मी किंवा कृतवर्मा पांडवांना जिंकल्याशिवाय कधींहि माघार घेणार नाहीं. त्या क्रुद्ध पांचालांचा पांडवांसह रणांत वध करून येऊं किंवा रणांत मृत्यु पावून स्वर्गाला तरी जाऊं! प्रभातकालीं आम्ही तुला सर्व तऱ्हेनें मदत करूं! हे अनघा, हें मी तुला सत्य सांगत आहें!"

मामाचें असें हितकारक भाषण श्रवण करतांच अश्वत्थाम्याला संताप चढला आणि तो डोळे लाल करून आवेशानें त्याला बोलला, "मनुष्य दुःखविह्वल किंवा संतप्त असला, अथवा एखादा अर्थ साधण्याकरितां विचार करीत असला किंवा कांहीं गोष्टीचें सतत चिंतन करीत असला, तर त्याला निद्रा कशी यावी? ह्या चारहि गोष्टी आज माझ्यामध्यें आहेत, हें लक्ष्यांत आण. ह्या चार प्रकारांपैकीं एक जो संताप तो माझ्या निद्रेचा क्षणोक्षणीं भंग करीत असतो. पितृवध मनांत येऊन माझ्या मनाला कितीतरी दुःख होत असेल? तें दुःख माझ्या हृदयाला जाळून टाकीत आहे. माझ्या अंतःकरणांत झालेल्या दुःखाचा रात्रंदिवस केव्हांच उपशम होत नाहीं. त्यांत विशेषेंकरून त्या पाप्यांनीं माझ्या पित्याला मजसमक्ष मारिलें, ही गोष्ट माझ्या अंतःकरणाला घरे पाडीत आहे! माझ्यासारखा मनुष्य या जगांत एक क्षणभर तरी जगला कसा? आणि 'द्रोणाचार्य मारला गेला,' हे पांचालांचे आनंदाचे उद्गार मीं ऐकून तरी कसे घ्यावे? धृष्टद्युम्नाची सरशी झाल्यामुळें मला जगावें, असें सुद्धां वाटत नाहीं. त्यानें माझ्या पित्याचा वध केला असल्यामुळें तो आणि त्याचे सोबती सर्व पांचाल वीर यांचाहि वध झाला पाहिजे!

"दुर्योधन राजाच्या मांड्या भग्न होऊन त्यानें केलेला विलाप मीं ऐकिला; तशा प्रकारच्या विलापानें कोणत्या मनुष्याचें अंतःकरण मग तो निर्दय असला तरी फुटल्यावांचून राहील बरें? मनुष्य कितीहि अकरुण असला, तरी त्याच्याहि डोळ्यांतून दुःखाश्रू आले असते. ऊरुभंग पावलेल्या दुर्योधनाचे उद्गार

ऐकून आणि मी जिवंत असतांहि आमच्या पक्षाचा पराभव झालेला मनांत येऊन वारिवेगानें ज्याप्रमाणें समुद्र फुगतो, त्याप्रमाणें माझा शोक वाढून अनावर होतो. एकांतांत विचार सुरू होऊन निद्रा कोठून मिळणार आणि सुखाची तरी प्राप्ति कशी होणार ? जोंपर्यंत आमचे शत्रूंचें रक्षण वासुदेव आणि अर्जुन ह्यांकडून होत आहे, तोंपर्यंत ते इंद्रालाहि अजिंक्य आहेत असें माझें मत आहे. तथापि उत्पन्न झालेला कोप मला आंवरतां येत नाहीं. या कोपापासून मला परावृत्त करील असा मनुष्यहि या लोकांत कोणी दिसत नाहीं ! माझ्या मनाची जी निश्चयबुद्धि झाली आहे, तीच मला पसंत वाटत आहे. माझ्या मित्रांचा पराभव होऊन पांडवांचा जय झाला, ही गोष्ट वार्तिकांच्या तोंडून ऐकिल्यापासून माझ्या हृदयांत दुःखाग्नि सारखा पेटत आहे. आज शत्रु निजले असतां त्यांचा वध करून मी संतापहीन होईन आणि मग सुखानें निद्रा घेईन." १०. १. ४.

---

## अध्याय ५ वा.

[ १ कृपाचार्य व अश्वत्थामा यांचा संवाद. २ अश्वत्थाम्याचें शत्रूच्या शिबिर-द्वारीं आगमन. ३ सौहार्दामुळें कृप व कृतवर्मा अश्वत्थाम्याच्या मागून जातात. ]

(१) कृप—दुर्बुद्धि मनुष्य एकदां मनोविकारांच्या स्वाधीन झाला म्हणजे त्यानें धर्मार्थ समजून घेण्याचा कितीहि प्रयत्न केला, तरी तो व्यर्थच होय असें मला वाटतें. तसेंच मनुष्य कितीहि बुद्धिवान् असला आणि त्याला जर नैतिक शिक्षण मिळालें नाहीं, तरीहि त्याला धर्मार्थांचें ज्ञान होणार नाहीं. त्याचप्रमाणें बुद्धीचा जड मनुष्य कितीहि सामर्थ्यवान् असला आणि त्यानें पंडिताजवळ फार दिवस राहून जरी त्याची सेवा केली, तरी त्याला पक्वान्नांत बुडवून ठेवलेल्या पळीप्रमाणें धर्माचीं तत्त्वें समजणें शक्य नाहीं. उलट एकादा प्राज्ञ मनुष्य पंडिताजवळ स्वल्पकाळ जरी राहिला, तरी जिह्वेला ज्याप्रमाणें पक्वान्नांची रुचि तत्काळ समजते, त्याप्रमाणें त्याला धर्मतत्त्वें समजूं लागतात ! मेधावी मनुष्य नियतेंद्रिय असून ज्ञानसंपादनाची त्याला आवड असेल, तर त्याला सर्व शास्त्रें अवगत होतील आणि जो भाग त्याला घेण्यासारखा असेल त्याला विरोध तो कधींहि करणार नाहीं. परंतु जो कोणाचेंहि ऐकणार नाहीं, जो सर्वदा हितकर्त्यांचा अवमान करणारा, दुरात्मा आणि पापी असतो, तो कोणी कल्याण मार्ग दाख-

विला, तरी त्याला टाकून पापमार्गालाच अनुसरतो ! सुहृद् असतात, ते त्याला पापकर्मापासून परावृत्त करूं पाहतात; परंतु तो दैववान् असल्यास त्यांच्या उपदेशानें माघारा फिरतो, परंतु तो दुर्दैवी असल्यास त्यांचें म्हणणें न ऐकतां विपरीत वागत असतो ! भ्रांतचित्त मनुष्याचें नानाविध भाषणांनीं नियमन करतां येतें, तसेंच सुहृज्जनांकडूनहि त्याला सन्मार्गावर आणतां येतें. असें शक्य नसल्यास, त्याचा नाश हा ठेवलेलाच असतो. अशारीतीनें पापकर्माला प्रवृत्त होणाऱ्या जाणत्या मनुष्याचा ज्ञानी मनुष्य यथाशक्ति पुनःपुनः निषेध करीत असतात.

वत्सा, हितमार्गाकडे लक्ष्य देऊन आणि मन ताब्यांत ठेवून माझ्या सांगण्याप्रमाणें वाग, म्हणजे मग तूं पश्चात्तापांत पडणार नाहींस ! निद्रावश झालेल्यांचा वध करणें धर्मशास्त्राला संमत नाहीं. त्याचप्रमाणें ज्यांनीं शस्त्रें ठेविलीं आहेत, ज्यांनीं रथ, अश्व इत्यादि वाहनांचा त्याग केला आहे, जे 'मी तुझा आहें' असें म्हणून आश्रयाला आले, जे शरण आले आहेत, अशांचा वध करणें कधींहि प्रशस्त नाहीं. आज पांचाल कवचें काढून सारी रात्र निर्धास्तपणें प्रेतांप्रमाणें निद्रावस्थेंत पडून राहतील; त्यांचा जो कपटानें घात करण्यास प्रवृत्त होईल तो अगाध, भयंकर व दुस्तर नरकांत पडेल यांत संशय नाहीं ! जगांतील सर्व अश्वशास्त्रवेत्त्यांमध्यें तूं श्रेष्ठ आहेस. तसेंच ह्या लोकीं यत्किंचितहि पातक आजपर्यंत तुला लागलेलें नाहीं. तूं सूर्यासारखा तेजस्वी आहेस; तरी उद्यां सकाळीं सूर्योदय होतांच सर्व भूतांच्या साक्षीनें रणांगणांवर शत्रूंना जिंकून टाक ! कोणतेंहि निंद्य कर्म तुझ्या हातून होणें हें तुला शोभादायक नाहीं. शुक्ल वस्त्रावर रक्तपात झाल्यासारखें तें कर्म होईल, असें मला वाटत आहे !

अश्वत्थामा—मामा, तूं मला जें जें सांगितलेंस, तें सर्व खरें आहे, यांत संशय नाहीं. परंतु हा शास्त्रसेतु त्यांनींच भेदून टाकिला आहे. अनेक राजे आणि तूंहि सन्निध असतां माझ्या न्यस्तशस्त्र पित्याचा धृष्टद्युम्नानें वध केला ! रथिश्रेष्ठ कर्णाचें रथचक्र भूमींत रुतून तो संकटांत सांपडला असतां अर्जुनानें त्याला मारलें ! त्याचप्रमाणें शिखंडीला पुढें करून न्यस्तशस्त्र व निरायुध शंतनुपुत्र भीष्माला अर्जुनानें मारिलें ! महाधनुर्धर भूरिश्रवा रणांत सहज सांपडला असतां व सर्व राजे आक्रोश करीत असतां त्यांचेसमक्ष सात्यकीनें त्याचा वध केला !

समरांगणांत भीमानें दुर्योधनाला गांठून सर्व राजांच्या समक्ष अधर्मानेंच त्याला गदेनें पाडिलें. पुष्कळ महारथ्यांनीं एकट्या दुर्योधनाला वेढल्यावर भीमसेनानें अधर्मानें त्या नरव्याघ्राला मारिलें ! त्या भग्नजानु दुर्योधनाचा विलाप वार्तिकांकडून माझ्या कानीं आला, तो ऐकून माझ्या हृदयाला घरे पडत आहेत ! अशा रीतीनें ज्यांनीं धर्ममर्यादेचा भंग केला, त्या पापी व अधार्मिक पांचालांची तूं कां बरें निंदा करीत नाहींस ? माझ्या पित्याचा वध ज्यांनीं केला, त्या पांचालांना आज रात्रीं ते निद्रित असतां मी मारून टाकणार ! त्यामुळें मला कीट किंवा पतंग यांचा जन्म प्राप्त झाला तरी हरकत नाहीं ! हें काम माझ्या हातून केव्हां होईल, याविषयीं माझ्या मनाला सारखी हुरहूर लागली आहे ! अशा स्थितींत मला निद्रा किंवा सुख तरी कोठून मिळणार ! त्यांच्या वधाविषयीं मीं केलेला निश्चय फिरवील असा कोणी मनुष्य जगांत झाला नाहीं व पुढेंहि होणार नाहीं !

( २ ) **संजय**—महाराजा, असें बोलून त्या प्रतापी अश्वत्थाम्यानें एकांतांत रथाला अश्व जुंपले आणि तो शत्रूंवर धांवला. तें पाहून कृपाचार्य व कृतवर्मा यांनीं त्याला विचारिलें, ‘ अरे, तूं हा रथ काय उद्देशानें जोडलास ? तुझ्या मनांत काय करावयाचें आहे ? हे नरश्रेष्ठा, तुझे जे प्रयत्न आणि साहित्य तेच आमचे प्रयत्न आणि साहित्य होय. तुझें सुखदुःख तेंच आमचें सुखदुःख, याविषयीं मनांत किंचित्हि शंका आणूं नकोस ! ’ तेव्हां त्या क्रुद्ध अश्वत्थाम्यानें आपल्या पित्याचा वध आठवून जें करण्याचें मनांत योजिलें, तें सर्व त्यांस सांगितलें. तो म्हणाला, “ माझ्या पित्यानें तीक्ष्ण बाणांनीं लक्षावधि योद्धयांचा संहार करून न्यस्तशस्त्र झाला असतां त्या धृष्टद्युम्नानें त्याला मारिलें ! मीहि तसाच त्या पापी व अधर्मी पांचाल राजपुत्राचा दुष्ट उपायांनींच वध करणार ! माझ्या हातून तो पापी पशूप्रमाणें मारला गेला असतां युद्ध करून धारातीर्थीं देह ठेवल्यानें मिळणारी गति त्याला मिळणार नाहीं, असें मला वाटतें, तर महारथी वीरहो, तुम्ही कवचें धारण करून व खड्ग-धनुष्यें हातांत घेऊन माझ्या मागें सिद्ध रहा ! ”

( ३ ) राजा, असें बोलून अश्वत्थामा रथावर चढला आणि शत्रूंवर चाल करून गेला. त्याच्या मागून कृपाचार्य व कृतवर्मा हेहि निघाले. तेव्हां ते शत्रूंवर चालून जाणारे तिघे यज्ञांतील आहुतींनीं समिद्ध अशा तीन अग्नींप्रमाणें

शोभायमान दिसले. हे राजा, मग जेथें शत्रूंकडील लोक गाढ झोंप घेत होते, अशा त्या शिबिरांत ते येऊन पोंचले. तेथें तो महारथ अश्वत्थामा शिबिराच्या द्वारदेशीं येऊन थांबला. १०. १. ५.

## अध्याय ६ वा.

[ १ अश्वत्थाम्याला शिबिरद्वारीं महद्भूतदर्शन. २ अश्वत्थाम्यानें टाकलेल्या शस्त्रास्त्रांचें त्याकडून ग्रसन. ३ पश्चात्तापानें अश्वत्थाम्यानें केलेली महादेवोपासना. ]

( १ ) धृतराष्ट्र—संजया, द्वारदेशीं अश्वत्थामा उभा आहे, असें पाहून कृपाचार्य व कृतवर्मा यांनीं काय केलें, तें मला सांग !

संजय—तो क्रोधसंतप्त महारथ अश्वत्थामा कृप व कृतवर्मा यांचा विचार घेऊन शिबिरद्वारीं येऊन पोंचला. तेथें येतो तों दार अडवून बसलेलें एक महद्भूत त्याच्या दृष्टीस पडलें. त्याचें शरीर मोठें धिप्पाड असून त्याची कांति चंद्रसूर्यांप्रमाणें होती. त्याचें स्वरूप अंगावर रोमांच उभें करण्यासारखें भयंकर होतें. त्यानें अंगावर व्याघ्रचर्म धारण केलें होतें. त्याच्या अंगावरून रुधिराचे लोट वहात होते. त्यानें कृष्णाजिन परिधान केलें होतें; त्याचें यज्ञोपवीत नागांचें होतें. त्यानें आपल्या लांब व पुष्ट हातांत नाना प्रकारचीं आयुधें धारण केलीं होतीं. बाहुभूषणांच्या ठिकाणीं त्यानें मोठमोठे सर्प बांधले होते. त्यांच्या तोंडांतून मोठमोठ्या ज्वाला निघत होत्या. त्याचें तोंड पसरलेलें असल्यामुळें दांत दिसत होते. त्यामुळें तें भयंकर झालें होतें. त्याचे चित्रविचित्र सहस्र डोळे होते, त्यांयोगें त्याचें स्वरूप भीषण दिसत होतें. त्याचें स्वरूप व वेष यांचें वर्णन करणेंहि शक्य नाहीं ! तें पाहिल्यावर प्रत्यक्ष पर्वत देखील भयानें फुटून जातील, इतकें तें भयंकर होतें ! त्याचें तोंड, नाक, कान आणि हजारों डोळे यांतून सारख्या ज्वाला निघत होत्या. त्याच्या तेजाच्या किरणांतून शंख, चक्र, आणि गदा धारण करणाऱ्या हजारों कृष्णमूर्ति दिसूं लागल्या !

( २ ) अश्वत्थाम्यानें तें अद्भुत भयंकर भूत पाहिलें तरी त्याच्या मनाला यत्किंचितहि भीति वाटली नाहीं. त्यानें त्याजवर दिव्य अस्त्रवृष्टि केली, परंतु समुद्रांतील वडवानल ज्याप्रमाणें पाण्याचे ओघ शोषून टाकतो, त्याप्रमाणें त्या महाभूतानें अश्वत्थाम्याचे सर्व बाण गिळून टाकिले ! आपले सर्व बाण त्या भूतानें निरर्थक करून टाकल्याचें पाहून त्यानें अग्निशिखेप्रमाणें प्रदीप्त अशी

आपली रथशक्ति त्याच्यावर सोडली ! ती दीप्ताग्र रथशक्ति त्याच्या अंगावर आपटून भंगून गेली ! राजा, मिथुनराशीच्या शेवटीं सूर्याचें तेज अतिदीप्त असतां एकादी मोठी उल्का आकाशांतून सूर्यावर पडून खाक होऊन जावी, त्याप्रमाणें त्या शक्तीची स्थिति झाली ! नंतर अश्वत्थाम्यानें बिळांतून दिव्य सर्प बाहेर ओढून काढावा, त्याप्रमाणें सोन्याच्या मुठीचें अतितेजःपुंज खड्ग म्यानांतून काढिलें आणि तें त्या भूतावर सोडलें. परंतु नकुल जसा बिळांत शिरतो, त्याप्रमाणें तें खड्ग त्याच्या अंगांत शिरून लुप्त झालें ! मग त्या संतप्त अश्वत्थाम्यानें विद्युल्लतेसमान आपली गदा त्या भूतावर सोडली, परंतु तिचाहि त्यानें ग्रास केला !

( ३ ) राजा, इतकें झाल्यावर आपल्या जवळचीं सर्व आयुधें संपलीं, असें अश्वत्थाम्याच्या नजरेस आलें आणि सर्व आकाश जनार्दनाच्या मूर्तींनीं व्यापून गेल्याचें त्याला आढळून आलें ! तेव्हां निरायुध अश्वत्थामा तो अद्भुत प्रकार पाहून आणि कृपाचार्यांचें भाषण ध्यानांत आणून म्हणाला, “ आधीं अप्रिय परंतु शेवटीं हितकारक असा मित्रांचा उपदेश जो ऐकत नाहीं, तो आपत्तींत पडला असतां माझ्याप्रमाणें शोकांत पडतो. त्या दोघांच्या म्हणण्याप्रमाणें मी न वागल्यामुळें माझ्यावर हा प्रसंग आला आहे. शास्त्रांत जे अवध्य म्हणून सांगितले आहेत, त्यांना शास्त्राज्ञा झुगारून जो मारूं पाहतो, तो सन्मार्गापासून असन्मार्गांत पडून आपला घात करून घेतो. गाई, ब्राह्मण, राजा, स्त्रिया, मित्र, माता, गुरू, लुले, जड, अंध, सुप्त, दचकून उठलेले, डोकें फिरलेले इत्यादि प्रकारच्या मनुष्यांवर केव्हांहि शस्त्रप्रहार करूं नये ! अशा प्रकारचा उपदेश गुरुजनांनीं सर्व मनुष्यांना केलेला आहे ! तो सनातन शास्त्रसंमत मार्ग सोडून दुर्मार्गाचें अवलंबन करून मी या भयंकर संकटांत पडलों आहें ! मनुष्यानें एकाद्या महत् कार्यास हात घालावा आणि तें काम शेवटाला नेण्याचें आपणाला सामर्थ्य नाहीं असें पाहून भीतीनें माघार घ्यावी ही फार मोठी आपत्ति होय, असें विद्वान् लोकांचें मत आहे. दैवापुढें मानुषी कृति कांहीं चालत नाहीं, असें म्हटलें आहे. मनुष्य प्रयत्न करीत असतां दैवयोगानें तो यत्न साधत नाहींसें झाल्यास तो धर्ममार्गापासून च्युत होतो आणि संकटांत पडतो. कोणत्याहि गोष्टीची प्रतिज्ञा करणें म्हणजे मूर्खपण होय, असें विद्वान् लोक म्हणतात. कारण एकाद्या कार्याला आरंभ करून मग मनुष्य भीतीनें माघार घेतो. तर माझ्या अधर्माचरणानेंच हें भय आज मला प्राप्त झालें आहे. द्रोणसुत अश्व-

त्थामा युद्धांतून कधींहि मागें फिरणार नाहीं; परंतु हें महद्भूत काळदंडाप्रमाणें माझ्यापुढें उभें आहे! मीं सर्व प्रकारें विचार करून पाहिला, तरी हें काय आहे तें मला समजत नाहीं. एकंदरींत माझी कलुषबुद्धि अधर्माकडे वळली आणि तिचेंच हें घोर फल असून याचा परिणाम फार भयंकर होणार, यांत संशय नाहीं. मीं आज युद्धांतून मागें फिरावें ही गोष्ट दैवविहित आहे. दैवसंकल्पाविरुद्ध जाणें कोणालाहि शक्य नाहीं. म्हणून मी आतां सर्वशक्तिमान् प्रभु जो शंकर त्याला शरण जातों म्हणजे तो ह्या घोर दैवदंडाचा नाश करून टाकील! तो निरामय, जटाधारी, देवांचा देव, उमापति, रुद्र, भगनेत्रहर, हर, विक्रमानें आणि तपानें सर्व देवांहून अधिक आहे. अशा त्या गिरीश शूलपाणि शंकरालाच मी शरण जातों!" १०. १. ६.

---

## अध्याय ७ वा.

[ १ अश्वत्थाम्याचें शिवस्तवन. २ अश्वत्थाम्यापुढें कांचनवेदीमध्यें अग्नीचा उद्भव. ३ अश्वत्थाम्यास शिवदर्शन व खड्गप्राप्ति. ]

( १ ) **संजय**—हे महाराजा, असा विचार करून तो द्रोणपुत्र अश्वत्थामा रथांतून खालीं उतरला आणि नम्रपणानें देवेश शंकराचें ध्यान करीत राहिला. तो म्हणालाः—

उग्रं स्थाणुं शिवं रुद्रं शर्वमीशानमीश्वरम् ।
गिरिशं वरदं देवं भवभावनमव्ययम् ॥ १
शितिकंठमजं शुक्रं दक्षक्रतुहरं हरम् ।
विश्वरूपं विरूपाक्षं बहुरूपमुमापतिम् ॥ २
स्मशानवासिनं दृप्तं महागणपतिं विभुम् ।
खट्वांगधारिणं रुद्रं जटिलं ब्रह्मचारिणम् ॥ ३
मनसा सुविशुद्धेन दुष्करेणाल्पचेतसा ।
सोहमात्मोपहारेण यक्ष्ये त्रिपुरघातिनम् ॥ ४

---

१ ह्या दहाहि श्लोकांत शंकराचीं अनेक नांवें आलीं आहे. त्या नांवांनीं शंकराला अश्वत्थामा संबोधून त्याला शरण जाऊन त्याचें स्तवन करीत आहे. १ भयंकर. २ निश्चल, स्थिर. ३ सर्वसत्ताधिपति. ४ पर्वता(कैलासा)वर निद्रा घेणारा. ५ सृष्टयुत्पादक. ६ शाश्वत. ७ नीलकंठ. ८ उज्ज्वल. ९ आत्मबलिदान करून. १० पूजन करितों.

स्तुतं स्तुत्यं स्तूयमानममोघं[1] कृत्तिवाससम्[2] ।
विलोहितं[3] नीलकंठमसह्यं दुर्निवारणम् ॥ ५
शक्रं[4] ब्रह्मसृजं ब्रह्म ब्रह्मचारिणमेव च ।
व्रतवंतं तपोनिष्ठमनंतं तपतां गतिम् ॥ ६
बहुरूपं गणाध्यक्षं त्र्यक्षं पारिषदप्रियम्[5] ।
धनाध्यक्षं क्षितिमुखं गौरीहृदयवल्लभम् ॥ ७
कुमारपितरं पिंगं गोवृषोत्तमवाहनम् ।
तनुवाससमत्युग्रमुमाभूषणतत्परम् ॥ ८
परं परेभ्यः परमं परं यस्मान्न विद्यते ।
इष्वस्त्रोत्तमभर्त्तारं दिगंतं[6] देशरक्षिणम् ॥ ९
हिरण्यकवचं देवं चंद्रमौलिविभूषणम् ।
प्रपद्ये[7] शरणं देवं परमेण समाधिना[8] ॥ १०

राजा, अशाप्रकारें स्तवन करून अश्वत्थामा म्हणाला, 'मजवर आलेल्या या घोर व अत्यंत दुष्कर आपत्तींतून मी पार पडेन, तर मी त्या शंकराप्रीत्यर्थ यजन करून अत्यंत पवित्र असा सर्वभूतबलि देईन !'

(२) राजा, त्या पुण्यवान् अश्वत्थाम्याचा हा निश्चय शंकरानें योगानें जाणल्यावर त्या महात्म्याच्या समोर एक सुवर्णवेदी प्राप्त झाली. त्या वेदीवर तत्काळ अग्नि प्रकट होऊन त्यानें आपल्या ज्वालांनीं दिशा, उपदिशा आणि आकाश हीं सर्व व्यापून टाकिलीं. त्या अग्नींतून पर्वतांसारखे किंवा मोठमोठ्या गजांसारखे शिवगण प्रकट झाले. त्यांपैकीं कित्येकांचीं तोंडें व डोळे दीप्तिमान् होते. कित्येकांना अनेक पाय, मस्तकें व हात होते. त्यांनीं चित्रविचित्र अंगदें धारण केलीं होतीं व आपले हात उंच केले होते. कांहींचीं रूपें कुत्र्यांसारखीं होतीं, कित्येकांचीं डुकरांप्रमाणें होतीं तर कित्येकांचीं उंटांसारखीं होतीं. कित्येकांचीं तोंडें अश्वांसारखीं, कित्येकांचीं कोल्ह्यांसारखीं तर कित्येकांचीं बैलांसारखीं होतीं. कित्येकांचीं मुखें अस्वलांसारखीं होतीं, कित्येकांचीं मार्जारांप्रमाणें तर कित्येकांचीं व्याघ्रांसारखीं होतीं. कांहीं काकमुखांचे, कित्येक मंडूकमुखांचे, तर कित्येक पोपटमुखांचे होते. कित्येक महा अजगरांसारखे, कित्येक श्वेतवर्ण हंसांसारखे, तर कित्येक चाषपक्ष्यांसारखे होते.

---

१ समर्थ. २ मृगचर्मधारी. ३ रक्तवर्णाचा. ४ शंकराचें एक नांव. ५ अनुचरांवर प्रेम करणारा. ६ सृष्टिसंहारक. ७ शरण जातों. ८ मनाच्या एकाग्रतेनें.

हे भारता, कित्येकांच्या हातांना कान होते, कित्येकांना हजारों डोळे होते, तर कित्येकांचीं पोटें मोठीं होतीं. कांहींचीं अंगें मांसरहित होतीं, कांहींना मस्तकें नव्हतीं, तर कांहींचे नेत्र व जिह्वा प्रदीप्त होत्या. कांहींच्या केंसांतून ज्वाळा निघत होत्या, कांहींचे चार हात व अंगावरील केंस पेटत होते, तर कांहींचा अंगवर्ण शंखांसारखा होता. कांहींचा ध्वनि शंखासारखा असून कांहींनीं शंखांच्या माळा गळ्यांत घातल्या होत्या. कांहींनीं जटा वाढविल्या होत्या, कांहींनीं पांच शिखा ठेविल्या होत्या तर कांहीं बोडके व कांहीं कृशोदर होते. कित्येकांना चार दंष्ट्रा, कित्येकांना चार जिह्वा, कित्येकांना शंकूंसारखे कर्ण, तर कित्येकांच्या मस्तकावर किरीट होते. राजेंद्रा, कितीएक मौंजी धारण केलेले होते व कित्येक आंखूड केंसांचे होते. कांहींनीं पागोटीं घातलीं होतीं, कित्येकांनीं मुकुट मस्तकावर धारण केले होते. कित्येकांचीं मुखें सुंदर असून त्यांनीं चांगले अलंकार अंगांवर घातले होते. कित्येकांनीं कमलमाळा गळ्यांत घातल्या होत्या. त्यांचें माहात्म्य फारच अद्भुत होतें.

हे भारता, असे ते लक्षावधि गण दिसूं लागले; कित्येकांच्या हातांत शतघ्नी, व वज्रें होतीं, कांहींच्या हातांत मुसळें होतीं, तर कित्येकांच्या हातांत घंटा, कित्येकांच्या हातांत भुशुंडी आणि पाश होते. कांहींनीं हातांत दंड घेतले होते आणि कित्येकांच्या पाठीवर नानाविध बाणयुक्त भाते लोंबत होते. कित्येकांनीं ध्वजा, तर कित्येकांनीं पताका धारण केल्या होत्या. कित्येकांच्या हातांत घंटा, कित्येकांच्या हातांत परशुधु, तर कोणाच्या हातांत महापाश होते. कोणी हातांत दांडकीं, कोणी मोठमोठे खांब तर कोणी खड्गें घेतलीं होतीं. कोणी मस्तकांवर सर्पांचे किरीट धारण केले होते, तर कित्येकांचीं बाहुभूषणें सर्पांचींच होतीं. कित्येकांनीं अंगावर चित्रविचित्र आभरणें घातलीं होतीं. कित्येकांचे ध्वज धुळीनें भरले होते, तर कोणी पंकदिग्ध झालेले दिसत होते. सर्वांनीं शुभ्र वस्त्रें आणि माला धारण केल्या होत्या. कांहींचीं अंगें नीलवर्ण तर कांहींचीं पिंगट वर्णांचीं होतीं. कित्येक गण मोठ्या आनंदानें भेरी, शंख, मृदंग, झांजा, आनक आणि गोमुखें वाजवीत होते, कांहीं गात होते आणि कांहीं नृत्य करीत होते. कित्येक उड्या मारीत चालले होते, कित्येक धांवत होते, तर कित्येक रथांतून वेगानें जात होते. त्यांत कांहीं टक्कलमाथ्याचे होते, तर कांहींचे केंस वाऱ्यानें उडत होते. कांहीं मदोन्मत्त गजांप्रमाणें वरचेवर शब्द करीत होते. त्यांचें रूप अत्यंत भयंकर असून त्यांच्या हातांत शूल आणि भाले होते. त्यांनीं निरनिराळ्या रंगांचीं वस्त्रें व माला

धारण केल्या होत्या व नानाविध उट्या लावल्या होत्या. कित्येकांनीं रत्नखचित अंगदें धारण केलीं असून हात वर केले होते. ते पराक्रमी शत्रु-संहारक गण रक्त व वसा यांचें प्राशन करणारे असून त्यांचें भोजन म्हणजे मांस व आंतडीं यांचें असे. कित्येक फार ठेंगणे असून कित्येक फार उंच होते. असे ते सर्व अतिभेसूर दिसत होते.

राजा, त्यांचें सामर्थ्य पृथ्वीवर सूर्य, चंद्र, ग्रह, नक्षत्रें यांसुद्धां आकाश उत्पन्न करून दाखविण्याइतकें होतें, त्यांचा उत्साहहि चतुर्विध भूतग्रामांचा नाश करण्याइतका होता. ते शंकर संतापला असतांहि निर्भय राहून आपल्या इच्छेनुरूप वागत असत. त्यांचें मन सर्वदा आनंदित असून वाग्देवता त्यांना वश होती व ते मत्सररहित होते. ते आठहि प्रकारचे ऐश्वर्यानें संपन्न असून त्याबद्दल त्यांना गर्व नव्हता. त्यांचीं अद्भुत कृत्यें पाहून शंकरालाहि मोठें कौतुक वाटत असे. असे ते शिवगण काया-वाचा-मनानें नित्य शंकराची आराधना करितात आणि तोहि अंतःकरणपूर्वक औरस पुत्रांप्रमाणें त्यांचें रक्षण करीत असतो. स्वाध्याय, ब्रह्मचर्य, तप आणि दम इत्यादिकांनीं त्या शूलांक शंकराची उपासना करून ते त्याच्या सायुज्याला जातात ! या आत्मभूत गणांच्याच साह्यानें भगवान् श्रीशंकर पार्वतीसह निखिल सृष्टीचें पालन करीत असतो.

राजा, याप्रमाणें नाना प्रकारचीं वाद्यें वाजवून, हंसून, ओरडून आणि अशाच अनेक प्रकारांनीं जगताला त्रस्त करून सोडणारे ते गण आपलें तेज प्रकट करीत व शंकराचें स्तवन करीत अश्वत्थाम्याजवळ येऊन पोंचले ! अश्वत्थाम्याचा महिमा वाढविण्यासाठीं, त्याचें तेज पाहण्यासाठीं आणि सौप्तिक-युद्धाच्या दर्शनेच्छेनें ते गणसमुदाय घोर रूप धारण करून आणि हातांत उग्र शूल, परिघ, पट्टिश इत्यादि आयुधें घेऊन तेथें जमले होते. ज्यांचें दर्शन झालें असतां निखिल त्रैलोक्यहि भयानें गांगरून जावें, असे ते जवळ आले असतांहि त्या महाबलवान् अश्वत्थाम्याला यत्किंचितहि भीति वाटली नाहीं. त्यानें हातांत धनुष्यबाण घेऊन व बोटांवर अंगुलित्र चढवून आपण होऊनच आपला बलि अर्पण केला. त्याचीं धनुष्यें बलिकर्माला लागणाऱ्या समिधा होता, आणि शुभ्र बाण हे त्यानें दर्भ योजिले होते ! तसेंच त्यानें आपलें शरीर ही आहुति योजिली ! नंतर त्या क्रोधिष्ठ अश्वत्थाम्यानें सोमदैवत्य मंत्र म्हणून आपलें शरीर शंकराला समर्पण केलें. नंतर त्या रौद्रकर्मी शंकराचें हात जोडून स्तवन करीत अश्वत्थामा म्हणाला—

अश्वत्थामा—भगवन्, अंगिरसाच्या कुळांत उत्पन्न झालेल्या ह्या देहाचा बलि मी आज अग्नीमध्यें अर्पण करीत आहें, त्याचा तूं स्वीकार कर ! हे महादेवा, या घोर आपत्तीमध्यें तुझ्या भक्तीनें चित्तैकाग्र्य करून तुझ्या समोर मी देहसमर्पण करीत आहें ! तुझ्या ठिकाणीं सर्व भूतें आहेत आणि तूं सर्व भूतांचे ठायीं आहेस ! तसेंच सत्त्व, रज, तमादि तीनहि गुण एकत्वानें तुझ्या ठिकाणीं वास करीत आहेत. हे विभो, तूं सर्व भूतांचा आश्रय आहेस, तेव्हां हे शत्रु जर मला जिंकण्याला अशक्य असतील, तर देवा, तूं ह्या अर्पण केलेल्या देहाचा स्वीकार कर !

(३) राजा, असें बोलून अग्नि प्रज्वलित झालेल्या त्या वेदीवरून अश्वत्थाम्यानें उडी घेतली आणि त्यानें अग्नींत प्रवेश केला. त्या निश्चेष्ट व ऊर्ध्वबाहु अश्वत्थाम्याची आहुति अग्नीमध्यें येऊन पडतांच साक्षात् भगवान् श्रीशंकर मंदहास्य करून त्याला बोलला, "सत्य, शौच, आर्जव, त्याग, तप, नियम, शांति, भक्ति, धृति, बुद्धि, वाणी इत्यादिकांनीं माझी सतत विधिपूर्वक आराधना करून श्रीकृष्णानें मला वश केलें आहे. त्या कृष्णापेक्षां अधिक प्रिय दुसरा कोणी मला नाहीं. बाबा, त्याच्या बहुमानास्तव आणि तुझी परीक्षा पाहण्याच्या हेतूनें मी त्या पांचालांना गुप्त करून अनेक प्रकारच्या माया निर्माण केल्या ! पांचालांचें रक्षण करून मी त्यांचाच सन्मान केला; परंतु आज कालच त्यांजवर उलटला असल्यामुळें त्यांचें जीवित आतां संपलें आहे !"

असें त्या महात्म्या अश्वत्थाम्याला सांगून आणि त्याला आपलें विमल खड्ग देऊन शंकरानें त्याच्या देहांत प्रवेश केला. शंकराचा अशा रीतीनें अश्वत्थाम्याच्या शरीरांत प्रवेश होतांच अश्वत्थाम्याचें तेज पुनः वाढून तो त्या तेजानें अधिकच दीप्तिमंत दिसूं लागला. त्या ईश्वरदत्त तेजाच्या योगानें अश्वत्थाम्याला विशेष आवेश उत्पन्न झाला आणि तो प्रत्यक्ष शंकराप्रमाणें शत्रूंच्या शिबिरावर चालून गेला, तेव्हां तीं भूतें आणि राक्षस त्याच्यामागून जाऊं लागलीं ! १०. १. ७.

## अध्याय ८ वा.

[ १ शिबिरद्वारीं कृप-कृतवर्मा यांस ठेवून अश्वत्थामा धृष्टद्युम्नादि पांचाल आणि द्रौपदेय यांचा नाश करितो. २ भयानें बाहेर पडलेल्यांचा कृप–कृतवर्मा यांच्या हातीं वध. ]

( १ ) **धृतराष्ट्र**—संजया, याप्रकारें द्रोणपुत्र अश्वत्थामा शिबिरावर चालून गेला असतां कृप व कृतवर्मा हे भयार्त होऊन माघारे तर फिरले नाहींत ना? कोणी क्षुद्र रक्षकांनीं त्यांना पाहून त्यांचें निवारण तर केलें नाहीं ना? त्या महारथ्यांना ती गोष्ट असह्य वाटून ते मागें फिरले नाहींत ना? शत्रूंच्या शिबिराचा आणि त्याबरोबरच पांचाल व सोमक यांचा संहार करून ते रणांत दुर्योधनाचे ऋणांतून मुक्त झाले काय? पांचालांनीं आपला केलेला पराभव आठवून, त्या वीरांनीं ते पांचाल निद्रिस्थ असतां त्यांचा सूड चांगला घेतला ना? संजया, हा सर्व वृत्तांत सांग पाहूं!

**संजय**—महाराजा, महात्मा अश्वत्थामा शत्रूंच्या शिबिरावर चालून गेला असतां कृप आणि कृतवर्मा हे द्वारदेशींच राहिले. हे राजा, ते महारथी आपल्या साहाय्याकरितां तेथें द्वारावर राहिले असल्याचें पाहून अश्वत्थामा त्यांना आनंदानें म्हणाला, 'तुम्ही दोघे सर्व क्षत्रियांचा नाश करण्याविषयीं समर्थ आहां, मग हे युद्धांत शेष राहिलेले आणि तेहि झोंपेंत असलेले यांचा सहज संहार कराल, यांत नवल तें काय? मी आतां शिबिरांत शिरून काळाप्रमाणें संचार करितों. तुमच्या बाजूला जो कोणी येईल, तो जीवंत सुटूं नये, एवढें मात्र तुम्ही करा; चला ही गोष्ट निश्चित ठरली.'

असें बोलून तो अश्वत्थामा पांडवांच्या विस्तीर्ण शिबिरांत शिरला. सरळ मार्ग सोडून तो आडवाटेनें आंत गेला आणि धृष्टद्युम्नाचा महाल जेथें असल्याचें त्याला ठाऊक होतें, तेथें बरोबर आला. शिबिरांतील लोक दिवसभर मोठा पराक्रम करून अगदीं श्रांत होऊन गेले होते, तर कित्येक पराभूत होऊन पळून आले होते; ते आतां गाढ झोंप घेत होते. राजा, त्या धृष्टद्युम्नाच्या मंदिरांत अश्वत्थाम्यानें हळूच प्रवेश केला आणि पाहतो तों धृष्टद्युम्न पलंगावर गाढ झोंपीं गेलेला त्याच्या दृष्टीस पडला. त्याचा बिछाना रेशमाप्रमाणें मऊ असून त्यावर उत्तम आस्तरण घातलें होतें. उत्तम उत्तम सुगंधी फुलें सभोंवार पसरलीं होतीं व सर्वत्र धूपाच्या सुवासाचा घमघमाट सुटला होता!

राजा, तो धृष्टद्युम्न अशा रीतीनें निर्धास्त निजला असतां अश्वत्थाम्यानें त्याला लत्ताप्रहार करून जागें केलें! अश्वत्थाम्याचा पादस्पर्श होतांच तो रणदुर्मद धृष्टद्युम्न जागा झाला आणि त्यानें अश्वत्थाम्याला ओळखिलें. तो बिछान्यावरून उठूं लागला, तों अश्वत्थाम्यानें दोहों हातांनीं त्याचे केंस धरून त्याला महीतलावर लोळविलें! हे भारता, धृष्टद्युम्नाला अश्वत्थाम्यानें दोन्ही हातांनीं आंवळून धरल्यामुळें व विशेषेंकरून धृष्टद्युम्न निद्रेनें व्याप्त असल्यामुळें तो कांहींच प्रतिकार करूं शकला नाहीं! राजा, त्या धृष्टद्युम्नाला पायांखालीं चेंगरून आणि त्याचा कंठ व उरःस्थल हीं दोन्ही दाबून धरून ठेवल्यामुळें तो सारखा ओरडून धडफड करूं लागला! अशा स्थितींत अश्वत्थाम्यानें त्याला पशूप्रमाणें मोठ्या निर्दयतेनें मारून टाकिलें. तरी शेवटीं धृष्टद्युम्न त्या द्रौणीला नखांनीं ओरबाडीत अस्पष्टपणें बोलला, 'अरे आचार्यपुत्रा, माझा शस्त्रानें वध कर; उशीर लावूं नकोस. हे ब्राह्मणश्रेष्ठा, तुझ्यामुळें तरी मला उत्तम लोकाची प्राप्ति होईल!' इतकें बोलून तो पांचाल राजपुत्र अश्वत्थाम्याकडून अत्यंत पीडित होत्साता थांबला!

राजा, धृष्टद्युम्नाचें तें अस्पष्ट भाषण ऐकून अश्वत्थामा त्याला बोलला, 'हे कुलकलंका, गुरुघातक्याला पुण्य लोकांची प्राप्ति कधीं होत नसते. म्हणून हे दुर्मते, शस्त्राघातानें तुझा वध करणें योग्य होणार नाहीं!' असें बोलून सिंह जसा मदोन्मत्त गजाला मारून टाकतो, त्याप्रमाणें त्या अश्वत्थाम्यानें आपल्या गुडघ्यांनीं धृष्टद्युम्नाला मर्मस्थळीं चेंगरून त्याचा वध केला! त्याच्या वधकालीं त्याचा आक्रोश ऐकून सर्व शिबिरांतील स्त्रिया आणि त्यांचे रक्षक धांवून आले! तो अमानुष पराक्रम करणारा म्हणजे कोणी तरी भूत असलें पाहिजे असें समजून ते सर्व भीतीनें गांगरून गेले. अशा उपायानें त्या धृष्टद्युम्नाला यमसदनीं पाठविल्यावर अश्वत्थामा आपल्या सुंदर रथावर चढून बसला. नंतर त्यानें धृष्टद्युम्नाच्या महालांतून बाहेर पडतांना मोठी गर्जना केली. तिच्या योगानें दाही दिशा दुमदुमून गेल्या! मग राहिलेल्या शत्रूंना मारून टाकावें, म्हणून तो पुनः रथांत बसून शिबिराकडे निघाला!

राजा, तो महारथ द्रोणपुत्र निघून गेला असतां त्या स्त्रिया आणि ते रक्षक यांनीं मोठा आकांत केला. राजा, धृष्टद्युम्न मारला गेल्याचें पाहून सर्व धृष्टद्युम्नाच्या हाताखालील क्षत्रिय वीर अत्यंत शोकाकुल होऊन मोठ्यानें विलाप करूं लागले. त्या स्त्रियांचा तो आक्रोश ऐकून जवळ असलेले मोठमोठे क्षत्रियश्रेष्ठ

कवचें चढवून सज्ज झाले आणि ‘हें काय आहे’ म्हणून विचारपूस करूं लागले. तेव्हां हे राजा, त्या भयभीत झालेल्या स्त्रियांनीं अश्वत्थाम्याला पाहिलें आणि ‘धांवा हो लवकर ! हा कोण राक्षस आहे कीं मनुष्य आहे, हेंच आम्हांला समजत नाहीं ! हा पांचालराजाचा वध करून रथावर चढून बसला आहे,’ असें त्या म्हणाल्या. तेव्हां ते क्षत्रियवीर एकत्र जमून त्या अश्वत्थाम्यावर धांवून आले; तेव्हां त्यानें त्या वीरांवर रुद्रास्त्र टाकून त्यांचाहि संहार केला !

याप्रमाणें त्या अश्वत्थाम्यानें धृष्टद्युम्नाचा आणि त्याच्या पदानुयायांचा वध केल्यावर जवळच झोपीं गेलेला उत्तमौजा त्याच्या दृष्टीस पडला. अश्वत्थाम्यानें पायानें त्याचा गळा आणि उरःस्थल हीं जोरानें दाबलीं आणि तो ओरडत असतां त्याला मारून टाकिलें ! असें होत आहे तों युधामन्यु तेथें आला आणि उत्तमौजाला राक्षसानें मारलें असावें, असें मानून त्यानें आपली गदा उगारली आणि ती अश्वत्थाम्याच्या हृदयावर फेंकली. त्यावर अश्वत्थाम्यानें धांवून जाऊन त्याला जमिनीवर पाडलें आणि थरथर कांपत असतां त्यालाहि पशूप्रमाणें मारलें ! त्या वीराला मारल्यावर अश्वत्थामा तेथून दुसऱ्या वीरांवर धांवून गेला आणि हे राजेंद्रा, त्या त्या ठिकाणीं गाढ झोंपेंत असलेल्या त्या महारथांवर तो चालून गेला आणि ज्याप्रमाणें शमिता यज्ञांत पशूंचा वध करितो, त्याप्रमाणें त्यानें त्या सर्वांचा वध केला ! त्यावेळीं ते वीर थरथरां कांपत होते ! नंतर आपलें खड्ग हातांत घेऊन दुसऱ्याहि वीरांना पृथक् पृथक् गांठून त्यानें वध केला ! त्याचप्रमाणें गुल्मभागीं कित्येक सैनिक श्रांत होऊन व आयुधें टाकून निजलेले त्यानें पाहिले. त्यांचाहि एका क्षणांत त्यानें वध केला ! याप्रमाणें शत्रूंचे योद्धे, अश्व आणि गज या सर्वांना त्यानें आपल्या उत्तम तलवारीनें कापून काढिलें ! यावेळीं त्याचें सर्व अंग रक्तानें भरलेलें असून तो साक्षात् अंत करणाऱ्या यमदूताप्रमाणें भासत होता. आपलें दीप्तखड्ग हातांत घेऊन युद्ध करीत असतां त्याचा परम भीषण असा अमानुष आकार दिसूं लागला. त्यावेळीं जे कोणी वीर जागे झाले, ते त्याच्या गर्जनेनें मोहित होऊन भयभीत झाले व व्याकुल होऊन एकमेकांकडे पाहात राहिले ! ते शत्रुविघातक क्षत्रियवीर असूनहि अश्वत्थाम्याचें तें रूप पाहून हा कोणीतरी राक्षस असला पाहिजे, ह्या कल्पनेनें त्यांनीं आपले डोळे मिटून घेतले !

राजा, इकडे तो घोररूप अश्वत्थामा काळाप्रमाणें त्या शिबिरांत संचार करीत होता; इतक्यांत द्रौपदेय आणि अवशिष्ट राहिलेले सोमक त्याच्या दृष्टीस पडले.

त्याची गर्जना कानीं पडतांच व धृष्टद्युम्न हत झाल्याचें ऐकतांच ते द्रौपदेय अस्वस्थ झाले आणि मोठ्या धैर्यानें त्यांनीं त्यावर शरवर्षाव सुरू केला ! त्या गर्जनेनें जागे होऊन प्रभद्रक आणि शिखंडी यांनीं अश्वत्थाम्यावर बाणांची सारखी वृष्टि केली ! आपल्यावर बाणवृष्टि करणाऱ्या त्या महारथांना पाहून त्यांचा वध करण्याच्या इच्छेनें अश्वत्थाम्यानें मोठ्यानें गर्जना केली ! नंतर आपल्या पित्याचा वध लक्षांत आणून अत्यंत क्रुद्ध झालेला तो वीर रथांतून खालीं उतरला आणि मोठ्या त्वरेनें त्यांच्यावर धांवून गेला ! सहस्रचंद्रांप्रमाणें विमल ढाल व आपलें सुवर्णमंडित विमल व दिव्य खड्ग घेऊन तो त्या द्रौपदीपुत्रांवर चालून गेला आणि खड्गानें त्यानें त्यांचा वध केला. नंतर त्या युद्धांत अश्वत्थाम्यानें प्रतिविंध्याच्या कुक्षींत तरवारीचा वार केला. त्यायोगानें तो जमिनीवर मरून पडला ! इतक्यांत प्रतापी सुतसोम अश्वत्थाम्यावर प्रास टाकून आणि पुनः खड्ग उगारून त्याच्या अंगावर गेला. हे नृपश्रेष्ठा, अश्वत्थाम्यानें सुतसोमाचा हात खड्गासहित तोडला आणि पुनः त्यावर वार केला, त्यामुळें तो छाती फुटून पडला !

राजा, तें पाहून नकुलपुत्र शतानीक यानें आपल्या दोनी हातांनीं रथचक्र उचलून तें अश्वत्थाम्याच्या वक्षःस्थलावर मारलें ! त्याचे हातून तें रथचक्र सुटतांच त्या ब्राह्मणानें उलट शतानीकावर वार केला; तेव्हां शतानीक विव्हल होऊन भूमीवर पडला आणि मग अश्वत्थाम्यानें त्याचें शिर उडविलें ! इकडे श्रुतकर्म्यानें परीघ घेऊन त्याचा अश्वत्थाम्यावर प्रहार केला. परंतु तो परीघ अश्वत्थाम्याच्या चर्मा( ढाली )वर जोरानें आदळून निसटला. तेव्हां त्यानें आपल्या उत्कृष्ट तरवारीनें श्रुतकर्म्याच्या मुखावर प्रहार केला. त्यानें तो बेशुद्ध होऊन भूमीवर पडला आणि त्याचें मुखहि विकृत झालें. ही चाललेली गडबड ऐकून शूर महारथी श्रुतकीर्ति यानें अश्वत्थाम्याला गांठून त्यावर बाणवर्षाव केला ! त्याच्याहि त्या बाणवर्षावाचा प्रतिकार आपल्या ढालीनें करून अश्वत्थाम्यानें त्याचें कर्णकुंडलांनीं सुशोभित शिर मस्तकापासून वेगळें केलें ! नंतर भीष्माचा घातक जो शिखंडी त्याचा आणि त्याबरोबर सर्व राहिलेल्या प्रभद्रकांचा नाना प्रकारच्या आयुधांनीं त्यानें वध केला ! या प्रसंगीं त्या महाबलवान् अश्वत्थाम्यानें क्रुद्ध होऊन एक खड्गाचा प्रहार शिखंडीच्या भुंवयांच्या मधोमध मारून त्याचे दोन तुकडे केले ! तो परंतप अश्वत्थामा शिखंडीला मारल्यावर प्रभद्रकांवर आणि अवशिष्ट राहिलेल्या विराटसैन्यावर धांवून गेला आणि द्रुपदाचे पुत्र, नातू आणि इष्टमित्र हे जेथें जेथें त्याला आढळले, तेथें तेथें त्यानें त्यांचें भयंकर

कंदन केलें ! यांशिवाय दुसरे जे कोणी वीर त्याला आढळले, त्यांच्यावरहि धांवून जाऊन त्या असिविशारद अश्वत्थाम्यानें आपल्या खड्गानें त्यांचाहि संहार केला !

राजा, त्यावेळीं मूर्तिमती काली कालरात्रीसारखीच त्या सर्व वीरांच्या दृष्टीस पडली. तिचें मुख आणि डोळे लाल असून तिनें अंगावर रक्तपुष्पांच्या माळा व तांबडी उटी लाविली होती. तिनें रक्तवस्त्र परिधान केलें होतें; तिनें हातांत पाश घेतले होते. त्या पाशांनीं ती मनुष्यें, अश्व आणि गज यांना आणि मुकुटहीन, न्यस्तशस्त्र व गाढ निद्रेंत हत झालेल्या कित्येक वीरांच्या प्रेतांना बांधून नेत होती ! अशी ती कालरात्रि आपल्याजवळ येऊन गात उभी राहिलेली त्या वीरांच्या दृष्टीस पडली ! हा प्रकार आणि सरास क्षत्रियसंहार करीत चाललेला अश्वत्थामा कित्येक रात्रीं त्या प्रमुख वीरांच्या स्वप्नांत येत असे ! जेव्हांपासून पांडव व कौरव यांच्यामध्यें भयंकर संग्रामाला प्रारंभ झाला, तेव्हांपासून ही काली आणि अश्वत्थामा त्यांच्या नजरेस पडत असत ! ते वीर पूर्वीच दैवानें मारले गेले होते, अश्वत्थामा हा केवळ त्यांना मारण्याला निमित्तमात्र झाला होता ! भूतमात्राला आपल्या गर्जनेनें भयभीत करून सोडणाऱ्या अश्वत्थाम्याला पाहून ती पूर्वकालीन गोष्टच आज आपण प्रत्यक्ष पाहत आहों, असें त्या दैवहत वीरांना वाटूं लागलें ! त्या अश्वत्थाम्याची ती गर्जना ऐकून पांडवांच्या शिबिरांतील शेंकडों आणि हजारों धन्वी जागे झाले ! अश्वत्थाम्यानें प्रत्यक्ष यमदूतांप्रमाणें कित्येकांचे पाय तर कित्येकांचे जघनभाग तोडून टाकिले व कित्येकांच्या बरगड्याहि त्यानें मोडून टाकिल्या !

हे प्रभो, त्यावेळीं छिन्न होऊन पडलेल्या, भयंकर आक्रोश करणाऱ्या, गज आणि अश्व यांच्या पायांखालीं चूर्ण झालेल्या वीरांनीं सर्व पृथ्वी व्याप्त होऊन गेली. 'अरे, हें काय, हा कोण, ही कसली गर्जना, काय हा प्रसंग' अशा प्रकारें सर्वत्र आक्रोश होत असतां अश्वत्थाम्यानें त्या सर्वांचा अंत केला ! कवचें अंगांत चढवून सज्ज झालेल्या पांडवीय सृंजयांना त्या वीरश्रेष्ठ अश्वत्थाम्यानें शस्त्ररहित करून यमलोकीं पाठविलें ! तेव्हां कित्येक निद्रांध त्याच्या शस्त्रप्रहारानें भयभीत होऊन व कांहीं सुचेनासें होऊन जागच्या जागीं लपून राहिले ! तेव्हां भयंकर शब्द करणाऱ्या रथांत बसून जाणाऱ्या त्या धनुर्धारी अश्वत्थाम्यानें कित्येक वीरांवर बाण मारून यमलोकीं पाठविलें. कित्येक वीर लांबून उड्या मारून येत होते, त्यांना आणि दुसऱ्याहि कित्येक

शत्रूंना त्यानें कालरात्रीच्या स्वाधीन केलें! कित्येकांना स्यंदनाच्या अग्रानें चिरडून टाकलें आणि कित्येक शत्रूंवर त्यानें बाणवर्षाव केला. नंतर तो आपली विचित्र शतचंद्र ढाल आणि तरवार घेऊन संचार करूं लागला. राजा, ज्याप्रमाणें एकादा मदोन्मत्त गज मोठ्या तलावाचा क्षोभ करून टाकितो, त्याप्रमाणें त्या अश्वत्थाम्यानें त्यांच्या शिबिरांमध्यें मोठी गडबड उडवून सोडली! त्या कोलाहलानें ते निद्रिस्थ वीर जागे झाले आणि भयभीत होऊन इतस्ततः धांवत सुटले! कांहीं जण अबद्ध भाषण करीत मोठमोठ्यानें आक्रोश करूं लागले! परंतु वस्त्र सांवरून कोणीहि शस्त्र हातांत घेण्यास तयार होईना. केंस विसकटून गेले असल्यामुळें परस्परांना ओळखण्याचीहि शक्ति त्यांच्या अंगांत नव्हती! कित्येक उड्या मारून जात असतां श्रांत होऊन पडले तर कित्येक तसेच भ्रमण करीत तेथें राहिले! कित्येकांनीं तेथल्या तेथें मलमूत्रविसर्जन केलें! राजेंद्रा, अश्व आणि गज यांनीं आपआपलीं बंधनें तोडून आणि सर्वत्र पळून एकच धुमाकूळ मांडला. कित्येक मनुष्यें भयभीत होऊन गुप्त ठिकाणीं लपून बसलीं. त्या मनुष्यांचा, गजांचा आणि अश्वांचा अश्वत्थाम्यानें सारखा संहार केला!

हे भरतश्रेष्ठा, अश्वत्थाम्यानें या प्रकारें निःपात चालविला असतां भूतें आणि राक्षस यांना अत्यानंद होऊन तीं आरोळ्या देऊं लागलीं! त्या आरोळ्यांनीं दशदिशा भरून गेल्या आणि आकाशहि व्याप्त झालें! वीरांचा तो आर्तनाद ऐकून त्रस्त झालेले अश्व व गज बुजून गेले आणि मोकळे होऊन शिबिरांतील लोकांना पायांखालीं तुडवूं लागले. ते पळून जात असतां त्यांच्या पायांनीं उडलेल्या धुळीनें शिबिरांत आधींच असलेला अंधकार द्विगुणित झाला. असा सर्वत्र अंधकार होऊन मनुष्यें अगदीं मूढ होऊन गेलीं. पित्यांना आपले पुत्र आणि बंधूंना आपले बंधु ओळखूं येईनात. जणुंकाय कालप्रेरणेनेंच ते लोक आपल्याच पक्षांतील लोकांना मारूं लागले. द्वारपाल व सैनिकहि आपापलीं स्थानें सोडून व दिङ्मूढ होऊन वाट सांपडेल तिकडे पळत सुटले! अशा रीतीनें ते नाहींसे झाले असतां पुनः ते कोणाला सांपडले नाहींत! दैवहत होऊन कोणी आपल्या बापाच्या नांवानें, तर कोणी आपल्या पुत्राच्या नांवानें आरोळ्या ठोकीत आपल्या बांधवांना सोडून धांवत सुटले! लोक परस्परांना गोत्रनामांनीं हाका मारीत सुटले, तर कित्येक हाहाकार करीत जमिनीवर पडून राहिले! अशांना ओळखून अश्वत्थाम्यानें त्यांचा रणांतच संहार केला!

( २ ) राजा, अशा रीतीनें अश्वत्थामा त्या वीरांचा संहार करीत असतां कांहीं क्षत्रिय भीतीनें शिबिरांतून बाहेर जाण्याचा यत्न करूं लागले, तों कृतवर्मा आणि कृप हे द्वारदेशीं त्यांना मारूं लागले ! अंगावरील कवचें गळून पडलीं आहेत, केंस मोकळे झाले आहेत, अशा स्थितींत कांपत कांपत हात जोडून उभे असतांहि त्यांना त्यांनीं सोडलें नाहीं. त्यांच्या हातून शिबिराच्या बाहेर एकहि वीर जीवंत सुटला नाहीं ! तो कृप आणि निर्दय कृतवर्मा यांनीं अश्वत्थाम्याच्या कल्याणाची इच्छा धरून त्या शिबिराला तीन वेगवेगळ्या ठिकाणीं आगी लावल्या ! त्या प्रकाशांत अश्वत्थामा शिबिरांत संचार करूं लागला. कांहीं वीर त्याच्या अंगावर धांवून आले असतां व कांहीं पळून जात असतां उभयतांना त्यानें खड्गानें कापून काढिलें ! कित्येक योद्धयांना त्यानें तरवारीनें मधोमध कापून काढिलें तर कित्येकांचे त्यानें तिळांएवढे तुकडे करून टाकिले. हे भरतसत्तमा, त्यावेळीं अत्यंत व्याकुळ होऊन विह्वळत पडलेले वीर, अश्व आणि गज यांनीं सर्व पृथ्वी व्यापून गेली ! त्या मरून पडलेल्या हजारों मनुष्यांमध्यें कित्येकांचीं कबंधें उभीं राहून पुनः पडत असत. हे राजा, अश्वत्थाम्यानें कित्येक वीरांचे सायुध, सांगद बाहू आणि कित्येकांचीं मस्तकें तोडून टाकिलीं, कित्येकांच्या पाठीवर त्यानें वार केले, कित्येकांना पार्श्वभागीं छिन्न केलें तर कित्येकांचीं मस्तकें त्यानें उडविलीं ! तो महात्मा अश्वत्थामा पराङ्मुख होणाऱ्या योद्धयांच्या कमरा तोडी, कित्येकांचे कर्ण कापी तर कित्येकांच्या अंशप्रदेशीं प्रहार करीत असे आणि कित्येकांच्या धडांमध्यें त्यांचींच मस्तकें खुपसून ठेवीत असे !

याप्रमाणें असंख्य मनुष्यांचा संहार करीत तो अश्वत्थामा संचार करीत असतां अंधारानें आधींच घोररूप झालेली रात्र अत्यंत दारुण दिसूं लागली ! किंचित् प्राण राहिलेले व अगदीं मरून गेलेले सहस्रावधि लोक, त्याचप्रमाणें अनेक गज आणि अश्व यांच्या प्रेतांनीं पृथ्वीचें स्वरूप अधिकच भयंकर दिसूं लागलें ! सर्वत्र यक्ष, राक्षस यांचा संचार सुरू झाला ! क्रुद्ध द्रोणपुत्राच्या हातून हत होऊन जे वीर भूतलावर पडत असत, त्यांपैकीं कोणी आपल्या बंधूंना, कोणी पित्यांना तर कोणी पुत्रांना हांका मारूं लागले ! त्यावेळीं कित्येकांनीं उद्गार काढले, 'या क्रूर राक्षसांनीं गाढ झोंपेंत असतां आमची जी अवस्था केली, तशी त्या क्षुब्ध धार्तराष्ट्रांनींहि कधीं केली नव्हती ! पांडवांचें सांनिध्य नसल्यामुळें आमचा हा संहार होत आहे ! साक्षात् जनार्दन ज्याचा रक्षणकर्ता, त्या अर्जुनाला असुर, गंधर्व, यक्ष किंवा राक्षस यांपैकीं कोणीहि

कधीं जिंकूं शकणार नाहीं ब्राह्मणांचा हितकर्ता, सत्यवक्ता, दांत, सर्व भूतांवर दया करणारा, असा धनंजय पार्थ निजलेल्यांवर, भ्रांतचित्त झालेल्यांवर, निःशस्त्र किंवा कृतांजलि होऊन शरण आलेल्यांवर, पळत सुटलेल्यांवर किंवा मुक्तकेश झालेल्या वीरांवर कधींहि प्रहार करीत नसतो ! असलें हें घोर कृत्य हे क्रूरकर्मी राक्षस आमच्यावर करीत आहेत !' अशा प्रकारचा विलाप करीत कित्येक पडले होते, कित्येक आरोळ्या फोडीत होते, तर कित्येक विवळत होते ! पुढें त्यांचा तो तुमुल ध्वनि लवकरच थांबला आणि पृथ्वीवर उडालेली धूळ रक्ताचा सडा पडून क्षणांत शांत झाली. सिंह जसा पशूंचा वध करितो, त्याप्रमाणें त्या क्रुद्ध अश्वत्थाम्यानें त्यावेळीं धडपड करणाऱ्या, उद्विग्न झालेल्या, निरुत्साही अशा हजारों लोकांचा संहार केला ! परस्परांना कवटाळून पडलेल्यांना, पळून जाणाऱ्यांना, लपून राहणाऱ्यांना आणि युद्ध करणाऱ्या अशा सर्वांना त्या द्रोणपुत्रानें यमलोकीं पाठविलें ! कित्येक वीर अग्नीकडून पोळले जात होते व कित्येकांचा अश्वत्थाम्याकडून वध होत होता. अशा स्थितींत एकमेक एकमेकांचा प्राण घेत होते !

राजा, अशा प्रकारें अर्धी रात्र संपून गेली, तों त्या द्रोणपुत्र अश्वत्थाम्यानें पांडवांच्या मोठ्या सेनेला यमसदनीं पाठविलें ! मनुष्यें, गज आणि अश्व यांना भयंकर आणि क्षयकर वाटणारी ती रात्र निशाचरादिकांना फारच आनंददायक वाटली ! तेथें नानाविध राक्षस आणि पिशाच हे नरमांस खातांना व रक्त पितांना जिकडेतिकडे दिसूं लागले ! त्या प्राण्यांत कित्येक भयंकर स्वरूपाचे, कित्येक पिंगट वर्णाचे, कांहीं मोठ्या दंतांचे, कांहीं धूसर वर्णाचे, कांहीं जटाधारी, कित्येक भयंकर मुखांचे, कित्येक पांच पायांचे तर कित्येक मोठ्या पोटांचे होते ! कित्येकांचे स्वर मोठे भयंकर, तर कित्येकांचीं रूपें अतिविचित्र, अशीं अत्यंत निर्दय, क्रूर आणि भयंकर राक्षसांचीं रूपें मुलांबायकांच्या दृष्टीस पडलीं ! रक्त पिऊन मोठ्या आनंदानें ते टोळ्यांनीं नाचत असत ! 'हें खाद्य मोठें श्रेष्ठ आहे, हें फार पवित्र आहे, हें अति गोड आहे' असें म्हणून त्यांनीं मेद, मज्जा, अस्थि, रक्त आणि वसा हीं यथेच्छ भक्षण केलीं ! अशा प्रकारचे नाना तोंडांचे, अतिभयंकर, क्रूरकर्मे, मांसाहारी राक्षस तेथें सहस्रावधि, लक्षावधि व कोट्यवधि जमून त्या भयंकर संकटकालीं आनंदित झालेले दिसत होते !

हे राजा, प्रभातकाल होतांच शिबिरांतून बाहेर जाण्याचें अश्वत्थाम्यानें योजिलें, अश्वत्थाम्याचें अंग रक्तानें अगदीं माखून गेल्यामुळें त्याच्या हातांतील

तलवार आणि त्याचा हात हीं दोन्ही एकच असल्याचा भास झाला ! एवढा जनक्षय केल्यावर अश्वत्थाम्याला मोठी धन्यता वाटूं लागून तो अधिकच शोभूं लागला ! युगाच्या अंतीं सर्व भूतांना जाळून टाकल्यावर ज्याप्रमाणें अग्नि शांत होतो, त्याप्रमाणें आपल्या प्रतिज्ञेप्रमाणें अंगीकृत कार्य केल्यावर त्या अश्वत्थाम्याला मोठा आनंद झाला व आपण पितृऋणांतून मुक्त झाल्यासारखें त्याला वाटूं लागलें व त्याचा संतापाग्नि शांत झाला ! राजा, ज्याप्रमाणें रात्रीच्या अंधारामध्यें शिबिरांत सर्व माणसें सुप्त झालीं असतां त्यानें प्रवेश केला, त्याचप्रमाणें सर्वांचा संहार करून व सर्व निःशस्त्र झाले असतां तो बाहेर पडला आणि आपला सर्व पराक्रम त्यानें कृप व कृतवर्मा यांस सांगितला. त्यामुळें त्यांस मोठा आनंद झाला ! त्याप्रमाणें त्यांनींहि त्याचें प्रिय कार्य—हजारों पांचाल आणि सृंजय यांचा वध—केल्याचें त्याला सांगितलें ! नंतर ते तिघेहि मोठ्या आनंदानें आरोळ्या देऊं लागले व टाळ्या पिटूं लागले ! अशा रीतीनें झोंपलेल्या व प्रमत्त होऊन पडलेल्या सोमकांचा दारुण संहार होतांना त्यांना ती रात्र भयंकर गेली ! आमच्या लोकांचा संहार करूनहि त्यांच्याकडील त्याप्रकारचे शूर व पराक्रमी वीर पडले, यावरून कालाचा फेरा अति दुरतिक्रम आहे, यांत शंका नाहीं !

धृतराष्ट्र—संजया, माझ्या पुत्राच्या जयाविषयीं इतकी उत्कंठा त्या अश्वत्थाम्याला होती, तर त्यानें आधींच असा पराक्रम करून कां बरें दाखविला नाहीं ? माझा पुत्र हत झाल्यावर त्या द्रोणपुत्रानें अशा प्रकारचा पराक्रम करून आपला क्षुद्रपणा दाखविला, ह्याचें कारण काय तें मला सांग !

संजय—राजा, पांडव, धीमान् केशव आणि सात्यकी हे समीप नसतांना अश्वत्थाम्याचे हातून हें कार्य घडून आलें. हे कुरुनंदना, त्यांच्या भयानेंच अश्वत्थाम्याचे हातून आजवर असा पराक्रम झाला नव्हता. ते जवळ असते तर असल्या प्रकारचा संहार प्रत्यक्ष शंकराच्याहि हातून झाला नसता ! मग याची ती कथा काय ! अशाप्रकारें त्या पांडवांच्या सुप्त सैन्याचा वध केल्यावर त्या तिघां महारथींनीं अन्योन्यांचें अभिनंदन केलें ! कृप व कृतवर्मा यांनीं अश्वत्थाम्याचें अभिनंदन केलें आणि त्यानेंहि त्यांना आलिंगन दिलें ! मग मोठ्या हर्षानें अश्वत्थामा बोलला, 'द्रौपदीपुत्र, पांचाल, सोमक आणि मत्स्य या सर्वांचा मीं संहार केला आहे ! आतां आम्ही कृतकृत्य झालों आहों ! जर आमचा राजा दुर्योधन आतां जीवंत असेल, तर आपण त्याजकडे जाऊं आणि त्याला हा सर्व वृत्तांत सांगूं या !' १०. १. ८.

## अध्याय ९ वा.

[ १ द्रौणि-कृप-कृतवर्म्यांकडून दुर्योधनाचें सांत्वन. २ दुर्योधनाला अश्वत्थाम्याकडून सुप्तजनवधकथन. ३ दुर्योधनाचा प्राणत्याग. ४ अश्वत्थामा इत्यादिकांचें नगरगमन. ५ संजयाला व्यासानुग्रहानें प्राप्त झालेल्या दिव्यदृष्टीचा नाश. ]

( १ ) **संजय**—राजा, याप्रमाणें सर्व पांचाल आणि द्रौपदीपुत्र यांचा वध केल्यावर, जेथें दुर्योधन पडून राहिला होता, त्या ठिकाणीं ते तिघेहि पोंचले. त्याजवळ जाऊन पाहतात, तों त्या राजाच्या शरीरांत किंचित् प्राण राहिला आहे, असें त्यांस आढळून आलें. नंतर रथांतून खालीं उतरून तुझ्या पुत्राच्या सभोंवार ते उभे राहिले. हे राजेंद्रा, त्याच्या मांडीचें चूर्ण झालें असून तो मोठ्या कष्टानें श्वासोच्छ्वास सोडीत होता, त्याला शुद्धि नव्हती, त्याच्या तोंडांतून रक्त वाहत होतें आणि त्याच्या सभोंवतीं लांडगे इत्यादि भयंकर श्वापदें गोळा होऊन त्याचें मांस खाण्याविषयीं उत्कंठित होऊन राहिले होते. तोहि मोठ्या कष्टानें त्यांचें निवारण करीत होता ! त्याला भयंकर वेदना होत असून तो भूमीवर पडून राहिला होता ! रक्तानें त्याचें सर्वांग भरून गेलें होतें ! अशा स्थितींत त्याला भूमीवर रुधिरदग्ध पडलेला पाहून ते कौरवांपैकीं उरलेले तीन वीर त्याच्या सभोंवतीं स्थित झाले. मध्यभागीं राजा दुर्योधन असून सभोंवार रक्तानें भरलेले तीन महारथी अश्वत्थामा, कृपाचार्य आणि कृतवर्मा हे उभे होते ! त्यावेळीं तीन बाजूंच्या तीन अग्नींनीं वेदी जशी शोभते, तसा दुर्योधन शोभूं लागला ! अशा दुःस्थितींत पडलेल्या राजाला पाहतांच त्यांना असह्य दुःख होऊन ते रडूं लागले. नंतर कृपाचार्य ह्यांनीं रणांत पडलेल्या त्या राजाचे मुखावरील रक्त आपल्या हातांनीं पुसून शोक करण्यास आरंभ केला !

**कृप**—दैवाला कोणतीहि गोष्ट अशक्य नाहीं. हा पहा अकरा अक्षौहिणी सेनेचा पति दुर्योधन हत होऊन येथें जमिनीवर पडला आहे. याची कांति सुवर्णासमान असून ह्याची सुवर्णविभूषित गदा त्या गदाप्रियाजवळ जमिनीवर पडली आहे. ही गदा ह्याला प्रत्येक रणप्रसंगीं अत्यंत साहाय्यकारी झाली असून सांप्रत तो स्वर्गाला जाण्याला निघालेला असतांहि ती त्याला सोडीत नाहीं. ही कांचनविभूषित गदा राजवाड्यांतील प्रियकर भार्येप्रमाणें त्याच्या शय्येवर शयन करीत आहे. धर्माभिषिक्त राजांमध्यें अग्रस्थानीं शोभणारा हा परंतप राजा आज रणांत हत होऊन धूळ खात पडला आहे ! विपरीत

कालाचा परिणाम कसा आहे पहा ! ज्यानें मारलेले अनेक क्षत्रियश्रेष्ठ रणांगणावर पडलेले असावे, तोच हा कुरुराज आज शत्रूकडून हत होऊन भूमीवर पडला आहे ! ज्याच्यापुढें शतशः राजे भयानें नम्र होऊन उभे राहत असत, तो राजा आज वीरशयनावर पडला असून त्याच्या सभोंवतीं मांसभक्षक प्राणी गोळा झाले आहेत ! पूर्वीं अर्थप्राप्तीकरितां ज्या राजासभोंवतीं ब्राह्मणवर्ग वाट पाहत असत, त्याच्याजवळ आज मांसेच्छु हिंस्र प्राणी जमून राहिले आहेत !

संजय—भरतसत्तमा, नंतर त्या कुरुश्रेष्ठ दुर्योधनाला अश्वत्थाम्यानें पाहिलें आणि करुणस्वरानें म्हटलें, " हे नरश्रेष्ठा, तूं सर्व धनुर्धरांमध्यें श्रेष्ठ असून युद्धभूमीवर धनाध्यक्ष कुबेरासारखा आणि तसाच तूं बलरामाचा श्रेष्ठ शिष्य आहेस, असें सर्व म्हणतात ! हे अनघा, तुझें छिद्र त्या भीमसेनाला कसें बरें दिसून यावें ! त्या पापी भीमसेनानें तुजसारख्या कृतार्थ व बलवान् वीराला मारलें हें कसें ! कालच बलवत्तर होय, म्हणून भीमसेनाचे हातून तुझा वध झाला आहे. हे महाराजा, तूं सर्वधर्मज्ञ असून त्या पापी नीच वृकोदरानें तुला मारिलें, त्याअर्थीं कालच अनिवार आहे, यांत संशय नाहीं. धर्मयुद्धांत अधर्माचा अवलंब करून भीमसेनानें तुझ्या मांड्या गदेनें फोडिल्या आणि तुला असें अधर्मानें मारल्यावर रणांत त्यानें तुझें मस्तक पायांखालीं तुडविलें, हें पाहून त्या नीच कृष्णानें आणि धर्मराजानें त्याची उपेक्षा केली ! धिक्कार असो त्या कृष्णाला आणि युधिष्ठिराला ! भीमसेनानें अधर्मानें तुझा वध केला आहे, म्हणून जोंपर्यंत ही निखिल चराचर सृष्टि राहील, तोंपर्यंत सर्व योद्धे भीमाची निंदाच करीत राहतील ! तो यदुनंदन वीर्यवान् बळराम तुझ्याविषयीं नेहमीं असें म्हणत असे कीं ' गदायुद्धामध्यें दुर्योधनासारखा दुसरा कोणी योद्धा नाहीं !' हे भारता, गदायुद्धामध्यें तो बळराम 'हाच एक माझा शिष्य' म्हणून सभांतून तुझी नित्य स्तुति करीत असे ! जी गति क्षत्रियाला उत्तम म्हणून मोठमोठ्या ऋषींनीं सांगितली आहे, ती गति तूं आज समरांत पडून मिळविली आहेस !

"पुरुषश्रेष्ठ दुर्योधना, तूं युद्धांत पडलास, म्हणून मला दुःख होत नाहीं, तर हतपुत्र गांधारी आणि धृतराष्ट्र यांची अवस्था लक्षांत येऊन मला वाईट वाटत आहे ! त्यांचा तूं रक्षणकर्ता हत होऊन तीं आतां भिकाऱ्यांसारखीं शोक करीत पृथ्वीवर फिरत राहतील ! ज्यांनीं धर्मज्ञतेचा मोठा डौल मिरविला

आणि तुझा वध होत असतां उपेक्षा केली, त्या कृष्णाचा आणि त्या दुर्मति अर्जुनाचाहि धिक्कार असो! राजा, ते सर्व निर्लज्ज पांडवहि म्हणतील कीं 'आम्हीं दुर्योधनाला कसें मारलें पहा!' परंतु गांधारे, युद्धामध्यें पतन पावून तूं धन्यच झाला आहेस! हे पुरुषश्रेष्ठा, तूं शत्रूंशीं धर्मानें अभिमुख युद्ध करीत राहिलास! गांधारीचे सर्व पुत्रांचा आणि ज्ञातिबांधवांचाहि वध झाला! आतां तिची काय गति होईल? त्याचप्रमाणें त्या मानी धृतराष्ट्राची आतां काय बरें अवस्था होईल? कृतवर्मा, मी आणि महारथ कृपाचार्य हे आम्ही ज्याअर्थीं तुझ्या मागोमाग स्वर्गाला आलों नाहीं, त्याअर्थीं आम्हांलाहि धिक्कार असो! तूं सर्व कामना परिपूर्ण करणारा, प्रजेचें सर्व प्रकारें हित करणारा राजा असून तुझ्यामागून आम्ही येऊं नये, त्याअर्थीं आम्हां नराधमांचा धिक्कार असो!

"राजा, कृपाच्या, तुझ्या, माझ्या आणि माझ्या पित्याच्या पराक्रमानें तुझीं आणि तुझ्या पदरच्या सर्व सेवकांचीं गृहें सर्वदा रत्नांनीं भरलेलीं असून तुझ्याच प्रसादानें आम्हांला मित्र, बांधव यांसह मोठमोठ्या यज्ञांत लाभ होऊन दक्षिणाहि पुष्कळ मिळाल्या आहेत! मग आम्हां पाप्यांची अशी प्रवृत्ति कां व्हावी कीं तूं सर्व पार्थिवांना बरोबर घेऊन परम गतीला जावें आणि आम्हीं मात्र तिघांनीं मागें रहावें! याच गोष्टीनें आमचे हृदयांत दुःखाग्नि भडकला आहे! आम्ही स्वर्गहीन झालों आहों! कोणताहि पुरुषार्थ न संपादितां तुझ्या सुकृताचें मात्र स्मरण करीत आम्ही राहिलों आहों! असें काय बरें आमचें कर्म आहे कीं आम्ही तुझ्याबरोबर येऊं नये! हे कुरुश्रेष्ठा, आतां आम्ही दुःखानें या पृथ्वीवर फिरत रहाणार! तुझ्यावांचून आतां आम्हांला शांति आणि सुख यांची प्राप्ति कोठून होणार? हे राजा, तूं येथून स्वर्गाला गेल्यावर तुझी महारथींशीं भेट होईल, तेव्हां तूं त्यांना ज्येष्ठ आणि श्रेष्ठ या क्रमानें मीं वंदन केल्याचें सांग! सर्व धनुर्धरांमध्यें श्रेष्ठ अशा गुरु द्रोणाचें पूजन करून त्याला सांग कीं आज मीं धृष्टद्युम्नाचा वध केला! तसेंच महारथी बाल्हिक, जयद्रथ, सोमदत्त, भूरिश्रवा आणि दुसरेहि पूर्वीं स्वर्गस्थ झालेले अनेक राजे यांना आलिंगन दे आणि मीं वंदन केल्याचें सांगून त्यांचें कुशल विचार!"

(२) **संजय**—त्या भग्नजानु आणि अचेतन राजाला असें सांगून अश्वत्थाम्यानें पुनः त्याच्याकडे पाहिलें आणि म्हटलें, "दुर्योधना, तूं जीवंत आहेस, तरी कानाला तृप्त करणारें भाषण ऐक! पांडवांच्या बाजूचे सात आणि कौरवांच्या

पक्षाचे आम्ही तीन इतके योद्धे उरलों आहों ! पांच पांडवबंधु, श्रीकृष्ण आणि सात्यकि असे सात पांडवांकडील योद्धे आणि मी, कृपाचार्य आणि कृतवर्मा असे कौरवांकडील तीन वीर हे ते योद्धे होत ! द्रौपदीपुत्र, धृष्टद्युम्नपुत्र आणि अवशिष्ट सर्व पांचाल हे मारले गेले ! त्यांनीं आमचा संहार केला, त्याचा प्रतिकार कसा केला, तें पहा. सर्व पांडवपुत्र मारले गेले ! मी सौप्तिक युद्ध करून राहिलेलीं मनुष्यें आणि वाहनें यांसह सर्व शिबिराचा संहार उडविला ! राजा, त्या पापी धृष्टद्युम्नाचा रात्रीच्या वेळीं शिबिरांत शिरून मी जनावराप्रमाणें वध केला !

(३) राजा धृतराष्ट्रा, ती अत्यंत आवडती बातमी अश्वत्थाम्याच्या तोंडून ऐकून दुर्योधनाला पुनः शुद्धि आली आणि तो म्हणाला, " जें कर्म भीष्म करूं शकला नाहीं, जें कर्णानें कधीं केलें नाहीं किंवा तुझ्या पित्याचेहि हातून घडलें नाहीं तें कर्म आज कृतवर्मा आणि कृप यांना संगतीं घेऊन तूं केलेंस ! तो नीच सेनापति धृष्टद्युम्न शिखंडीसह हत झाला आहे, त्यामुळें इंद्राच्याच पदवीला मी पोंचल्यासारखें मला वाटत आहे ! तुमचें कल्याण होवो ! तुमची गांठ आतां पुनः स्वर्गलोकीं पडेल !"

(४) राजा, असें बोलून तो तुझा पुत्र आपल्या मित्रांना दुःखांत लोटून निधन पावला ! त्याचा आत्मा स्वर्गांत गेला आणि शरीर मृत्तिकेंत प्रविष्ट झालें ! दुर्योधन समरांगणांत शत्रूवर धांवून जाऊन शेवटीं शत्रूकडून मारला गेला ! पुनःपुनः त्यांनीं दुर्योधनाला आलिंगन दिलें, नंतर त्याच्या मृत देहाकडे पुनःपुनः नजर टाकिली आणि आपापल्या रथावर आरूढ झाले ! त्या वेळीं अश्वत्थाम्यानें करुणापूर्वक शोक केला, तो पाहून कृप आणि कृतवर्मा यांनींहि दुःखार्त होऊन विलाप केला ! नंतर प्रभातकालीं ते तिघेहि नगराकडे गेले !

(५) राजा, अशाप्रकारें कौरव-पांडवसैन्यांचा भयंकर संहार झाला आणि हा सर्व अनर्थ तुझ्याच दुष्ट मसलतीनें झाला ! तुझा पुत्र स्वर्गाला गेल्यावर मी शोकाकुल झालों आणि भगवान् व्यासानें मला दिलेली दिव्य दृष्टिहि नष्ट झाली !

वैशंपायन—जनमेजया, पुत्राची निधनवार्ता ऐकून धृतराष्ट्रानें दुःखाचा एक दीर्घ उष्ण निश्वास सोडला आणि चिंताकुल होऊन बसला ! १०. १. ९.

---

# ऐषीकपर्व.

## अध्याय १० वा.

[ १ धृष्टद्युम्नाच्या सारथ्याकडून युधिष्ठिराला शिबिरवृत्तांतकथन. २ युधिष्ठिराचा शोक. ]

( १ ) **वैशंपायन**—जनमेजया, ती रात्र निघून गेल्यावर धृष्टद्युम्नाचा सारथि धर्मराजाकडे गेला आणि त्यानें सौप्तिकयुद्धांत झालेला सर्व संहार त्यास सांगितला.

**सूत**—महाराजा, द्रौपदीपुत्र आणि द्रुपदाचे पुत्र निर्धास्तपणें रात्रीचे वेळीं आपल्या शिबिरांत प्रमत्त होऊन गाढ झोंपेंत असतां त्या दुष्ट गौतमानें, भोज कृतवर्म्यानें आणि पातकी अश्वत्थाम्यानें त्यांचा वध केला ! त्यांनीं प्रास, शक्ति, परश्वध इत्यादिकांनीं सहस्रावधि नर, गज, अश्व यांचा वध करून सर्व शिबिराचा नाश करून टाकिला ! कुऱ्हाडींनीं मोठें वन तोडीत असतां जसा भयंकर ध्वनि ऐकूं येतो, तसा हे भारता, तुझ्या सैन्यांत होत असल्याचें ऐकूं आलें ! हे महीपते, त्या सर्व सैन्यांतून एकटा मी बचावलों आणि कृतवर्मा दुसऱ्या कोठें व्यग्र झाला असतां त्याच्या हातून कसा तरी सुटलों !

( २ ) ती अशुभ वार्ता ऐकून धर्मराज युधिष्ठिर पुत्रशोकानें मूर्च्छित होऊन भूमीवर पडला ! तो पडत असतां सात्यकी, भीमसेन, अर्जुन आणि नकुल-सहदेव यांनीं त्याला सांवरून धरिलें. धर्मराज थोड्या वेळानें सावध झाला आणि प्रथम शत्रूंला जिंकून नंतर पराभूत झालेल्या वीराप्रमाणें तो शोक करूं लागला. तो म्हणाला, 'दिव्यदृष्टि लोकांना देखील कालगति समजणें कठीण आहे. शत्रूंचा पराजय झाल्यावर ते विजयी झाले व आमचा जय झाला असतांहि अखेरीला आम्ही पराजित झालों ! बांधव, मित्र, पितर, मुलगे, सुहृद्वर्ग, भाऊबंद, अमात्य, पौत्र या सर्वांना जिंकून शेवटीं आमचाच पराजय झाला ! जेथें अनर्थ दिसत होता, तेथें उत्तम कार्यभाग झाला आहे, आणि जेथें आम्ही पूर्णपणें विजय मिळवून कृतार्थ झालों होतों, तेथें अखेरीला तो विजय अनर्थाकार झाला ! म्हणून जय म्हणजे अपजय होय असें समजलें पाहिजे ! जय पावून जर विपन्नाप्रमाणें मनुष्याची स्थिति होते तर तो जय कसा मानावा ? ज्याचे कर्णि-नालीक बाण हे दंष्ट्रांप्रमाणें होते, ज्याची तरवार जिव्हेसारखी होती, ज्याचें धनुष्य उघड्या जबड्याप्रमाणें होतें, ज्याच्या धनुष्याचा आवाज मोठ्या

गर्जनेसारखा होता, जो समरांगणांत सिंहासारखा भयंकर होता, अशा कर्णाला ज्यांनीं दाद दिली नाहीं, ते आमच्या प्रमादानें मारले गेले! ज्या ठिकाणीं रथ हे मोठे डोह, बाणवर्षाव ह्या जेथील लाटा, वाहनें व अश्व वगैरे हीं जेथील रत्नें, शक्त्यादि आयुधें हे ज्या ठिकाणचे मासे, गज हे जेथील मगर, धनुष्यें हीं ज्यांतील भोंवरे आणि मोठमोठे बाण हे ज्यावरील फेंस, युद्ध हा जेथील चंद्रोदय, धनुष्याचा ध्वनि ही जेथील गर्जना असा द्रोणरूपी समुद्र नाना प्रकारच्या शस्त्रनौकांनीं जे तरून गेले, ते राजपुत्र आमच्याच चुकीमुळें मरून गेले ! या लोकीं मनुष्याचा वध होण्याला प्रमाद जसा कारण होतो, तसा दुसऱ्या कशानेंहि तो होत नसतो ! कारण प्रमत्त मनुष्याला अर्थप्राप्ति चोहोंकडून सोडून जाते आणि सर्व प्रकारचे अनर्थ त्याच्यावर येऊन पडतात ! उत्कृष्ट ध्वजाग्र हा जेथील धूमकेतु, बाण ह्या जेथील ज्वाला, कोप हा ज्या ठिकाणचा सोसाट्याचा वारा, धनुष्याचा टणत्कार हा जेथें महाघोष आणि कवच व नानाविध शस्त्रें हा ज्या ठिकाणचा होम, असा भीष्मरूपी अग्निदाह ज्यांनीं सहन केला, ते राजपुत्र आमच्या हयगयीमुळें मारले गेले !

राजा, प्रमत्त मनुष्याला विद्या, तप, श्री, विपुल यश यांपैकीं कशाचीहि प्राप्ति होणें शक्य नाहीं. सर्व शत्रूंना सावध राहून वध करणारा इंद्र कसें सुख भोगीत आहे पहा ! इंद्रासारखे पराक्रमी राजपुत्र आमच्या प्रमादामुळें-असाविध्यानें-हत झाले पहा ! श्रीमंत व्यापारी ज्याप्रमाणें समुद्र तरून येतात, आणि शेवटीं एकाद्या लहान नदीमध्यें बुडून मरतात, त्याप्रमाणें आज ह्या राजपुत्रांची स्थिति झाली. निद्रावश झाले असतां क्रूरांनीं ज्यांचा वध केला, ते निःसंशय स्वर्गलोकीं गेले ! परंतु ही साध्वी द्रौपदी ह्या शोकसमुद्रामध्यें आतां कसा प्रवेश करील, हा विचार मनांत येऊन मला फार दुःख होत आहे ! तिचे बंधु, पुत्र, वृद्ध पांचालराज पिता, या सर्वांचा वध झाल्याचें ऐकून ती मूर्च्छा येऊन पडेल आणि शोकाकुल होऊन झिजून अगदीं कृश होईल ! हा शोक असह्य होऊन ती मग सुखोपभोग तरी कसले घेणार ? पुत्रक्षय व भ्रातृवध ह्यांनीं झालेल्या शोकाग्नीमुळें ती जळून जाईल !

राजा, याप्रमाणें त्या दुःखी कुरुराजानें शोक केला. नंतर तो नकुलाला बोलला, ‘ नकुला, जा आणि त्या मंदभाग्य द्रौपदीला व तिजबरोबर तिच्या मातृपक्षीय लोकांना घेऊन ये ! ’ त्या धर्मप्रतिम धर्मराजाचें भाषण मान्य करून नकुल तत्काल रथांत बसला आणि द्रौपदीच्या मंदिरांत व पांचालराजाच्या राण्या

जेथें होत्या तेथें गेला! याप्रमाणें द्रौपदीला आणण्याकरितां धर्मराजानें नकुलाला पाठविलें आणि आपण शोकविह्वल होऊन जेथें मुलगे पडून त्यांसभोंवतीं भूतगण जमून बसले होते, त्या रणभूमीवर रुदन करीत गेला! त्या रुद्ररूप व अमंगल स्थलीं प्रवेश करून त्यानें आपले पुत्र, इष्टमित्र आणि बांधव यांना भूमीवर पडलेले पाहिले! त्यांचीं अंगें रक्तानें भरलेलीं होतीं, त्यांचे देह छिन्न झाले होते आणि त्यांचीं मस्तकें तोडून टाकिलीं होतीं! त्यांना पाहून धर्मवेत्त्यांमध्यें श्रेष्ठ अशा त्या धर्मराजाला अत्यंत भडभडून आलें! त्यांना पाहून त्यानें आपल्या परिवारासह फार शोक केला आणि देहभान नष्ट होत्साता एकदम भूमीवर पडला! १०. २. १०.

---

## अध्याय ११ वा.

[ १. नकुलाचें द्रौपदीसह युधिष्ठिराकडे आगमन. २. भीमाचें अश्वत्थाम्याचे मस्तकावरील मणिहरणार्थ गमन. ]

( १ ) **वैशंपायन**—राजा जनमेजया, युद्धांत पुत्र, पौत्र, मित्र यांचा संहार झालेला पाहून तो युधिष्ठिर राजा अगदीं दुःखमग्न होऊन गेला. पुत्र-पौत्र, बंधु आणि स्वजन यांची आठवण होऊन तो महात्मा अतिविलाप करूं लागला. त्याचे डोळे अश्रूंनीं भरून आले, तो थरथर कांपूं लागला आणि त्याचें देहभानहि नष्ट झालें. तेव्हां सुहृज्जन उद्विग्न होऊन त्याचें समाधान करूं लागले. इतक्यांत नकुल हा सूर्याप्रमाणें तेजस्वी रथांत बसून दुःखी द्रौपदीला घेऊन आला. उपप्लव्य नगरांत घोर अनर्थवार्ता ऐकून आधींच ती विह्वल झाली होती! आतां आपल्या सर्व पुत्रांचा विनाश झालेला ऐकून वाऱ्यानें थरथर कांपणाऱ्या केळीप्रमाणें ती कांपूं लागली आणि धर्मराजापुढें येऊन शोकविह्वल होत्साती धाडकन् जमिनीवर पडली! त्या शोकार्त कमलाक्षीचें मुख राहूनें ग्रस्त चंद्राप्रमाणें दिसूं लागलें! तिला पडलेली पाहून सत्यविक्रमी भीमसेनानें मोठी त्वरा करून आपल्या बाहूंनीं तिला सांवरून धरिलें. भीमसेनानें तिला आश्वासन दिल्यावर ती त्या धर्मराजाला रडत रडत म्हणाली, " राजा, क्षत्रियधर्माप्रमाणें आपल्या पुत्रांना मृत्युमुखीं देऊन ही निखिल पृथ्वी आपल्या हातांत पडली आणि आतां आपण तीवर राज्य कराल, ही मोठ्या भाग्याची गोष्ट आहे! हे पार्था, आपणाला गजांतलक्ष्मी व सर्व पृथ्वीचें राज्य पावून

आतां सौभद्र व अभिमन्यूची आठवण होणार नाहीं, ही सुदैवाची गोष्ट आहे. क्षत्रियधर्माप्रमाणें आपले शूर पुत्र रणांगणावर पडलेले ऐकून उपप्लव्य नगरांत आपण सुखानें माझ्याशीं रहाल व त्यामुळें मुलांची आठवण आपणांस कधींहि होणार नाहीं, हीहि आनंदाची गोष्ट आहे!

"राजा, त्या पापी अश्वत्थाम्यानें आमच्या लोकांचा वध केलेला ऐकून अग्नि ज्याप्रमाणें आपल्या आश्रयाला असलेल्या वस्तूंना दग्ध करून टाकितो, त्याप्रमाणें हा शोक मला जाळीत आहे! त्या पापी द्रौणीचा त्याच्या अनुयायांसह आज जर युद्धांत पराक्रम गाजवून आपल्या हातून वध होणार नाहीं, आणि त्याला आपल्या पापकर्माचें फळ मिळणार नाहीं, तर मी येथें प्राण जाईपर्यंत अशीच बसून राहीन, हें पक्कें समजा!"

जनमेजया, असें बोलून ती याज्ञसेनी द्रौपदी धर्मराजाजवळ येऊन बसली! आपली प्रिय पट्टराणी अशी बसलेली पाहून तो धर्मात्मा धर्मराज तिला म्हणाला, "हे कल्याणि, तूं धर्मज्ञ आहेस! तुझे पुत्र आणि बंधु यांना धर्ममार्गाला योग्य असें मरण प्राप्त झालें आहे; म्हणून त्याबद्दल शोक करणें तुला योग्य नाहीं! हे कल्याणि, तो अश्वत्थामा येथून दूर वनांत गेला असला पाहिजे. तर हे सुंदरि, युद्धांत त्याचा पराजय होऊन तो पतन पावल्याचें तुला कसें बरें समजणार?"

द्रौपदी—अश्वत्थाम्याच्या मस्तकावर जन्मापासूनचा मणि असल्याचें मीं ऐकिलें आहे. त्या पाप्याला युद्धांत मारून त्याच्या मस्तकावरील मणि जर तुमच्या मस्तकावर माझ्या दृष्टीस पडेल, तरच हें जीवित मी धारण करीन, असा माझा निश्चय आहे.

असें धर्मराजाला बोलून ती सुंदरी भीमसेनाजवळ गेली आणि त्याला म्हणाली, "अहो भीमसेन, क्षत्रियधर्माला अनुसरून माझें रक्षण करणें तुमचें कर्तव्य आहे. इंद्रानें ज्याप्रमाणें शंबरासुराचा वध केला, त्याप्रमाणें तुम्ही त्या पाप्याला मारून टाका. पराक्रमांत तुमच्याशीं तुल्य दुसरा पुरुष कोणी नाहीं, हें त्रैलोक्यांत प्रसिद्ध आहे. वारणावत नगरांत पांडवांवर मोठा कठिण प्रसंग आला असतां त्यांतून तुम्हींच त्यांना सोडविलें! हिडिंब राक्षसाची गांठ पडली असतां तुम्हीच त्यांना गति झालां! त्याचप्रमाणें इंद्रानें पौलोमीला संकटमुक्त केलें, त्याप्रमाणें तुम्हीं मला कीचकानें अत्यंत छळिलें असतां सोडविलें!

अहो भीमसेन, ज्याप्रमाणें तुम्हीं हीं मोठमोठीं पराक्रमकृत्यें पूर्वीं केलीं, त्याप्रमाणें आतांहि या वैरी अश्वत्थाम्याचा वध करा आणि सुखी व्हा !"

राजा, अशाप्रकारें तिनें केलेला विलाप ऐकून त्या बलवान् भीमसेनाला तें तिचें दुःख पाहवेना ! तो तत्काल आपल्या सुवर्णमय दिव्य महारथावर चढला आणि आपलें रुचिर धनुष्य, बाण वगैरे घेऊन आणि नकुलाला सारथ्यपद देऊन अश्वत्थाम्याच्या वधाच्या उद्देशानें आपलें सशर धनुष्य त्यानें जोडलें आणि शीघ्र अश्वांस हांकलें. त शीघ्रगामी अश्व मोठ्या वेगानें निघाले. अशा रीतीनें रथ घेऊन तो भीमसेन आपल्या शिबिरांतून निघाला ! १०.२.११.

---

## अध्याय १२ वा.

[ १ अश्वत्थाम्याचा अविचार. २ भीम निघून गेला असतां श्रीकृष्ण धर्मराजाला भीमाचें संरक्षण करण्यास सांगतो. ]

( १ ) वैशंपायन—राजा, तो भीमसेन निघून गेल्यावर यदूत्तम श्रीकृष्ण कुंतीपुत्र युधिष्ठिराला बोलला, "युधिष्ठिरा, पुत्रशोकानें दुःखी झालेला तुझा बंधु समरांत अश्वत्थाम्याचा वध करण्याच्या इच्छेनें एकटाच जात आहे. हे भरतर्षभा, सर्व बंधूंमध्यें भीम हा तुला अत्यंत प्रिय आहे. तो आज संकटांत सांपडला असतां त्याचे संरक्षणाचा उपाय तूं योजीत नाहींत हें कसें ? अरे, द्रोणानें आपल्या पुत्राला जें ब्रह्मशिर नांवाचें अस्त्र शिकविलें आहे, तें संपूर्ण जगतालाहि जाळून टाकील असें आहे. तेंच अस्त्र त्या द्रोणानें सर्व धनुर्धरश्रेष्ठ अर्जुनालाहि संतुष्ट होऊन दिलें. एकदां त्या अश्वत्थाम्यानें द्रोणाला एकांतांत गांठून उतावीळपणानें तें अस्त्र त्याजकडे मागितलें ! तेव्हां द्रोणाला पुत्राचें तें म्हणणें फारसें आवडलें नाहीं आणि त्या सर्वधर्मवेत्त्या आचार्यानें आपल्या दुरात्म्या पुत्राचा अविचार लक्ष्यांत आणून त्याला बजाविलें कीं, 'बाळा, तूं रणांत कितीहि संकटांत पडलास, तरी या अस्त्राचा प्रयोग करूं नकोस. विशेषतः मनुष्यप्राण्यावर तर हें कधींच सोडूं नकोस !'

"एवढें सांगून तो आपल्या पुत्राला आणखी म्हणाला, 'हे पुरुषश्रेष्ठा, तूं सन्मार्गानें जाणारा मनुष्य नाहींस !' युधिष्ठिरा, तें बापाचें अप्रिय भाषण ऐकून तो अश्वत्थामा आपल्या हातून कोणतेंहि पुण्यकर्म होण्याविषयीं निराश होत्साता शोकार्त होऊन पृथ्वीवर भटकूं लागला ! हे भारता, तेव्हां तूं वनांत रहात

असतां तो द्वारकेंत येऊन राहिला. तेथें सर्व यादवांची त्याजविषयीं पूज्यबुद्धि झाली. एकदां तो समुद्रकिनाऱ्यावर द्वारवतीतीरीं राहत असतां मला एकांतांत भेटून हंसत म्हणाला, 'कृष्णा, उग्र तपश्चर्या करून माझ्या अमितविक्रमी पित्यानें अगस्त्यापासून देव-गंधर्वपूजित असें जें ब्रह्मशिरनामक अस्त्र मिळविलें आहे, तें त्या भारताचार्याप्रमाणें माझ्या जवळहि आहे. हे यदूत्तमा, तरी तूं तें मजपासून घे आणि तुझ्याजवळील शत्रुसंहारक सुदर्शन चक्र मला दे!' धर्मराजा, याप्रमाणें तो हात जोडून माझ्यापाशीं माझें अस्त्र मागूं लागला, तेव्हां मींहि त्याला संतोषानें म्हटलें, "देव, दानव, गंधर्व, मानव, पक्षी व सर्प हे सर्व जरी एकत्र केले, तरी त्यांच्यानें माझ्या वीर्याची बरोबरी शंभ-राच्या हिश्शानें सुद्धां होणार नाहीं. हें माझें धनुष्य, ही माझी गदा, हें माझें चक्र, ही माझी शक्ति, ह्यांतून तुला जें जें कांहीं पाहिजे तें तें मी तुला देतों, मागून घे, यांतून तुला जें घेतां येऊन त्याचा प्रयोग शत्रूवर करतां येईल, तें तूं खुशाल घे. याच्या मोबदला मला जें अस्त्र तूं देऊं करीत आहेस, तेंहि तूं घे. मला त्याची जरूरी नाहीं!

"'युधिष्ठिरा, मग त्या अश्वत्थाम्यानें माझ्याशींच स्पर्धा करून पुढें ठेविलेल्या त्या शस्त्रास्त्रांतून तें सुंदर व वज्रनाभ चक्र मागितलें. तेव्हां मीं म्हटलें, 'बरें आहे, घे!' मग अश्वत्थाम्यानें एकदम त्या चक्रावर उडी घेऊन तें आपल्या डाव्या हातांत धरिलें. परंतु त्याला तें जाग्यावरून हालवितांहि येईना. तेव्हां तो आपला उजवा हात लावून आपल्या सर्व सामर्थ्यानें तें उचलूं लागला. तरी तें त्याला उचलेना. मग शत्रूवर तें चालवून त्याचा प्रयोग करण्याचें नांवच नको! तेव्हां तो थकून जाऊन दुःखी झाला आणि तेथून परतला. अशाप्रकारें कष्टी होऊन त्यानें तो नाद सोडला. तेव्हां मींच त्याला बोलावून म्हटलें, "अरे, जो सर्व मनुष्यांमध्यें मोठ्या योग्यतेचा, ज्याच्याजवळ गांडीव धनुष्य आहे, ज्याचे अश्व पांढरे शुभ्र आहेत, ज्याच्या केतूवर मारुति बसला आहे, ज्यानें देवदेवेश उमापति शंक-रालाहि द्वंद्वयुद्धामध्यें आपल्या पराक्रमानें संतुष्ट केलें, ज्याच्याहून ह्या पृथ्वी-तलावर मला दुसरा प्रिय कोणीच नाहीं, ज्या महात्म्याकरितां मी माझे प्राणहि देण्यास सर्वदा तयार, त्या माझ्या प्रिय मित्र अर्जुनानेंहि तूं ज्या प्रकारच भाषण केलेंस, तसें कधीं केलें नाहीं. त्याचप्रमाणें बारा वर्षें घोर ब्रह्मचर्य-व्रत करून व हिमाचलावर राहून तपःसामर्थ्यानें जो पुत्र मीं प्राप्त करून घेतला व जो माझ्याचसारखें व्रतानुष्ठान करणाऱ्या रुक्मिणीच्या पोटीं जन्मास

आला, त्या माझ्या तेजस्वी प्रद्युम्न पुत्रानेंहि अरे मूढा, हें माझें दिव्य आणि रणांगणांत अप्रतिम असें चक्र कधीं मागितलें नाहीं, तें तूं आज मागितलेंस! माझ्या अतिबलवान् बलराम बंधूनें, सांबानें, गदानें किंवा द्वारकावासी वृष्णि व अंधक महारथ्यांनींहि तुझ्याप्रमाणें माझ्याकडे आजपर्यंत कधीं मागितलें नाहीं. बा वीरोत्तमा, तूं भारताचार्य द्रोणाचा पुत्र असून सर्व यादवांना पूज्य आहेस. हें चक्र घेऊन तूं कोणाशीं युद्ध करणार आहेस?

(२) "मी असें भाषण केल्यावर त्या अश्वत्थाम्यानें मला उत्तर दिलें, 'कृष्णा, मी सत्य सांगतों कीं, तुझी पूजा करून मी तुझ्याशींच युद्ध करीन! प्रभो, मी अजिंक्य व्हावें, ह्या इच्छेनें हें देव-दानवपूजित चक्र मीं तुझ्याकडे मागितलें. केशवा, आतां ती दुर्लभ वस्तु मला प्राप्त न झाल्यामुळें मी आल्या मार्गानें परत जातों! मला निरोप दे! सर्व अस्त्रांमध्यें भयंकर असें हें चक्र वीरश्रेष्ठ तुझ्याशिवाय दुसऱ्या कोणालाहि धारण करतां येणार नाहीं!' असें बोलून अश्वत्थाम्यानें रथाला जुंपण्यासारखे अश्व, पुष्कळ द्रव्य आणि विविध प्रकारचीं रत्नें घेऊन गमन केलें. तो आतां परत आला आहे. तो अतिकोपी, दुरात्मा, खोडकर आणि क्रूर आहे. त्याला ब्रह्मशिर अस्त्र चांगलें अवगत आहे. म्हणून त्यापासून भीमाचें रक्षण अवश्य केलें पाहिजे!" १०. २. १२.

---

## अध्याय १३ वा.

[ १ भागीरथीतीरावर व्याससंनिध बसलेल्या अश्वत्थाम्याचें कृष्णादिकांस दर्शन. २ अश्वत्थाम्याकडून अस्त्रप्रयोग. ]

(१) **वैशंपायन**—राजा, असें त्या कुरुश्रेष्ठ धर्मराजाला सांगून तो यादवांना आनंद देणारा श्रीकृष्ण सर्व आयुधांनीं सज्ज अशा आपल्या उत्तम रथावर चढला. त्या रथाला सुवर्णमालांनीं सुशोभित कांबोजदेशचे अश्व जोडले होते. रथ उदित रवीप्रमाणें अत्यंत देदीप्यमान दिसत होता; तो सर्व प्रकारच्या रत्नांनीं विभूषित केला होता. त्या रथाच्या धुरेच्या उजव्या बाजूला शैब्य व डाव्या बाजूला सुग्रीव जोडले होते. त्यांच्या मागें मेघपुष्प व बलाहक होते. त्या रथावर विश्वकर्म्यानें तयार केलेला व रत्नादिकांनीं विभूषित असा दिव्य ध्वज फडकत होता. त्यावर अत्यंत कांतिमान् असा सर्पशत्रु गरुड उभा होता. अशा त्या रथावर सर्व धनुर्धरश्रेष्ठ श्रीकृष्ण चढला. त्याच्या

पार्श्वभागीं अर्जुन आणि धर्मात्मा कुरुराज युधिष्ठिर बसले. त्या समयीं शार्ङ्गधनुष्य धारण करणारा इंद्र रथांत बसून त्याच्या सभोंवतीं जसे अश्विनीकुमार शोभतात, तसे ते दिसले. आपल्या रथावर त्या दोघांना घेऊन श्रीकृष्णानें आपल्या हातांत प्रतोद घेतला आणि त्या वेगवान् अश्वांना हांकतांच ते धांवत सुटले. अशा रीतीनें श्रीकृष्ण आणि धर्मार्जुन यांना घेऊन ते भरधांव जात असतां, पक्षी उडतांना होणाऱ्या शब्दाप्रमाणें मोठा ध्वनि होऊं लागला. हे भरतश्रेष्ठा, ते तिघे वीर भीमसेनाच्या मागें जाऊं लागले असतां एका क्षणांत त्यांनीं त्याला गांठलें, तरी शत्रूचा पाठलाग करण्याविषयीं उत्सुक अशा त्या क्रोधसंतप्त भीमाचें निवारण त्यांच्यानें करवेना ! पांडवपुत्रांचा वध करणारा दुरात्मा अश्वत्थामा ज्या ठिकाणीं असल्याचें त्यानें ऐकिलें होतें, त्या भागीरथीतीरावर त्यानें आपले वेगवान् अश्व त्या तिघां धनुर्धरांच्या पुढून हांकले. मग उदकतीरावर ऋषींसह बसलेला कृष्णद्वैपायन व्यास त्याच्या दृष्टीस पडला. त्याच्याच जवळ तो क्रूरकर्मा, घृतानें माखलेला, दर्भवस्त्र धारण करणारा आणि धुळीनें भरलेला असा अश्वत्थामा बसलेला त्याच्या दृष्टीस पडला. आपलें सशर धनुष्य घेऊन भीमसेन त्यावर धांऊन गेला आणि ‘ अरे, थांब, थांब, ’ म्हणून मोठ्यानें ओरडला.

( २ ) राजा, त्यावेळीं धनुष्य घेऊन आपल्यावर येणाऱ्या भीमसेनाला आणि त्याच्या मागें धर्मार्जुनांला श्रीकृष्णाच्या रथांत बसलेले पाहून अश्वत्थामा भयभीत झाला आणि आपला काळ जवळ आल्याचें त्याला वाटलें ! मग न भीतां त्या अश्वत्थाम्यानें आपल्याकडील दिव्य अस्त्राचें चिंतन केलें आणि त्या संकटप्रसंगीं तें दिव्य अस्त्र त्यानें सोडलें ! त्यावेळीं पांडव मोठे शूर असून त्यांजवळ दिव्य आयुधें आहेत, ह्याचा त्यानें कांहींएक विचार न करितां रागानें ‘ अस्त्रा, या पांडवांचा संहार कर, ’ असें कठोर भाषण केलें ! हें बोलून त्यानें सर्व लोकांना मोह उत्पन्न करणारें तें अस्त्र सोडलें ! त्यावेळीं त्या अस्त्रांतून जो अग्नि उत्पन्न झाला, तो प्रलयकालच्या यमाप्रमाणें तीनहि लोकांना जाळून टाकील कीं काय असें वाटूं लागलें ! १०. २. १३.

## अध्याय १४ वा.

[ १ कृष्णाज्ञेनें अर्जुनानें अश्वत्थाम्यावर केलेला अस्त्रप्रयोग. ]

(१) वैशंपायन—राजा, आजानुबाहु श्रीकृष्णानें अश्वत्थाम्याचा विचार आधींच जाणून अर्जुनाला म्हटलें, “ अर्जुना, द्रोणाचार्यांनें तुला दिलेलें दिव्य अस्त्र सोडण्याची हीच वेळ आहे, तरी तूं कोणत्याहि अस्त्राचें निवारण करणारें तें अस्त्र आपलें व आपल्या बंधूंचें रक्षण करण्याकरितां आतां सोड !” केशवाचें भाषण ऐकून तो शत्रुसंहारक अर्जुन आपलें सशर धनुष्य घेऊन शीघ्र रथांतून खालीं उतरला आणि प्रथम अश्वत्थाम्याला आणि नंतर आपल्या बंधूंना व आपणाला कल्याण असो, असें बोलून त्यानें सर्व देवतांना व वडील माणसांना नमस्कार केला आणि तें अस्त्र सोडलें. अस्त्र सोडतांना ‘ ह्या अस्त्रानें शत्रूच्या अस्त्राचें शमन होवो ’ असें शुभचिंतन त्यानें केलें !

राजा, नंतर अर्जुनानें सोडलेलें तें अस्त्र प्रज्वलित होऊन प्रलयकालच्या अग्नीप्रमाणें भासलें ! त्या अश्वत्थाम्याचेंहि अस्त्र पेटून त्यापासून भयंकर ज्वाला निघूं लागल्या, सोसाट्याचे वारे सुटून हजारों उल्का पडूं लागल्या आणि सर्व भूतमात्राला मोठें भय वाटूं लागलें ! अग्निज्वालांनीं आकाश व्याप्त होऊन गेलें, सर्वत्र भयंकर नाद होऊं लागला आणि पर्वत, अरण्यें व वृक्ष यांसह सर्व पृथ्वी कांपूं लागली. याप्रमाणें तीं दोन्ही अस्त्रें सर्व लोकांना जाळीत राहिलीं. तेव्हां सर्वभूतात्मा नारद आणि भरतपितामह व्यास हे दोन मुनि तेथें प्रगट होऊन त्यांनीं तें सर्व अवलोकन केलें ! प्राणिमात्रावर दया करणारे आणि सर्वधर्मज्ञ असे ते परम तेजस्वी मुनी त्या प्रदीप्त अस्त्रांच्या मध्यें त्या भारद्वाज-धनंजयांचें शमन करण्याकरितां उभे राहिले. प्रज्वलित अग्नीप्रमाणें देव-दानव-पूजित मुनींना कोणाचें भय असणार ?

ऋषि—शस्त्रविद्येंत प्रवीण अशा कोणी महारथ्यांनींहि जें पूर्वीं मनुष्य-प्राण्यावर सोडलें नाहीं तें अस्त्र, हे वीरांनो, तुम्ही सोडून हा काय अनर्थ मांडला आहे ? १०. २. १४.

## अध्याय १५ वा.

[ १ अर्जुनकृत अस्त्रोपसंहार. ]

( १ ) वैशंपायन—नरश्रेष्ठ जनमेजया, अग्नीसमान तेजस्वी त्या मुनींना पाहून अर्जुनानें आपला दिव्य शर सत्वर मागें घेतला आणि हात जोडून तो म्हणाला, 'शत्रूच्या अस्त्राचें शमन व्हावें, म्हणून मीं तें सोडलें होतें; आतां तें माघारें घेतलें असतां हा पापी अश्वत्थामा आपल्या अस्त्रतेजानें आम्हां सर्वांस जाळून टाकील; तरी आमचें व सर्वांचें हित होईल, असें आपण उभयतांनीं सांगावें; आपण देवांसारखे सर्वांस पूज्य आहां.' असें बोलून त्या धनंजयानें पुनः आपलें अस्त्र माघारें घेतलें. त्या अस्त्राचा उपसंहार करणें देवादिकांनाहि कठिण होतें. त्या प्रकारचें परमास्त्र रणांत एकदां सोडलें असतां त्याचा संहार एकट्या अर्जुनावांचून दुसऱ्या कोणाच्यानेंहि करतां आला नसता ! प्रत्यक्ष इंद्रालाहि त्याचा संहार करणें शक्य नव्हतें ! ब्रह्मतेजापासून त्या अस्त्राची उत्पत्ति असल्यामुळें कोणी अविचारी पुरुषानें तें सोडल्यास ब्रह्मचाऱ्यावांचून दुसऱ्या कोणालाहि त्याचा उपसंहार करतां आला नसता ! ज्यानें ब्रह्मचर्यव्रत पूर्णपणें पाळलें नाहीं, असा कोणी तें अस्त्र सोडल्यावर पुनः माघारें घेऊं लागेल, तर तें त्याचें व त्याच्या अनुयायांचें मस्तकच तोडून टाकील ! तें दुष्प्राप्य अस्त्र मिळवून ब्रह्मचारी अर्जुनानें मोठ्या संकटकालीं सुद्धां त्याची योजना केली नव्हती ! अर्जुन हा सत्यव्रती, शूर, ब्रह्मचारी व गुर्वाज्ञा शिरसा मान्य करणारा असल्यामुळें त्याला तें अस्त्र पुनः माघारें घेतां आलें.

अश्वत्थाम्यानेंहि आपल्यासमोर उभे राहिलेल्या त्या उभयतां मुनींस पाहिलें; परंतु आपल्या तेजानें त्या अस्त्राचा उपसंहार करण्याचें सामर्थ्य त्याच्यांत नव्हतें. त्यामुळें तो दीनवदन होऊन द्वैपायन व्यासाला म्हणाला, 'मुने, भीमसेनाच्या भीतीनें परम संकटकालीं प्राणरक्षणार्थ म्हणूनच मीं तें अस्त्र सोडलें होतें. रणांत दुर्योधनाचा कपटानें वध करून त्यानें हें मोठें अधर्माचरण केलें, म्हणून अविचारानें हें अस्त्र मीं सोडलें. त्याचा संहार आतां माझ्या हातून होणार नाहीं. अग्नीसारखें हें दिव्य व दुर्लभ अस्त्र पांडवांचा नाश होवो, असें मंत्रून मीं सोडलें होतें. तें अस्त्र आज सर्व पांडवांचा नाश निःसंशय करील ! क्रोधावेशांत पांडवांचा नाश व्हावा, ह्या हेतूनें हें अस्त्र सोडून मीं पातक जोडलें आहे !'

व्यास—बाबारे, धनंजयानें ब्रह्मशिर अस्त्र सोडलें तें क्रोधानें सोडलें नाहीं, किंवा युद्धांत तुझा नाश व्हावा, ह्याहि इच्छेनें सोडलें नाहीं. तर त्या अस्त्रानें रणांत तुझ्या अस्त्राचें शमन व्हावें, ह्याच उद्देशानें त्यानें सोडलें आणि पुनः त्याचा उपसंहारहि केला. तुझ्या पित्याच्या उपदेशानें असलें ब्रह्मास्त्र मिळवूनहि त्या धनंजयानें आपला क्षत्रियधर्म सोडला नाहीं. अर्जुन सर्वास्त्रवेत्ता असूनहि मोठा धृतिमान् व साधुशील आहे. असें असतां त्याचा बंधूंसह वध करण्यांत तुझा उद्देश तरी कोणता आहे? जेथें ब्रह्मास्त्राचा संहार ब्रह्मास्त्रानेंच होत असतो, त्या ठिकाणीं बारा वर्षेपर्यंत पर्जन्यवृष्टि होत नसते, म्हणून व प्रजांचें हित व्हावें ह्या इच्छेनें अंगांत सामर्थ्य असूनहि तो आपल्या अस्त्रानें तुझ्या अस्त्राचा पाडाव करूं इच्छीत नाहीं! पांडव, तूं आणि सर्व राष्ट्र यांचें सर्वदा रक्षण होणें इष्ट आहे, म्हणून हे महाभुजा, हें दिव्य अस्त्र तूं मागें घे! तुझा क्रोध शांत होवो, आणि पांडवहि निरामय होवोत. राजर्षि अर्जुन हा अधर्मानें तुला जिंकूं इच्छीत नाहीं. तुझ्या मस्तकावर असलेला मणिहि आज तूं पांडवांच्या स्वाधीन कर तो घेऊन पांडव तुला प्राणदान करतील!

अश्वत्थामा—पांडवांनीं आजपर्यंत जीं जीं रत्नें मिळविलीं आहेत किंवा आणखीहि संपत्ति संपादन केली आहे, त्या सर्वांहून माझा हा मणि श्रेष्ठ आहे. तो एकदां धारण केला म्हणजे शस्त्रापासून, व्याधीपासून, क्षुधेपासून किंवा देव-दानव-नागांपासूनहि मुळींच भीति नाहीं! त्याचप्रमाणें राक्षसांची किंवा तस्करांचीहि भीति बाळगण्याचें कारण नाहीं. अशा प्रकारचा सामर्थ्यवान् मणि मी कधींहि हातांतून सोडणार नाहीं. तथापि आपण भगवान् व्यास जें म्हणतां तें मला मान्य केलें पाहिजे! हा माझा मणि व हा मी आहें! तरी तें अस्त्र पांडवांच्या गर्भांवर जाऊन पडणार, यांत संशय नाहीं. कारण तें कधींहि फुकट जाणारें नसून एकदां सोडलें असतां तें पुनः माघारें घेण्यास मीहि समर्थ नाहीं. म्हणून हें अस्त्र मी पांडवांच्या गर्भांवर सोडितों! भगवन्, आपलें वाक्य मी अन्यथा करितों असें नाहीं!

व्यास—हे अनघा, तसें कर. परंतु आतां मात्र बुद्धि पालटूं नकोस. पांडवांच्या गर्भांवर हें अस्त्र सोड आणि तूं स्वस्थ रहा!

वैशंपायन—नंतर रणांगणांत सोडलेलें तें दिव्य अस्त्र अश्वत्थाम्यानें द्वैपायन व्यासाचें भाषण ऐकून पांडवांच्या गर्भांवर सोडलें! १०. २. १५.

---

## अध्याय १६ वा.

[ १ कृष्णानें अश्वत्थाम्याला दिलेला शाप. २ भीमसेनानें द्रौपदीला मणि देऊन तिचें केलेलें सांत्वन. ३ युधिष्ठिरानें द्रौपदीच्या वचनावरून मस्तकीं केलेलें मणिधारण. ]

( १ ) **वैशंपायन**—जनमेजया, त्या पापी अश्वत्थाम्यानें सोडलेलें तें अस्त्र पाहून श्रीकृष्ण मोठ्या आनंदानें अश्वत्थाम्याला बोलला, " विराटाची मुलगी व अर्जुनाची सून ही पूर्वी उपप्लव्य नगरांत असतां एका सत्यवाक् ब्राह्मणानें तिला म्हटलें, ' कुरुकुलांतील सर्व पुरुषांचा नाश झाला असतां तुला पुत्र होईल. तो गर्भांत असतांच त्याला परिक्षित् नांव प्राप्त होईल. तें त्या सत्पुरुषाचें भाषण आतां खरें ठरणार आहे ! हा परिक्षित् पांडवांची पुनः वंशवृद्धि करणारा पुत्र होईल.' " असें गोविंद बोलला असतां अश्वत्थामा अत्यंत क्रोधाविष्ट होऊन त्याला बोलला, ' केशवा, तुझें हें बोलणें पक्षपाताचें आहे. माझे शब्द कधींहि खोटे होणार नाहींत. विराटाच्या मुलीच्या ज्या गर्भाचें रक्षण तूं करूं इच्छीत आहेस, त्या गर्भावर मीं सोडलेलें अस्त्र जाऊन पडणारच !'

**भगवान् कृष्ण**—तुझें परम अस्त्र पडलें असतां फुकट जाईल, असें नाहीं. परंतु तो मृत गर्भ सजीव होऊन पुढें दीर्घायुषी होईल ! तूं मात्र सर्व विद्वानांच्या मुखें दुष्ट व पापी ठरशील आणि हा अश्वत्थामा पापकर्मी–बालहत्या करणारा-असें ते सर्व म्हणतील; म्हणून तूं त्या पापकर्माचें फळ भोगीत रहा ! तूं तीन सहस्र वर्षें या पृथ्वीवर भ्रमण करीत राहशील. तुझे सर्व कांतीचा लोप होऊन तुझें भाषण कोणाशीं होणार नाहीं ! तुझें फिरणें निर्जन देशांत होईल. अरे नीचा, जनांमध्यें तुझें रहाणेंहि होणार नाहीं. भयंकर अरण्यांत तुझी वसति होऊन पू आणि रक्त यांच्या दुर्गंधीनें तुझें शरीर व्याप्त होऊन व नाना रोगांनीं वेष्टित होऊन तूं पापी भटकत राहशील. हा परिक्षित् मोठा होऊन व शारद्वत कृपाचार्यापासून वेदाध्ययन करून सर्वास्त्रें ग्रहण करील ! अशा रीतीनें सर्व परमास्त्रांचें शिक्षण झाल्यावर तो क्षत्रियधर्म उत्तम रीतीनें पाळील आणि तो धर्मात्मा साठ वर्षेंपर्यंत पृथ्वीचें पालन करील ! हे दुष्टा, ह्या पुढें तुझ्या देखत तो महाबाहु कुरुवंशाचा अधिपति होऊन परिक्षित् ह्या नांवानें प्रसिद्ध होईल. तुझ्या शस्त्राग्नितेजानें दग्ध झालेल्या ह्या बालकाला मी जीवंत करीन. हे नराधमा, माझी तपश्चर्या सत्य असून तिचें वीर्य केवढें मोठें आहे तें तूं पहा !

व्यास—अश्वत्थामन्, आमचाहि अनादर करून ज्याअर्थी तूं असलें दारुण कर्म केलेंस आणि ब्राह्मण असूनहि ज्याअर्थी असें वर्तन केलेंस, त्याअर्थी देवकी-पुत्र कृष्णानें जें सांगितलें आहे, तसेंच सर्व घडून येईल, यांत संशय नाहीं. कारण तूं क्षात्रधर्म अंगिकारिला आहेस !

अश्वत्थामा—ब्रह्मन्, तुझ्यासह या लोकीं मी मानवांमध्यें राहीन. आतां ह्या पुरुषोत्तम श्रीकृष्णाची वाणी सत्य होवो !

( २ ) वैशंपायन—नंतर तो मणि महात्म्या पांडवांना देऊन त्या सर्वां-देखत दुःखी अश्वत्थामा वनांत निघून गेला. पांडव शत्रूला जिंकून श्रीकृष्ण, व्यास आणि नारदमुनि यांना पुढें करून जन्मापासून द्रोणाच्या मस्तकावर असलेला मणि घेऊन प्रायोपवेशन करीत बसलेल्या द्रौपदीकडे धांवत गेले. ते शूर पांडव वाऱ्यासारख्या धांवणाऱ्या उत्कृष्ट अश्वांना रथाला जोडून कृष्णासह आपल्या शिबिराला आले ! रथांतून उतरून ते महारथी तत्काल द्रौपदीला भेटले. तेव्हां ती अश्वत्थाम्याच्या पराजयानें संतुष्ट, तथापि पुत्रा-दिकांच्या शोकानें दुःखी झालेली पाहून तेहि अत्यंत दुःखी झाले. नंतर ते कृष्णा-सह दुःखी, शोकाकुल व विमनस्क स्थितींत द्रौपदीजवळ जाऊन उभे राहिले ! मग धर्मराजाच्या संमतीनें बलवान् भीमसेनानें तो मणि तिला दिला आणि असें म्हटलें, “ भद्रे, ज्यानें तुझ्या पुत्रांचे प्राण घेतले, त्या शत्रूला जिंकून हा मणि आणला आहे पहा ! प्रिये, आतां क्षात्रधर्म मनांत आण व ऊठ ! श्रीकृष्ण शिष्टाईकरितां निघाला असतां तूं बोलली होतीस कीं, ‘ मला पति नाहींत, पुत्र नाहींत, बंधु नाहींत आणि हे गोविंदा, तूंहि माझा कोणी नव्हेस. ’ अशीं क्षत्रियधर्मानुरूप जीं जीं वाक्यें तूं कृष्णाला बोलली होतीस, तीं आतां आठव पाहूं ! आमच्या राज्यप्राप्तीला आड येणाऱ्या त्या पापी दुर्योधनाचा वध झाला ! त्या गर्विष्ठ दुःशासनाचें रक्त मीं प्राशन केलें ! वैराचा सूड उगविला, आम्हांला दोष लावण्याला आतां कोणालाहि जागा नाहीं ! अश्वत्थाम्याला जिंकिलें, परंतु तो ब्राह्मण म्हणून त्याला सोडलें ! देवि, त्याचें सर्व तेज नाहींसें झालें असून शरीर मात्र अवशिष्ट आहे ! त्याचा मणि आम्हीं काढून घेतला आणि त्याचें आयुधहि त्याला खालीं ठेवायाला लाविलें ! ”

( ३ ) द्रौपदी—वैराचा सूड घ्यावयाचा तो तुम्हीं घेतला. अश्वत्थामा गुरु-पुत्र असल्यामुळें मला गुरूसारखाच आहे ! हा मणि आतां धर्मराजानें

आपल्या मस्तकीं धारण करावा ! नंतर गुरुद्रोणाचा प्रसाद म्हणून व विशेषतः द्रौपदीच्या सांगण्यावरून धर्मराजानें तो मस्तकीं धारण केला. त्यावेळीं धर्मराज तो दिव्यमणि धारण करून चंद्राच्या योगें जसा पर्वत शोभतो तसा शोभूं लागला ! मग पुत्रशोकानें व्याकुल झालेली द्रौपदी उठली आणि नंतर धर्मराजानें श्रीकृष्णाला प्रश्न केला ! १०. २. १६.

---

## अध्याय १७ वा.

[ १ युधिष्ठिराला कृष्णाकडून रुद्रमाहात्म्यकथन. ]

( १ ) **वैशंपायन**—राजा, सौप्तिक युद्धांत त्या तीन रथ्यांनीं सर्व सैन्याचा वध केला असतां युधिष्ठिर शोकाकुल होऊन कृष्णाला बोलला, 'कृष्णा, त्या पापी नीच अश्वत्थाम्यानें माझ्या सर्व महारथ पुत्रांचा संहार कसा बरें केला ! तसेंच त्या अश्वत्थाम्यानें सहस्रावधि द्रुपदपुत्र कसे मारिले ! ज्याच्यापुढें महाधनुर्धारी द्रोणाचार्यांनेंहि उभे राहण्याचें टाळिलें, त्या रथिश्रेष्ठ धृष्टद्युम्नाचा वध त्यानें कसा केला ? नरश्रेष्ठा, असें काय पुण्यकर्म त्यानें केलें होतें कीं त्याच्या एकट्याच्या हातून सर्वांचा वध व्हावा ?'

**श्रीकृष्ण**—देवाधिदेवांचा ईश्वर, साक्षात् अव्यय असा जो महादेव, त्याला तो अश्वत्थामा शरण गेला, त्यामुळें त्या एकट्याचे हातून अनेकांचा वध झाला. महादेव शंकर प्रसन्न झाला असतां अमरत्व देखील देईल. तो कैलासनाथ असें वीर्य देईल कीं ज्याच्या योगानें इंद्राचाहि नाश करितां येईल. हे भरतर्षभा, त्या महादेवाचें खरें स्वरूप व प्राचीनकालीं त्यानें कोणकोणतीं विविध कर्में केलीं तेंहि मी जाणतों. हे भारता, तो सर्व भूतांचा आदि, मध्य व अंत आहे. त्याच्याच कर्मानें ह्या सर्व जगताची घडामोड चालली आहे. एकदां भूतसृष्टि उत्पन्न करण्याचें मनांत आणून ब्रह्मदेवानें शंकराला म्हटलें, 'शंकरा, तूं प्रजा उत्पन्न करण्याचें काम चिरकाल करूं नकोस !' त्यावर 'होय' असें म्हणून शंकर भूतमात्राचे ठिकाणीं असलेले दोष पाहून पाण्यांत मग्न झाला आणि त्या महातपस्व्यानें दीर्घ काल तपश्चर्या केली. नंतर ब्रह्मदेवानें बराच वेळ वाट पाहिली. नंतर त्यानें सर्व भूतांची उत्पत्ति करणारा असा दुसरा स्रष्टा मनापासून निर्माण केला. त्यानें शंकर पाण्यांत सुप्त असलेला पाहून आपल्या पित्याला म्हटलें, 'जर मला दुसरा कोणी वडील नसेल, तर मीच एकटा प्रजा

निर्माण करीन.' तेव्हां त्याला पित्यानें सांगितलें कीं 'तुझ्यापेक्षां दुसरा कोणी वडील नाहीं. हा शंकर पाण्यांत मग्न होऊन बसला आहे. तर तूं सृष्टि निर्माण कर!' नंतर त्यानें दक्षादि सात प्रजापति निर्माण करून त्यांजकडून ही चतुर्विध सृष्टि उत्पन्न करविली. प्रजा उत्पन्न होतांच त्या क्षुधित झाल्या व प्रजापतीलाच भक्षण करण्याकरितां त्याजवर धांवून आल्या. त्या आपल्याला आतां खाणार, असें पाहून प्राणरक्षणार्थ तो पितामहाकडे गेला आणि म्हणाला, 'भगवन्, ह्यांच्या हातून मला सोडीव व यांच्या जीविताचें कांहीं तरी साधन निर्माण कर.' नंतर त्यानें त्यांकरितां तृणधान्यादि ओषधि व बलिष्ठांकरितां दुर्बल प्राणी असें दोन प्रकारचें अन्न निर्माण केलें. अशाप्रकारें अन्न निर्माण होतांच तीं उत्पन्न झालेलीं भूतें आलेल्या वाटेनें परत गेलीं. अशारीतीनें सर्व प्रजा संतुष्ट होऊन आपापल्या योनीमध्यें वृद्धि पावूं लागल्या. त्यामुळें प्राणिवर्गाची वाढ होऊन लोकगुरूला–पितामहाला–आनंद झाला.

हे राजा, नंतर सर्वश्रेष्ठ ईश्वर जलांतून बाहेर आला, तों सर्व प्रजा निर्माण होऊन आपापल्या सामर्थ्यानुसार वृद्धि पावत आहेत, असें त्यानें पाहिलें. तें पाहून भगवान् रुद्र संतापला व त्यानें आपलें लिंग छिन्न केलें आणि त्याची पूजा केली असतां तें सर्व आस्तिकांना सिद्धिप्रद होईल अशा अभिप्रायानें जमिनींत रोविलें. मग अविनाशी ब्रह्मदेव त्याचें सांत्वन करण्याकरितां त्याला म्हणाला, 'शंकरा, तूं चिरकालपर्यंत पाण्यांत राहून काय केलेंस आणि ह्या लिंगाची उत्पत्ति करून तें जमिनीवर कशाकरितां स्थापित केलें आहेस?' तेव्हां तो लोकनायक शंकर संतापला आणि ब्रह्मदेवाला म्हणाला, 'ह्या प्रजा दुसऱ्या कोणीं तरी निर्माण केल्या असतां आतां ह्या लिंगाचा मला काय उपयोग? हे पितामहा, त्या प्राण्यांकरितां तपोबलानें अन्नहि उत्पन्न केलें आहे. तेणेंकरून ओषधींची व त्यांबरोबर प्रजांचीहि उत्पत्ति होऊन ती सतत अव्याहत चालू रहाणार! राजा, असें बोलून तो क्रोधसंतप्त महातपस्वी शंकर विमनस्क होऊन तेथून निघाला, तो मुंडवान्नामक पर्वताच्या पायथ्याशीं तप करण्याकरितां गेला. १०. २. १७.

---

## अध्याय १८ वा.

[ कृष्णकथित शिवमाहात्म्य. ]

( १ ) श्रीकृष्ण—कृतयुग निघून गेल्यावर वेद प्रमाण धरून विधिवत् यागादि कर्मे करण्याची इच्छा धरून देवांनीं यज्ञ निर्माण केला व त्याला साधनभूत जे हविर्भाग तसेंच त्या त्या हविर्भागाकरितां वेगवेगळया देवता आणि यज्ञिय द्रव्यहि त्यांनीं ठरविलें. शंकराचें खरें स्वरूप न ओळखल्यामुळें त्यांनीं त्याकरितां हविर्भागाची योजना केली नाहीं. तें पाहून शंकरानें यज्ञनाशक साधन म्हणून आरंभीं एक धनुष्य निर्माण केलें. लोकयज्ञ, क्रियायज्ञ, गृहयज्ञ आणि मनुष्ययज्ञ या चार प्रकारच्या यज्ञांनीं हें जगत् चाललें आहे. त्यांपैकीं लोकयज्ञ व मनुष्ययज्ञ यांचेकडून इतर दोन यज्ञांचा नाश करण्याच्या उद्देशानें शंकरानें धनुष्य निर्माण केलें. त्या धनुष्याचें प्रमाण पांच विती होतें. हे भारता, वषट्काराची त्या धनुष्याच्या दोरीच्या ठिकाणीं योजना झाली आणि यज्ञाचीं चार अंगें तीं धनुर्ज्या दृढ करण्याचीं साधनें झालीं.

नंतर तें धनुष्य घेऊन क्रुद्ध शंकर ज्या ठिकाणीं देव यज्ञ करीत होते तेथें गेला. हातांत धनुष्य घेऊन आलेल्या शंकराला पाहतांच पृथ्वी भयभीत झाली व पर्वत थरथर कांपूं लागले, वारा वाहेनासा झाला व प्रदीप्त केलेला अग्नि पेटेनासा झाला, आकाशांतील नक्षत्रमंडळ उद्विग्न होऊन भ्रमण करीत राहिलें, सूर्यप्रकाश लोपला, चंद्र निस्तेज झाला, संपूर्ण आकाश अंधकारानें व्याप्त झालें, देव व्याकुळ झाले, त्यांना विषय सुचेनासे झाले, यज्ञ कोठेंहि दिसेनासा झाला आणि त्यामुळें देवता अगदीं त्रस्त होऊन गेल्या. मग शंकरानें आपल्या तीव्र बाणानें यज्ञाच्या हृदयावर प्रहार केला, तेव्हां तो सर्वांस पवित्र करणारा यज्ञ तेथून मृगरूपानें नाहींसा झाला. त्याच रूपानें पुढें तो व त्याच्या मागें शंकर अशा रीतीनें नभोमंडळांतून जात असतां विचित्र शोभूं लागले ! यज्ञपुरुष नाहींसा होतांच देवांची ज्ञानशक्ति नष्ट झाली व ज्ञाननाश होऊन ते सर्व अगदीं व्याकुळ झाले ! त्यांना कांहींच समजेनासें झालें. शंकरानें क्रोधावेशांत आपल्या धनुष्यानें सवित्याचे बाहू छेदले, भगाचे डोळे फोडले आणि पूषाचे दांत पाडिले. तें पाहून देव व यज्ञांगें इतस्ततः धांवत सुटलीं. कित्येक तेथल्या तेथेंच व्याकुल होऊन मृतवत् दिसूं लागले ! शंकरानें तेथील सर्वांचा असा नाश करून तिरस्कारपूर्वक विकट हास्य केलें आणि

धनुष्कोटि दाबून सर्व देवांना विरोध केला! मग देवांनीं बोलण्यास आरंभ केला, त्यासरशीं शंकराच्या धनुष्याची दोरी तुटली व तें धनुष्य दोरीवांचूनच स्फुरण पावूं लागलें!

अशा रीतीनें धनुष्य विफल होतांच यज्ञपुरुषासह सर्व देव शंकराला शरण गेले आणि शंकरानेंहि त्यांवर कृपा केली. प्रभु शंकर प्रसन्न झाला आणि त्यानें आपला क्रोध जलाशयांत टाकिला. तो शंकराचा क्रोध अग्निरूपानें समुद्राचें पाणी सदोदित शोषित असतो. नंतर त्या प्रसन्न शंकरानें भगाला डोळे, सवित्याला हात आणि पूषाला दांत दिले आणि पूर्वीप्रमाणें यज्ञ चालू करण्यास अनुज्ञा दिली. पुनः सर्वत्र शांतता झाली आणि देवांनींहि शंकराच्या हविर्भागाची योजना केली. हे भारता, तो शंकर क्रुद्ध होतांच सर्व विश्व अस्वस्थ झालें आणि तो प्रसन्न होतांच सर्वत्र शांतता नांदूं लागली.

युधिष्ठिरा, त्या शंकराच्या कृपेनें तुझे सर्व महारथ पुत्र आणि पांचाल धृष्टद्युम्नाचे असंख्य शूर अनुचर यांस अश्वत्थाम्यानें रणांत मारलें! हा पराक्रम अश्वत्थाम्याचा नाहीं, तें तूं मनांतहि आणूं नकोस! तो केवळ महादेवाचाच प्रसाद होय, त्यामुळें तें सर्व घडून आलें. ही गोष्ट लक्षांत ठेवून तूं आतां पुढील कार्यास लाग! १०. २. १८.

[ येथें दहावें सौप्तिक पर्व संपलें. ]

( येथें दुसरें ऐषीक उपपर्व संपलें. )

---

यापुढें अकरावें स्त्रीपर्व लागेल, त्याचा हा आद्य श्लोक आहे—

जनमेजय—**हते दुर्योधने चैव हते सैन्ये च सर्वशः।**
**धृतराष्ट्रो महाराज श्रुत्वा किमकरोन्मुने॥**

# श्रीमन्महाभारतार्थ

## ( महाभारताचें मराठी सुबोध भाषांतर )



## ११. स्त्रीपर्व.

### जलप्रदानिकपर्व १.



नारायणं नमस्कृत्य नरं चैव नरोत्तमम् ।
देवीं सरस्वतीं चैव ततो जयमुदीरयेत् ॥

### अध्याय १ ला.

[ १ धृतराष्ट्राचा शोक. २ संजयकृत धृतराष्ट्रसांत्वन. ]

( १ ) जनमेजय—हे मुने, दुर्योधनाचा आणि त्याच्या सर्व सैन्याचा संहार झाला असतां पुढें धृतराष्ट्रानें काय केलें ? त्याचप्रमाणें महामनस्क धर्मपुत्र युधिष्ठिर राजा आणि कृपप्रभृति ते तीन वीर पुरुष यांनीं पुढें काय केलें ?

वैशंपायन—जनमेजया, आपल्या शंभर पुत्रांचा वध झाल्यावर शाखा तोडलेल्या वृक्षाप्रमाणें दीन, पुत्रशोकामुळें संतप्त, विचारगूढ आणि चिंतामग्न झालेल्या त्या जयिश्रेष्ठ धृतराष्ट्र राजाजवळ संजय गेला आणि म्हणाला, 'महाराज, असा शोक करूं नकोस. शोक करण्यांत लाभ नाहीं ! राजेंद्रा, तुझ्या अठरा अक्षौहिणी सैन्याचा नाश झाला असून ही पृथ्वी आतां निर्जन व शून्य झाली आहे ! नाना देशचे राजे नाना दिशांकडून येऊन येथें एकत्र मिळाले, ते सर्व तुझ्या पुत्रासह निधन पावले ! आतां वडील, पुत्र, पौत्र, ज्ञातिजन, आप्तेष्ट आणि गुरु यांचीं उत्तरकार्यें कथाक्रम करीव !'

वैशंपायन—पुत्र, पौत्र यांच्या वधामुळें व्याकुल झालेल्या धृतराष्ट्र राजानें

संजयाचें तें करुण भाषण ऐकिलें आणि वायूनें उन्मूलित वृक्षाप्रमाणें तो धाडकन् जमिनीवर पडला !

धृतराष्ट्र—माझे पुत्र, तसेच माझे सर्व सुहृज्जन हत झाले. आतां ह्या पृथ्वीवर संचार करितांना मला मोठें दुःख होईल ! बंधुहीन मला आतां जगून तरी काय करावयाचें आहे ? पंख गळून गेलेल्या व जराजीर्ण झालेल्या पक्ष्याप्रमाणें माझें जीवित व्यर्थ झालें आहे ! माझें राज्य, बंधु आणि माझी दृष्टिहि गेली. हे महाप्राज्ञा, क्षीणरश्मि सूर्याप्रमाणें आतां माझी शोभा नष्ट झाली ! मी माझ्या सुहृदांचें ऐकिलें नाहीं, जामदग्न्य परशुरामाचें बोलणें लक्षांत घेतलें नाहीं, देवर्षि नारदाचा आणि कृष्णद्वैपायनाचाहि उपदेश ऐकिला नाहीं. सभेमध्यें श्रीकृष्णानें राजा, 'पुरे आतां वैर, आपल्या पुत्रांचें निवारण कर' वगैरे माझ्या कल्याणाचा उपदेश केला असतांहि तो मीं ऐकिला नाहीं, त्यामुळें मला आतां अत्यंत ताप होत आहे ! भीष्माचें धर्मपर भाषणहि मीं ऐकिलें नाहीं ! वृषभाप्रमाणें गर्जना करणाऱ्या दुर्योधनाचा आणि दुःशासनाचा वध, कर्णाचा नाश आणि द्रोणसूर्यास लागलेलें ग्रहण ऐकून माझें हृदय विदीर्ण होऊन गेलें आहे !

संजया, या जन्मीं पूर्वीं माझ्या हातून कांहीं दुष्कृत्य झाल्याचें मला स्मरत नाहीं कीं ज्याचें फळ मला मूर्खाला आज भोगावें लागत आहे. पूर्वजन्मीं माझ्या हातून कांहीं दुष्कर्म घडलें असलें पाहिजे, ज्यामुळें ब्रह्मदेवानें मला असल्या दुःखकारक संकटांत घातलें आहे. आधींच आलेलें वृद्धपण आणि त्यांत दैवयोगानें सर्व बंधुवर्गाचा क्षय आणि आप्तेष्टांचा विनाश प्राप्त झाला ! माझ्यापेक्षां अधिक दुःखी पृथ्वीतलावर दुसरा कोण आहे ?

( २ ) वैशंपायन—राजा, अशाप्रकारें शोकविह्वल होऊन विलाप करणाऱ्या धृतराष्ट्र राजाचें सांत्वन करीत संजय म्हणाला, "राजा, शोक सोडून दे, तूं वेदांचें श्रवण केलें आहेस, त्याचप्रमाणें वृद्धांच्या तोंडून शास्त्रवचनेंहि ऐकिलीं आहेस. पूर्वीं सृंजयराजा पुत्रशोकाकुल झाला असतां ऋषींनीं त्याला केलेला उपदेश तुला श्रुत आहे; त्याचप्रमाणें तुझा पुत्र तारुण्यमदानें उन्मत्त झाला असतां त्याला मुनींनीं केलेला उपदेशहि तूं ऐकिला आहेस; परंतु तूं सुहृज्जनांचें म्हणणें न ऐकतां फलाशेला गुंतून आपला स्वार्थहि साधून घेतला नाहींस. एकधारी तरवारीप्रमाणें आपल्या मनाला वाटेल, त्याप्रमाणें तूं वागत गेलास; तूं बहुधा दुराचारी लोकांचेच तंत्रानें वागलास ! दुःशासन, दुरात्मा कर्ण, दुष्ट शकुनि, दुर्मति चित्रसेन आणि सर्व जगताला शल्याप्रमाणें

टोंचणारा शल्य हेच त्याचे मंत्री; ज्यानें कुरुवृद्ध भीष्म, गांधारी, विदुर, महात्मा द्रोण, शारद्वत कृप, श्रीकृष्ण, धीमान् नारद, अनेक ऋषि आणि अमित-तेजस्वी व्यास यांचेंहि म्हणणें ऐकिलें नाहीं; ज्यानें धर्माची भीति कधींहि बाळगली नाहीं; ज्याला सर्वदा युद्धाची इच्छा; जो अल्पबुद्धि व मोठा गर्विष्ठ; ज्याचे तोंडून युद्धाशिवाय दुसरा शब्द कधींहि निघाला नाहीं; असा तो तुझा पुत्र वीर्यवान् असूनहि नित्य क्रूर, क्रोधिष्ठ आणि असंतुष्ट असे !

राजा, तूं वेदज्ञ असून मेधावी आहेस; तसाच तूं सत्यवचनीहि आहेस. तुझ्यासारखे बुद्धिमान् सज्जन कधींहि मोह पावत नाहींत ! हे मारिषा, तुझ्या पुत्रानें धर्माचरण कधींहि केलें नाहीं; उलट त्यानें सर्व क्षत्रियांचा संहार मात्र केला आणि शत्रूंचें यश वाढविलें ! तूंहि तटस्थ राहिलास आणि त्याला योग्य असें कांहीं सांगितलें नाहींस. मनाची समतोल वृत्ति तुला ठेवतां आली नाहीं ! मनुष्यानें आधींपासूनच यथायोग्य वर्तन ठेवलें पाहिजे, कीं जेणेंकरून त्याचा अर्थनाश होऊन मग पश्चात्ताप करण्याचें कारण पडणार नाहीं ! पुत्रलोभामुळें तूं सर्वदा त्याचे मनाप्रमाणें वागलास आणि शेवटीं पश्चात्ताप पावलास ! आतां तूं शोक करणें व्यर्थ होय. ज्याला केवळ मध मात्र दिसत असून पर्वताचा कडा दिसत नाहीं, तो मधाच्या लोभानें जातो आणि घसरून खालीं पडतो. तुझी दशा त्याच प्रकारची झाली आहे ! शोक केल्यानें अर्थ, कांहीं फल, संपत्ति किंवा मोक्षप्राप्तीहि होत नसते ! स्वतः अग्नि उत्पन्न करून तो वस्त्रानें गुंडाळूं लागल्यास शरीर दग्ध होऊन जावयाचेंच ! मागाहून मनस्ताप करीत बसतो, तो पंडित नव्हे ! पुत्रांसह तूंच हा पार्थकोपाग्नि उत्पन्न केलास, दुष्ट वाक्य-वायूनें त्या अग्नीला तुम्हींच चेतविलें आणि त्यांत लोभाज्य ओतून त्याला प्रदीप्त केलें ! मग त्या समिद्ध अग्नीमध्यें पतंगांप्रमाणें तुझे पुत्र पडून मेले ! शरज्वालांनीं दग्ध होऊन गेलेल्या त्या पुत्रांबद्दल आतां शोक करणें तुला योग्य नाहीं ! राजा, तुझ्या डोळ्यांतून सारखा अश्रुप्रवाह वाहत असल्यामुळें तुझें तोंड मलिन झालें आहे. असें तोंड असणें शास्त्रसंमत नाहीं; पंडितहि याला चांगलें म्हणत नाहींत. शोक हा मनुष्यांला निखाऱ्यांप्रमाणें भाजून टाकितो. म्हणून विचारानें शोक टाकून दे आणि धीर धरून चित्त शांत ठेव !"

**वैशंपायन**—राजा, महात्म्या संजयानें असें धृतराष्ट्राचें सांत्वन केल्यावर परंतप विदुरानेंहि त्यास पुनः उपदेश केला ! ११. १. १.

## अध्याय २ रा.

[ १ विदुराकडून धृतराष्ट्राचें सांत्वन. २ युद्धाशिवाय क्षत्रियांस दुसरा स्वर्गदायक मार्ग नाहीं. ]

( १ ) **वैशंपायन**—जनमेजया, मग विदुरानें आपल्या अमृतासमान गोड भाषणानें त्या नरश्रेष्ठ धृतराष्ट्राला आनंदविलें. तें विदुराचें भाषण मी तुला आतां सांगतों. लक्ष देऊन ऐक !

**विदुर**—राजा, ऊठ, काय म्हणून निजलास ? विचार कर आणि चित्त शांत ठेव ! सर्व प्राण्यांना शेवटीं मरण ही गति आहे. जेथें जेथें संचय असेल, तेथें तेथें क्षय हा शेवटीं असावयाचाच. जे जे वर गेले असतील, ते ते पडावयाचे. संयोग म्हटला म्हणजे वियोग व्हावयाचा आणि जीविताबरोबर मरण हें असावयाचेंच. हे भारता, शूर आणि भित्रा या दोघांनाहि यम आकर्षण करितो, मग खरे क्षत्रिय कां बरें युद्ध करणार नाहींत ? युद्ध न करणारा मरतो, तसा रण करणारा जीवंतहि राहतो. हे महाराजा, काल प्राप्त झाला असतां त्याला चुकवील असा कोणी नाहीं. प्राणिमात्राची उत्पत्ति होण्यापूर्वीं त्याचा अभाव असतो, तसाच अंतींहि अभाव असतो. मध्यंतरीं त्याचा आपणांस स्वप्नसृष्टीप्रमाणें किंचित्काल भास होतो. अशी स्थिति असतां शोक करण्याचें काय बरें कारण आहे ? शोक केल्यानें कोणी मृताच्या मागून जात नाहीं किंवा शोक करून कोणी मरतहि नाहीं. अशी गोष्ट असतां तूं विनाकारण शोक कां करीत आहेस ?

हे कुरुसत्तमा, सर्व प्रकारच्या विविध प्राण्यांस काळ आकर्षण करीत असतो. काळाला कोणी प्रिय नाहीं किंवा द्वेष्यहि नाहीं. हे भरतर्षभा, ज्याप्रमाणें वायु तृणाग्रांना आपल्या स्वाधीन ठेवतो, त्याप्रमाणें सर्व प्राणी कालवश होतात. आम्ही सर्व एकाच वर्गांतले असून सर्वांना एकाच ठिकाणीं जावयाचें आहे. ज्याचा काल जवळ येतो तो पुढें जातो ! असें असतां शोक करण्याचें काय कारण ? राजा, युद्धामध्यें हत झालेल्यांबद्दल तूं शोक करणें मुळींच योग्य नाहीं. जर तुला शास्त्रें प्रमाण वाटत असतील, तर ते सर्व परम गतीला गेले आहेत ! त्यांनीं उत्तम प्रकारें वेदाध्ययन केलें होतें आणि त्यांचें व्रताचरणहि कडक होतें आणि ते अभिमुख मृत्यु पावले आहेत. त्यांबद्दल शोक करण्याचें काय बरें कारण ? आपणांला अज्ञात अशा स्थलाहून ते आले आणि अज्ञात स्थलीं ते पुनः गेले ! वस्तुतः ते तुझे कोणी नव्हत आणि तूंहि त्यांचा कोणी नाहींस;

मग शोक करावयाचें काय बरें कारण ? आम्हां क्षत्रियांना युद्धांत मरण आल्यास स्वर्ग मिळतो आणि शत्रूस मारलें असतां यश मिळतें ! दोन्ही आपणाला पुण्यदायक आहेत, रणामध्यें निष्फल असें कांहीं नाहीं ! हे भरतर्षभा, इंद्र तुझ्या पुत्रांना जेथें सर्व इच्छित वस्तु प्राप्त होतात, अशा उत्तम लोकांची प्राप्ति करून देईल आणि ते तेथें इंद्राचे अतिथि होऊन राहतील ! राजा, रणांत हत झालेल्या शूरांना जशी स्वर्गप्राप्ति होते, तशी यज्ञांनीं, तपश्चर्येनें किंवा विद्येनेंहि होत नसते ! शूरांच्या शरीराग्नीवर ज्यांनीं शराहुतींचें हवन केलें आणि परस्परांकडून हवन केले जाणारे बाण ज्यांनीं सहन केले, त्या शूरांची धन्यता किती म्हणून वर्णावी ?

(२) राजा, अशाप्रकारें क्षत्रियाला युद्धाशिवाय स्वर्गाला जाणारा दुसरा उत्तम मार्ग नाहीं, हें मी तुला सांगतों. युद्धांत हत झालेले ते क्षत्रिय वीर महात्मे, शूर व सभेंत शोभणारे असे होते; त्यांनीं सर्वांकडून मोठे आशीर्वाद संपादन केले होते; त्यांबद्दल शोक करणें योग्य नव्हे. हे पुरुषश्रेष्ठा, तूं विवेकानें चित्त आंवरून धर आणि शोक करूं नकोस. शोकाकुल होऊन देहत्याग करणें तुला योग्य नाहीं. अरे, आजपर्यंत अनेक जन्म घेऊन संसारांत अनेक मातापितरें, शेंकडो पुत्र आणि बायका यांचा आपण अनुभव घेतला, ते कोणाचे व आम्ही कोणाचे ? या जगांत प्रत्येक दिवशीं मूर्खाला शोक करण्याचे हजारों प्रसंग व शतशः भयस्थानें येत असतात, विद्वानाला त्यांची किमपिहि बाधा होत नाहीं. हे कुरुसत्तमा, कालाला कोणी प्रिय नाहीं, किंवा शत्रुहि नाहीं. तो कोणाची मध्यस्थी करीत नाहीं, तो सर्वांचें आकर्षण करितो. काल भूतांचा नाश करितो, काल प्रजांचा संहार करितो आणि सर्व प्राणी झोंपीं गेले तरी काल जागृत असतो, त्याचा अतिक्रम करणें कठीण आहे. तारुण्य, सौंदर्य, जीवित, द्रव्यसंचय, आरोग्य, प्रियकर मंडळीचा सहवास हीं सर्व अनित्य आहेत, यांच्या ठिकाणीं शहाण्यानें लुब्ध होऊं नये. तसेंच सर्वसाधारण आलेल्या दुःखकारक संकटाबद्दल त्वां एकट्यानेंच शोक करावा हेंहि योग्य नाहीं ! तूं आपला प्राणांत करून घेतलास तरीहि तें दुःख नाहींसें होणार नाहीं. संकटकालीं शोक न करितां दुःखाचा प्रतिकार करावा. दुःखाचें चिंतन न करणें हेंच तें नाहींसें करण्याचें उत्तम औषध आहे. जों जों दुःखाचें चिंतन करावें, तों तों तें नाहींसें न होतां वाढतच जातें. अनिष्ट वस्तूंच्या संयोगानें किंवा प्रिय वस्तूंच्या वियोगानें अल्पबुद्धीचीं मनुष्यें मानसिक दुःखानें होरपळून

जातात. ह्या शोकानें अर्थ, धर्म किंवा सुख यांपैकीं कांहींएक साधत नाहीं. दुःखानें कार्यार्थ तर प्राप्त होत नाहींच, उलट मनुष्य धर्मार्थकाम ह्या त्रिवर्गाला मात्र मुकतो ! कमीअधिक संपत्ति प्राप्त झाली असतां मनुष्यें असंतुष्ट होतात,
१ परंतु पंडित कसल्याहि स्थितींत संतुष्टच असतात. मानसिक दुःखाचा नाश बुद्धीनें करावा व शारीरिक दुःख औषधानें नाहीसें करावें !

राजा, हेंच ज्ञानाचें सामर्थ्य होय. शोक करून बालांसारखें वागूं नये. मनुष्याचें प्राक्तन तो निजला असतां निजतें, तो उठला असतां त्याजबरोबर उठतें, आणि तो धांवत असतां त्याच्यामागून धांवत जातें. ज्या ज्या अवस्थेमध्यें मनुष्य जें जें शुभाशुभ कर्म करितो, त्याचें त्याचें फळ त्याला त्या त्या अवस्थेमध्यें प्राप्त होतें. तसेंच ज्या ज्या शरीरानें मनुष्य जें जें कर्म करितो, त्या त्या शरीरानें तें तें तो भोगतो. आपणच आपले बंधु आणि आपणच आपले शत्रु आहों. आपण जें जें कांहीं बरें किंवा वाईट केलें असेल, त्याचे साक्षीहि आपणच आहों. शुभ कर्मानें सौख्य आणि पापकर्मानें दुःख यांची प्राप्ति होत असते. कर्म हें सर्वदा चालूच असतें. कांहीं घडत नाहीं, असें कधींहि होत नाहीं. तुझ्यासारखे बुद्धिमान् लोक ज्ञानाविरुद्ध व अपायकारक अशा देहघाताच्या कृत्यास कधींच तयार होत नसतात ! ११. १. २.

---

## अध्याय ३ रा.

[ १ विदुराकडून शास्त्रार्थकथनानें धृतराष्ट्रशोकहरण. ]

( १ ) धृतराष्ट्र—महाप्राज्ञा विदुरा, तुझ्या उत्कृष्ट भाषणानें माझा सर्व शोक दूर झाला आहे. तुझ्या मुखानें आणखीहि कांहीं भाषण ऐकावें अशी माझी इच्छा आहे. अनिष्ट गोष्टींच्या प्राप्तीनें आणि इष्ट गोष्टींच्या वियोगानें पंडित मानसिक दुःखापासून कसे मुक्त होतात ?

विदुर—जसजसें मन दुःखापासून किंवा सुखापासून निवृत्त होत जाईल, तसतसें त्याचें नियमन करून शहाणे चित्ताची उपरति पावतात. हे नरर्षभा, ज्याचें आपण सर्वदा चिंतन करीत असतों, तें सर्व विश्व अशाश्वत आहे. तें केळीसारखें आहे. केळीच्या गाभ्यांत ज्याप्रमाणें कांहीं सार सांपडत नाहीं, त्याप्रमाणें ह्या जगांतहि कांहीं सार नाहीं. जर शहाणे आणि मूर्ख, सधन आणि निर्धन मृत्यु पावल्यावर सुखानें निद्रा घेऊं शकते, तर तपस्वी लोकांनीं

तपश्चर्येच्या योगानें देह शोषण करण्यांत तरी काय अर्थ होता? म्हणून मरणानंतरहि मनुष्याला विषम गति प्राप्त होत असली पाहिजे. आपणाला विशिष्ट कुल, रूप इत्यादिकांची प्राप्ति होते, त्या सर्वांचा संबंध अदृष्टाशीं–पूर्वसंचिताशीं–आहे, तर मग पूर्वकर्माधीन पुत्रादिकांच्या संयोगवियोगांत आनंद-शोक करण्यांत तरी कोणता अर्थ आहे? पंडित लोक गृहांप्रमाणें प्राण्यांचीं शरीरें समजतात. गृहांप्रमाणें जीव यथाकालीं एका देहांतून दुसऱ्यांत प्रवेश करितो. देह शाश्वत नसून जीव मात्र शाश्वत आहे. ज्याप्रमाणें जीर्ण अथवा एखाद्या वेळीं नवेंहि वस्त्र टाकून मनुष्य दुसरें पसंत करितो, त्याप्रमाणें जीव देहाचा त्याग करितो.

धृतराष्ट्रा, प्राणिमात्रास मिळणारीं सुख-दुःखें हीं त्यानेंच स्वतः केलेल्या कर्मांचा परिणाम होत. कर्मानें मनुष्याला स्वर्ग, सुख किंवा दुःख यांची प्राप्ति होते. तो भार त्याला इष्ट असो वा नसो, सहन करावाच लागतो. ज्याप्रमाणें एखादें मातीचें भांडें कुंभाराच्या चाकावर असतांना मोडतें, एखादें कांहींसें तयार झाल्यावर भंग पावतें, तर एखादें संपूर्ण तयार झाल्यावर फुटून जातें; कित्येक झांकून ठेवल्यावर, कित्येक चक्रावरून खालीं उतरतांना, कित्येक उतरल्यावर, कित्येक आर्द्र असतांना तर कित्येक शुष्क झालीं असतां भंग पावतात. कित्येक भट्टींत घालतांना, कित्येक बाहेर काढतांना, तर कित्येक बाहेर काढून साफ करितांना फुटून जातात. याचप्रमाणें प्राण्यांच्या शरीराची स्थिति आहे. गर्भांत असतांना, प्रसूति होतांच, एक दोन दिवस गेल्यावर, पंधरा दिवस किंवा महिना झाल्यावर, एका वर्षानें, दोन वर्षांनीं, तारुण्यांत, मध्यम वयांत किंवा वृद्धावस्थेंत केव्हां ना केव्हां तरी देह हा जावयाचाच. प्राप्तकर्मानुसार कित्येक प्राणी पुनर्जन्म घेतात, कित्येक घेत नाहींत. अशाप्रकारें जगाची साहजिक स्थिति असतां तूं शोक कां बरें करावा? हे राजा, ज्याप्रमाणें एखादा प्राणी क्रीडार्थ उदकांत पोहत असतां वर येतो व खालीं जातो, त्याचप्रमाणें या संसारसागरांत जीवांचें उन्मज्जन-निमज्जन चाललें आहे. त्यांत अल्पबुद्धि माणसें कर्मभोगांनीं बद्ध होऊन क्लेश पावतात. परंतु जे ज्ञानी असतात, जे संसारांत शहाणपणानें वागतात, जे प्राण्यांचें हित करण्यांत सर्वदा तत्पर असून ज्यांना प्राण्यांचा समागम कसा होतो, ह्याचें यथार्थ ज्ञान आहे, तेच परमगतीला जातात. ११. १. ३.

---

## अध्याय ४ था.

[ विदुराकडून धृतराष्ट्राला गर्भवासप्रकारकथन. ]

(१) धृतराष्ट्र—हे वाग्विशारदा, हें संसारारण्य कसें जाणावें, हें ऐकण्याची मला फार इच्छा आहे. तरी यांतील तत्त्व मला सांग.

विदुर—राजा, प्राण्यांची गर्भोत्पत्ति झाल्यापासूनच त्याच्या सर्व क्रिया दिसून येतात. शुक्र-शोणितांचा संयोग होऊन गर्भोत्पत्ति होते. तें शुक्र-शोणित एकरात्र एकत्र राहिल्यानें त्याला कलिल म्हणतात. त्यांत एका रात्रींतच अल्प फरक पडून जीव (सत्तामात्र) राहतो. पुढें पांचवा महिना संपला असतां त्यांत चैतन्याचा आविर्भाव होतो. पुढें दहाव्या महिन्यापर्यंत सर्वांगसंपूर्ण गर्भ होतो. हा यावेळीं रक्तमांसांनीं वेष्टित अशा अमंगळ पदार्थांमध्यें असतो. नंतर तो वायुवेगानें वर पाय व खालीं मस्तक अशा स्थितींत योनिद्वाराशीं येऊन आंवळला जातो व प्राक्कर्मानुसार फार क्लेश पावतो. तेथून सुटून येतो, तो संसारांत पडून त्याच्या मागें अनेक उपद्रव लागतात. ज्याप्रमाणें कुत्रे आमिषाच्या मागें लागतात, त्याप्रमाणें त्याच्या मागें ग्रह लागतात. पुढें स्वकर्मबद्ध झालेल्या त्या जीवाचा उत्तरकाल प्राप्त झाला असतां अनेक प्रकारचे व्याधि जडतात. मग विषयसंगावर फार प्रेम करणाऱ्या इंद्रियपाशांत तो बद्ध होतो आणि नंतर हे नराधिपा, त्याला अनेक प्रकारचीं व्यसनें जडतात. त्या व्यसनांत एकदां आसक्त झाल्यावर त्याची तृप्ति मुळींच होत नाहीं. आणि आपण करितों तें चांगलें कीं वाईट याचाहि विचार त्याला होत नाहीं. जरी मूढ मनुष्यांची अशी स्थिति होते, तरी ध्याननिष्ठ साधुपुरुष यथाशास्त्र वर्तनानें आपलें रक्षण करितात. मूर्खाला मात्र यमलोक जवळ येऊन पोंचला, तरी समजत नाहीं. पुढें कालानें यमदूतांनीं त्याचें आकर्षण केलें असतां तो मृत्यु पावतो. यमदूत आकर्षण करीत आहेत व सर्व इंद्रियें विकल झालीं आहेत अशा स्थितींतहि पूर्वीं केलेल्या बऱ्या वाईट गोष्टींची वासना राहून तो पुनः गर्भवासादि बंधनांत पडतो आणि आपल्या हिताला मुकतो. हें जगत् लोभाला वश झालें असल्यामुळें अगदीं नीचावस्थेला पोंचलें आहे. लोभ, क्रोध, भय यांनीं उन्मत्त होऊन मनुष्याला आत्मस्वरूपाची ओळख राहत नाहीं. कुलीनपणाचा टेंभा मिरवून मनुष्य दुष्कुलीनांला निंदितो आणि संपत्तिमदानें मत्त होऊन दरिद्री जनांची अवहेलना करितो. दुसऱ्याला मूर्ख

म्हणतो, परंतु आत्मस्वरूप ओळखत नाहीं. दुसऱ्याचे दोष काढतो, परंतु आपले दोष काढूं इच्छीत नाहीं.

राजा, शहाणे व मूर्ख, श्रीमंत व गरीब, कुलीन व अकुलीन, गर्विष्ठ व अगर्विष्ठ हे यमलोकीं आच्छादनहीन स्थितींत जेव्हां पडतात, तेव्हां हा श्रीमंत, हा गरीब, अशा प्रकारचा भेद तेथील लोकांना मुळींच दिसत नाहीं. याचें कारण त्यांची दृष्टि कुल-रूपादि विषयांकडे नसते. सर्वांचे देह एकसारखे जमिनीवर पडलेले पाहत असूनहि मूर्ख लोक एकमेकांपासून अनेक प्रकारें फलाची इच्छा कां बरें करितात? या क्षणभंगुर जगांत जो जन्मापासून धर्मरक्षण करितो, तो परम गतीला पावतो. अशा रीतीनें सर्व प्रकारें जो तत्त्वाप्रमाणें वागतो, तो हे राजा, सर्व मार्ग सोडून ऊर्ध्व मार्गानेंच जातो. ११. १. ४.

---

## अध्याय ५ वा.

[ १ संसाराचें रूपक. ]

( १ ) धृतराष्ट्र—विदुरा, ह्या धर्मारण्यामध्यें प्रवेश होण्याचें साधन जर बुद्धीच असेल, तर कोणत्या मार्गानें बुद्धीचा उपयोग करून तेथें प्रवेश करावा, तें मला विस्तरशः सांग.

विदुर—राजा, प्रथमतः स्वयंभू ब्रह्मदेवाला नमस्कार करून मोठमोठे ऋषि या संसाराला अरण्य कां म्हणतात, तें सांगतों, ऐक!

कोणी एक ब्राह्मण एका महावनांत रहात असे. तो एकदां वाट चुकून सिंह, व्याघ्र, गज, अश्वलें इत्यादि हिंस्र श्वापदांचें वसतिस्थान अशा एका घोर अरण्यांत आला. ते पशू अक्राळविक्राळ स्वरूपाचे व मांसभक्षक असून मोठमोठ्या गर्जना करीत असत. चारी बाजूंनीं त्यांनीं तें अरण्य इतकें व्यापून गेलें होतें कीं, तें पाहून प्रत्यक्ष यमालाहि भीति वाटली असती. असें तें घोर अरण्य अवलोकन करून तो ब्राह्मण भयानें अत्यंत उद्विग्न होऊन गेला, त्याच्या अंगावर रोमांच उभे राहून तो कांपूं लागला. रक्षणार्थ सर्व दिशांकडे पहात तो धांवूं लागला. भयपीडित होऊन त्या श्वापदांपासून आपली सुटका करून घेण्याकरितां कोठेंतरी वाट सांपडेल, ह्या इच्छेनें तो धांवत असतां त्याला अरण्यांतून दूर जातांहि येईना, अथवा त्या भयंकर श्वापदांपासून आपली सुटकाहि करून घेतां येईना! त्यानें सर्वत्र नजर टाकिली तों जिकडेतिकडे पाश ठेविले आहेत, एका भयंकर

स्त्रीनें हातांनीं आपणाला घट्ट आंवळिलें आहे, पंचशीर्षांचे पर्वतप्राय उंच नाग सर्व ठिकाणीं पसरले असून गगनभेदी प्रचंड वृक्षांनीं तें महारण्य व्यापून गेलें आहे असें त्याच्या दृष्टीस पडलें ! त्या अरण्यामध्यें एक खोल विहीर होती. दाट वेली व गवत यांयोगें ती विहीर पूर्ण झांकली गेली होती. अशा त्या गूढ विहिरीमध्यें तो ब्राह्मण धांवत जात असतां पडला ! परंतु वेलींच्या जाळ्यांत त्याचे पाय अडकून फणसाच्या फळाप्रमाणें तो खालीं डोकें व वर पाय अशा स्थितींत तेथें लोंबत राहिला. असा तो लोंबत असतां त्याला आणखी एक विघ्न उपस्थित झालें. त्या विहिरीमध्यें एक महाबलाढ्य सर्प व त्या विहिरीच्या कांठावर एक प्रचंड गज त्याच्या दृष्टीस पडला. त्या गजाला सहा तोंडें असून त्याला काळे व पांढरे असे बारा पाय होते. हा जेथें अडकून राहिला होता, त्याच वृक्षलतांकडे तो गज हळूहळू येत होता. त्या वृक्षस्कंधांवर नाना रूपांचे भयंकर भ्रमर गुंजारव करीत तेथील मध वरचेवर खाण्याच्या इच्छेनें बसले होते. सर्व प्राण्यांस मध हा खावासा वाटतो व बालकांस तर तो विशेषच स्वाद्य वाटत असतो. तो मध सारखा खालीं गळत होता व तो लोंबणारा पुरुष मोठ्या लोभानें त्या रसाचें प्राशन करीत होता. अशाप्रकारें तो संकटांत पडला असतांहि मधुप्राशनाची त्याची इच्छा लवमात्रहि कमी झाली नव्हती. एकसारखा त्या मधाचीच इच्छा करीत तो तेथें अतृप्ततेनें राहिला होता.

राजा, अशा संकटकाळीं त्या ब्राह्मणाला आपल्या जीविताचा कंटाळा आला नाहीं. त्याची जीविताशा त्या मधावर गुंतून राहिली. इकडे कांहीं कृष्ण व शुभ्र वर्णांचे मूषक त्या वृक्षाचीं मूळें कुरतुडून टाकीत होते ! भयंकर सर्प व वनांतील ती उग्र स्त्री, विहिरींतील नाग, कांठावरील गज, वृक्ष पडण्याची भीति, पांचवें मूषकभय आणि आपणाला इष्ट अशा मधाचें भ्रमरांकडून भक्षण अशा सहा भीतींनीं तो तेथें संसारसमुद्रांत त्रस्त होऊन पडला होता. इतकें असूनहि त्याला जीविताशेचा यत्किंचितहि कंटाळा आलेला दिसत नव्हता ! ११. १. ५.

---

## अध्याय ६ वा.

[ १ संसाररूपकाचें प्रतिपादन. ]

( १ ) धृतराष्ट्र—हे वाग्विशारदा, तो ब्राह्मण संकटाच्या स्थितींत तेथें अत्यंत दुःखानें राहत असतां त्याचें चित्त कसें समाधान पावत होतें,

त्याचप्रमाणें तो जेथें मोठ्या धर्मसंकटांत पडला होता, तें ठिकाण कोठें होतें, तसेंच तो त्या संकटांतून मुक्त कसा होणार होता, हें सर्व मला सांग. म्हणजे आपण त्याच्या मुक्ततेकरितां योग्य परिश्रम करूं! त्याच्या उद्धरणासाठीं माझ्या मनांत मोठी करुणा उत्पन्न झाली आहे.

विदुर—मोक्षमार्ग जाणणाऱ्या विद्वानांनीं सांगितलेलें एक रूपक आहे. हें जाणल्यानें परलोकामध्यें मनुष्य कल्याण पावतो. राजा, ज्याला महावन म्हटलें आहे, तो महासंसार असून ज्याचा गहनारण्य म्हणून उल्लेख केला आहे, तो प्राणिमात्राचा संसार होय. ज्यांना व्याल म्हटलें आहे, ते व्याधि होत. जी भयंकर शरीरधारण करणारी स्त्री तेथें रहाते म्हणून सांगितलें, ती रूप आणि तेज यांचा नाश करणारी जरा होय, असें ज्ञाते लोक म्हणतात. हे राजा, तेथें जो कूप म्हटला आहे, तो प्राण्यांचा देह होय. त्यामध्यें महासर्प राहत असतो, म्हणून सांगितलें, तो सर्व भूतांचा व प्राण्यांचा नाश करणारा आणि सर्वहरण करणारा काल आहे. त्या कूपामधील ज्या वेलीवर अडकून मनुष्य लोंबत आहे ती म्हणजे प्राण्यांची जीविताशा होय. त्या कूपाच्या कंठावरून त्या वृक्षाकडे येणारा सहा तोंडांचा गज म्हणजे संवत्सर होय. सहा ऋतु हीं त्याचीं सहा मुखें असून बारा महिने हे त्याचे बारा पाय आहेत. जे मूषक व सर्प त्या वृक्षाला कुरतडून टाकीत आहेत, ते दिवस आणि रात्री होत. तेथें असणारे भ्रमर म्हणजे वासना आणि ज्या तेथें मधाच्या धारा वाहत असतात, तीं विषयसुखें होत. ह्याच सौख्यांत मानवप्राणी सर्वदा मग्न झालेले असतात. अशाप्रकारें संसारचक्राचें परिवर्तन होत असल्याचें ज्ञाते जाणतात आणि तेणेंकरून ते संसारपाश तोडून टाकितात. ११. १. ६.

---

## अध्याय ७ वा.

[ १ विदुराकडून धृतराष्ट्राला तत्त्वकथन. ]

( १ ) धृतराष्ट्र—विदुरा, तूं तत्त्वद्रष्टा असून जें आख्यान मला कथन केलेंस, त्यांतील अमृततुल्य भाषण पुनः श्रवण करण्याला मला मोठा हर्ष वाटत आहे.

विदुर—राजा, ह्याच मार्गाचें मी पुनः विस्तारपूर्वक वर्णन करितों. तें ऐकल्यानें शहाणे पुरुष संसारापासून मुक्त होतात. राजा, ज्याप्रमाणें एखादा

पुरुष दीर्घ मार्ग चालून थकून जातो आणि ठिकठिकाणीं विश्रांति घेतो, त्याचप्रमाणें संसारपाशांत बद्ध झालेले अज्ञान जीव वेगवेगळ्या गर्भांत वास करितात, ज्ञानी मात्र त्यांतून मुक्त होतात. म्हणून शास्त्रवेत्ते लोक या संसारचक्राला मार्ग म्हणतात आणि हे भरतसत्तमा, ज्या मार्गाला पंडित लोक गहन वन म्हणत असतात, तो म्हणजे मर्त्य प्राण्यांस मोह पाडणारा भोंवरा आहे. शहाण्या मनुष्यानें त्याची इच्छा करूं नये. ज्या शारीरिक व मानसिक व्याधि मनुष्यांना प्रत्यक्ष व परोक्ष जडतात, त्या व्याल होत, असें पंडित लोक म्हणतात. हे भारता, अज्ञ लोकांना त्यांपासून पुष्कळ त्रास झाला किंवा कोणी त्यांचें निवारण केलें, तरी पूर्वकर्मांमुळें या व्यालांची भीति त्यांस वाटत नाहीं. जरी या व्याधींपासून मनुष्य सुटला, तरी पुढें रूपविनाशक जरा त्याला गांठतेच. जेथें मज्जा, मांस यांचा मोठा चिखल आहे, अशा देहरूप कूपांत तो पडला असतांहि शब्द-स्पर्शादि विविध विषयांत तो आसक्त होतो. संवत्सर, मास, पक्ष, अहोरात्र आणि संधिकाल हे क्रमानें त्याचें रूप आणि आयुष्य हरण करितात. संवत्सर, मास हे कालाचे निधि—कर्तव्यसाधक—आहेत, हें मूर्खांना समजत नाहीं.

राजा, सर्व प्राण्यांना विधात्यानें त्यांच्या कर्मांप्रमाणें निर्माण केलें आहे, असें ज्ञाते म्हणतात. शरीर हा भूतांचा रथ, बुद्धि ही सारथि, इंद्रियें हीं अश्व आणि मन हा लगाम होय. जो कोणी त्या धांवत्या अश्वांच्या मागून जातो, तो ह्या संसारचक्रामध्यें चक्रवत् फिरत राहतो. जो आपल्या बुद्धीनें मनाला ताब्यांत ठेवून त्या इंद्रियरूप अश्वांस आंवरून धरितो, तो मृत झाल्यावर पुनः संसारांत पडत नाहीं. संसारचक्रांत फिरत असतां जे मोह पावत नाहींत, ते त्याबरोबर न फिरतां शीघ्र मुक्त होतात. कारण राजा, तसें फिरल्यानें दुःख मात्र निश्चयपूर्वक होतें. यासाठीं शहाण्या मनुष्यानें त्यापासून आपली मुक्तता होण्याचा प्रयत्न करावा. त्यानें या कामीं किमपि उपेक्षा करूं नये. तसें केल्यास या संसारवृक्षाची वाढ मात्र होईल. राजा, जो यतेंद्रिय असून ज्यानें क्रोध व लोभ यांचें निराकरण केलें आहे, जो सर्वदा संतुष्ट व सत्यवादी आहे, त्याला शांति प्राप्त होते. राजा, ज्याच्या योगानें अज्ञ लोक मोह पावतात, त्या ह्या संसाराला याम्य—यमलोकीं पोंहचविणारा—रथ म्हणतात. हे राजा, याच्या योगानें तुला प्राप्त झालेली अवस्थाच प्राप्त होणारी आहे! राज्यनाश, सुहृन्नाश आणि सुतनाश ह्या गोष्टी तृष्णाशीलास दुःखदायक होत असतात. त्यामुळें

साधु पुरुषानें मोठें दुःख प्राप्त झालें असतां दुःखनाशाचा खरा उपाय योजावा. संयमी मनुष्यानें ब्रह्मज्ञानरूपी औषधि मिळवून दुःखरूपी महाव्याधीचा नाश करावा. स्थिरसंयमी मनुष्य ज्याप्रमाणें स्वतः दुःखापासून आपली मुक्तता करून घेतो, त्याप्रमाणें त्याचा पराक्रम, संपत्ति, मित्र किंवा सुहृज्जन ह्यांजकडून ती होऊं शकत नाहीं.

हे भारता, मीं केलेल्या उपदेशावर भरंवसा ठेव आणि प्रथमतः शील संपादन कर. दम, त्याग आणि अप्रमाद हे ब्रह्मलोकास पोंचविणारे अश्व आहेत. शीलरूप लगाम हातांत धरून जो मनोरूपी रथांत स्थित होतो, तो मृत्युभयापासून मुक्त होऊन ब्रह्मलोकाला जातो. हे राजा, जो सर्व भूतांना अभय देतो, त्यास सत्यलोकीं निरामय व सर्वश्रेष्ठ स्थान प्राप्त होतें. अभयप्रदानानें मनुष्याला जें फल प्राप्त होतें, तें हजारों यज्ञांनीं किंवा नित्य केलेल्या उपवासांनीं प्राप्त होत नाहीं! प्राण्याला स्वतःच्या प्राणापेक्षां अधिक प्रिय असें दुसरें कांहीं नाहीं. मरण हें कोणालाहि नको असतें. हे भारता, शहाण्या मनुष्यानें प्राणिमात्रावर दया करावी. अनेक प्रकारचे मोहांत व अज्ञानपटलांत सांपडलेले स्थूल दृष्टीचे मंद लोक इकडेतिकडे भ्रमण करीत फिरत असतात. परंतु सूक्ष्म दृष्टीचे लोक मात्र शाश्वत ब्रह्मपदाला जातात.

---

## अध्याय ८ वा.

[ १ द्वैपायन व्यासाकडून धृतराष्ट्रशोकापहरण. ]

( १ ) **वैशंपायन**—विदुराचें भाषण श्रवण करून तो कुरुराज धृतराष्ट्र पुत्रशोकानें विह्वल होऊन मूर्च्छित झाला आणि भूमीवर पडला. त्याला तसा निःसंज्ञ होऊन भूमीवर पडलेला पाहतांच त्याचे बांधव, कृष्णद्वैपायन व्यास, विदुर, संजय, इतर आप्त आणि त्याचे प्रिय द्वारपाल त्याच्या सभोंवतीं जमले आणि कोणी सुखकर शीतजलसिंचनानें, कोणी पंख्याच्या वाऱ्यानें, तर कोणी त्याच्या अंगावर हात फिरवून त्याला शुद्धीवर आणण्याचा प्रयत्न केला. बऱ्याच वेळानें धृतराष्ट्र सावध झाला आणि पुत्रशोकसंतप्त होऊन त्यानें बराच वेळ विलाप केला. तो म्हणाला, "प्रभो, ज्यांत वारंवार दुःखें प्राप्त होतात, अशा ह्या मनुष्यजन्माला धिक्कार असो! पुत्रनाश, द्रव्यनाश आणि इष्ट जनांचा नाश यांमुळें विष किंवा अग्नि यांसारखें भयंकर दुःख होत असतें. त्यामुळें

सर्व गात्रांचा दाह होतो आणि बुद्धि नष्ट होते. दुःखानें ग्रस्त झालेल्या त्या मनुष्यास मरण प्रिय वाटूं लागतें! माझ्या दुर्भाग्यानें अशाप्रकारचें दुःख मला आज प्राप्त झालें आहे. ह्या दुःखाचा शेवट प्राणांताशिवाय दुसऱ्या कशानें होईल, असें मला वाटत नाहीं. म्हणून हे द्विजसत्तमा, मी आजच प्राणत्याग करणार आहें!"

याप्रमाणें ब्रह्मवेत्त्यांमध्यें श्रेष्ठ अशा त्या महात्म्या व्यास पित्याला सांगितल्यावर धृतराष्ट्र मोह पावला आणि पुनः शोकमग्न झाला. जनमेजया, चिंतन करतां करतां तो अगदीं स्तब्ध झाला. त्याचें भाषण ऐकून कृष्णद्वैपायन मुनीनें पुत्रशोकसंतप्त त्या आपल्या पुत्राला म्हटलें—

व्यास—महाबाहो, तुला मी जें कांहीं सांगत आहें, तें नीट श्रवण कर! तूं वेदवेत्ता, तसाच बुद्धिमान् आहेस! धर्मार्थकुशलहि तूं आहेस! हे परंतपा, कोणतीहि गोष्ट तुला अवगत नाहीं, असें नाहीं. सर्व मर्त्य प्राणी अनित्य आहेत, हेंहि तूं जाणतोस, यांत संशय नाहीं! तसेंच इहलोक व परलोक हे दोन्ही अशाश्वत आहेत, हें तुला माहीत आहे. मग शोक करण्याचें काय बरें कारण आहे? राजेंद्रा, तुझ्या पुत्राला निमित्त करून कालानें तुझ्या समक्ष वैर उत्पन्न केलें. राजा, ज्या गोष्टी अवश्य व्हावयाच्या असतात, त्यांपैकींच कौरव-पांडवांचें युद्ध हें एक होतें. असें असतां त्या उत्तम लोकाप्रत गेलेल्या शूरांविषयीं तूं शोक कां बरें करावास? हे महाबाहो, महात्म्या ज्ञानी विदुरानें हें सर्व आधींच जाणून शम करण्याकरितां पुष्कळ यत्न केला. परंतु दैवानें ठरविलेल्या गोष्टी अन्यथा करण्यास मनुष्यानें कितीहि श्रम केले तरी ते व्यर्थच होणार, असें मला वाटतें. आतां मीं प्रत्यक्ष ऐकिलेलें देवांचें या युद्धासंबंधीं जें कार्य तेंहि तुला सांगतों. तें ऐकिल्यानें तुझ्या चित्ताची स्थिरता होईल.

राजा, पूर्वीं एकदां मी इंद्रसभेंत गेलों असतां तेथें सर्व देव जमलेले माझ्या दृष्टीस पडले. हे अनघा, नारदादि सर्व देवर्षि आणि पृथ्वीहि तेथें आलेली मीं पाहिली. ती कांहीं कार्य योजूनच देवांकडे आली होती. नंतर ती त्या जमलेल्या देवांजवळ गेली आणि म्हणाली, 'हे महाभागहो, पूर्वीं ब्रह्मलोकीं माझें जें कार्य करण्याविषयीं तुम्हीं कबूल केलें होतें तें कार्य आतां सत्वर करा!'

तें पृथ्वीचें भाषण ऐकून प्रभु विष्णु त्या देवसभेंत हंसतच तिला म्हणाला, "धृतराष्ट्राच्या शंभर पुत्रांतून जो वडील पुत्र दुर्योधन या नांवानें प्रसिद्ध आहे,

तो तुझें कार्य करील. तो राजा झाला असतां तुझे सर्व हेतु परिपूर्ण होऊन तूं धन्य होशील. त्याच्याकरितां कुरुक्षेत्रांत सर्व राजे जमतील आणि ते तीक्ष्ण शस्त्रप्रहारांनीं अन्योन्यांचा वध करितील. तसें झालें असतां हे देवि, तुजवरील भार नाहींसा होईल ! हे शोभने, तूं आतां स्वस्थानीं निघून जा आणि लोकधारणा कर."

राजा धृतराष्ट्रा, हा तुझा पुत्र दुर्योधन लोकसंहाराकरितां कलीच्या अंशापासून गांधारीच्या उदरीं जन्मास आला. तो असहिष्णु, चपलबुद्धि आणि अतिकोपी असून त्याची समजूत घालणें कोणालाहि शक्य नव्हतें. दैवयोगानें त्याचे बंधुहि त्यासारखेच निघाले. त्याचा मामा शकुनि, परमसखा कर्ण आणि दुसरे पुष्कळ राजे स्वतःच्या विनाशासाठीं त्याच गुणाचे उत्पन्न झाले. जसा राजा तशाच त्याच्या प्रजाहि होतात, असा नियम आहे. स्वामी धार्मिक असेल तर त्याचा अधर्मी सेवकहि धार्मिक होईल. धन्याच्या गुणदोषांप्रमाणें सेवकांचेहि गुणदोष असतात, हें उघड आहे. हे राजा, दुष्ट राजाच्या संगतीनें तुझे सर्व पुत्र नाश पावले. हे महाबाहो, देवसभेंतील ही सर्व हकीकत तत्त्ववेत्त्या नारदाला विदित आहे. हे पृथ्वीपते, तुझ्या पुत्रांचा नाश त्यांच्या अपराधांमुळेंच झाला आहे. म्हणून तूं त्याबद्दल शोक करूं नये. शोक करण्याचें कांहींच कारण नाहीं. हे भारता, पांडवांनीं तुझा स्वल्पहि अपराध केला नव्हता. तुझे पुत्रच दुष्ट असून त्यांनीं ह्या सर्व पृथ्वीचा घात केला.

राजा, पूर्वीं नारदानें राजसूय यज्ञाचे वेळीं धर्मराजाला सभेंत सांगितलें होतें कीं, 'पांडव व कौरव हे रणांत एकमेकांना गांठून युद्ध करतील व पतन पावतील. तूं मात्र आपलें कर्तव्य करीत रहा !' नारदाचें तें भाषण ऐकून त्यावेळीं पांडवांना फार दुःख झालें.

याप्रमाणें सनातन देवगुह्य मीं तुला सांगितलें. तेणेंकरून तुझा शोक व प्राणत्याग करण्याचा निश्चयहि नाहींसा होईल आणि ह्या सर्व गोष्टी दैवाधीन होत्या हें ध्यानांत आणून तूं पांडवांविषयीं स्नेह धारण करिशील, अशी मला आशा आहे. राजा, असें होणार असल्याचें मीं पूर्वींच ऐकिलें होतें आणि त्याप्रमाणें राजसूय यज्ञाचे वेळीं तें सर्व धर्मराजाला सांगितलेंहि होतें. ही गुह्य गोष्ट मीं सांगितल्यावर धर्मानें कौरव-पांडवांचें युद्ध न होण्याविषयीं पुष्कळ प्रयत्न केला, परंतु तो सर्व निष्फळ ठरला. एकंदरींत दैवच बलवत्तर होय, असें म्हटलें

पाहिजे. हे राजा, दैवाचा अतिक्रम करणें हें कोणाहि स्थावर व जंगम भूताला कधीं शक्य नाहीं. हे भारता, तूं एवढा धर्मपर व बुद्धिश्रेष्ठ असून आणि प्राण्यांची सर्व गति व अगति जाणूनहि जर असा मोहांत पडतोस, तर तूं शोकविह्वल होऊन वरचेवर मूर्च्छित होत आहेस, हें पाहून युधिष्ठिर राजा आपले प्राणहि टाकील, असें मला वाटतें. राजेंद्रा, कृमि-कीटकांवरहि दया करणारा तो वीर आहे, त्याला तुझी दया येणार नाहीं, हें कसें होईल ? हे भारता, माझी तुला आज्ञा आहे म्हणून, दैव अनतिक्रमणीय आहे हें जाणून आणि पांडवांवरील तुझी कृपादृष्टि ध्यानांत आणून तूं प्राण धारण कर ! असें वागल्यानें लोकांत तुझी कीर्ति होईल. बापा, तुला धर्मार्थांची मोठी प्राप्ति होईल आणि चिरकाल तपश्चर्या केल्याचेंहि पुण्य तुला लाभेल. प्रज्वलित अग्नीप्रमाणें प्रखर पुत्रशोक तुला झाला आहे; परंतु मीं केलेल्या बोधरूप जलानें त्याला एकदांचा विझवून टाक पाहूं !

वैशंपायन—अमिततेजस्वी व्यासाचें तें भाषण ऐकून धृतराष्ट्रानें थोडा वेळ विचार केला आणि म्हटलें, 'द्विजोत्तमा, महाशोकजालानें मी अत्यंत विह्वल झालों आहें. वरचेवर मोह पावून मी स्वतःलाहि ओळखत नाहींसा झालों आहें ! तुझें हें दैवयोगपर भाषण ऐकल्यानें मी आतां प्राणधारण करीन आणि शोक न करण्याविषयीं यत्न करीन.'

धृतराष्ट्राचें अशा प्रकारचें भाषण श्रवण केल्यावर तो सत्यवतीसुत व्यास तेथेंच अंतर्धान पावला. ११. १. ८.

---

## अध्याय ९ वा.

[ १ विदुराचें धृतराष्ट्राला सांत्वनपर भाषण. ]

(१) जनमेजय—विप्रर्षे, भगवान् व्यास गेला असतां धृतराष्ट्र राजानें काय केलें, तें तूं मला सांग. तसेंच कौरवराज युधिष्ठिर राजा आणि कृपाचार्यप्रमुख ते तिघेजण यांनीं पुढें काय केलें तें मला सांग ! अश्वत्थाम्याचें कृत्य आणि परस्परांनीं अन्योन्यांस दिलेले शाप मीं पूर्वींच ऐकिले आहेत. यापुढील संजयानें सांगितलेला वृत्तांत मला निवेदन कर !

**वैशंपायन**—राजा जनमेजया, दुर्योधनाचा वध आणि सर्व सैन्याचा नाश झाला असतां संजयाची व्यासदत्त दिव्यज्ञानशक्ति नष्ट होऊन तो धृतराष्ट्राजवळ गेला आणि म्हणाला—

**संजय**—राजा, नाना देशांचे नाना राजे आपापल्या ठिकाणांहून येऊन तुझ्या पुत्रांसह पितृलोकीं गेले. हे भारता, त्या सर्वांनीं ' हें युद्ध आतां नको ' म्हणून याचना केली असतां वैराचा अंत करण्याच्या हेतूनें तुझ्या पुत्रानें सर्व पृथ्वीचा घात केला. आतां पुत्र, पौत्र आणि पितर यांचीं प्रेतकार्यें यथाक्रम करीव !

**वैशंपायन**—संजयाचें त्यावेळचें घोर भाषण श्रवण करून धृतराष्ट्र मृतवत् निश्चल झाला व जमिनीवर पडला ! तो राजा अशा रीतीनें भूमीवर पडला असतां सर्वधर्मज्ञ विदुर त्याजवळ गेला आणि म्हणाला "राजा, ऊठ, काय म्हणून निजतोस ? हे भरतर्षभा, शोक करूं नकोस ! सर्व प्राण्यांची शेवटीं हीच गति होत असते. प्राणिमात्राचा आद्यंत अभाव असतो, मध्यें मात्र थोडा काळ आपणांस त्याचा भास होतो. मग त्याबद्दल शोक करण्याचें काय बरें कारण ? शोक करणारा मृतामागून जाऊं शकत नाहीं किंवा शोक करणारा कोणी मरतहि नाहीं. मग असें असतां तूं कशासाठीं हा शोक करीत आहेस ? युद्ध न करितां मनुष्य मृत्यु पावतो आणि युद्ध करूनहि एखादा जीवंत राहतो. काल प्राप्त झाला असतां कोणाच्यानेंहि त्याला टाळतां येणें शक्य नाहीं. काल सर्व भूतांचें आकर्षण करितो. त्याला कोणी प्रिय नाहीं किंवा द्वेष्यहि नाहीं. ज्याप्रमाणें वायु सर्वत्र तृणाग्रांना हालवितो, त्याप्रमाणें सर्व भूतें कालवश होऊन त्याजपुढें मान वांकवून राहतात. हे भरतर्षभा, आपण सर्व एकाच समुदायांतील असून आम्हां सर्वांस त्याच एका ठिकाणीं जावयाचें आहे. ज्याची वेळ आधीं भरते, तो आधीं जातो, मग तेथें शोक करण्याचें काय बरें कारण ? युद्धांत हत झालेल्या ज्या वीरांसाठीं तूं शोक करीत आहेस, ते सर्व स्वर्गाला गेले आहेत. त्या महात्म्यांबद्दल शोक करण्याचें कारण नाहीं. युद्धांत देह ठेवणाऱ्यांप्रमाणें मोठमोठे दक्षिणायुक्त यज्ञ, तप किंवा विद्या यांच्या योगानेंहि उत्तम गति प्राप्त होत नाहीं. ते सर्व वेदवेत्ते, शूर, सुव्रती असून सर्व सन्मुख मृत्यु पावले आहेत. त्यांबद्दल शोक कशाला बरें करावा ? शूरांच्या शरीराग्नींत त्यांनीं शराहुति दिल्या आणि शत्रूंनीं हवन केलेले बाण त्या सत्पुरुषांनीं सहन केले आहेत !

राजा, याप्रमाणें स्वर्गास जाण्याचा उत्तम मार्ग मीं तुला सांगितला. इहलोकीं क्षत्रियाला युद्धाहून श्रेष्ठ असें दुसरें कांहीं नाहीं. ते क्षत्रिय महात्मे, शूर, सभेंत शोभणारे असून त्यांनीं उत्तम आशीर्वाद मिळविले होते. त्यांपैकीं कोणाबद्दलहि शोक करणें तुला उचित होणार नाहीं. हे पुरुषर्षभा, आपलें मन आंवरून धर व शोक करूं नकोस. शोकविह्वल होऊन तूं आपलें उदकदानादि कार्य सोडून देणें कधींहि योग्य होणार नाहीं. ११. १. ९.

---

## अध्याय १० वा.

[ १ धृतराष्ट्रनिर्गमन. २ गांधारीप्रभृति स्त्रियांचा विलाप. ]

( १ ) वैशंपायन—विदुराचें तें भाषण श्रवण करून धृतराष्ट्रानें अश्व रथाला जोडण्याविषयीं सांगितलें आणि पुनः त्याला म्हटलें, 'गांधारी व सर्व भारतस्त्रिया यांस शीघ्र घेऊन ये ! तसेंच वधू कुंती व तिच्या येथें असलेल्या इतर स्त्रियांसहि सत्वर आण !'

( २ ) अशाप्रकारें त्या धर्मवेत्त्या विदुराला सांगून तो शोकमूढ धर्मज्ञ राजा रथावर आरूढ झाला. नंतर पुत्रशोकानें व्याकुल झालेली गांधारीहि पतीच्या आज्ञेस मान देऊन कुंती व इतर स्त्रिया यांसह धृतराष्ट्र होता, त्या ठिकाणीं आली. त्या शोकाकुल स्त्रिया तेथें आल्या आणि त्यांनीं एकमेकांस हांका मारून मोठ्यानें आक्रोश करण्यास आरंभ केला. विदुराला त्यांच्यापेक्षांहि अधिक दुःख झालें, तरी त्यानें त्यांचें समाधान केलें. नंतर कंठ दाटून आलेल्या त्या स्त्रियांस रथांत घालून तो नगराबाहेर निघाला. त्यावेळीं कौरवांच्या सर्व निवासस्थानांतून एकच हाहाकार सुरू झाला. आबाल वृद्ध सर्व लोक शोकसंतप्त होऊन गेले. ज्या स्त्रिया पूर्वीं देवांच्याहि नजरेस कधीं पडल्या नाहींत, त्या आज अनाथ होऊन नीच जनांच्याहि दृष्टीस पडत होत्या. आपले सुंदर केंस अस्ताव्यस्त सोडून, भूषणें टाकून देऊन आणि एकवस्त्र परिधान करून ह्या स्त्रिया अनाथांप्रमाणें बाहेर चालल्या. यूथपति मृत झाल्यावर हरिणी ज्याप्रमाणें पर्वताच्या गुहांतून बाहेर पडतात, त्याप्रमाणें त्या कौरवस्त्रिया श्वेतपर्वतांप्रमाणें भासणाऱ्या आपल्या स्फटिकमय प्रासादांतून बाहेर पडल्या. आपले हात आंवळून कोणी पुत्राच्या नांवानें, कोणी बंधूच्या नांवानें, तर कोणी पित्याच्या नांवानें आक्रोश करीत होत्या. त्यावरून जणुंकाय युगान्त होऊन लोकसंहारच चालला आहे कीं

काय असा भास होत होता. त्या विलाप करीत आणि रडत ओरडत पुढें जात होत्या. शोकानें त्यांची ज्ञानशक्ति नष्ट होऊन आपलें कर्तव्य कोणतें हेंच त्यांस समजेनासें झालें होतें. ज्यांना पूर्वीं सखीजनांच्या सांनिध्याचीहि लज्जा वाटत असे, त्याच आतां एकवस्त्र परिधान करूनहि सासूसासऱ्यांपुढें जाण्यास लाजत नव्हत्या. त्या स्त्रिया परस्परांच्या स्थितींतील सूक्ष्म भेद काढून परस्परांचें आश्वासन करीत होत्या आणि शोकविह्वल होऊन परस्परांकडे पाहत होत्या!

याप्रमाणें हजारों प्रकारें आक्रोश करणाऱ्या त्या स्त्रियांस घेऊन तो दीन राजा धृतराष्ट्र नगराबाहेर पडला आणि त्वरेनें रणांगणाकडे जाऊं लागला. त्याच्या मागून शिल्पी, व्यापारी, शेतकरी आणि इतर कामकरी लोकहि नगराच्या बाहेर पडले. राजा, कौरवांच्या क्षयामुळें विह्वल झालेल्या त्या स्त्रियांनीं चालविलेल्या आक्रोशाच्या भयंकर शब्दानें सर्व भुवनें व्यथित होऊन गेलीं. युगांतकाल प्राप्त होऊन व प्राणिमात्र दग्ध होऊन जसा सर्वत्र एकच प्रलय झालेला दृष्टीस पडतो, तसाच विनाश झाल्याचें सर्वांस वाटलें. कुरूंचा क्षय झाला असतां त्यांजवर आसक्त होऊन राहिलेल्या पौरजनांचीं अंतःकरणें अत्यंत उद्विग्न झालीं आणि त्यांनीं मोठमोठ्यानें आक्रोश करण्यास आरंभ केला! ११. १. १०.

---

## अध्याय ११ वा.

[ १ रणांगणाकडे धृतराष्ट्र निघाला असतां मार्गांत कृप-कृतवर्म-द्रौणींशीं भेट. २ धृतराष्ट्राचें सांत्वन करून त्या तिघांचें आपआपल्या ठिकाणीं गमन. ]

( १ ) वैशंपायन—जनमेजया, तेथून एक कोसभर गेल्यावर त्यांस शारद्वत कृपाचार्य, द्रोणपुत्र अश्वत्थामा आणि कृतवर्मा यांची भेट झाली. प्रज्ञाचक्षु धृतराष्ट्रास पाहतांच त्यांचे कंठ अश्रूंनीं दाटून आले आणि त्यांनीं दुःखाचा निःश्वास सोडला. नंतर त्या शोकाकुल राजाला ते म्हणाले, ' राजा, तुझ्या पुत्रानें इतरांस दुर्घट असा अलौकिक पराक्रम केला आणि तो आपल्या अनुचरांसह इंद्रलोकीं गेला. दुर्योधनाच्या सैन्यापैकीं आम्ही तिघेच रथी जीवंत आहों! हे भरतर्षभा, बाकीचें तुझें सर्व सैन्य नाश पावलें!'

( २ ) असें राजाला सांगून शारद्वत कृपाचार्य पुत्रशोकार्त गांधारीला उद्देशून बोलला, "गांधारि, तुझ्या पुत्रांनीं निर्भयपणें युद्ध करून अनेक शत्रुगणांचा वध केला. पराक्रमाचीं कृत्यें करीत असतां ते निधन पावले. शस्त्रपराक्रमानें

निर्मल लोक संपादन करून ते तेथें उज्ज्वल देह धारण करून देवांप्रमाणें विहार करतील, यांत संशय नाहीं. त्या शूरांपैकीं कोणीहि युद्धपराङ्मुख झाला नाहीं किंवा कोणी शत्रूस शरणहि गेला नाहीं. प्रत्येक युद्ध करीत असतां सन्मुख शस्त्रानें निधन पावला आहे! अशाप्रकारें युद्ध करणाऱ्या क्षत्रियास परम गति प्राप्त होत असते, असें प्राचीन ऋषिजनांचें म्हणणें आहे. युद्धामध्यें शस्त्रानें मरण आल्यास त्याबद्दल शोक करणें अनुचित होय. हे राज्ञि, त्यांचे शत्रु पांडव यांचीहि या युद्धानें वृद्धि झालेली नाहीं. आतां अश्वत्थामप्रमुख आम्हीं जो पराक्रम केला तो श्रवण कर. भीमसेनानें तुझ्या पुत्राचा अधर्मानें वध केल्याचें ऐकून पांडव शिबिरांत सुप्त झाले असतां त्यांजवर आम्ही धांवून गेलों आणि पांडव-धृष्टद्युम्नप्रमुख सर्व पांचाल, द्रुपदाचे पुत्र आणि द्रौपदेय यांचा वध केला! अशाप्रकारें तुझ्या पुत्राच्या शत्रूंचा नाश करून आम्ही तेथून पळालों. आम्ही तिघेच असल्यामुळें त्यांपुढें रणांत आमच्यानें उमें राहवलें नाहीं. ते शूर व महाधनुर्धर पांडव क्रोधवश होऊन वैराचा सूड उगविण्याकरितां आमचा शीघ्र पाठलाग करितील! आपल्या पुत्रांचा आम्हीं वध केल्याचें ऐकून ते पुरुषश्रेष्ठ उन्मत्त होऊन आमचा शोध काढीत लवकरच येतील! हे यशस्विनि, त्यांचा वध करून आतां पांडवांपुढें उभें राहण्याची आमची छाती नाहीं. हे राज्ञि, आम्हांला आतां जाण्याची अनुज्ञा दे. तूं शोक करूं नकोस! राजा धृतराष्ट्रा, तूंहि आम्हांला अनुज्ञा दे! उत्तम प्रकारें धैर्य धारण कर आणि विचार करून पहा म्हणजे मरण हाच क्षात्रधर्म होय असें तुला कळून येईल!''

जनमेजया, असें बोलून आणि धृतराष्ट्रास प्रदक्षिणा करून कृपाचार्य, कृतवर्मा आणि अश्वत्थामा ह्या तिघांनीं त्या मनीषी राजाकडे नजर फेंकली आणि गंगेला अनुलक्षून आपले अश्व हांकले. पुढें धृतराष्ट्राला सोडून दूर गेल्यावर त्या तिघांनीं कांहीं विचार केला आणि दुःखी अंतःकरणानें ते तिघे तीन वाटांनीं निघून गेले. कृपाचार्य हस्तिनापुराला, कृतवर्मा आपल्या राष्ट्राला आणि अश्वत्थामा व्यासाच्या आश्रमास निघून गेला. त्या पांडवांचा अपराध केल्यामुळें ते तिघे भयार्त होऊन एकमेकांकडे पहात दूर निघून गेले. पुढें त्या महारथ पांडुपुत्रांनीं अश्वत्थाम्याला गांठून मोठ्या पराक्रमानें त्याला जिंकिलें. ११. १. ११.

## ✓ अध्याय १२ वा.

[ १ युधिष्ठिराचें कृष्णासह धृतराष्ट्राकडे आगमन. २ लोहभीमाचा भंग. ]

( १ ) वैशंपायन—जनमेजया, सर्व सैन्यांचा नाश झाला असतां धर्मराज युधिष्ठिराला आपला वृद्ध चुलता हस्तिनापुरांतून बाहेर निघाल्याची वार्ता समजली. तेव्हां पुत्रशोकसंतप्त युधिष्ठिर आपल्या बंधुवर्गासह पुत्रशोकानें दुःख करणाऱ्या धृतराष्ट्राकडे जावयास निघाला. युधिष्ठिरामागून दाशार्ह श्रीकृष्ण, युयुधान आणि युयुत्सु हेहि निघाले. त्यांच्या मागून पुत्रशोकानें दुःखार्त झालेली द्रौपदी तेथें जमलेल्या पांचाल स्त्रियांसह विलाप करीत चालली. हे भरतसत्तमा, अशाप्रकारें गेल्यावर गंगेच्या तीरावर आर्त झालेल्या कुररींप्रमाणें शोक करणाऱ्या त्या भरतस्त्रिया धृतराष्ट्राच्या दृष्टीस पडल्या. तेथें हजारों प्रकारांनीं विलाप करणाऱ्या स्त्रियांनीं धर्मराजाला वेढिलें. त्या हात वर करून मोठ्यानें आक्रोश करूं लागल्या. त्या म्हणाल्या, "ह्या धर्मराजाची धर्मज्ञता आणि सुजनता आज कोठें गेली ? ह्यानें आपले वडील बंधु, गुरुपुत्र आणि मित्र यांचा वध केला आहे ! महाबाहो धर्मा, द्रोण, पितामह भीष्म आणि जयद्रथ यांचा वध करवून तुझ्या मनाला काय बरें वाटलें असेल ? अरे, आपले वडील व बंधु, त्याचप्रमाणें तो दुष्प्रधर्ष अभिमन्यु आणि द्रौपदीपुत्र हे कोठेंहि दिसत नसतां तुला राज्य घेऊन तरी काय करावयाचें आहे ?"

( २ ) जनमेजया, अशाप्रकारें विलाप करणाऱ्या स्त्रियांतून मोठ्या कष्टानें बाहेर निघून त्या धर्मराज युधिष्ठिरानें धृतराष्ट्राला प्रणाम केला. नंतर इतर पांडवांनींहि आपापलीं नांवें सांगून त्याला अभिवंदन केलें. आपल्या सर्व पुत्रांचा युधिष्ठिरामुळेंच अंत झालेला पाहून अर्थातच धृतराष्ट्राच्या मनांत त्याविषयीं प्रेम नव्हतें. तरी त्या शोकव्याकुल राजानें धर्मराजाला आलिंगन दिलें आणि त्याचें सांत्वन केलें. नंतर त्याच्या मनांत कोपरूप अग्नि प्रज्वलित होऊन त्यानें भीमाची विचारपूस केली. त्यावेळीं शोकवायूनें प्रज्वलित झालेला त्याचा कोपाग्नि भीमसेनरूप वनाची जाळून राख करूं इच्छीत आहे असें दिसलें ! भीमसेनाविषयीं धृतराष्ट्राचा अशुभ संकल्प श्रीकृष्णानें आधींच जाणून त्याचा उपायहि योजून ठेविला आणि भीमसेन धृतराष्ट्राला भेटूं जात असतां त्याचें हातांनीं निवारण करून भीमाचा लोहमय पुतळा पुढें केला ! तेव्हां हा वृकोदर भीमच होय, असें मानून त्या बलवान् राजानें त्याचा चुराडा करून टाकिला.

धृतराष्ट्राला अयुत नागांचें बळ असल्यामुळें त्याला त्या लोहमय भीमाचा नाश करितां आला ! परंतु असें करतांना त्याची छाती फुटली व मुखावाटे रक्तस्राव होऊं लागला. त्यामुळें तो रक्तदिग्ध धृतराष्ट्र भूमीवर पडला व फुललेल्या पारिजातकासारखा दिसूं लागला ! तें पाहून संजयानें पुढें होऊन त्याला धरिलें आणि तो म्हणाला, 'राजा, असें करूं नकोस.' असें बोलून त्यानें धृतराष्ट्राचें समाधान व सांत्वन केलें.

राजा, नंतर धृतराष्ट्राचा कोप शांत झाला आणि तो 'हायरे भीमा,' म्हणून शोक करूं लागला. त्याचा क्रोध नाहींसा झाला आहे आणि भीमसेनाचा वध आपल्या हातून झाला, असें समजून तो शोक करीत आहे, हें पाहून श्रीकृष्ण त्याला म्हणाला, " धृतराष्ट्रा, तूं शोक करूं नकोस. भीमाचा तुझ्या हातून वध झालेला नाहीं ! ही भीमाची लोहप्रतिमा तूं भग्न केलीस ! हे भरतर्षभा, तूं क्रोधवश झाला आहेस, असें जाणून मीं मृत्यूच्या दाढेंत गेलेल्या भीमसेनाला मागें ओढिला आणि ही लोखंडी प्रतिमा पुढें केली.

"हे राजशार्दूला, तुझ्या इतका बलवान् दुसरा कोणी नाहीं. हे महाबाहो, तुझ्या हाताची मिठी सहन करील असा कोण बरें आहे ? यमाच्या तडाक्यांत गेलेला जसा कोणी जीवंत सुटत नाहीं, त्याचप्रमाणें तुझ्या हातूनहि कोणी जीवंत रहाणार नाहीं. म्हणून तुझ्या मुलानें भीमाची जी लोहमयी मूर्ति केली होती, तीच मीं तुझ्यापुढें केली. पुत्रशोकानें तुझें अंतःकरण शोकसंतप्त होऊन तुझा सर्व धर्मविचार नाहींसा झाला आणि म्हणूनच भीमसेनाचा वध करण्याची तुला बुद्धि झाली. परंतु त्याचा वध करणें तुला योग्य नाहीं. कारण, हे महाराजा, आतां तुझे मुलगे गतायुषी झाल्यामुळें ते जीवंत राहणेंस शक्य नव्हतें. म्हणून आम्ही शमार्थ जें जें केलें त्या सर्वांस मान्यता दे आणि शोक करूं नकोस !" ११. १. १२.

---

## अध्याय १३ वा.

[ १ धृतराष्ट्रकोपविमोचन. ]

( १ ) वैशंपायन—जनमेजया, इतक्यांत मुखमार्जनाची तयारी करून परिचारिका धृतराष्ट्राजवळ आल्या. तो विधि झाल्यावर श्रीकृष्ण पुनः त्याला

म्हणाला, 'राजा, वेद व विविध शास्त्रांचें अध्ययन तूं केलें आहेस. त्याचप्रमाणें पुराणें आणि राजधर्मेहि तूं ऐकिले आहेस. असा तूं विद्वान्, महाप्राज्ञ आणि स्वपरबलाबल जाणण्यास समर्थ असूनहि तूं आपल्या अपराधामुळें दुसऱ्यावर कोप कां बरें करितोस? भारता, त्याच वेळीं मीं, भीष्म-द्रोणांनीं, विदुरानें आणि संजयानें तुला पुष्कळ प्रकारें सांगितलें, तरी तूं आमचे म्हणण्याप्रमाणें केलें नाहींस. आम्हीं तुझें निवारण केलें असतां आणि पांडव बलानें व शौर्यानें आपल्या पुत्रांहून बलिष्ठ असतां तूं आमचें ऐकिलें नाहींस! जो राजा स्थित-प्रज्ञ असून स्वतः आपले दोष, तसेंच देश-काल-विभाग जाणतो व तदनुरूप वर्तन करितो, तो उत्तम प्रकारचें श्रेय पावतो. आपलें श्रेय कशांत आहे व हिताहित कोणतें हें दुसरे सांगत असतांहि जो ऐकत नाहीं आणि अनीतीनें वागतो, तो विपत्तींत पडून शोक करितो. हे भारता, ह्यांपैकीं तूं दुसऱ्या प्रकारानें वागलास हें लक्ष्यांत आण. राजा, तुझ्या अंगीं कर्तृत्वशक्ति मुळींच नसून दुर्योधनाला वश होऊन त्याच्या सांगण्याप्रमाणें तूं वागत आलास! तूं आपल्याच अपराधामुळें विपत्तींत पडला आहेस. मग भीमाला मारण्याची इच्छा कां बरें करतोस? म्हणून तूं क्रोधाचें दमन कर आणि आपलें दुष्कृत्य आठव. ज्या क्षुद्रानें केवळ स्पर्धेनें पांचालीला सभेंत आणविली, त्याच वैराची फेड करण्याच्या इच्छेनें भीमानें त्याचा वध केला! तूं आणि तुझ्या दुष्ट पुत्रानें केलेला अतिक्रम आणि अपराध नसतांहि पांडवांचा तुझ्या हातून झालेला त्याग हीहि गोष्ट लक्षांत आण!

वैशंपायन—जनमेजय राजा, याप्रमाणें कृष्णानें सत्य गोष्ट सांगितली असतां धृतराष्ट्र राजा देवकीपुत्र कृष्णाला बोलला, "महाबाहो माधवा, तूं म्हणतोस तें सर्व अगदीं बरोबर आहे. माझ्या बलवान् पुत्रस्नेहानें मला नीतिभ्रष्ट केलें आहे. तो बलवान् सत्यविक्रमी व तुझ्याकडून रक्षण केलेला भीमसेन माझ्या बाहुपाशांत सांपडला नाहीं, ही मोठ्या सुदैवाची गोष्ट आहे. आतां माझें मन अव्यग्र झालें असून माझा क्रोध व संतापहि शांत झाला आहे. हे माधवा, त्या मध्यम पांडव अर्जुनाला भेटण्याविषयीं मला मोठी इच्छा उत्पन्न झाली आहे. सर्व मोठमोठे राजे मृत्युवश झाले असतां आणि माझे पुत्रांचाहि वध झाला असतां पांडुपुत्रांचें कल्याण व्हावें, अशी माझी दांडगी इच्छा असून त्यांजविषयीं माझ्या मनांत प्रेमहि उत्पन्न झालें आहे!"

राजा, असें बोलून त्या धृतराष्ट्रानें भीमाला, धनंजयाला आणि पुरुषप्रवीर माद्रीसुत नकुल-सहदेवांना रडत रडत आलिंगन, आश्वासन आणि कल्याणपर आशीर्वाद दिले ! ११. १. १३.

---

## अध्याय १४ वा.

[ १ युधिष्ठिरादिकांचें गांधारीकडे गमन. २ व्यासकृत गांधारीसांत्वन. ]

( १ ) **वैशंपायन**—राजा, धृतराष्ट्राची आज्ञा घेऊन ते सर्व पांडव कृष्णासह गांधारीकडे गेले. आपले सर्व शत्रूंस ज्यानें मारिलें आहे, असा युधिष्ठिर राजा येत आहे, असें समजतांच त्या पुत्रशोकानें संतप्त झालेल्या पतिव्रता गांधारीनें त्याला शाप देण्याचें मनांत आणलें. तिचा तो पांडवांविषयीं पापी अभिप्राय सत्यवतीसुत ऋषि व्यास यानें आधींच जाणला. त्यानें तत्काल गंगेच्या पुण्यगंधी शुचि जलाला स्पर्श केला आणि तो महर्षि मनोवेगानें गांधारीजवळ आला. भूतमात्राच्या मनांतील भाव दिव्य दृष्टीनें जाणणाऱ्या त्या व्यासमुनीनें गांधारीचा अभिप्राय जाणला. तो हितवादी महातपस्वी व्यास तत्काल गांधारीजवळ आला आणि शापकालाचें खंडण करून शमकालाचें महत्व त्यानें त्या आपल्या सुनेला उत्तमप्रकारें कथन केलें. तो म्हणाला, "गांधारि, ही शाप देण्याची वेळ नव्हे, शांत हो. तूं शाप देण्याचें योजलें आहेस. तो विचार टाकून दे आणि माझें भाषण ऐक. जयाची इच्छा करणाऱ्या तुझ्या पुत्रानें ' माते, मी शत्रूबरोबर युद्ध करीत असतां मला शुभाशीर्वाद दे,' म्हणून अठराहि दिवस तुला सांगितलें होतें आणि त्या जयैषी पुत्रानें तुजकडे वरचेवर याचना केली असतां तूंहि 'जेथें धर्म तेथेंच जय होत असतो,' असें सांगत असस ! गांधारि, तुझ्या तोंडांतून संतोषानें निघालेलीं वाक्यें कधीं उलट झालेलीं मला स्मरत नाहींत. ह्याहि वेळीं तीं तशींच खरीं ठरलीं आहेत. आतां अनेक राजांशीं तुमुल रणकंदन होऊन त्यांतून पांडव विजयी होऊन पार पडले आहेत, त्याअर्थीं त्यांच्या बाजूला अधिक धर्म आहे, हें उघड आहे. गांधारि, आजवर तूं क्षमाशील होतीस, मग आतांच तूं क्षमा कशी सोडून दिलीस ? हे धर्मज्ञे, तूं अधर्माला सोडून दे. कारण जिकडे धर्म तिकडेच जय असतो. हे मनस्विनि, तूं निजकर्तव्य आणि पूर्वींचें भाषण लक्ष्यांत आणून आपला कोप आंवरून धर. हे सत्यवादिनि, अशा रीतीनें वागणें तुला योग्य नाहीं !"



समरभूमीवर सर्वत्र प्रेतें पडलीं असून बगळे, कावळे त्यांचे लचके तोंडांत आहेत, कोणी भरतस्त्रिया आपल्या मृत पतींस कवटाळीत आहेत, तर कोणी त्यांचे बाहु हातांत धरून शोक करीत आहेत. हा भयंकर देखावा गांधारी आपल्या दिव्यदृष्टीनें पाहत आहे. (स्त्रीपर्व, पृष्ठ ३७३.)

गांधारी—भगवन्, मी पांडवांची असूया करीत नाहीं, किंवा त्यांचा नाश व्हावा, अशीहि इच्छा करीत नाहीं. माझें मन पुत्रशोकानें अत्यंत विह्वल झालें आहे! ज्याप्रमाणें कुंतीला पांडवांचें रक्षण करणें कर्तव्य वाटत आहे, त्याच-प्रमाणें मी आणि धृतराष्ट्रानेंहि पांडवांचें रक्षण अवश्य केलें पाहिजे. दुर्योधन, सौबल शकुनि, कर्ण आणि दुःशासन यांच्या अपराधामुळेंच हा कौरवकुलाचा नाश झाला आहे! यांत अर्जुनाचा दोष नाहीं, भीमसेनाचा नाहीं, नकुल-सहदेवांचा नाहीं किंवा युधिष्ठिराचाहि कांहीं अपराध नाहीं! माझे पुत्र कौरव हे युद्ध करीत असतां रणांगणांत सर्व इष्टांसह मृत्यु पावले, ही गोष्टहि मला कांहीं अप्रिय झाली असें वाटत नाहीं. परंतु भीमसेनानें कृष्णासमक्ष जें निंद्य वर्तन केलें, त्याचें मात्र मला अत्यंत वाईट वाटत आहे. त्या महाथोर भीमानें दुर्योधनाला गदायुद्धाला बोलाविलें व गदायुद्धांत तो आपल्याहून विद्येनें अधिक आहे आणि रणांगणांत तो विविध प्रकारें संचार करीत अस-ल्याचें पाहून भीमसेनानें त्यावर नाभीच्या खालीं प्रहार केला, ह्या गोष्टीनें मात्र मला संताप होत आहे! धर्मज्ञ महात्म्यांनीं उपदेशिलेल्या धर्माचें शूर म्हणविणाऱ्या क्षत्रियांनीं प्राणरक्षणार्थ असें उल्लंघन करणें कसें बरें योग्य होईल? ११. १. १४.

## अध्याय १५ वा.

[ १ भीम–गांधारीसंवाद. २ पांडवांची कुंतीला भेट. ३ गांधारीचें कोपशमन. ]

(१) वैशंपायन—जनमेजया, भीमसेनानें तें गांधारीचें भाषण ऐकून तिला नम्रतापूर्वक परंतु निर्भयपणें उत्तर दिलें. तो म्हणाला, "माते, मला झालेल्या त्रासामुळें व आपलें रक्षण करण्याकरितां धर्म किंवा अधर्म जो काय माझ्या हातून त्या ठिकाणीं घडला असेल, त्याची तूं मला क्षमा कर! तुझ्या महाबल पुत्राचा धर्मयुद्धानें वध करण्यास कोणीच समर्थ नसल्यामुळें माझ्या हातून विषम आचरण झालें. त्यानेंहि पूर्वीं धर्मराजास द्यूतांत अधर्मानेंच जिंकिलें व आम्हांला सदैव छळिलें, म्हणून माझ्याकडून हें विषमाचरण झालें. सर्व सैन्यांतून एकटाच उरलेल्या ह्या वीर्यवान् वीरानें गदायुद्धांत माझा वध करूं नये, म्हणून मीं तसें केलें. राजपुत्री पांचाली एकवस्त्रा व रजस्वला असतां तुझ्या पुत्रानें तिला जीं दुरुत्तरें केलीं तीं सर्व तुला ठाऊक आहेतच. सुयो-

धनाला जिंकिल्यावांचून ही सर्व ससागर पृथ्वी आम्हांला भोगतां आली नसती, म्हणून मी तसा वागलों. त्याचप्रमाणें तुझ्या पुत्रानें आम्हांला अप्रिय असें आचरण केलें, तें हें कीं भरसभेंत त्यानें द्रौपदीला आपली डावी मांडी दाखविली. त्याच वेळीं त्या तुझ्या दुराचारी पुत्राचा वध आम्हीं करावयाचा, परंतु युधिष्ठिर राजाच्या आज्ञेनें आम्ही स्वस्थ बसलों. हे राज्ञि, तुझ्या पुत्रानें जें हें मोठें वैर उद्दीपित केलें आणि वनांतहि आम्हांला नित्य क्लेश दिले, त्यामुळेंच मीं असें केलें ! दुर्योधनाचा रणांत वध करून आम्ही वैरांतून पार पडलों, युधिष्ठिराला राज्यप्राप्ति झाली आणि आमच्याहि मनांतील कोप नाहींसा झाला !''

गांधारी—भीमसेना, तूं माझ्या पुत्राच्या सामर्थ्याची स्तुति करीत आहेस, त्याअर्थी माझ्या पुत्राचा वध झालाच नाहीं, असें मला वाटत आहे ! शिवाय तूं आतां सांगितलेलीं सर्व कृत्यें त्याच्या हातून झालीं आहेत हीहि गोष्ट खरी ! तथापि हे भारता, रणांत नकुलाचे अश्व वृषसेनानें मारून त्यास संकटांत पाडलें असतां त्याच्या साहाय्यास जावयाचें सोडून तूं दुःशासनाचें रक्त प्यालास ! वृकोदरा, सज्जनांनीं निंद्य ठरविलेलें, अतिघोर, अनार्य लोकांस शोभणारें, असें हें क्रूरकर्म तूं केलेंस, तें अगदींच अयुक्त होय !

भीमसेन—माते, दुसऱ्याचेंहि रक्त कधीं पिऊं नये, मग स्वतःचें कोण बरें प्राशन करील ! ज्याप्रमाणें मला स्वतःचा देह, त्याचप्रमाणें माझ्या बंधूचा–दुःशासनाचा–देह होय. त्यांत विशेष कांहीं नाहीं. रक्त ओठांच्या खालीं गेलें नाहीं, ही खरी गोष्ट आहे. माते, तूं शोक करूं नकोस. ह्यांतील सत्य त्या एक यमधर्मालाच ठाऊक आहे. आतां माझे हात रक्तानें माखले गेले, ह्याचें कारण सांगतों, ऐक ! रणांत वृषसेनानें नकुलाचे अश्व मारिल्यामुळें कौरवांना अतिहर्ष झाला होता. तें पाहून मला अत्यंत संताप चढला. तसेंच द्यूताच्या वेळीं द्रौपदीचे केंस दुःशासनानें धरून ओढले, तेव्हांहि संतप्त होऊन मी जें कांहीं बोललों होतों तें माझ्या मनांत तसेंच राहिलें होतें. ती माझी प्रतिज्ञा मीं पूर्ण केली नसती तर हे राज्ञि, मी माझ्या क्षात्रधर्मापासून शाश्वतचा मुक्त झालों असतों. ती माझी प्रतिज्ञा मोडली जाऊं नये, म्हणूनच मीं तसें केलें ! गांधारि, मीं अन्यायाचें वर्तन केलें, अशी शंका घेऊं नकोस. आम्हीं कोणत्याहि प्रकारें अपकार केला नसतां पूर्वींच तुझ्या पुत्रांनीं आम्हांला छळिलें, तेव्हां त्यांस तूं आंवरून धरलें नाहींस आणि आतांच आम्हांला कां बरें दोष लावतेस ?

**गांधारी**—भीमा, या वृद्धाचे शंभर पुत्रांचा वध करून तूं विजयी झालास; तरी ज्याचा कमी अपराध होता, अशा एखाद्याला तरी तूं जीवंत कां बरें ठेवलें नाहींस ? बाबा, राज्यभ्रष्ट झालेल्या आम्हां वृद्धांचें एक तरी संतान आम्हां उभय आंधळ्यांची काठी म्हणून तरी शेष कां ठेविलें नाहींस ? माझे पुत्रांचा वध करीत असतां तूं धर्माला जागला असतास आणि एखादा पुत्र जीवंत ठेवला असतास तर मला असें दुःख झालें नसतें !

**वैशंपायन**—असें बोलून पुत्र-पौत्रांच्या वधानें दुःखी झालेली गांधारी सक्रोध दृष्टीनें धर्मराज कोठें आहे, म्हणून चौकशी करूं लागली. तेव्हां तो नृपश्रेष्ठ युधिष्ठिर हात जोडून कांपत कांपत तिच्याजवळ गेला आणि मधुर भाषण करून बोलला 'हे देवि, तुझ्या पुत्रांचा वध करणारा दुष्ट युधिष्ठिर मी आहें. मी शापाला पात्र आहें. पृथ्वीनाशाला मी कारण झालों आहें. मला शापून टाक ! तशाप्रकारच्या सुहृदांचा वध करून मी मूर्खानें मित्रद्रोह जोडला आहे ! मला आतां जीवित, राज्य किंवा धन यांपैकीं कशाचीहि आशा राहिली नाहीं !' असें बोलणाऱ्या त्या युधिष्ठिर राजाला गांधारी कांहींच बोलली नाहीं. ती एकसारखी दीर्घ निश्वास टाकीत राहिली होती. खालीं वांकून युधिष्ठिरानें तिच्या पायांवर हात ठेवले, तेव्हां डोळ्यांवरील पट्टयांच्या फटींतून त्याच्या हातांचीं बोटें त्या धर्मज्ञ व दीर्घदर्शी गांधारीच्या दृष्टीस पडलीं. त्याबरोबर तीं तेजस्वी नखें तत्काल निःसत्त्व व मलिन दिसूं लागलीं. तें पाहून अर्जुन तत्काल वासुदेवाच्या पाठीमागें लपला. हे भारता, अशाप्रकारें ते पांडव इकडे तिकडे लपत असतां कांहीं वेळानें गांधारीचा क्रोध शांत झाला आणि तिनें त्या पांडवांचें मातेप्रमाणें सांत्वन केलें !

( २ ) जनमेजय राजा, नंतर त्या गांधारीचा निरोप घेऊन ते विशालवक्ष पांडव आपल्या वीरमाता कुंतीकडे गेले. फार दिवसांनीं तिला पुत्रांची गांठ पडली होती, त्यामुळें आणि त्यांत झालेल्या मानसिक दुःखांमुळें तिचा कंठ भरून आला. तिनें मुखावर वस्त्र घेऊन अश्रू ढाळले. नंतर डोळे पुसून तिनें पुत्रांकडे पाहिलें, तों शस्त्रास्त्रांनीं त्यांचे देह विदीर्ण झाल्याचें तिला आढळून आलें. तिनें एकेकाला आपल्याजवळ घेऊन पुनः पुनः त्याला कुरवाळलें ! द्रौपदीचे पुत्रांचे वधामुळें तिजविषयीं तिला फारच दुःख झालें आणि जमिनी-वर पडून शोक करीत असलेल्या द्रौपदीकडे तिची दृष्टि गेली !

**द्रौपदी**—आर्ये, अभिमन्यूसह माझे सर्व पुत्र कोठें गेले ? तुम्हांला सोडून जाऊन त्यांना बराच वेळ झाला, तरी अजून ते परत कां बरें येत नाहींत ? मला पुत्रांवांचून हें राज्य घेऊन तरी काय करावयाचें आहे ?

( ३ ) यावर कुंतीनें द्रौपदीचें सांत्वन केलें. त्यावेळीं द्रौपदी शोकसंतप्त असून तिला रडण्याचे वरचेवर हुंदके येत होते. कुंतीनें तिला उठवून आपल्या पुत्रांसह ती गांधारीकडे गेली. गांधारीहि शोकाकुल होती, तथापि कुंतीचा शोक तिजपेक्षांहि अधिक होता !

**वैशंपायन**—राजा, अशाप्रकारें द्रौपदी व कुंती शोक करीत असतां गांधारी द्रौपदीला म्हणाली, ' पुत्रि, असा शोक करूं नकोस ! माझ्याकडे पहा ! माझ्या दुःखाची कल्पना कर ! कालाचा फेराच आम्हांवर येऊन हा अंगावर कांटा उभा राहील, असा लोकसंहार झाला आहे, असें मला वाटतें. महामति विदुरानें सांगितलेल्या सर्व गोष्टी अक्षरशः खऱ्या ठरल्या आहेत. अपरिहार्य गोष्ट होऊन गेली, त्याला काय करायाचें ? तूं शोक करूं नकोस ! संग्रामामध्यें निधन पावलेल्यांबद्दल शोक करणें योग्य नाहीं. जशी तूं तशीच मी ! आम्हां दोघींचें समाधान आतां कोण बरें करणार ? माझ्याच अपराधामुळें आमच्या महाथोर कुलाचा नाश झाला आहे ! ११. १. १५.

[ येथें पहिलें जलप्रदानिकपर्व समाप्त झालें. ]

---

## स्त्रीविलासपर्व २.



### अध्याय १६ वा.

[ १ व्यासप्रसादामुळें गांधारीला दिव्यदृष्टि प्राप्त होऊन रणभूदर्शन. २ धृतराष्ट्र-युधिष्ठिरांचा स्त्रियांसह रणभूमिप्रवेश. ३ स्त्रियांचा विलाप. ४ गांधारी आपल्या विलाप करणाऱ्या स्नुषा कृष्णाला दाखविते. ]

( १ ) **वैशंपायन**—राजा, असें बोलून गांधारीनें तेथूनच कौरवांची युद्धभूमि दिव्य दृष्टीनें अवलोकन केली. महाभागा गांधारी ही मोठी पतिव्रता व खरी सहधर्मचारिणी असून सर्वदा सत्यभाषण करणारी होती. तिनें उग्र तपश्चर्या

केली होती. पुण्यवान् महर्षि व्यास यांच्या वरदानानें तिला दिव्यज्ञान प्राप्त होऊन शोक करण्यासारख्या विविध गोष्टी बसल्या जागीं दिसूं लागल्या. त्या ज्ञानामुळें दूर असलेलें रणांगण तिला अगदीं जवळ दिसूं लागलें. तें वीरांचें अद्भुत रणांगण अंगावर कांटा उभा राहील असें होतें. त्या ठिकाणीं सर्वत्र अस्थि, वसा, केश, हे पसरलेले असून रक्तौघ वाहत होते; जिकडे तिकडे सहस्रावधि मनुष्यांचीं शरीरें पडलीं होतीं, गज, अश्व, रथ आणि योद्धे यांचीं रक्तपूर्ण शिरोहीन शरीरें आणि शरीरहीन मस्तकें यांनीं सर्व जागा व्याप्त झाल्या होत्या. गज, अश्व, नर आणि नारी यांच्या किंकाळ्या जागोजाग ऐकूं येत होत्या. कोल्हे, बगळे, करकोंचे, डोमकावळे आणि कावळे हे तेथें वसतिस्थान करून राहिले होते. मनुष्यभक्षक राक्षसांना तेथें मोठा आनंद होत असून सर्वत्र अशुभ कोल्हे आणि गृध्र यांनीं तें स्थान भरून गेलें होतें.

(२) राजा, नंतर व्यासांच्या आज्ञेनें धृतराष्ट्र राजा कुरुस्त्रियांस घेऊन युधिष्ठिरप्रभृति पांडवांसह कृष्णाला पुढें करून रणागणांत गेला. कुरुक्षेत्रावर जातांच त्या पतिहीन स्त्रियांना तेथें आपले पुत्र, बंधु, पिते आणि पति हत होऊन पडलेले दृष्टीस पडले. तेथें मांसभक्षक कोल्हे, बगळे, कावळे, भूतें, पिशाच्चें, राक्षस आणि विविध निशाचर हे त्या हत वीरांचे लचके तोडीत होते ! याप्रमाणें ती युद्धभूमि रुद्राचें क्रीडास्थान झालेली पाहून त्या स्त्रियांना रडें कोसळलें आणि त्या मोठ्यानें आक्रोश करूं लागल्या. त्यांनीं मूल्यवान् रथांतून खालीं उड्या घेतल्या ! कित्येक दुःखी भारतस्त्रिया तो अदृष्टपूर्व देखावा पाहून भीतीनें प्रेतांस अडखळल्या व दुसऱ्या जमिनीवर पडल्या ! त्या श्रांत आणि अनाथ स्त्रियांची चेतना नष्ट झाली ! विशेषतः पांचाल आणि कौरव स्त्रियांची तर अत्यंत दीन स्थिति झाली होती. त्या दुःखोद्विग्न स्त्रियांच्या सर्वत्र चाललेल्या आक्रोशानें व्याप्त झालेली ती भयंकर रणभूमि अवलोकन करून धर्मशील गांधारीनें पुरुषोत्तम श्रीकृष्णाला जवळ बोलाविलें आणि कौरवांचा झालेला संहार अनुलक्षून म्हणाली, " हे पुंडरीकाक्षा, ह्या माझ्या गतधवा सुना पहा ! ह्यांचे केंस अस्ताव्यस्त झाले आहेत आणि माधवा, ह्या कुररींप्रमाणें आक्रोश करीत आहेत. ह्या आपल्या पतींच्या प्रेतांजवळ जाऊन त्यांचे गुणांची आठवण करीत आहेत आणि आपल्या पुत्रांकडे, बंधूंकडे, पित्यांकडे आणि पतींकडे पृथक् पृथक् धांवत आहेत ! हतपुत्र वीरमातांनीं आणि हतपति वीरपत्नींनीं ही रणभूमि कशी व्याप्त होऊन गेली आहे पहा !

कर्ण, भीष्म, अभिमन्यु, द्रोण, द्रुपद, शल्य अशा प्रदीप्त अग्निसमान नर-श्रेष्ठांनीं हें रणांगण कसें फुलून गेलें आहे पहा! त्या महात्म्यांचीं सुवर्णकवचें, निष्क, मणि, अंगद, केयूर आणि माला यांनीं ही रणभूमि सुशोभित झाली आहे! त्याचप्रमाणें वीरांनीं सोडलेल्या शक्ति, परिघ, विविध प्रकारचे खड्ग, तीक्ष्ण शर आणि धनुष्यें हीं चोहोंकडे पसरून रणाला विचित्र शोभा आली आहे! हिंस्र पशूंचे कळप कोठें आनंदानें एकत्र राहिले आहेत, कोठें क्रीडा करीत आहेत, तर कोठें सुखानें निद्रा घेत पडले आहेत! हे वीरा, हें रणांगण अशाप्रकारचें आहे पहा! प्रभो जनार्दना, त्याकडे पाहून मी शोकानें जळून जात आहें! हे मधुसूदना, पांचाल आणि कौरव यांचा नाश झाल्यानें पंच-भूतांचा अर्थात् सर्व जगताचा वध झाल्यासारखें मला वाटत आहे! त्या वीरांना आज गरुड व गृध्रपक्षी ओढीत आहेत आणि हजारों त्यांना आपल्या पायांनीं फाडफाडून भक्षण करीत आहेत! जयद्रथ, कर्ण, त्याचप्रमाणें द्रोण, भीष्म, अभिमन्यु इत्यादिकांचा अशा रीतीनें नाश होईल, याची कल्पना तरी कोणीं केली होती काय? जवळ जवळ अवध्य असे हे वीर पतन पावले आहेत आणि गतप्राण होऊन अचेतन झाले आहेत! गृध्र, कंक, बक, श्येन, कुत्रे आणि कोल्हे हे लचके तोडून त्यांचें भक्षण करीत आहेत!

दुर्योधनाचा वश होऊन क्रोधाविष्ट झालेले हे नरव्याघ्र आज विझून गेलेल्या अग्नीप्रमाणें शांत झाले आहेत पहा! जे सर्वदा मऊ बिछान्यावर निजत असत, ते आज विपन्न स्थितींत उघड्या जमिनीवर पडून राहिले आहेत! ज्यांचें सर्वदा बंदिजनांनीं अभिवंदन करीत असावें, ते आज अमंगल शिवांची घोर कोल्हेकुई ऐकत राहिले आहेत! जे यशस्वी वीर पूर्वी चंदना-गुरूची उटी अंगाला लावून शयनांवर निजावयाचे, तेच आज धुळींत लोळत पडले आहेत! त्यांचे अलंकार गृध्र, गोमायु आणि काक हे इकडे तिकडे फेंकून देत आहेत! आणि घोर शिवा त्यांच्या सभोंवतीं जमून सारखी भयंकर ओरड करीत आहेत! या युद्धाभिमानी योद्ध्यांच्या हातांत तीव्र बाण, पाणी दिलेले खड्ग आणि विमल गदा असून त्या जशाच्या तशाच दिसत आहेत, यावरून ते जीवंतच आहेत, असें वाटत आहे. बहुतेक वीरांचे सुंदर देह हिंस्र प्राण्यांनीं विद्रूप करून टाकिले आहेत, ते आज बैलांसारखे भूमीवर पडले आहेत! दुसरे कोणी महाबाहु वीर प्रियकांत आपल्या स्त्रियांना आलिंगन देऊन जसे झोंपीं जातात, त्याप्रमाणें आपल्या गदांस आलिंगून

व त्यांच्याकडे तोंडें करून पडले आहेत ! हे जनार्दना, कित्येकांच्या अंगांत कवचें व हातांत तेजस्वी आयुधें असल्यामुळें हिंस्त्र पशु ते जीवंतच आहेत, असें समजून त्यांच्या वाटेस जात नाहींत ! कित्येक महात्म्यांना हिंस्त्र श्वापदें ओढीत आहेत व त्यांच्या गळ्यांतील चित्रविचित्र सुवर्णमाळा समंताद्भागीं पडल्या आहेत. हे भयंकर गोमायु यशस्वी मृत वीरांच्या कंठांतील हारांचे सहस्त्रावधि तुकडे करून टाकीत आहेत पहा ! आजपर्यंत बंदिजन ज्यांची स्तुति गात असत आणि उत्तम प्रकारचे उपचारांनीं ज्यांची सेवा करीत असत, त्यांच्याच शेजारीं त्यांच्या दुःखार्त राण्या शोकाकुल होऊन विलाप करीत आहेत !

( ३ ) केशवा, ज्या श्रेष्ठ स्त्रियांचीं मुखें आजवर रक्तकमलाप्रमाणें शोभत असत, तींच आज दुःखशोकाकुल स्थितींत अगदीं शुष्क होऊन गेल्यासारखीं दिसत आहेत. ह्या कित्येक स्त्रियांनीं आपलें रडें थांबविलें आणि मुखावर वस्त्र घेऊन ध्यानमग्न झाल्या आहेत पहा ! ह्या पहा कुरुस्त्रिया दुःखित होऊन आपापल्या पतींजवळ जात आहेत ! तीं कौरवस्त्रियांचीं मुखें अरुण वर्णाचीं आणि सुवर्णासारखीं होतीं, तींच आतां क्रोध आणि रोदन यांच्या योगानें लालबुंद झालीं आहेत ! हे केशवा, एकवस्त्र परिधान केलेल्या आणि शुष्क, श्याम व गौर वर्णाच्या ह्या दुर्योधनाच्या पट्टराण्या पहा ! ह्यांचे तुटक मंदविलाप ऐकूं येतात, परंतु इतर स्त्रियांच्या आरोळ्यांत त्यांचा अर्थ समजत नाहीं ! ह्यांच्याकडे पाहून ते नुकतेच पतन पावलेले वीर दीर्घ निश्वास सोडून व मोठा विलाप करून दुःखानें प्राण सोडीत आहेत ! पतींच्या शरीरांकडे पाहून कित्येक मोठा आक्रोश व विलाप करीत आहेत ! दुसऱ्या कित्येक आपल्या मृदु हस्तांनीं मस्तक पिटीत आहेत ! तुटून पडलेलीं मस्तकें, हात, पाय इत्यादि सर्व अवयव एकमेकांवर पडून त्यांच्या भारानें जणुंकाय पृथ्वी व्याप्त झाल्यासारखी दिसत आहे ! तीं वीरांचीं मस्तकरहित धडें व देहरहित मस्तकें पाहून आपल्या पतींचें कोणतें याविषयीं मोठा संशय येऊन त्या स्त्रियांना मोह पडत आहे ! एकाद्या धडाला शिर जोडून मूढ अंतःकरणानें त्याकडे पहावें, तों तें आपल्या पतीचें नव्हे, असें आढळून त्या दुःखाकुल होत आहेत असें चाललें आहे ! कित्येक दुःखी स्त्रिया शरांनीं छिन्न झालेले बाहू, ऊरु आणि चरण दुसऱ्या धडांना जोडून पाहत आहेत व पुनः पुनः मूर्च्छित होऊन पडत आहेत ! लचके तोडून मस्तकें मृगपक्ष्यांनीं खाल्लीं असल्यामुळें कित्येक भरतस्त्रियांना आपले पति समोर असतांहि ओळखूं येईनासे झाले आहेत !

( ४ ) हे मधुसूदना, आपले भ्राते, पिते, पुत्र आणि पति यांचा शत्रूंनीं संहार केलेला पाहून कित्येक स्त्रिया आपले हात मस्तकावर मारून घेत आहेत. सखड्ग बाहूंनीं आणि सकुंडल मस्तकांनीं सर्व पृथ्वी व्याप्त होऊन सर्वत्र रक्तमांसाचा चिखल झाल्यामुळें रणभूमीवरून जाणेंहि अशक्य झालें आहे. हे भरतश्रेष्ठा कृष्णा, ज्यांना आजवर दुःखाचा अनुभव मुळींच नाहीं, अशा त्या अनिंदित स्त्रिया आज दुःखसागरांत पडल्या आहेत! त्यांचे बंधु, पति आणि पुत्र यांच्या प्रेतांनीं पृथ्वी व्याप्त झाली आहे! जनार्दना, किशोरींच्या समूहांप्रमाणें माझ्या ह्या अनेक दुःखित सुना तूं पहा! केशवा, यांचीं हीं अशीं वेडींवांकडीं रूपें पाहण्यापेक्षां अधिक दुःखदायक असें मला काय आहे? हे माधवा, माझ्या हातून खरोखर पूर्वजन्मीं कांहीं तरी पातक घडल्यामुळें माझे पुत्र, पौत्र आणि बांधव मरून पडलेले मी पाहत आहें!"

जनमेजया, याप्रमाणें ती दुःखी व शोकग्रस्त गांधारी कृष्णाशीं संभाषण करीत असतां त्या दुःखग्रस्त मातेला आपल्या हत पुत्रांचें दर्शन झालें. ११. २. १६.

---

## ० अध्याय १७ वा.

[ १ गांधारीचा दुर्योधनसंबंधीं विलाप. २ भानुमतीविषयीं गांधारीचा शोक. ]

( १ ) वैशंपायन—जनमेजया, शोकाकुल गांधारी दुर्योधनाला हत झाल्याचें पाहतांच वनांत केळ मोडून पडावी, त्याप्रमाणें जमिनीवर धाडकन् पडली. मग शुद्धीवर आल्यावर रक्तानें माखलेल्या आपल्या पुत्रास तिनें पाहिलें आणि मोठ्यानें आक्रोश व विलाप केला. त्या विकलेंद्रिय गांधारीनें आपल्या पुत्राला पोटाशीं धरिलें आणि 'हाय हाय, हा पुत्रा' म्हणून शोक करीत एकच आक्रोश केला. मग हारांनीं व निष्कांनीं सुशोभित त्याचे उरःस्थलावर नेत्रोदकाचें सिंचन करून ती शोकसंतप्त गांधारी जवळच असलेल्या कृष्णाला बोलली, "विभो वार्ष्णेया, ज्ञातिक्षय करणारा हा संग्राम सुरू झाला असतां तो नृपसत्तम दुर्योधन हात जोडून मला म्हणाला, 'माते, ह्या ज्ञातिजनांशीं चाललेल्या युद्धांत माझा जय होईल, असा आशीर्वाद मला दे!' असें तो म्हणाल्यावर हे पुरुषव्याघ्रा, आमच्यावर येणारें हें पुढील संकट लक्षांत आणून त्याला

मीं म्हटलें, 'जिकडे धर्म, तिकडे जय होईल.' हे पुत्रा, युद्ध करीत असतां तूं जर मोह पावला नाहींस, तर खरोखर देवांप्रमाणें तुलाहि आपल्या शस्त्रप्रभावानें उत्तम लोक मिळतील ! कृष्णा, मीं पूर्वीं असें म्हटलें होतें, तेव्हां आतां दुर्योधनाबद्दल मी शोक करीत नाहीं. परंतु त्या हतबांधव व दीन झालेल्या धृतराष्ट्रासाठीं शोक करीत आहें.

" माधवा, हा अमर्षण, शूरश्रेष्ठ, अस्त्रप्रवीण आणि युद्धदुर्मद माझा पुत्र आज वीरशयनावर पडला आहे पहा ! जो हा परंतप मूर्धाभिषिक्त राजांच्या अग्रभागीं नित्य चालत असे, तोच आज धुळीमध्यें लोळत पडला आहे पहा ! हा कालाचा फेरा असा आहे ! हा वीर वीरसेवित शय्येवर पडला आहे, त्याअर्थीं त्याला उत्तम गति प्राप्त होणार, यांत संशय नाहीं. ज्याचें मन पूर्वीं उत्तम स्त्रिया रिझवीत असत, त्या वीरशयनावर सुप्त झालेल्या वीरास आज अशुभ शिवा रंजवीत आहेत ! ज्याला पूर्वीं मोठमोठे राजे लोक रमवीत असत, तोच आज मरून महीतलावर हत होऊन पडला असतां गृध्र पक्षी त्याचें रंजन करीत आहेत ! ज्याला पूर्वीं स्त्रिया सुंदर पंखे घेऊन वारा घालीत असत, त्याला सध्यां पक्षी आपल्या पंखांनीं वीजन करीत आहेत. सिंहानें जसें गजाला मारून टाकावें, त्याप्रमाणें भीमसेनानें रणांत हत केलेला हा महाबाहु, बलवान् आणि सत्यविक्रमी वीर येथें पडला आहे ! कृष्णा, भीमसेनानें गदेनें मारलेला हा रुधिरदिग्ध होऊन पडलेला दुर्योधन पहा ! हे केशवा, ज्यानें पूर्वीं अकरा अक्षौहिणी सेना समरांत उभी केली, तो महाबाहु आज अन्यायानें हत झाला आहे ! सिंहानें ज्याप्रमाणें शार्दूलाचा वध करावा, त्याप्रमाणें भीमसेनानें मारलेला हा महाबलवान् व महाधनुर्धर दुर्योधन हा असा निजून राहिला आहे ! ह्या मंदभाग्यानें केवळ विदुराचाच अपमान केला असें नाहीं, तर प्रत्यक्ष आपल्या पित्याचाहि अनादर केला आणि शेवटीं त्या वृद्धांच्या अपमानामुळेंच हा मंद पोर मृत्यु पावला ! ज्यानें तेरा वर्षें ही निष्कंटक पृथ्वी उपभोगिली, तो माझा हा पृथ्वीपति पुत्र आज मरून पृथ्वीवर पडला आहे ! कृष्णा, ह्या वेळपर्यंत पृथ्वीवर धार्तराष्ट्राची सत्ता चालत असून ती गज, अश्व आणि बैल यांनीं समृद्ध अशी मी पहात होत्यें. परंतु, ती स्थिति फार दिवस टिकली नाहीं ! हे महाबाहो, त्याच पृथ्वीवर आज दुसऱ्याची सत्ता चालत असून गज, अश्व आणि बैल यांविरहित ती आज मला दिसत आहे ! मी आतां कशाकरितां म्हणून प्राणधारण करावें ! "

(२) "कृष्णा, पुत्रवधापेक्षांहि कष्टकारक गोष्ट म्हटली म्हणजे ह्या रणांत स्त्रिया आपल्या मृत पतींची सेवा करीत आहेत, त्यांना पहाणें ही होय! कृष्णा, स्वर्णवेदीसमान जिची कांति, अशी ही लक्ष्मणमाता व दुर्योधनपत्नी भानुमती पतीचे अंकावर बसली आहे! तिचे केंस किती विखरले आहेत पहा! पूर्वीं राजा जीवंत असतां ही तरुणी आलिंगन देऊन त्याला नित्य रमवीत असे आणि आज काय हा उलट प्रकार! बाल लक्ष्मणासह माझा पुत्र रणांत पडलेला पाहूनहि माझें हृदय शतधा विदीर्ण कसें बरें होत नाहीं? ही वामोरु भानुमती एकीकडे रक्तानें माखलेल्या लक्ष्मणाचें अवघ्राण करीत आहे, तर दुसरीकडे दुर्योधनाचे अंगावरून हात फिरवीत आहे! ही मनस्विनी पुत्राकरितां आणि पतीकरितां मोठ्यानें शोक करीत आहे हायहाय! ती पुत्राकडे सारखी टक लावून बसलेली दिसत आहे! हे माधवा, ती पहा दोन्ही हात कपाळावर मारून घेऊन वीर कुरुराजाच्या उरावर पडली! पुंडरीकासारखा हिचा गौर वर्ण असून ही आज त्याच्या आंतील भागाप्रमाणें केवळ पांडुवर्ण झाली आहे! ही बिचारी पतीच्या व पुत्राच्या तोंडावरून हात फिरवीत आहे! जर वेद व श्रुति ह्या खऱ्या असतील, तर ह्या दुर्योधन राजानें आपल्या बाहुबलानें खरोखरच पुण्यलोक मिळविले असतील!" ११. २. १७.

---

## अध्याय १८ वा.

[ १ गांधारीचा स्नुषाविषयक शोक. २ दुःशासन-शकुनिप्रभृतींविषयीं विलाप. ]

( १ ) **गांधारी**—माधवा, हे माझे युद्धोत्साही शंभर पुत्र भीमसेनानें गदाप्रहारानें हत केले आहेत पहा! त्यांहूनहि आज माझ्या सुना आपल्या पुत्रांचा वध झाल्याचें पाहून व केंस मोकळे सोडून रणांगणांत इतस्ततः धांवत सुटल्या आहेत, ही गोष्ट मला विशेषच दुःखदायक वाटत आहे! पायांत भूषणें घालून ज्यांना राजवाड्यांतील मऊ भूमितलावरून चालण्याची संवय, त्यांना सांप्रत रुधिरार्द्र जमिनीवरून संचार करण्याचा प्रसंग आला आहे! त्या गृध्र, गोमायु आणि वायस यांना मोठ्या कष्टानें दूर सारीत आहेत आणि अतिदुःखानें उन्मत्ताप्रमाणें चित्तविभ्रम होऊन सर्वत्र फिरत आहेत! ही पहा एक कृशकटि लावण्यवती भयंकर रणभूमि पाहून दुःखभरानें खालीं पडली! हे महाबाहो,

ह्या राजकन्या लक्ष्मणमातेकडे पाहून माझ्या मनाची जी उद्विग्न स्थिति झाली आहे, ती कशानेंहि शांत होत नाहीं! त्या पहा कित्येक आपल्या बंधूंना, कित्येक आपल्या पित्यांना, तर कित्येक आपल्या पुत्रांना जमिनीवर हत पडलेले पाहून त्यांचे महाभुज हातांत धरून भूमीवर पडत आहेत! हे अपराजिता, ह्या भयंकर रणसंहारांत ज्यांचे बांधवांचा नाश झाला आहे, अशा तरुण व वृद्ध स्त्रियांचा सर्वत्र चाललेला आक्रोश ऐक! हे महाभुजा, श्रमानें किंवा मोहानें आर्त झालेल्या कित्येक स्त्रिया रथांचा किंवा हत झालेल्या गज-हयांचा आश्रय घेऊन कशा उभ्या आहेत पहा! कृष्णा, ती पहा एक स्त्री आपल्या बंधूचें देहापासून उडविलेलें मस्तक पोटाशीं धरून उभी आहे! त्याचें नाक उत्तम असून त्याचे कानांत सुंदर कुंडलें शोभत आहेत! हे अनघा, त्या निर्दोषी स्त्रिया आणि मंदबुद्धि मी यांनीं पूर्वजन्मीं कांहींतरी मोठें पातक केलें असलें पाहिजे आणि म्हणूनच हे जनार्दना, हें मोठें संकट आम्हांवर यमधर्मानें आणिलें आहे! वार्ष्णेया, ह्या जगांत आपल्या शुभ किंवा पापकर्मांचा नाश कधींहि होत नसतो. माधवा, अति तरुण, लावण्याच्या केवळ खाणी, कुलीन, विनयशील, ज्यांचे केस, पापण्या आणि डोळे काळेभोर आहेत, ज्यांचा शब्द हंसासारखा आहेत, अशा ह्या स्त्रिया दुःखशोकांनीं मोहित होऊन बालकांप्रमाणें शब्द करीत पडल्या आहेत! हे पुंडरीकाक्षा, ह्यांचीं प्रफुल्ल पद्मांप्रमाणें कांतियुक्त व निर्दोष मुखें प्रखर सूर्याच्या योगानें तप्त होत आहेत! वासुदेवा, मत्त मातंगाप्रमाणें असहिष्णु माझ्या पुत्रांच्या अंतःपुराकडे आज नीच लोक नजर टाकीत आहेत!

( २ ) "हे गोविंदा, ह्या माझ्या पुत्रांच्या शतचंद्र ढाली, सुवर्णकवचें, हे सूर्यासारखे शोभणारे ध्वज, सुवर्णनिष्क आणि शिरस्त्राणें हीं महीतलावर हुताग्नीप्रमाणें कशीं प्रदीप्त दिसत आहेत पहा! हा माझा पुत्र दुःशासन येथें पडला आहे! त्या शूर शत्रुविध्वंसक भीमसेनानें ह्याला रणांत पाडलें! आणि ह्याच्या सर्वांगांतील रक्त प्राशन केलें. माधवा, द्यूतांत दिलेले क्लेश लक्ष्यांत आणून आणि द्रौपदीच्या प्रोत्साहनावरून भीमसेनानें माझ्या पुत्रांचा गदेनें वध केला पहा! जनार्दना, आपल्या बंधूचें व कर्णाचें प्रिय करणाच्या इच्छेनें भरसभेंत ह्यानें नकुल, सहदेव आणि अर्जुन ह्यांच्या समक्ष द्रौपदीला म्हटलें 'पांचालि, तुला द्यूतांत आम्हीं जिंकिलें आहे, तूं आतां आमची दासी झाली आहेस, तर आमच्या घरीं चल!"

कृष्णा, तेव्हां मीं दुर्योधनाला सांगितलें, ' ह्या शकुनीच्या गळयांत मृत्यु-पाश पडला आहे, ह्यापासून तूं दूर रहा. हा तुझा मातुल दुर्बुद्धि आणि कलह-प्रिय आहे, तरी त्याची संगति सोडून दे आणि पांडवांशीं सख्य कर ! दुर्बुद्धे, तूं ह्या अमर्षण भीमसेनाला ओळखीत नाहींस ! गजाला ज्याप्रमाणें अग्निका-ष्ठांनीं टोंचावें, त्याप्रमाणें तूं वाक्शरांनीं भीमाला टोंचीत आहेस !'

केशवा, त्या क्रुद्ध भीमानें दुःशासनाचे ते वाग्बाण लक्षांत ठेवून सर्पानें जसा वृषभांस दंश करावा, त्याप्रमाणें माझ्या पुत्रांवर आपल्या क्रोधरूपी विषाचा प्रयोग केला ! सिंह जसा महागजाचा वध करितो, त्याप्रमाणें भीम-सेनानें मारलेला हा दुःशासन हात पसरून येथें निजला आहे ! ह्या असहिष्णु भीमानें रणांगणावर दुःशासनाचें रक्त प्राशन केलें, तें त्याचें अत्यंत घोर कर्म होय ! ११. २. १८.

---

## अध्याय १९ वा.

[१ विकर्ण, दुर्मुख, इत्यादिकांबद्दल गांधारीचा शोक.]

(१) गांधारी—माधवा, हा माझा विद्वत्पूजित् पुत्र विकर्ण मारला जाऊन येथें पडला आहेत ! भीमसेनानें शेंकडो ठिकाणीं प्रहार करून ह्याचा निःपात केला आहे ! मधुसूदना, शरदृतूंत नीलमेघामध्यें जसा चंद्र चमकत असतो, तसा हा गजांच्या मध्यभागीं पडून शोभत आहे ! धनुष्य हातीं धरून घट्ट पडलेला तलत्रयुक्त ह्याचा प्रचंड हात बुभुक्षित गृध्र मोठ्या कष्टानें छेदित आहेत ! हे माधवा, ती त्याची गरीब बिचारी पत्नी मांसेच्छु गिधाड आणि काक यांना त्याजपासून एकसारखी हांकीत आहे; पण तिच्यानें त्यांचें निवारण होत नाहीं ! हे पुरुषर्षभा, हा तरुण, सुंदर व शूर विकर्ण सुखांत वाढला असून सुखोपभोगांसच योग्य आहे, परंतु तो आज मरून धुळींत पडला आहे ! माधवा, कर्णि, नालीक, नाराच इत्यादि बाणांनीं ह्याच्या सर्व मर्मांवर प्रहार झाले असतांहि ह्या भरतसत्तमाचें तेज अजून कांहींहि कमी झालेलें नाहीं !

कृष्णा, त्या प्रतिज्ञापालक संग्रामशूरानें रणांत मारलेला शत्रुगणसंहारक दुर्मुख हत होऊन सन्मुख पडला आहे पहा ! त्याचें तें मस्तक श्वापदांनीं अर्धें भक्षण करून टाकिलें आहे, तरी सप्तमीच्या चंद्राप्रमाणें तें अधिकच शोभत

आहे! हे कृष्णा, ह्या शूर वीराचें रणांत दिसणारें अशा प्रकारचें मुख पहा तर खरें! असा हा माझा पुत्र शत्रूंकडून मारला जाऊन आज धुळींत कसा पडला आहे? ज्याच्या समोर युद्धारंभीं उभा राहणारा कोणी नव्हता, तो माझा देवलोक जिंकणारा पुत्र दुर्मुख शत्रूंच्या हातून युद्धांत कसा रे पडला? हे मधुसूदना, हा मृत होऊन भूमीवर पडलेला चित्रसेन पहा! हा धार्तराष्ट्र म्हणजे धनुर्धरांचा एक उत्कृष्ट नमुनाच होता! चित्रविचित्र माला व अलंकार धारण करणाऱ्या त्यासभोंवतीं त्याच्या शोकसंतप्त स्त्रिया हिंस्र श्वापदांसह रडत बसल्या आहेत! हे कृष्णा, स्त्रियांच्या रडण्याचा आक्रोश व श्वापदांच्या गर्जना यांच्या योगानें रणांगण अत्यंत भयानक झालें असून तो देखावा मला अति अपूर्व वाटत आहे!

ज्या तरुण व सुंदर वीराची अनेक लावण्यवती स्त्रिया नित्य सेवा करीत असत, तो हा विविंशति धुळीमध्यें अस्ताव्यस्त पडला आहे! कृष्णा, ज्याचें कवच बाणांनीं फुटलें आहे, अशा या युद्धांत पडलेल्या विविंशति वीरासभोंवतीं गृध्र कसे बसून राहिले आहेत पहा! समरांत हा शूर पांडवांच्या सेनेंत प्रवेश करून सत्पुरुषोचित वीरशयनावर आज पडून राहिला आहे! कृष्णा, ह्या विविंशतीच्या मुखाकडे जरा नजर टाक! त्याचें स्मितयुक्त मुख, सुंदर नाक, रेंखलेल्या भोंवया आणि ताराधिप चंद्राप्रमाणें शुभ्र मुख पहा! ह्याच्या सभोंवतीं अनेक सुंदर स्त्रिया बसून ज्याप्रमाणें हजारों देवकन्या गंधर्वांशीं क्रीडा करितात, त्याप्रमाणें त्याशीं रममाण होत असत! परसैन्याचा नाश करणारा, शूर, सभेंत शोभणारा आणि शत्रूंचा विघातक अशा ह्या दुःसह वीरापुढें कोण उभा राहूं शकणार? पण त्याच दुःसहाचें शरीर बाणांनीं व्याप्त होऊन तो प्रफुल्ल कर्णिकारांनीं भरलेल्या पर्वताप्रमाणें सांप्रत दिसत आहे! सुवर्णमाला आणि देदीप्यमान कवच यांच्या योगानें श्वेतपर्वत जसा अग्नीनें प्रज्वलित होतो, तसा हा गतप्राण होऊन शोभत आहे! ११. २. १९.

---

## अध्याय २० वा.

[ १ गांधारी, उत्तरा व इतर स्त्रिया यांचा विलाप. ]

( १ ) **गांधारी**—केशवा, जो शौर्यामध्यें व बलामध्यें आपल्या पित्याच्या व तुझ्याहि दीडपट होता म्हणून सांगतात व जो एकटा माझ्या पुत्रांची ही

दुर्भेद्य सेना भंग करण्यास समर्थ होता, तो दस सिंहाप्रम ें भयंकर अभिमन्यु अनेक शत्रूंना मृत्युमुखीं पाठविणारा असूनहि आज ् तः मृत्युवश झाला आहे ! कृष्णा, हा अभिमन्यु हत झाला आहे, तरी त्या अमिततेजस्वी वीराची प्रभा यत्किंचितहि कमी झालेली दिसत नाहीं ! ही विराटाची कन्या व गांडीवधारी अर्जुनाची सून उत्तरा दुःखी होऊन आपल्या शूर व तरुण पतीकडे पाहून शोक करीत आहे पहा ! ती पहा त्याच्या अगदीं जवळ जाऊन त्याला आपल्या हातांनीं कुरवाळीत आहे ! त्या सौभद्राच्या प्रफुल्ल कमलाकार मस्तकाचें अवघ्राण करून ती अतिरूपवती त्याला आलिंगन देत आहे पहा ! जी पूर्वी मधुसेवनानें मत्त झाली असतांहि अभिमन्यूला लाजत असे, ती आज त्याचें रक्तदिग्ध सुवर्णविभूषित कवच सोडून त्याचें शरीर निरखून पहात आहे ! कृष्णा, त्याजकडे निरखून ती तुला उद्देशून म्हणत आहे कीं, " हे पुंडरीकाक्षा, तुझ्याचसारख्या नेत्रांचा हा अभिमन्यु येथें पडला आहे ! हे अनघा, बल, वीर्य आणि तेज यांमध्येंहि तो अगदीं तुझ्याचसारखा आहे. अरे, रूपांत देखील तो तुझ्याशीं तुल्य असून आज हत होऊन भूमीवर पडला आहे ! नाथा, अत्यंत सुकुमार अशा हरिणचर्मावर आपण दररोज निजावयाचें आणि आजच आपण असे जमिनीवर कसे पडलां ? ही जमीन आपल्या अंगाला खुपून त्रास नाहीं का देत ? गजशुंडेप्रमाणें लांब धनुष्याची दोरी ओढून घट्टे पडलेले आणि सुवर्णांगदें घातलेले विपुल हात सोडून हे निजले आहेत ! फार वेळ युद्ध केल्यामुळें श्रमांनींच यांना गाढ निद्रा लागली आहे ! नाथा, मी आर्त होऊन एवढा विलाप करीत असतां तुम्ही माझ्याशीं मुळींच बोलत नाहीं ! मीं कांहीं आपला अपराध केल्याचें मला स्मरत नाहीं, मग मजबरोबर कां बरें बोलत नाहीं ! पूर्वी आपण मला दुरून पाहतांच बोलत असां, आणि नाथा, आज माझा कोणता असा अपराध झाला आहे कीं आपण मजशीं बोलूं नये ! आर्या, आर्य सुभद्रेला, देवांसारख्या आपल्या पित्यांना आणि दुःखार्त मला सोडून आपण कोठें हो चाललांत ? "

कृष्णा, त्या अभिमन्यूचे रक्तानें भरलेले केंस हातांनीं नीट करून आणि त्याचें मस्तक मांडीवर घेऊन तो जिवंतच आहे असें समजून ती त्यास विचारत, "नाथा, आपण वासुदेवाचे भाचे असून गांडीवधारी अर्जुनाचे पुत्र आहां. असें असतां त्या महारथांनीं रणमध्यभागीं आपला वध कसा हो केला ? ज्यांनीं मला वैधव्य आणलें त्या कृप, कर्ण, जयद्रथ, द्रोण आणि अश्वत्थामा

ह्या सर्व क्रूरकर्म्यांना धिक्कार असो ! मला दुःख देण्यासाठींच एकट्या आपणाला त्या बाल्यस्थितींत घेरून पांडव आणि पांचाल यांचे समक्ष वध करतांना त्या सर्व महारथांचें मनांत तरी काय होतें ! वीरा, आपण सनाथ असतां आपला अनाथासारखा वध व्हावा ना ? आपला पिता मोठा नरशार्दूल वीर युद्धांत अनेकांच्या हातून आपला वध झाल्याचें पाहून प्राण तरी कसे धारण करील ? हे पुष्करेक्षणा, आपणांवांचून विपुल राज्यलाभ किंवा शत्रूंचा पराभव यांच्या योगानें पांडवांना मुळींच आनंद होणार नाहीं ! प्राणनाथ, आपण आपल्या धर्मानें, इंद्रियदमनानें किंवा शस्त्रपराक्रमानें जे लोक मिळविले असतील, तेथें मी आपल्या मागून येईन, तेथें माझा प्रतिपाळ आपण करावा ! आपणांस रणांत मरून पडलेले आपल्या डोळ्यांनीं पाहूनहि मी अभागी अजून जीवंत आहें, त्याअर्थी वेळ आल्यावांचून कोणी मरत नाहीं हेंच खरें ! हे नरव्याघ्रा, त्या पितृलोकीं आपण आपल्या गोड सस्मित वाणीनें मजवांचून दुसऱ्या कोणाशीं बोलत बसाल बरें ! आपण स्वर्गांत खरोखर अप्सरांचीं मनें आपल्या स्मितपूर्वक वाणीनें आणि परम सौंदर्यानें मोहित कराल ! सौभद्रा, आपण पुण्यलोकीं जाऊन आणि अप्सरांशीं रममाण होऊन विहार करीत असतां माझ्या सेवेची आपणांस आठवण तरी होईल काय ? येथें माझा व आपला संबंध म्हणजे सहा महिन्यांचाच होता ! सातव्या महिन्यांत हे वीरा, आपण निधन पावलांत !"

कृष्णा, असें ती निराश झालेली उत्तरा बोलत आहे, इतक्यांत मत्स्यराजस्त्रियांनीं तिला मागें ओढिलें ! दुःखार्त झालेल्या उत्तरेला त्या दुःखी स्त्रिया मागें सारीत आहेत, तोंच विराटाचें प्रेत त्यांच्या दृष्टीस पडलें ! तें पाहून त्या मोठ्यानें आक्रोश व विलाप करूं लागल्या ! द्रोणाच्या अस्त्रमंत्रित शरांनीं विच्छिन्न होऊन रक्तदिग्ध होऊन पडलेल्या विराट राजास गृध्र, गोमायु आणि वायस टोंचीत बसले आहेत पहा ! त्या असितेक्षणा स्त्रियांस विराट राजाला पक्षी टोंचीत असतां अतिदुःख होत असे, तथापि त्या विराटाचें निवारण करूं शकल्या नाहींत ! त्या स्त्रियांचीं तोंडें उन्हानें तप्त झालेलीं आणि आयास व श्रम यांनीं विवर्ण होऊन गेलीं होतीं ! माधवा, हा उत्तर, हा अभिमन्यु, तो कांबोजाधिपति सुदक्षिण आणि तो सुस्वरूप लक्ष्मण हे सर्व लहान बालक रणांगणाच्या अग्रभागीं मरून पडले आहेत पहा ! ११. २. २०.

## अध्याय २१ वा.

[ १ गांधारीचा कर्णविषयक शोक. ]

(१) गांधारी—कृष्णा, हा धनुर्धर व महारथ वैकर्तन कर्ण येथें हत होऊन पडला आहे! प्रदीप्त अग्नि उदकानें विझून जातो, त्याप्रमाणें रणांगणांत हा अर्जुन पराक्रमजलानें शांत झाला आहे! अनेक अतिरथांचा वध करून अंतीं रक्तौघानें माखलेला व जमिनीवर पडलेला हा कर्ण पहा! हा शूर अत्यंत क्रोधी, दीर्घद्वेषी, महाधनुर्धर आणि महाबल असून आज अर्जुनाच्या हातून मारला जाऊन रणांत निजला आहे! ज्याप्रमाणें गज यूथपतीला पुढें करून अनेक शत्रूंशीं युद्ध करितात, त्याप्रमाणें माझ्या महारथ पुत्रांनीं पांडवांच्या भीतीनें त्यालाच पुढें करून युद्ध केलें! तो हा वीर सिंहानें मारलेल्या शार्दूलासारखा किंवा एकाद्या मत्त मातंगानें दुसऱ्या मातंगास मारावें, त्यासारखा अर्जुनाच्या हातून मारला गेला! हे पुरुषश्रेष्ठा, युद्धांत पडलेल्या ह्या वीराच्या स्त्रिया त्याच्या सभोंवतीं बसून व आपले केंस मोकळे सोडून रडत बसल्या आहेत पहा! कृष्णा, ज्याला भिऊन धर्मराज युधिष्ठिर सर्वदा उद्विग्न असे, ज्याला कर्णाच्या काळजीमुळें तेरा वर्षेपर्यंत धड निद्राहि लागली नाहीं, जो इंद्राप्रमाणें रणांगणावर शत्रूंना अजय्य, ज्याचें तेज युगांतींच्या अग्नीसमान आणि जो सर्वदा हिमालयाप्रमाणें निश्चल, असा तो कर्ण, हे माधवा, सर्व कौरवांस आश्रयभूत होता. तो आज वातभग्न वृक्षाप्रमाणें जमिनीवर हत होऊन पडला आहे!

कृष्णा, ही पहा कर्णाची पत्नी व वृषसेनाची आई मोठ्या दीनतेनें विलाप करीत व रडत जमिनीवर पडली आहे! कर्णा, तुला हा आचार्यशापच खरोखर बाधला आहे! त्यामुळें तुझें रथचक्र भूमीनें गिळून टाकिलें आणि नंतर त्या समरशोभी धनंजयानें बाणानें तुझें मस्तक समरांत उडविलें! हरहर! ही सुषेणाची माता सुवर्णकवच घातलेल्या महाबाहु व धैर्यवान् कर्णाकडे पाहून दुःखार्त होत्साती रडून मूर्च्छित झाली! देहभक्षक हिंस्र प्राण्यांनीं या महात्म्याच्या शरीराचे लचके तोडून तें इतकें कृश करून सोडलें आहे कीं, कृष्णपक्षांतील चतुर्दशीच्या दिवशींच्या चंद्राप्रमाणें ह्याजकडे पाहून आम्हांला आनंद होत नाहीं! पहा कांहीं वेळानें पुनः सावध होऊन ती उठली आहे आणि पुत्रवधानें तप्त होऊन दीनपणें कर्णाचें मुख हुंगीत शोक करीत बसली आहे! ११. २. २१.

---

## अध्याय २२ वा.

[ १ गांधारीचा अवंतिनाथ, बाल्हीक आणि जयद्रथ यांबद्दल शोक. ]

( १ ) गांधारी—भीमसेनानें रणांत वधिलेल्या त्या शूर अवंतिनाथाला अनेक भाऊबंद असतांहि अनाथाप्रमाणें त्याला गृध्र, कोल्हे भक्षण करीत आहेत ! हे मधुसूदना, आपल्या शूर शत्रूंचें कंदन करून वीरशयनावर रक्तदिग्ध होऊन पडला असतां त्याला कोल्हे, करकोचे आणि नाना प्रकारचे हिंस्र प्राणी इतस्ततः ओढीत आहेत ! हा कालाचा फेरा पहा ! संग्राम करून वीरशयनावर झोंपीं जाणाऱ्या या अवंतिनाथाच्या सभोंवतीं बसून त्याच्या स्त्रिया विलाप करीत आहेत ! महाधनुर्धर प्रतीपपुत्र बाल्हीक भल्लानें हत होऊन शार्दूलासारखा जमिनीवर पडला आहे पहा ! हा मरून पडला आहे, तथापि पौर्णिमेच्या उदयोन्मुख पूर्णचंद्राप्रमाणें ह्याच्या मुखावरील तेज झळकत आहे पहा !

कृष्णा, पुत्रशोकानें अत्यंत संतप्त व प्रतिज्ञापालन करणाऱ्या पार्थानें रणांत ह्या जयद्रथाचा वध केला ! या जयद्रथाच्या संरक्षणास एकादश अक्षौहिणी सैन्य ठेविलें होतें, परंतु त्याचाहि नाश करून त्या महात्म्या अर्जुनानें सत्यपालनार्थ याचा वध केला ! हे जनार्दना, अतिगर्विष्ठ अशा ह्या सिंधुसौवीरपति जयद्रथाला आज शिवा आणि गृध्र भक्षण करीत बसले आहेत ! हे अच्युता, प्रियभार्या यांचें रक्षण करीत असतांहि त्याला भिववून ह्या गृध्र-शिवा ह्याच्या बेंबीजवळील भाग ओढीत आहेत ! अशा त्या पराक्रमी वीराधिपति महाभुज जयद्रथाचें कांबोज व यवन देशच्या स्त्रिया सभोंवतीं बसून रक्षण करीत आहेत ! हे जनार्दना, जेव्हां हा द्रौपदीला घेऊन केकयांसह पळाला, तेव्हांच पांडवांनीं याला मारलें असतें, परंतु दुःशलेकडे पाहून त्यांनीं त्याला सोडून दिलें ! कृष्णा, मग ते पांडव आजच त्या दुःशलेला कसें बरें विसरले ? ही पहा ती माझी कन्या बाला दुःशला दुःखानें शोक करीत उरःस्थल बडवून घेत आहे ! माझी कन्या आणि सुना विधवा झालेल्या पाहून अधिक दुःख मला कोणतें व्हावयाचें राहिलें आहे ? हाय हाय ! भर्त्याचें मस्तक न सांपडल्यामुळें शोक व भय नाहींसे होऊन इतस्ततः धांवणारी ही दुःशला पहा ! ज्यानें पुत्रवत्सल पांडवांना अडविलें, तो अनेकांना मारून शेवटीं आपणहि मृत्युवश झाला ! त्या मातंगाप्रमाणें मत्त व परम दुर्जय वीराला वेढून त्या चंद्रानना स्त्रिया सारख्या रुदन करीत आहेत ! ११. २. २२.

---

## ७ अध्याय २३ वा.

[ १ गांधारीचा शल्य-भगदत्तविषयक शोक. २ गांधारीचें कृष्णाजवळ भीष्म-द्रोणांचें गुणकथन. ]

( १ ) गांधारी—बा केशवा, हा साक्षात् नकुलमातुल शल्य येथें हत होऊन पडला आहे ! ह्याला धर्मज्ञ धर्मराज युधिष्ठिरानेंच युद्धांत मारलें ! हे पुरुषश्रेष्ठा, जो नित्य तुझ्याशीं सर्वत्र स्पर्धा करीत असे, तो हा महाबल मद्रराज शल्य येथें हतप्राण होऊन पडला आहे ! बा कृष्णा, ज्यानें युद्धांत कर्णाचें सारथ्य करीत असतां पांडवांच्या जयार्थ त्याचा तेजोभंग केला, त्या शल्याला धिक्कार असो ! कृष्णा, याचें पूर्णचंद्रासारखें प्रेक्षणीय, पद्मपत्राप्रमाणें डोळयांनीं युक्त आणि व्रणहीन मुख कावळे टोंचीत बसले आहेत ! याची तोंडांतून बाहेर पडलेली ही तप्त सुवर्णासमान जीभ पक्षी भक्षण करीत आहेत ! युधिष्ठिरानें मारलेल्या या सभाभूषण मद्रराजासभोंवतीं त्याच्या स्त्रिया रडत बसल्या आहेत ! सूक्ष्म वस्त्र परिधान करणाऱ्या या क्षत्रिय स्त्रियांनीं नरश्रेष्ठ शल्यासभोंवतीं जमून आक्रोश चालविला आहे ! पंकामध्यें मग्न झालेल्या गजासभोंवतीं ज्याप्रमाणें तरुण हस्तिणींनीं जमून बसावें, त्याप्रमाणें या मृत शल्यासभोंवतीं त्याच्या स्त्रिया बसून राहिल्या आहेत ! हे वृष्णिनंदना, शरणागतांस आश्रय देणाऱ्या या शूर शल्याकडे एकवार पहा ! शरांनीं याच्या शरीराचे तुकडे तुकडे होऊन हा वीर शय्येवर पडला आहे !

हा प्रतापवान् शैलनिवासी श्रीमान् राजा भगदत्त हातांत गजांकुश घेऊन जमिनीवर पडला आहे पहा ! त्याची सुवर्णमाला त्याच्या मस्तकावर शोभत आहे आणि श्वापदें जरी त्याच्या शरीराचें भक्षण करीत आहेत, तरी ती त्याच्या केंसांस अजूनहि कशी भूषवीत आहे पहा ! पूर्वी ज्याप्रमाणें अंगावर रोमांच उभे करणारें असें वृत्रासुरांचें इंद्राशीं युद्ध झालें, त्याचप्रमाणें ह्याचें पार्थ धनंजयाशीं युद्ध झालें ! त्यांत ह्या महाबाहूनें अर्जुनाशीं घनघोर युद्ध केलें, परंतु शेवटीं अर्जुनानें घोर संकटांत आणून ह्याला पाडिलें !

( २ ) कृष्णा, शौर्य किंवा वीर्य यांमध्यें ज्याच्यासारखा दुसरा कोणी वीर पृथ्वीवर नाहीं, असा हा भीष्म समरभूमीवर भयंकर पराक्रम गाजवून शरशय्येवर पडला आहे ! हे कृष्णा, ह्या सूर्यासारख्या तेजस्वी दिसणाऱ्या निजलेल्या शांतनवाकडे पहा. जणुंकाय युगांतीं कालयोगानें आकाशांतून हा सूर्यच खालीं

पडला आहे ! ह्या वीर्यवंतानें शत्रूंना समरांत शस्त्रतेजानें तप्त करून सोडलें आणि केशवा, हा नरसूर्य सायंकाळीं अस्तास जाणाऱ्या सूर्याप्रमाणें अस्ताचलावर जात आहे ! हा स्थिरबुद्धीचा ऊर्ध्वरेता भीष्म शूरसेवित वीरशय्येवर पडलेला आहे पहा ! भगवान् स्कंद जसा शरवणांत निजला होता, त्याप्रमाणें कर्णी, नालीक आणि नाराच बाणांची उत्तम कार्पासविरहित शय्या पसरून तीवर हा भीष्म निजला आहे आणि गांडीवधारी अर्जुनानें त्याला ह्या तीन बाणांची उत्तम उशीहि करून दिली आहे. पित्याची आज्ञा पाळणारा, ऊर्ध्वरेता, महाकीर्तिमान् आणि युद्धांत अप्रतिम गणलेला हा शांतनव येथें शयन करीत आहे ! बाबा केशवा, हा धर्मात्मा आणि सर्वज्ञ असूनहि इहपरलोकविषयक ज्ञानानें मर्त्य असूनहि अमराप्रमाणें प्राण धारण करीत आहे ! आज हा भीष्म शरांनीं हत होऊन पडला आहे, त्याअर्थीं ह्या भूतलावर युद्धांत खरा कृती, विद्वान् आणि पराक्रमी असा वीर कोणीच नाहीं ! माधवा, पांडवांनीं विचारल्यावरून ह्या धर्मज्ञ व सत्यवादी शूरानें आपणाला मृत्यु कधीं येणार हें त्यांस सांगितलें ! नष्ट झालेला कुरुवंश ज्यानें पुनः उद्धृत केला, तो महाबुद्धिमान् भीष्म आज कौरवांबरोबरच पराभव पावला ! माधवा, हा देवासारखा देवव्रत भीष्म परलोकीं गेला असतां आतां कौरवांनीं धर्मविषयक प्रश्न कोणाला विचारावे !

कृष्णा, अर्जुनाचा किंवा सात्यकीचा आचार्य, तसाच सर्व कौरवांचा उत्तम गुरु असा जो द्रोण तो येथें मरून पडला आहे पहा ! माधवा, जशीं चतुर्विध अस्त्रें त्रिदशेश्वर इंद्राला आणि महावीर्यवान् भार्गवाला अवगत आहेत, तशींच तीं द्रोणालाहि ज्ञात होतीं ! ज्याच्या प्रसादानें एवढें दुष्कर कर्म करण्यास पंडुपुत्र अर्जुन समर्थ झाला, तो द्रोण आज मरून पडला आहे; तीं अस्त्रें त्याचें पालन करूं शकलीं नाहींत ! ज्याला पुढें करून कौरव पांडवांस युद्धार्थ आह्वान करीत असत, तो हा शस्त्रधर श्रेष्ठ द्रोण शस्त्रांनीं क्षत होऊन पडला आहे ! जो वीर शत्रुसेना दग्ध करीत असतां अग्नीप्रमाणें वर्तुलाकार गमन करीत असे, तो द्रोणाचार्य आज हत होऊन ज्वाला शांत झालेल्या अग्नीप्रमाणें जमिनीवर पडला आहे ! हे माधवा, द्रोणाचार्यांची ती धनुर्मुष्टि व तें हस्तावरण हीं द्रोण रणांत निधन पावला असतांहि जीवंत मनुष्याच्या हातांत असल्यासारखीं भासत आहेत ! हे केशवा, ज्याप्रमाणें पूर्वीं ब्रह्मदेवापासून चार वेद सर्वांस प्राप्त झाले, त्याचप्रमाणें सांप्रतकाळीं हीं सर्व अस्त्रें त्या शूर द्रोणाचार्यांपासून मिळालीं आहेत ! त्याचे बंदिजनांनीं

वंदित व सर्वदा शतावधि शिष्यांना नमनार्ह असे हे पूज्य चरण आज कोल्हे ओढीत आहेत ! हे मधुसूदना, ती कृपी दुःखग्रस्त होऊन धृष्टद्युम्नानें मारलेल्या द्रोणाजवळ दीनपणें बसली आहे ! अतिदुःखार्त होऊन, केंस मोकळे सोडून, मान खालीं घालून आपल्या शस्त्रधराग्रणी हत पतीची ती सेवा करीत आहे पहा ! केशवा, धृष्टद्युम्नानें ज्याचें कवच बाणांनीं फोडून टाकिलें आहे, अशा त्या द्रोणाचार्यांची भार्या ही जटिल व व्रताचरणी कृपी रणांगणांत त्याची शुश्रूषा करीत आहे ! ती पहा यशस्विनी सुकुमारी अतिआतुरतेनें आपल्या पतीच्या प्रेतकार्याची खटपट करीत आहे ! माधवा, हे जटिल व ब्रह्मचारी धनुष्यें, शक्ति आणि रथनीड यांची चिता रचून ठेवीत आहेत ! हे सामवेदी यथावत् अग्न्याधान करून व चिता पेटवून तीवर द्रोणास निजवीत आहेत व आतां ते तीन साम म्हणत आहेत ! बाण व इतर पदार्थ यांनीं त्या अमित तेजस्वी द्रोणाचार्यांचें ते दहन करीत आहेत ! तेथें कोणी त्या द्रोणाची स्तुति करीत आहेत, कोणी रडत आहेत, तर कोणी त्या कालाला अनुसरून तीन साम म्हणून त्याची प्रशंसा करीत आहेत. अशा रीतीनें द्रोणाचें दहन करून त्या सर्व ब्राह्मणशिष्यांनीं चितेला अपसव्य घातलें आणि कृपीस पुढें करून ते आतां गंगेच्या अभिमुख निघाले आहेत ! ११. २. २३.

---

## ० अध्याय २४ वा.

[ १ गांधारीचा भूरिश्रव्याविषयीं शोक. २ शकुनीविषयीं गांधारीचे निंदोद्गार. ]

( १ ) **गांधारी**—कृष्णा, हा जवळच युयुधानानें पाडलेला सोमदत्तपुत्र पहा ! नानाप्रकारचे पक्षी ह्याला टोंचून त्रास देत आहेत ! हे जनार्दना, पुत्रशोकानें संतप्त हा सोमदत्त त्या धनुर्धर युयुधानाची निंदाच करीत आहे, असें दिसतें ! ही भूरिश्रव्याची शोकसंतप्त माता आपल्या पतीचें–सोमदत्ताचें–आश्वासन करीत आहे ! ती म्हणते, “हे महाराज, हा भरतकुलाचा दारुण संहार, तसाच हा कौरवांचा चाललेला निःपात आणि हा एकंदर झालेला प्रलय पाहण्यास आपण जीवंत नाहीं, हें सुदैवच म्हटलें पाहिजे ! सहस्रावधि दानें देऊन व अनेक यज्ञ करून मरणारा हा आपला यूपकेतु पुत्र पाहण्यास आपण जीवंत नाहीं, हे आपलें भाग्य होय ! महाराज, समुद्रांत बुडत असतां आक्रोश करणाऱ्या हंसींप्रमाणें या रणांत घोर विलाप करणाऱ्या

सुनांचे आक्रोश आपल्या कानांवर येत नाहींत, हें आपलें मोठें सुदैवच आहे! पुत्र आणि पति मृत झाले असतां एकवस्त्रानें आपलें अर्ध अंग झांकून व आपले काळे केंस मोकळे सोडून त्या आपल्या सुना धांवत सुटल्या आहेत.

"अर्जुनानें ज्याचा उजवा बाहु छेदून टाकिला आहे, त्या आपल्या पुत्राचें शरीर श्वापदें भक्षण करीत असतां आपणाला दिसत नाहीं, ही आपली पूर्वपुण्याईच समजली पाहिजे! युद्धांत हत झालेला शल, भूरिश्रवा आणि तशाच ह्या सर्व दुःखी सुना आज पाहण्यास आपण जीवंत नाहीं, हीहि मोठ्या भाग्याची गोष्ट होय! त्या महात्म्या यूपकेतूचें सुवर्णछत्र रथोपस्थावर मोडून टाकलेलें पाहण्यास आपण आज जीवंत नाहींत, हें आपलें सुदैवच होय! अहो, ह्या भूरिश्रव्याच्या असितेक्षणा स्त्रिया सात्यकीनें मारलेल्या आपल्या पतिसभोंवतीं बसून शोक करीत आहेत, पहा! केशवा, पतिशोकानें ग्रस्त झालेल्या ह्या स्त्रिया दीनतेनें अतिविलाप करीत भूमीवर देहभान विसरून पडत आहेत! अर्जुन हा आपणाला विमलकर्मकर्ता समजत असून त्यानें हें असलें बीभत्स कर्म कसें बरें केलें? हा शूर यज्वा दुसऱ्याशीं युद्धांत गुंतला असतां त्यानें याचा बाहु तोडून टाकिला! सात्यकीनें तर याहूनहि अधिक पापी कर्म केलें आहे! तें हें कीं तो शुद्धाचारवान् प्रायोपवेशन करून बसला असतां त्यानें त्यावर प्रहार करून त्याला मारलें! हे धार्मिका, तुला दोघांनीं मिळून वधिलें, त्याअर्थी त्यांनीं तुला अधर्मानेंच मारलें आहे! आतां सभांमधून गोष्टी निघाल्या असतां तो सात्यकि आपल्या या कृत्याचें समर्थन तरी कसें करील?"

माधवा, या यूपध्वज भूरिश्रव्याच्या स्त्रियाहि हें सात्यकीचें कर्म म्हणजे अत्यंत अपुण्यप्रद, अयशस्कर आहे, असें मोठा आक्रोश करून सांगत आहेत. ही पहा अतिकोमलांगी सौमदत्तीची स्त्री! ही आपल्या पतीचा हात आपल्या मांडीवर घेऊन अत्यंत दीनतेनें शोक करीत आहे कीं, "शूर शत्रूंचा वध करणारा, मित्रांस अभय देणारा, सहस्रावधि गाईंचें दान करणारा आणि क्षत्रियांचा अंत करणारा हाच तो हात! कमरपट्टा वर ओढणारा, पीनस्तनांचें मर्दन करणारा, नाभि, ऊरु आणि जघन यांस स्पर्श करणारा आणि वसनग्रंथि सोडणारा हाच तो हात! दुसऱ्याशीं युद्ध करीत असतां आपणाला असावध पाहून प्रत्यक्ष कृष्णाच्या समक्ष हा हात अर्जुनानें छेदिला! हे जनार्दना, सभांमध्यें किंवा विद्वज्जनांमध्यें गोष्टी निघाल्या असतां ह्या गोष्टीचें समर्थन तूं किंवा स्वतः अर्जुन तरी कसें करणार?"

( २ ) याप्रमाणें निंदा करून ती वरांगना स्तब्ध बसली. तिच्या सवतीहि स्वतःच्या सुनेविषयीं जितका शोक करावा, तितका तिजविषयीं करूं लागल्या ! इकडे बलवान् व सत्यपराक्रमी गांधारराज शकुनि आपल्या भाच्याकडून—सह-देवाकडून—मारला जाऊन येथें पडला आहे पहा ! ज्याला पूर्वीं सुवर्णदंडाच्या दोन व्यजनांनीं वारा घातला जात असे, तो आज येथें निजला असून त्यावर पक्षी आपल्या पंखांनीं वारा घालीत आहेत ! जो पूर्वीं शेंकडों हजारों मायावी स्वरूपें दाखवून पांडवांस फसवीत असे, त्या मायावी शकुनीच्या सर्व माया आज पंडुपुत्रांच्या तेजानें दग्ध झाल्या आहेत ! ज्या नीचानें मायेच्या योगानें धर्मराजाला जिंकून त्याचें विपुल राज्य घेतलें, तोच आज आपल्या जीविताला गमावून बसला आहे ! हे कृष्णा, ह्या शकुनीसभोंवतीं पक्षी कसे घिरट्या घालीत आहेत पहा ! ह्यानेंच माझ्या पुत्रांच्या नाशाकरितां ह्यांना कपटाचें शिक्षण दिलें आणि ह्यानेंच पांडवांशीं माझ्या पुत्रांचें हाडवैर पाडून माझ्या पुत्रांचा आणि आप्तेष्टांसह आपल्या स्वतःचा नाश करून घेतला ! हे प्रभो, ज्याप्रमाणें माझे पुत्र धारातीर्थीं निधन पावून उत्तम लोकाला गेले आहेत, त्याचप्रमाणें ह्या दुर्बुद्धीलाहि ते लोक प्राप्त झाले आहेत. हे मधुसूदना, तेथें तरी माझ्या सरळबुद्धीच्या पुत्रांस हा दुष्ट आपल्या बंधूंशीं वैर करायाला लावणार नाहीं कशावरून ? ११. २. २४.

---

## अध्याय २५ वा.

[ १ गांधारीचा कांबोजादिकांबद्दल विलाप. २ तिचा श्रीकृष्णास शाप. ]

( १ ) गांधारी—माधवा, जो मूल्यवान् आस्तरणावर निजावयास योग्य, तो हा दुर्धर्ष वृषस्कंध कांबोज हत होऊन येथें धुळींत पडला आहे पहा ! ह्याचे चंदनविभूषित बाहू रक्तानें माखलेले पाहून ह्याची अतिदुःखित स्त्री दीन होऊन शोक करीत आहे तो ऐक ! " ज्यांचे तळहात व अंगुली अत्यंत मृदु आहेत, असे हेच ते ह्याचे परिघतुल्य बाहु ! ह्यांच्या मिठींत मी एकदां सांपडलें असतां माझी कधींच तृप्ति होत नसे ! हे जनेश्वरा, आपल्यावांचून माझी आतां काय स्थिति होईल ? " ही मधुभाषिणी हतबंधु व अनाथ होऊन थरथरां कांपत आहे ! विविध पुष्पमाला उन्हांत कोमजल्या, तरी त्यांचें स्वाभाविक तेज जसें लोपून जात नाहीं, तसेंच ह्या क्लांत स्त्रियांचें

शरीरतेज उतरलें नाहीं! हे मधुसूदना, तुझ्या सन्मुख पडलेल्या ह्या कलिंगाकडे जरा नजर टाक? ह्याचे दोन्ही हातांना बांधलेलीं हीं दीप्त अंगदें कशीं शोभत आहेत पहा!

हे जनार्दना, इकडे हा मागधांचा अधिपति जयत्सेन पडला आहे पहा! त्याच्या स्त्रिया व्याकुळ होऊन रुदन करीत आहेत! ह्या विशालाक्षींचा आवाज अति सुस्वर आहे. त्यांचा तो मनाचें व कर्णाचें रंजन करणारा मधुर आवाज माझ्या मनाला मोह पाडीत आहे! ज्यांचीं वस्त्रें व अलंकार सर्वत्र पडलीं आहेत, ज्या शोकग्रस्त होऊन रडत बसल्या आहेत, त्या ह्या मागधस्त्रिया आपलीं पसरलेलीं शयनें टाकून आज येथें जमिनीवर पडल्या आहेत! तो पहा कोसल देशाचा अधिपति राजपुत्र बृहद्बल; त्याच्या स्त्रिया त्याच्यासभोंवतीं जमून पृथक् पृथक् शोक करीत आहेत! जे सौभद्राचे बाण त्याच्या शरीरांत रुतून राहिले आहेत, ते मोठ्या कष्टानें त्या बाहेर काढीत आहेत व असें करतांना त्या वारंवार मूर्च्छा येऊन पडत आहेत! माधवा, ऊन व परिश्रम यांनीं कोमेजलेलीं त्यांची सुंदर मुखें म्लान झालेल्या कमलांप्रमाणें दिसत आहेत! हे येथें द्रोणानें मारलेले शूर धृष्टद्युम्नपुत्र रुचिर अंगदें धारण करून पडले आहेत! ह्या सर्व शिशूंच्या अंगांवर सुवर्णमाला शोभत आहेत! रथ हें ज्याचें अग्न्यगार, धनुष्य ज्याची ज्वाला आणि बाण, शक्ति आणि गदा हीं ज्याचें इंधन अशा द्रोणरूप अग्नींत सांपडून हे टोळांसारखे दग्ध होऊन गेले! तसेंच हे रुचिर अंगदें घातलेले केकय देशचे राजपुत्र, पांचहि बंधु, द्रोणाकडून मारले गेले आहेत! त्यांचीं सुवर्णकवचें उन्हानें तप्त झालीं आहेत! माधवा, त्यायोगानें जणुंकाय प्रदीप्त अग्निच आपल्या तेजानें पृथ्वी प्रज्वलित करीत आहे!

माधवा, महासिंहानें अरण्यांत मारलेल्या प्रचंड गजाप्रमाणें द्रोणानें युद्धांत मारलेला हा द्रुपद राजा पहा! हे पुंडरीकाक्षा, ह्या पांचाल राजाचें पांढरें स्वच्छ छत्र शरदृऋतूंतील चंद्राप्रमाणें शोभत आहे! वृद्ध द्रुपदाला दग्ध करून ह्या त्याच्या दुःखित स्त्रिया व सुना त्यास अपसव्य घालून निघाल्या आहेत! द्रोणानें समरांगणांत मारलेल्या शूर महात्म्या चेदिपति धृष्टकेतूला त्याच्या दुःखित स्त्रिया उचलून नेत आहेत! हे मधुसूदना, युद्धामध्यें ज्यानें द्रोणास्त्र भग्न केलें, तोच हा आज नदीप्रवाहानें उन्मळून पडलेल्या वृक्षाप्रमाणें मरून पडला आहे! हा चेदिपति धृष्टकेतु मोठा शूर महारथ होता! त्यानें सहस्त्रावधि

शत्रूंस युद्धांत मारून शेवटीं आपणहि समरांत पडला! हृषीकेशा, हा सैन्य-बांधवांसह हत झाला असतां ह्याला पक्षी टोंचीत आहेत आणि त्याच्या स्त्रिया जमून सभोंवतीं बसल्या आहेत! हा दशार्हराजाचा नातू. ह्या सत्यविक्रमी वीराला अंकावर घेऊन चेदिराजाच्या थोर स्त्रिया रुदन करीत आहेत पहा! हृषीकेशा, ह्या धृष्टकेतूच्या पुत्राचें रुचिर कुंडलांनीं शोभणारें सुंदर मुख, त्याचे द्रोणानें बाण मारून तुकडे करून टाकिले आहेत! मधुसूदना, पिता समरांत शत्रूंशीं युद्ध करतांना ह्यानें त्यास सोडलें नाहीं, इतकेंच नव्हे, तर अजूनहि त्यानें पित्यास टाकिलें नाहीं! हे महाबाहो, माझा शत्रुवीरविध्वंसक नातू लक्ष्मण हा असाच आपल्या दुर्योधन पित्याच्या पाठीमागून असे!

माधवा, हिंवाळ्याचे अंतीं वाऱ्यानें मोडून पडलेल्या पुष्पित शालवृक्षा-प्रमाणें हे अवंतीचे विंदानुविंद येथें मरून पडले आहेत पहा! यांचीं अंगदें व कवचें सुवर्णाचीं आहेत! यांचे हातांत खड्ग व धनुर्बाण आहेत! यांचे डोळे वृषभांच्या सारखे असून यांच्या गळ्यांत विमल माळा आहेत! हे येथें निजले आहेत! कृष्णा, तुझ्यासह जे पांचहि पांडव, भीष्म, द्रोण, वैकर्तन कर्ण कृप, दुर्योधन, अश्वत्थामा, सिंधुपति जयद्रथ, सोमदत्त, विकर्ण व शूर कृतवर्मा यांच्या हातून जीवंत सुटले, ते आतां कोणालाहि अवध्यच आहेत! ज्या नरश्रेष्ठांनीं आपल्या शस्त्रवेगानें देवांनाहि मारावें, ते हे वीर आज रणांत निधन पावून पडले आहेत! कालाचा फेरा कसा आहे तो पहा! माधवा, दैवाला कोणत्याहि गोष्टीचा अतिभार आहे असें नाहीं; म्हणूनच हे माझे एवढे क्षत्रियश्रेष्ठ शूर दैवाच्या योगानें दुसऱ्या क्षत्रियांकडून मारले गेले! कृष्णा, तुझी इच्छा परिपूर्ण न होतां जेव्हां तूं उपप्लव्यास पुनः निघालास, तेव्हांच माझे चपळ पुत्र निधन पावले! त्याच वेळीं शांतनव भीष्मानें आणि प्राज्ञ विदुरानें 'आपल्या पुत्रांच्या ठिकाणीं स्नेहभाव ठेवूं नकोस,' म्हणून मला सांगितलें होतें! त्यांचें तें भविष्य कधीं खोटें होणारें नाहीं! हे जनार्दना, माझे पुत्र त्यानंतर थोड्याच दिवसांनीं भस्मसात् झाले!

वैशंपायन—असें सांगून गांधारी शोकसंतप्त झाली आणि तत्काल जमि-नीवर पडली! दुःखानें तिचें आत्मज्ञान व धैर्य नष्ट झालें! नंतर पुत्रशोकानें व्याप्त होऊन ती क्रोधाविष्ट झाली, तिचीं इंद्रियें व्यथित झालीं आणि ती कृष्णाला दूषणें देऊन बोलूं लागली!

(२) **गांधारी**—कृष्णा, पांडव व कौरव हे परस्पर दग्ध झाले! त्यांचा नाश होत असतां तूं उपेक्षा करून स्वस्थ बसलास, याचें काय बरें कारण? तुझ्या अंगीं सामर्थ्य असून पदरीं पुष्कळ सेवक होते व सैन्यहि पुष्कळ होतें. तसाच दोन्हीं-कडे तूं समर्थ असून तुझ्या शब्दाला मानहि होता! हे मधुसूदना, तूं समजून-उमजून कौरवांचा नाश होत असतां त्यांची उपेक्षा केलीस, म्हणून हे महाबाहो, त्याचें फल तुला मिळेल! पतिसेवेनें जें किंचित् तपःसामर्थ्य मीं संपादन केलें असेल, त्या दुर्मिळ सामर्थ्यानें मी चक्रगदाधर तुला शाप देतें! ज्याअर्थी जाति-बांधव कौरव-पांडव परस्परांच्या हातून युद्धांत निधन पावत असतां हे गोविंदा, तूं त्यांची उपेक्षा केलीस, त्याअर्थी तूंहि आपल्या ज्ञातिबांधवांचा नाश करिशील! हे मधुसूदना, आजपासून छत्तिसाव्या वर्षी तुझे ज्ञातिजन, अमात्य आणि पुत्र निधन पावून तूं अनाथासारखा अविज्ञात होशील! तुजकडे कोणीहि लक्ष देणार नाहीं! तूं वनचर होऊन संचार करीत असतां निंद्यमार्गानें मृत्यु पावशील! अशा रीतीनें तुझे पुत्र आणि ज्ञातिबांधव यांचा नाश झाला असतां तुझ्या स्त्रियाहि या भरतस्त्रियांप्रमाणेंच पृथ्वीवर पडून रडत राहतील!"

वैशंपायन—तिचें तें घोर भाषण ऐकून तो थोर मनाचा वासुदेव किंचित् हंसल्यासारखें दाखवून देवी गांधारीला म्हणाला, "हे क्षत्रिये, हें असें होणार असल्याचें मला ठाऊकच होतें! तूं मात्र त्याची निष्फल पुनरुक्ति केलीस! दैवयोगानें हे वृष्णिहि असेच नाश पावतील यांत संशय नाहीं. हे शुभे, ह्या वृष्णिसेनेला मारणारा माझ्यावांचून दुसरा कोणी नाहीं! कारण ते दुसऱ्या नरांनाच नव्हे, तर देव-दानवांनाहि अवध्य आहेत आणि या कारणामुळेंच त्यांचा परस्परांच्या हातूनच नाश होणार आहे!"

राजा, असें त्या कृष्णाचें भाषण ऐकून पांडव मनांत अत्यंत दचकले! ते अति उद्विग्न झाले आणि त्यांना जीविताचीहि आशा उरली नाहीं! ११.२.२५.

[ येथें दुसरें स्त्रीविलासपर्व समाप्त झालें. ]

---

## श्राद्धपर्व ३.



### अध्याय २६ वा.

[ १ जमिनीवर पडलेल्या गांधारीचें कृष्णाकडून आश्वासन. २ युधिष्ठिराज्ञेनें विदुर-संजयादिकांकडून मृतांचें दहनक्रियाकरण. ]

(१) **श्रीभगवान्**—हे गांधारि, ऊठ ऊठ, शोक करूं नकोस; तुझ्याच अपराधामुळें हे कौरव निधन पावले आहेत. तूं दुरात्मा, ईर्ष्या करणारा, अत्यंत मानी, अशा दुर्योधन पुत्राला पुढें करून त्याच्या दुष्कृत्यांस वाखाणीत आहेस ! ह्या दुर्योधन निष्ठुर, वैराचा केवळ पुतळाच, वृद्धांच्या आज्ञा न जुमानणारा असून तूं त्याला आश्रय दिलास आणि आतां आपला स्वतःचा दोष मजवर घालूं पाहतेस हें कसें बरें ? त्याचप्रमाणें मृत किंवा नष्ट यांबद्दल जो मागाहून शोक करितो, त्याला दुप्पट दुःख होतें. नष्ट गोष्ट पुन्हां प्राप्त होत नाहींच, परंतु दुःखानें दुःख मात्र वाढतें ! या जगांत ब्राह्मणस्त्री जो गर्भधारण करते, तो सर्वदा तप करण्यास योग्य असा होतो. त्याचप्रमाणें धेनूला नांगरधारी, घोडीला धांवणारा, शूद्र स्त्रीला दास, वैश्य स्त्रीला पशुरक्षक आणि क्षत्रिय राजकन्येला वध करणारा गर्भ राहत असतो !

**वैशंपायन**—वासुदेवानें पुनः केलेलें तें अप्रिय भाषण ऐकून गांधारीचे डोळे शोकानें व्याकुळ झाले आणि ती स्वस्थ बसली ! इकडे राजर्षि धृतराष्ट्रानें अज्ञानापासून उत्पन्न होणारा मोह आवरून धर्मराज युधिष्ठिराला विचारिलें, 'हे पांडवा, या सैन्यापैकीं कोणकोण जीवंत आहेत, त्याचें परिमाण तुला ठाऊक आहे. आतां या संग्रामांत किती मेले त्यांची संख्या समजत असल्यास मला सांग.'

**युधिष्ठिर**—ह्या युद्धांत एकंदर एक अब्ज सहासष्ट कोटि, वीस हजार लोक पडले आहेत !

**धृतराष्ट्र**—हे पुरुषसत्तमा युधिष्ठिरा, त्या मृत वीरांना कोणकोणती गति प्राप्त झाली हें मला सांग ! हे महाबाहो, तुला सर्व कांहीं ठाऊक आहे; असें मला वाटतें.

**युधिष्ठिर**—ह्या मोठ्या संग्रामांत ज्यांनीं आपलीं शरीरें मोठ्या आनंदानें हुत केलीं, त्या सत्यपराक्रमी लोकांना इंद्रलोकच्या बरोबरीचे लोक मिळाले आहेत

आणि हे भारता, जे दुःखानें मरणें भाग आहे असें समजून युद्धांत मरण पावले, ते गंधर्वलोकीं गेले; जे संग्रामभूमींत शत्रू युद्धार्थ आह्वान करीत असतांहि युद्धपराङ्मुख होऊन तेथून पळून गेले आणि पळत असतां शत्रूंच्या शस्त्रप्रहारांनीं निधन पावले, ते गुह्यकांमध्यें गेले; शत्रूंकडून पराजित, शक्तिहीन, निरायुध, तीक्ष्ण शरांनीं शत्रूंकडून मारले जात असूनहि जे क्षात्रधर्मपरायण लज्जित होऊन रणांगणांत शत्रुसन्मुख पतन पावले, ते महात्मे ब्रह्मलोकीं गेले याबद्दल शंका घेण्याचें कारण नाहीं. हे राजा, तसेंच जे युद्धांगणाच्या मर्यादेंत मृत्यु पावले, ते उत्तरकुरूंमध्यें प्रविष्ट झाले !

धृतराष्ट्र—पुत्रा, सिद्धाप्रमाणें कोणत्या ज्ञानबलानें हें सर्व तुला समजतें ? हे महाबाहो, जर हें मला सांगण्यास कांहीं हरकत नसेल, तर मला सांग !

युधिष्ठिर—धृतराष्ट्रा, तुझ्या निदेशानुसार पूर्वीं आम्हीं वनांत संचार करीत असतां तीर्थयात्राप्रसंगानें मला हा सिद्धाचा अनुग्रह झाला. तेथें मला लोमष ऋषीचें दर्शन घडून ही अनुस्मृति आणि ज्ञानयोगानें दिव्य दृष्टि प्राप्त झाली !

धृतराष्ट्र—भारता, आतां जे सनाथ व अनाथ लोक या युद्धांत निधन पावले आहेत, त्या सर्वांच्या शरीरांचें विधिपूर्वक दहन करणारना ? ज्यांचा कोणी संस्कर्ता नाहीं किंवा जे आहिताग्निहि नाहींत, अशाच लोकांची संख्या फार मोठी असल्यामुळें आमच्या हातून त्या सर्वांच्या क्रिया कशा होणार ? हे युधिष्ठिरा, ज्यांना गरुड, गृध्र हे इतस्ततः ओढून नेत आहेत, त्यांना आपल्या कर्मांनुसार लोक मिळतील ! त्यांचा शोध कसा लागणार !

( २ ) वैशंपायन—हे महाराजा जनमेजया, असें धृतराष्ट्रानें कुंतीपुत्र युधिष्ठिराला सांगितल्यावर त्यानें दुर्योधनाचा पुरोहित सुधर्मा, धौम्य, सूत, संजय, महाबुद्धि विदुर, कुरुकुलांतील युयुत्सु, तसेंच इंद्रसेनादि सर्व सेवक आणि सारथी यांस आज्ञा करून सांगितलें कीं, ‘ या सर्वांचीं प्रेतकार्यें तुम्हीं यथाविधि करावीं. अनाथाप्रमाणें कोणी राहून त्याच्या शरीराचा नाश होऊं नये ! ’ राजा, नंतर युधिष्ठिराच्या आज्ञेनुसार विदुर, संजय, सुधर्मा, धौम्य आणि इंद्रसेनप्रमुख सेवक यांनीं चंदनागुरूचीं आणि कालीयक चंदनाचीं काष्ठें, घृत, तैल, सुवासिक गंध, रेशमी वस्त्रें, आणि लांकडाचे मोठमोठे संचय तयार करविले, त्याचप्रमाणें मोडकेतोडके रथ, नाना प्रकारचीं आयुधें

गोळा केलीं आणि मोठ्या प्रयत्नानें चिता रचिल्या. नंतर प्रथमतः मोठमोठे राजे, त्यांच्या मागून इतर लोक, अशा क्रमानें अव्यग्र मनानें त्या सर्वांचें शास्त्रोक्त विधीनें दहन केलें! दुर्योधन राजा, त्याचे शतावधि बंधु, शल्य, शल, भूरिश्रवा, जयद्रथ, अभिमन्यु, दौःशासनि, लक्ष्मण, राजा धृष्टकेतु, सोमदत्त, शताधिक सृंजय, राजा क्षेमधन्वा, विराट, द्रुपद, शिखंडी, पार्षत, धृष्टद्युम्न, पराक्रमी युधामन्यु व उत्तमौजा, कौसलदेशाधिपति, द्रौपदीपुत्र, सौबल, शकुनि, अचल, वृषक, राजा भगदत्त, अमर्षण, वैकर्तन, कर्ण व त्याचे पुत्र महाधनुर्धर केकय राजे, महारथ त्रिगर्त, घटोत्कच, बकासुराचा बंधु राक्षसेंद्र अलंबुष, राजा जलसंध, हे व दुसरे सहस्रावधि राजे घृतधारांनीं दीप्त अग्नींत दग्ध केले! नंतर कित्येक महात्म्यांचे पितृयज्ञ सुरू झाले! कित्येकांनीं सामपठण आरंभिलें, दुसऱ्या कित्येकांनीं शोक आरंभिला. सामाच्या ऋचांचा तो नाद आणि स्त्रियांचा तो रोदनस्वर यांच्या योगानें त्या रात्रीच्या वेळीं सर्व प्राण्यांस भीति उत्पन्न झाली. ते विधूम प्रदीप्त अग्नि आकाशांतील अल्प अभ्रांनीं आच्छादित ग्रहांप्रमाणें दिसूं लागले.

जनमेजया, नाना देशांहून तेथें आलेल्या ज्या वीरांचे कोणी आप्त तेथें नव्हते, जे केवळ अनाथ होते, त्यांचीं प्रेतें विदुरानें राजाज्ञेनें आणवून त्यांच्या सहस्रावधि राशि केल्या आणि त्यांच्या सभोंवतीं पुष्कळ लांकडें रचून व वर पुष्कळ तेल ओतून त्यांचें दहन करविलें! अशा रीतीनें त्यांच्या क्रिया करवून कुरुराज युधिष्ठिर धृतराष्ट्राला पुढें करून गंगेवर गेला. ११. ३. २६.

---

## अध्याय २७ वा.

[ १ गंगातीरावर मृतांना उदकदान. २ कुंती कर्ण हा आपला पुत्र असल्यामुळें त्याला युधिष्ठिराकडून जलांजलि देवविते. ३ धृतराष्ट्र-युधिष्ठिरांकडून बांधवांना जलदान. ]

**वैशंपायन**—जी सर्वदा प्रसन्न, जिचें उदक अत्यंत पवित्र, जिचा वेग मोठा, जिच्यामध्यें पुष्कळ डोह असून, जिचें पात्र अफाट आहे, अशा त्या गंगेवर पोहोंचल्यावर कुरुस्त्रियांनीं आपलीं भूषणें, उत्तरीय वस्त्रें व बुरखे काढले आणि नंतर आपले पिते, भ्राते, पौत्र, स्वजन, पुत्र, श्वशुर, आणि पति यांना अत्यंत दुःखानें रडत रडत सर्वांनीं जलदान केलें. धर्मज्ञांनीं आपल्या इष्टमित्रांसहि उदकांजलि दिल्या. त्या वीरपत्नींनीं अशा रीतीनें उदकक्रिया केल्या असतां

त्या गंगेचें पाणी गढूळ झालें; मग कांहीं वेळानें तें पूर्ववत् वाहूं लागलें. तें वीरपत्नींनीं भरलेलें महोदधीसारखें अफाट गंगातीर आनंदरहित व उत्साहशून्य दिसूं लागलें !

(२) राजा जनमेजया, इतक्यांत कुंती शोकसंतप्त झाली आणि ती आपल्या मंद वाणीनें बोलली " अहो, तो रथयूथपश्रेष्ठ, महाधनुर्धर, सकलवीरलक्षणयुक्त, ज्याला अर्जुनानें रणांत जिंकिलें आणि ज्याला सारथिपुत्र राधेय म्हणून तुम्ही समजत होतां, जो सैन्यामध्यें सूर्यासारखा चकाकत असे, ज्यानें पूर्वी अनुयायांसह तुम्हां सर्वांबरोबर युद्ध केलें, दुर्योधनाच्या सर्व सैन्यांत जो प्रामुख्यानें शोभत असे, वीर्यामध्यें ज्याच्या तोडीचा वीर सर्व पृथ्वीतलावर एकहि नव्हता आणि ज्या शूरानें प्राणांचीहि पर्वा न करितां पृथ्वीवर सर्वदा कीर्ति मिळविली, त्या सत्यप्रतिज्ञ व कधींहि युद्धपराङ्मुख न होणाऱ्या तुमच्या ज्येष्ठ बंधूस—कर्णास—आधीं उदकांजलि द्या ! तो जन्मतःच कवचकुंडलयुक्त असून सूर्यापासून माझ्या ठिकाणीं झाला आहे ! "

जनमेजया, मातेचें तें अप्रिय भाषण श्रवण करून सर्व पांडव कर्णाविषयीं शोक करूं लागले. ते अत्यंत दुःखी झाले. नंतर तो कुंतीपुत्र युधिष्ठिर सर्पाप्रमाणें निश्वास टाकीत मातेस म्हणाला, " हा महारथ कर्ण म्हणजे एक महाऱ्हदच होता. शर ह्या त्यांतील लाटा असून ध्वज हा त्याचा भोंवरा होता. त्याचे प्रचंड बाहु, हे त्यांतील मकर असून त्यांत करतलशब्दाचा खळबळाट होत होता ! ज्याच्या बाणाच्या टप्प्यांत धनंजयावांचून दुसरा कोणीहि उभा राहूं शकला नाहीं, ज्याच्या बाहुप्रतापानें आम्ही सर्व तप्त होत होतों, तो तुझा देवगर्भ पुत्र पूर्वींच कसा जन्मास आला ? वस्त्रानें अग्नि झांकून टाकावा, त्याप्रमाणें त्या कर्णाला तूं आजपर्यंत कसें छपवून ठेविलेंस ? ज्याप्रमाणें आम्ही नित्य गांडीवधारी अर्जुनाच्या बळाचा आश्रय केला, तसाच कौरवांनीं त्या कर्णाच्या बाहुबलाचा अवलंब केला ! सर्व राजांमध्यें रथिश्रेष्ठ दुर्योधनानें कुंतीपुत्र कर्णावांचून दुसऱ्या कोणाच्याच बलाचा आश्रय केला नाहीं ! तो सर्वशस्त्रधराग्रणी कर्ण आमचा वडील बंधु म्हणतेस, तर त्या अद्भुतविक्रमी वीर पुरुषाला तूं लग्नापूर्वीं कसा जन्म दिलास ! ही गोष्ट तूं गुप्त ठेवल्यानें आमचा घात झाला आहे ! कर्णाच्या वधानें आम्ही सर्व पांडव अत्यंत दुःखपीडित झालों आहों ! अभिमन्यूच्या वधानें, द्रौपदीपुत्र मारले गेल्यानें, पांचालांच्या विना-

शानें, त्याचप्रमाणें कौरवांच्या पतनानें मला जें दुःख झालें आहे, त्याच्या शतगुणित दुःख आज मला या गोष्टीनें होत आहे! आज मला कर्णाबद्दल शोक होत आहे, त्यामुळें अग्नींत जीवंतपणींच दग्ध झाल्यासारखें मला दुःख होत आहे! कर्ण आमचा बंधु आहे, हें तर आधीं आम्हांला कळलें असतें, तर स्वर्गावरील कोणतीहि वस्तु आम्हांला अप्राप्य नसती, आणि मग हे कौरवांचा अंत करणारें घोर युद्धहि झालें नसतें!"

( ३ ) राजा, अशाप्रकारें धर्मराज युधिष्ठिरानें पुष्कळ प्रकारें विलाप केला, नंतर अशा रीतीनें बराच वेळ रुदनांत गेल्यावर त्यानें कर्णाची उत्तरक्रिया केली! उदकांजलि देण्याकरितां तेथें बसलेल्या सर्व स्त्रियांनीं रडून मोठा आकांत केला. मग त्या बुद्धिमान् कुरुपति युधिष्ठिरानें बंधुप्रेमानें कर्णाच्या सर्व स्त्रियांस अवगुंठनांसह जवळ आणविलें आणि त्या धर्मात्म्यानें त्यांसह सर्व उत्तरक्रिया यथाशास्त्र केली! नंतर तो म्हणाला, या 'कुंतीच्या गुप्त गोष्टीमुळें मज पाप्याच्या हातून हा माझा ज्येष्ठ बंधु निधन पावला आहे; तरी ह्यापुढें स्त्रियांच्या मनांत कांहींएक गुप्त गोष्ट राहणार नाहीं.' असें बोलून तो दुःखी धर्मराज गंगेंतून बाहेर पडला आणि आपले बंधु व इतर इष्टमित्र यांसह तीरावर आला! ११. ३. २७.

[ येथें तिसरें श्राद्धपर्व संपलें. ]

( येथें अकरावें स्त्रीपर्व समाप्त झालें. )

---

ह्याच्यापुढें शांतिपर्वाला आरंभ होतो. त्याचा आद्य श्लोक हा आहे—

वैशंपायन उवाचः—कृत्वोदकं ते सुहृदां सर्वेषां पांडुनंदनाः ।
विदुरो धृतराष्ट्रश्च सर्वाश्च भरतस्त्रियः ॥

# श्रीमन्महाभारतार्थ

## ( महाभारताचें मराठी सुबोध भाषांतर )



## १२. शांतिपर्व.

## राजधर्मपर्व १.



नारायणं नमस्कृत्य नरं चैव नरोत्तमम् ।
देवीं सरस्वतीं चैव ततो जयमुदीरयेत् ॥

### अध्याय १ ला.

[ १ नारदकृत युधिष्ठिरसांत्वन. २ युधिष्ठिराचा कर्णविषयक विलाप. ३ कर्णाला शाप होऊन त्याचें रथचक्र पृथ्वीनें कां गिळिलें, असा युधिष्ठिराचा नारदाला प्रश्न. ]

(१) **वैशंपायन**—राजा, पांडव, विदुर, धृतराष्ट्र आणि सर्व भरतस्त्रिया यांनीं आपापल्या सुहृदांच्या उत्तरक्रिया केल्यावर ते महात्मे पांडव तेथेंच नगराच्या बहिर्भागीं युद्धांत क्वचित्प्रसंगीं कपटाचा आश्रय केल्यामुळें उत्पन्न झालेल्या दोषाच्या प्रतिकारार्थ एक महिनाभर राहिले. आप्तांची उत्तरक्रिया केल्यानंतर त्या धर्मपुत्र युधिष्ठिर राजाजवळ मोठमोठे महात्मे, सिद्ध आणि ब्रह्मर्षिश्रेष्ठ असे द्वैपायन व्यास, नारद, महर्षि देवल, देवस्थान, कण्व आणि त्यांचे उत्तमोत्तम शिष्य, तसेंच वेदवेत्ते, आचारसंपन्न, गृहस्थाश्रमी आणि ब्रह्मचर्य संपविलेल्या अनेक ब्राह्मणश्रेष्ठांनींहि त्या कुरुश्रेष्ठाला भेट दिली. ते महात्मे येत आहेत, असें पाहून युधिष्ठिर त्यांस सामोरा गेला आणि त्यानें यथाविधि त्यांचें पूजन केलें. नंतर ते महर्षि महामूल्यवान् आसनांवर बसले. प्रसंगानुरूप त्यानें केलेला

सत्कार स्वीकारून ते शेंकडो हजारों ब्राह्मण पुण्यप्रद भागीरथीच्या तीरावर त्या शोकसंतप्त राजा युधिष्ठिराचे सांत्वनार्थ त्याच्या सभोंवतीं बसले असतां नारद-मुनि कृष्णद्वैपायन मुनींचें मत घेऊन योग्य कालीं त्या धर्मपुत्र युधिष्ठिराला म्हणाला, "युधिष्ठिरा, तूं न्यायाचा आश्रय करून आपल्या बाहुवीर्यानें आणि श्रीकृष्णाच्या प्रसादानें ही संपूर्ण पृथ्वी जिंकिली आहेस, त्याचप्रमाणें त्या लोक-भयंकर संग्रामांतून मुक्त होऊन क्षत्रधर्मांमध्यें रत झाला आहेस, ही गोष्ट तुझ्या अंतःकरणाला सुखप्रद झाली आहेना? हे युधिष्ठिरा, तूं आपल्या शत्रूंचा संहार करून आतां आपल्या सुहृदांना आनंद देतोसना? एवढी मोठी संपत्ति प्राप्त झाली असतां सांप्रत तुला शोकबाधा होत नाहींना?"

(२) **युधिष्ठिर**—नारदा, कृष्णबाहुबलाच्या आश्रयानें, ब्राह्मणांच्या कृपाप्रसादानें आणि भीमार्जुनांच्या बलानें आम्हीं ही समग्र पृथ्वी जिंकिली, तरी हें मोठें भयंकर दुःख माझ्या अंतःकरणास सर्वदा सारखें तापदायक झालें आहे. भगवन्, हा लोभमूलक मोठा ज्ञातिसंहार करून व सुभद्रेच्या आणि द्रौपदीच्या प्रिय पुत्रांचा घात करवून आम्हीं मिळविलेला जय म्हणजे पराजयच होय असें मला वाटत आहे! श्रीकृष्ण येथून द्वारकेला गेल्यावर तेथें असणारी माझ्या कनिष्ठ बंधूची–अर्जुनाची–स्त्री सुभद्रा त्याला काय बरें म्हणेल? आमचें प्रिय व हित करण्यांत सर्वदा तत्पर अशी ही द्रौपदी आपले पुत्र आणि बांधव ह्यांच्या वधानें अत्यंत दीन होऊन गेली आहे, तिला पाहून मला अत्यंत दुःख होत आहे! हे भगवन्, आणखी दुसरी एक गोष्ट तुला सांगतों, ती अशी कीं, कुंतीनें आपली मसलत गुप्त ठेवल्यानें मी अत्यंत दुःखी झालों आहें. ज्याला दशसहस्र नागांचें बळ, युद्धामध्यें ज्याची बरोबरी करणारा दुसरा कोणीच वीर नव्हता, युद्धक्रीडेंत जो सिंहाप्रमाणें पराक्रमी, जो चतुर, दयाळू, दानशील, व्रतनिष्ठ, कौरवांचा आधार, अत्यंत अभिमानी, अद्भुतपराक्रमी, परोत्कर्षा-सहिष्णु, सदा क्षुब्ध, प्रत्येक युद्धांत आमचा पराजय करणारा, रणांगणांत शीघ्र अस्त्रें सोडणारा, आश्चर्यकारक युद्ध करणारा आणि कुशल, असा कुंतीच्या पोटीं गुप्तपणें जन्म पावलेला कर्ण, तो खरोखर आमचा बंधु होता. जलांजलि देण्याचा प्रसंग आला असतां तो सर्वगुणसंपन्न कर्ण आपणाला सूर्यापासून झालेला असून त्याला आपण पूर्वीं पेटींत घालून गंगेच्या प्रवाहांत सोडून दिलें होतें, असें तिनें सांगितलें. त्यालाच लोक राधेच्या पोटीं जन्माला आलेला सारथ्याचा पुत्र समजतात.

तो कुंतीचा ज्येष्ठ पुत्र आमचा भ्राता होता, ही गोष्ट मला न समजल्यामुळें राज्यलोभानें मीं त्याचा वध केला. कापसाच्या राशीला ज्याप्रमाणें अग्नि जाळून टाकितो, त्याप्रमाणें ह्या गोष्टीनें माझीं गात्रें जळून जात आहेत. तो आमचा बंधु होता, ही गोष्ट श्वेतवाहन अर्जुनाला, मला, भीमाला किंवा नकुल-सहदेवांनाहि ठाऊक नव्हती. त्या सुव्रत कर्णाला मात्र आमचा संबंध माहीत होता. आम्हांमध्यें सर्वदा मैत्री रहावी, ह्या इच्छेनें आमची माता कुंती त्याच्याजवळ गेली होती व तूंहि माझाच पुत्र आहेस, असें त्याला म्हणाली होती. परंतु त्या महात्म्या कर्णानें कुंतीचा तो अभिलाष पूर्ण केला नाहीं. परंतु तो आपल्या मातेला असें बोलला असल्याचें माझ्या ऐकण्यांत आहे कीं, 'हे माते, रणामध्यें मी दुर्योधनाचा त्याग करीन, असें कधींहि शक्य नाहीं. कारण तुझ्या मताप्रमाणें मी दुर्योधनाचा त्याग करून युधिष्ठिराशीं संधि केला तर अनार्यत्व, दुष्टत्व आणि कृतघ्नत्व हे दोष मला लागतील आणि लोकहि म्हणतील कीं हा अर्जुनाशीं रणांत युद्ध करण्याला भ्याला! म्हणून मी श्रीकृष्णासह प्रथम अर्जुनाशीं युद्ध करून त्याला जिंकीन आणि मग धर्मपुत्र युधिष्ठिराशीं संधि करीन.'

असें त्या विशालवक्ष कर्णाचें भाषण ऐकून कुंती त्याला म्हणाली, 'तूं अर्जुनाबरोबर वाटेल तितकें युद्ध कर, पण बाकीच्या चौघांना अभय दे.' तेव्हां तो कर्ण हात जोडून आपल्या कांपणाऱ्या आईला म्हणाला, 'अर्जुनाशिवाय तुझे इतर चारहि पुत्र मला वश होणारे आहेत, म्हणून मी त्यांचा वध करणार नाहीं. हे देवि, एकंदरींत तुला पांचच पुत्र राहतील. कारण, कर्णाचा नाश झाला असतां तुझा अर्जुन राहील व अर्जुनाचा वध झाला तर कर्ण जीवंत राहील. नंतर तुझ्या मनांत ज्यांचें प्रिय करायाचें असेल, त्यांचें कर.' असें बोलून ती पुत्रलोभवती आमची माता कुंती तेथून गृहाला गेली. पुढें त्या कर्णवीराचा त्याच्या सख्ख्या बंधूनें—अर्जुनानें—वध केला. परंतु हे प्रभो, तोंपर्यंत ही गुप्त गोष्ट कुंतीकडून अथवा कर्णाकडूनहि फुटली नाहीं. हे द्विजश्रेष्ठा, अर्जुनानें त्या शूर महाधनुर्धर कर्णास युद्धांत पाडल्यावरच तो आमचा सख्खा व ज्येष्ठ बंधु असल्याचें मला कुंतीकडून समजलें. त्यामुळें भ्रातृवधकर्त्या माझे मनाला अत्यंत वेदना होत आहेत. मला जर अर्जुन व कर्ण या उभयतांचें खरोखर साहाय्य असतें, तर मीं प्रत्यक्ष इंद्रालाहि जिंकिलें असतें!

( ३ ) त्या दुष्ट कौरवांनीं सभेमध्यें मला क्लेश दिल्यामुळें मनांत उत्पन्न झालेला क्रोध कर्णाला पाहतांच शांत होत असे. द्यूतप्रसंगीं दुर्योधनाचें कल्याण करण्याच्या इच्छेनें जेव्हां त्याचीं कठोर आणि रूक्ष भाषणें माझ्या कानावर येत असत, तेव्हां माझा कोप त्याचे पाय दृष्टीस पडतांच एकदम शांत होत असे! कुंतीच्या पायांसारखेच त्याचे पाय होते, अशी माझी समजूत होती; परंतु कुंतीच्या आणि त्याच्या पायांमध्यें इतकें सादृश्य कां असावें, ह्याचें कारण कितीहि विचार केला तरी माझ्या चित्तांत येईना. हे भगवन्, युद्धामध्यें त्याचें रजचक्र पृथ्वीनें कां गिळिलें आणि त्या माझ्या बंधूला कशा प्रकारचा शाप झाला होता, तें सर्व तूं बरोबर सांगावें अशी माझी इच्छा आहे. कारण तूं सर्वज्ञ असून आत्मज्ञानी आहेस, त्यामुळें जगांतील सर्व कृताकृताचें ज्ञान तुला आहे! १२. १. १.

## अध्याय २ रा.

[ १ ब्रह्मास्त्रप्राप्त्यर्थ कर्ण द्रोणाकडे जातो. २ द्रोणाचार्यानें नाहीं म्हणतांच तो परशुरामाकडे जातो. ३ कर्णशापवृत्तांत. ]

( १ ) **वैशंपायन**—ह्याप्रमाणें युधिष्ठिरानें त्या वक्तृश्रेष्ठ नारदाला प्रश्न केला असतां, तो कर्णशाप कशाप्रकारें झाला, तें सर्व वृत्त त्यानें युधिष्ठिराला सांगितलें.

**नारद**—हे महाबाहो, तुझें म्हणणें अगदीं बरोबर आहे. संग्रामांत कर्ण आणि अर्जुन यांना कोणाचेहि प्रहार सहन करतां येणें अशक्य नव्हतें. तथापि हे अनघा, ह्या दोघांमध्यें वैर उत्पन्न करण्यांत देवांचा कांहींएक गुप्त विचार होता, तो मी तुला आतां कथन करितों. हे महाबाहो, ही गोष्ट पूर्वीं कशी घडली, तें मी सांगतों, नीट ऐक! प्रभो, क्षत्रिय शस्त्रप्रहारानें पवित्र होऊन स्वर्गाला कसा जातो, हें पाहण्याकरितां वैराग्नि प्रदीप्त करून सोडणारा हा कन्यागर्भ कर्ण देवांनीं निर्माण केला. तो तेजस्वी बाल असतांनाच सारथ्याचा पुत्र झाला. पुढें अंगिरसकुलांत श्रेष्ठ अशा द्रोणाचार्यापासून त्यानें धनुर्विद्या संपादन केली. हे राजेंद्रा, भीमसेनाचें सामर्थ्य, अर्जुनाचें चापल्य, तुझी बुद्धि, नकुल-सहदेवांचा विनय, गांडीवधारी अर्जुनाचें श्रीकृष्णाशीं सख्य आणि तुम्हां सर्वांवर असणारें प्रजाजनांचें प्रेम, ह्या सर्वांचा विचार करीत असतांना त्याचें मन सर्वदा व्यथित होऊन जात असे! त्यानें बालपणापासून राजा

दुर्योधनाशीं सख्य ठेवलें होतें आणि दैवानें स्वभावतःच तो तुमचा हाडवैरी बनला होता. पुढें अर्जुन आपल्यापेक्षां धनुर्विद्येमध्यें बलवत्तर असल्याचें कर्णाला कळून आलें, तेव्हां तो एकांतीं द्रोणाकडे जाऊन त्याला म्हणाला, 'प्रसादनविधि आणि उपसंहार ह्यांसह ब्रह्मास्त्र शिकण्याची माझी इच्छा आहे. कारण, अर्जुनाबरोबर युद्ध करण्याचें माझ्या मनांत आहे. पुत्रावर तसेंच शिष्यांवरहि आपलें सारखेंच प्रेम आहे. तुझी कृपा झाली असतां विद्वान् लोक 'हा अस्त्रविद्येंत अनभ्यस्त' आहे असें म्हणणार नाहींत.'

असें कर्णानें सांगितल्यावर द्रोणाचार्याला अर्जुनाची अपेक्षा असल्यामुळें आणि कर्णाचा दुष्टपणा कळून चुकल्यामुळें तो कर्णाला म्हणाला, 'ज्यानें यथावत् व्रताचरण केलें आहे, त्या ब्राह्मणाला किंवा ज्यानें तपश्चर्या केली आहे, अशा क्षत्रियालाच ब्रह्मास्त्र जाणण्याचा अधिकार आहे, इतरांस नाहीं!'

(२) त्या अंगिरसकुलश्रेष्ठ द्रोणाचार्यानें असें सांगतांच त्याचा निरोप घेऊन व पूजन करून कर्ण परशुरामाकडे जाण्याकरितां महेंद्रपर्वतावर गेला. परशुरामाकडे जाऊन कर्णानें त्याला साष्टांग नमस्कार घातला आणि मोठ्या गौरवानें त्याला 'मी भृगुकुलोत्पन्न ब्राह्मण आहें' असें सांगितलें. तेव्हां गोत्र इत्यादिकांची सर्व चौकशी करून 'परशुरामानें तुझें स्वागत असो, तूं येथेंच रहा,' असें सांगून त्याला आपल्याजवळ ठेवून घेतलें. त्याप्रमाणें प्रत्यक्ष स्वर्ग अशा त्या महेंद्रपर्वतावर कर्ण राहिला. तेथें कर्णाला गंधर्व, राक्षस, यक्ष आणि देव यांशीं वारंवार भेटी होऊं लागल्या. तेथें त्या भृगुश्रेष्ठ परशुरामाकडे कर्णानें उत्तम प्रकारची यथाविधि बाणास्त्रविद्या संपादन केली आणि अशा रीतीनें तो देव, दानव आणि गंधर्व यांना अत्यंत प्रिय झाला. कोणी एके वेळीं तो सूर्यपुत्र कर्ण खड्ग आणि धनुष्य हातांत घेऊन एकटाच आश्रमाजवळ समुद्रकांठीं फिरत असतां अग्निहोत्रासक्त एका ब्रह्मवादी ब्राह्मणाचे होमधेनूचा त्याचे हातून साहजिकपणें वध झाला. मग कर्णानें आपल्या हातून ती गोष्ट अज्ञानानें घडली, हें लक्षांत आणून त्या ब्राह्मणाला तसें कळविलें आणि त्याच्या समजुतीकरितां वारंवार असें बोलला कीं, 'भगवन्, माझ्या अज्ञानामुळें ह्या धेनूचा माझ्या हातून वध झाला आहे, तरी आपण मजवर कृपा करावी!'

(३) हें ऐकून तो संतप्त ब्राह्मण कर्णाची निर्भर्त्सना करीत त्याला म्हणाला, 'हे दुराचाऱ्या, दुर्मते, तूं वधार्ह आहेस! म्हणून ह्या कर्माचें तुला तसेंच फल

मिळेल. हे पाप्या, ज्याच्याशीं तूं स्पर्धा करीत आहेस आणि ज्याच्या पराजया-करितां तुझी रात्रंदिवस खटपट चालली आहे, त्याच्याशीं तूं युद्ध करीत असतां तुझें रथचक्र भूमि गिळून टाकील ! नराधमा, तसें होऊन तुझें चित्त अस्वस्थ झालें असतां शत्रु तुजवर धांवून येऊन तुझें मस्तक उडवून टाकील ! तूं येथून जा ! हे मूढा, ज्याप्रमाणें तूं प्रमत्त होऊन माझ्या धेनूचा वध केलास, त्याचप्रमाणें तुझाहि बाणांनींच शत्रु शिरच्छेद करील !'

असा त्या ब्राह्मणश्रेष्ठाचा शाप झाला असतां त्याची कृपा व्हावी म्हणून कर्णानें त्याला धेनु, द्रव्य आणि रत्नें देऊन त्याचा कोप शांत करण्याचा पुष्कळ प्रयत्न केला. परंतु तो ब्राह्मण कर्णाला पुनः बोलला, 'माझ्या तोंडून एकदां जें आलें, तें कोणाच्याहि हातून कधींहि बदललें जाणार नाहीं. तूं येथून निघून जा, अथवा पाहिजे असल्यास येथें रहा, वाटेल तें कर.' याप्रमाणें त्या ब्राह्मणानें सांगितल्यावर भयभीत कर्ण दैन्यानें अधोमुख होऊन परशुरामाकडे गेला ! जातांना त्याच्या मनांत तोच विषय सारखा घोळत होता. १२. १. २.

## अध्याय ३ रा.

[ १ कर्णाला ब्रह्मास्त्राची प्राप्ति. २ अलर्कनामक कीटकाकडून कर्णाच्या ऊरूला दंश. ३ परशुरामाचा कर्णाला शाप. ]

( १ ) **नारद**—कर्णाचें बाहुवीर्य, प्रणय, इंद्रियदमन आणि गुरुसेवा या गुणांनीं तो भृगुश्रेष्ठ संतुष्ट झाला आणि त्यानें त्या तपोनिष्ठ कर्णाला ब्रह्मास्त्राचा संपूर्ण प्रयोग यथाविधि शिकविला. अशा प्रकारें ब्रह्मास्त्रज्ञान झाल्यावर भृगूच्या आश्रमांत मोठ्या आनंदानें राहून त्या अद्भुतविक्रमी कर्णानें धनुर्वेद-विद्येंत थोर प्रयत्न केला. नंतर एकदां परशुराम कर्णाला बरोबर घेऊन आपल्या आश्रमाच्या जवळच फिरत असतां उपवासानें अगदीं थकून गेला. कर्णावर पूर्ण विश्वास बसून प्रेम जडल्यामुळें परशुराम त्याच्या मांडीवर डोकें ठेवून झोंपीं गेला.

( २ ) इतक्यांत श्लेष्मा, मेद, मांस आणि रक्त खाणारा व ज्याचा स्पर्शहि अत्यंत भयंकर, असा एक दारुण कृमि कर्णाच्या जवळ आला आणि त्या रक्त-भक्षक कृमीनें त्याची मांडी फोडली. आपला गुरु जागा होईल, ह्या भीतीनें

कर्णाला त्याला दूर फेंकतां किंवा त्याचा वधहि करतां आला नाहीं. हे भारता, तो कृमि जरी कर्णाला सारखा दंश करीत होता, तरी परशुराम जागा होईल, ह्या शंकेनें कर्णानें त्याची उपेक्षा केली आणि यत्किंचित्‌हि न कांपतां व व्यथित न होतां मोठ्या धैर्यानें ती असह्य दंशवेदना सहन करून कर्णानें आपल्या गुरूला तसेंच मांडीवर निजूं दिलें. पुढें शरीराला रक्तस्पर्श होतांच तो तेजस्वी भृगुकुलश्रेष्ठ जागा झाला व त्रस्त होऊन कर्णाला म्हणाला, 'अरे, मी अशुचि झालों, हें तूं काय करीत आहेस, तें भय सोडून आधीं मला यथार्थ सांग !' तेव्हां कर्णानें आपणाला कृमीनें कसा दंश केला, तें सर्व परशुरामाला सांगितलें व परशुरामानेंहि तो डुकराच्या आकाराचा, आठ पायांचा, तीक्ष्ण दंष्ट्रांचा, सुयांप्रमाणें केंसांनीं व्याप्त आणि भीतीनें अंग संकुचित करणारा अलर्क नांवाचा कृमि पाहिला. परशुरामाची नजर त्याजवर पडतांच तो कृमि त्या रक्तांत भिजून तेथेंच मृत झाला. ती अत्यंत आश्चर्याची गोष्ट झाली. कारण, आकाशामध्यें वाटेल तें स्वरूप धारण करणारा, कृष्णवर्ण अंगाचा, आरक्त कंठाचा व मेघावर बसलेला असा एक राक्षस त्याला दिसला. त्याचे मनोरथ पूर्ण झाले असल्यामुळें तो हात जोडून परशुरामाला म्हणाला, 'हे भृगुशार्दूला, तुझें कल्याण असो. आतां मी आलों तसा जातों. हे मुनिसत्तमा, तूं मला ह्या नरकांतून मुक्त केलें आहेस. तसेंच तूं माझें कल्याणहि केलें आहेस. तुला मी वंदन करितों !'

हें त्या राक्षसाचें भाषण श्रवण करून तो प्रतापवान् महाबाहु जामदग्न्य त्याला म्हणाला, 'तूं कोण आहेस आणि तुला नरकांत पडण्याचें कारण काय, तें मला सांग.' त्यावर तो राक्षस बोलला, "मी पूर्वी सत्ययुगांत दंश नांवाचा महाराक्षस होतों. माझें वय सुमारें भृगूच्या वयाइतकेंच होतें. मी भृगूच्या प्रियपत्नीचें बळजबरीनें हरण केलें आणि त्या महर्षीच्या शापानें कृमि होऊन भूमीवर पडलों. तेव्हां तो तुझा पूर्वपितामह क्रुद्ध होऊन मला म्हणाला, 'हे पाप्या, तूं मूत्र आणि कफ खाणारा कृमि होऊन नरकांत पडशील ! तेव्हां 'हे ब्रह्मन्, ह्या शापाचा अंत कसा होईल, तें सांग,' असें मीं त्याला म्हटलें. त्यावर 'भार्गवरामाकडून तूं शापमुक्त होशील' असें भृगु म्हणाला. असा त्या मुनीचा शाप होऊन जेथें कधींहि कल्याण नाहीं, अशा ह्या गर्तीत—नरकांत—मी पडलों होतों. परंतु हे साधो, तुझा समागम होऊन मी त्या पापयोनींतून आज मुक्त झालों आहें." असें बोलून तो महासुर परशुरामाला नमस्कार करून तेथून चालता झाला.

नंतर परशुराम क्रुद्ध होऊन कर्णाला म्हणाला, ‘ हे मूढा, हें अति दुःख कोणाहि ब्राह्मणाला कधीं सहन होणारें नाहीं. तुझें हें धैर्य पाहून तूं क्षत्रिय असावास असें मला वाटत आहे. म्हणून आतां तरी तूं खरें सांग !’

( ३ ) हें ऐकून परशुरामाचा शाप होईल, ह्या भीतीनें कांपत कांपत त्याचा कोप शांत करण्याच्या हेतूनें कर्ण बोलला, ‘ हे भार्गवा, मी ब्राह्मण किंवा क्षत्रिय या दोन्ही वर्णांतील नसून जातीनें सूत आहें. ह्या भूमीवर लोक मला ‘ राधासुत कर्ण ’ असें म्हणतात. अस्त्रलोभानें असत्य बोलणाऱ्या मजवर अनुग्रह कर ! वेदविद्या शिकविणारा गुरु हा खरोखर पिताच होय, म्हणून मीं आपणाला ‘ माझें गोत्र भार्गव आहे, ’ असें सांगितलें. असें म्हणून त्या दीन झालेल्या कर्णानें हात जोडले आणि भूमीवर लोटांगण घातलें. शापभीतीनें तो थरथर कांपत होता. तेव्हां तो भृगुश्रेष्ठ राम क्रोधाविष्ट झाला आणि हंसल्यासें करून कर्णाला म्हणाला, ‘ कर्णा, अस्त्रलोभानें असत्याचा स्वीकार करून आजवर तूं माझी सेवा केलीस, त्याअर्थीं आपल्यासमान योद्ध्याशीं युद्ध करितांना तुझा वधकाल जवळ आला तरी ह्या अस्त्राचा तुला किमपि उपयोग होणार नाहीं. ह्याशिवाय अन्यकाळीं मात्र हें अस्त्र तुला उपयोगीं पडेल. हें ब्रह्मास्त्र अब्राह्मणाशीं मरणकालपर्यंत केव्हांहि टिकणारें नाहीं. हे मूर्खा, आतां तूं येथून निघून जा ! तुजसारख्या असत्य बोलणाऱ्या मनुष्याला येथें जागा नाहीं, भूतलावर तुजसमान क्षत्रिय योद्धा कधीं होणार नाहीं !’

अशाप्रकारें परशुरामानें सांगितल्यावर त्याला अभिवंदन करून कर्ण तेथून निघाला व दुर्योधनाकडे येऊन ‘ मी ब्रह्मास्त्र शिकलों आहें ’ असें त्याला म्हणाला. १२. १. ३.

## अध्याय ४ था.

[ १ स्वयंवरार्थ दुर्योधन कलिंगदेशाला कर्णासह जातो. २ दुर्योधनकृत कन्याहरण.]

( १ ) नारद—हे भरतर्षभा, भृगुनंदन परशुरामापासून ब्रह्मास्त्राची प्राप्ति झाल्यावर कर्ण दुर्योधनाच्या समागमांत आनंदानें राहूं लागला. नंतर कोणी एके समयीं चित्रांगद राजाच्या कलिंग देशामध्यें स्वयंवरासाठीं अनेक राजे जमले होते. हे भारता, त्या देशांतील अत्यंत सौंदर्यशाली अशा राजपूर नांवाच्या नगरांत शेंकडो राजे कन्येच्या प्राप्त्यर्थ आलेले होते. तेथें सर्व राजे एकत्र झाल्याचें

ऐकून दुर्योधनहि कर्णाला बरोबर घेऊन आपल्या सुवर्णरथांतून तिकडे गेला. हे नृपसत्तमा, ह्या स्वयंवरमहोत्सवांत अनेक राजे कन्याप्राप्तीच्या हेतूनें मिळाले होते. तेथें शिशुपाल, जरासंध, भीष्मक, वक्र, कपोतरोमा, नील, दृढपराक्रमी रुक्मी, स्त्रीराज्याधिपति महाराज शृगाल, अशोक, शतधन्वा, भोज हे व दक्षिण-दिशेस वसति करणारे अनेक राजे, तसेच पूर्व आणि उत्तर दिशेकडील म्लेच्छ राजे हे जमले होते. सर्वांची कांति सुवर्णाप्रमाणें झळकत असून त्यांनीं सुवर्ण बाहुभूषणें धारण केलीं होतीं. त्या सर्वांचे देह तेजस्वी असून ते व्याघ्राप्रमाणें बलसंपन्न होते.

( २ ) हे भारता, ते सर्व राजे तेथें येऊन बसल्यावर धात्री आणि भालदार यांसह ती कन्या त्या सभेमध्यें आली. नंतर त्या कन्येला राजांचीं नांवें सांगितलीं असतां ती कन्या दुर्योधनाला सोडून पुढें गेली. तिनें आपला केलेला हा अपमान त्या कुरुकुलोत्पन्न दुर्योधनाला सहन झाला नाहीं. त्यानें सर्व राजांचा अनादर करून त्या कन्येला पुढें जाण्याला अडथळा केला. मग वीर्यमदानें उन्मत्त होऊन त्या भीष्म-द्रोणाश्रित दुर्योधन राजानें त्या कन्येला रथांत बसवून तिचें हरण केलें. तेव्हां हे पुरुषश्रेष्ठा, त्या दुर्योधनामागून गोधा आणि अंगुलित्र चढवून व हातांत खड्ग घेऊन रथारूढ वीर कर्ण त्याच्यामागून निघाला. नंतर युद्धोत्सुक राजे अंगांत कवचें घालून व रथ जोडून युद्धार्थ सज्ज झाले. त्यामुळें तेथें एकच कोलाहल उडून राहिला. त्यावेळीं ते राजे अत्यंत क्रोधाविष्ट होऊन कर्ण-दुर्योधनांवर मेघ पर्वतावर वृष्टि करितात, त्याप्रमाणें बाणांची वृष्टि करीत चालून गेले. ते आपल्यावर धांवून येत असल्याचें पाहून कर्णानें एकेक बाण सोडून त्यांचीं धनुष्यें आणि बाण भूतलावर पाडून टाकिले! नंतर कित्येक धनुष्यहीन, कित्येक धनुष्यें सज्ज केलेले, कित्येक बाणधारी, तर कित्येक रथ-शक्तिगदायुक्त अशा त्या सर्व राजांना आपल्या अस्त्रकौशल्यानें व्याकुल करून व त्यांच्या सारथ्यांचा वध करून कर्णानें त्यांचा पराजय केला. त्यामुळें मनोभंग होऊन ते सर्व राजे स्वतःच आपले अश्व हांकीत व ‘आमचें रक्षण कर, आमचें रक्षण कर,’ असें म्हणत रणांगण सोडून पळून गेले. इतक्यांत कर्णसंरक्षितदुर्योधन आनंदित होऊन त्या कन्येला घेऊन हस्तिनापुराला निघून गेला. १२. २. ४.

## अध्याय ५ वा.

[ १ कर्णपराक्रम. २ जरासंधाकडून कर्णाला मालिनीनगरीचें अर्पण. ३ कर्णवध होण्याचीं कारणें. ]

( १ ) **नारद**—कर्णानें आपलें बल प्रगट केलेलें ऐकून मगधाधिपति जरासंधानें त्याला रणांगणांत द्वैरथयुद्धाला आह्वान केलें. नंतर त्या दिव्यास्त्रवेत्त्या उभय वीरांमध्यें युद्ध सुरू झालें. त्यांत उभयतांनीं परस्परांवर नाना प्रकारच्या आयुधांची वृष्टि केली. शेवटीं धनुष्यबाणांचा क्षय व खड्गांचा भंग होऊन ते उभय बलवान् वीर भूमीवर आले आणि त्यांनीं बाहुयुद्धास आरंभ केला. तेव्हां कर्णानें [१]बाहुकंटक युद्ध करून जरा नांवाच्या दाईनें सांधून टाकिलेल्या जरासंधाच्या देहाचा संधि निखळून काढिला.

( २ ) ह्याप्रमाणें कर्णानें आपल्या शरीराचा भंग केल्याचें पाहून जरासंध राजानें संतुष्ट होऊन आपलें वैर सोडून दिलें व तो कर्णाला बोलला 'मी संतुष्ट झालों आहें.' त्यानें अत्यंत प्रेमपूर्वक कर्णाला मालिनी नांवाची नगरी अर्पण केली. हे नरशार्दूला, त्यामुळें तो शत्रुजेता कर्ण अंगदेशामध्यें राजा होऊन राहिला. पुढें तो शत्रुसंहारक कर्ण दुर्योधनाच्या संमतीनें चंपानगरीचें पालन करूं लागला, हें तुला माहीत आहेच. अशा रीतीनें आपल्या शस्त्रप्रतापानें कर्ण भूतलावर प्रसिद्धि पावला.

( ३ ) पुढें तुझ्या हिताकरितां देवेंद्रानें त्याजवळ कवचकुंडलें मागितलीं व कर्णानेंहि देवमायेनें मोहित होऊन देहाबरोबरच निर्माण झालेलीं अशीं दिव्य कवचकुंडलें त्याला दिलीं. अशा रीतीनें कर्ण कवचकुंडलविरहित झाला असतां अर्जुनानें कृष्णासमक्ष त्याचा वध केला. ब्राह्मणाच्या आणि महात्म्या परशुरामाच्या शापामुळें, कुंतीला दिलेल्या वरामुळें, इंद्राच्या मायेमुळें, रथ्यांच्या गणनेंत भीष्मानें 'हा अर्धरथी आहे' असें बोलून त्याचा अपमान केल्यामुळें, आणि शल्याकडून तेजोभंग झाल्यामुळें, अर्जुनानें श्रीकृष्णाच्या नीतीचा आश्रय करून, रुद्र, देवेंद्र, यम, वरुण, कुबेर, द्रोण, महात्मा कृप ह्यांचीं दिव्य अस्त्रें घेऊन सूर्यसमप्रभ रविपुत्र कर्णाचा वध केला. अशाप्रकारें ब्राह्मणांच्या

---

१ एकां जंघां पदाऽऽक्रम्य परमुद्यम्य पाट्यते ।
केतकीपत्रवच्छत्रुर्युद्धं तद्बाहुकंटकम् ॥

शापामुळें आणि अनेक लोकांकडून फसविला गेल्यामुळें तुझा बंधु युद्ध करून मरण पावला. म्हणून हे पुरुषव्याघ्रा, युद्धांत मरण पावलेल्या त्या कर्णाबद्दल तुला शोक करणें योग्य होणार नाहीं. १२. १. ५.

---

## अध्याय ६ वा.

[ १ युधिष्ठिराचा शोक. २ युधिष्ठिराचा स्त्रीशाप. ]

( १ ) वैशंपायन—इतकें बोलून तो देवर्षि नारद थांबला. इकडे राजर्षि युधिष्ठिर शोकानें चिंतामग्न होऊन बसला. त्या शोकाक्रांत, दीन, व्याकुल सर्पाप्रमाणें श्वासोच्छ्वास टाकणाऱ्या व डोळ्यांतून अश्रू ढाळणाऱ्या वीर युधिष्ठिराला त्यावेळीं दुःखी व शोकाकुल कुंती अर्थयुक्त मधुर शब्दांनीं म्हणाली, " महाबाहो युधिष्ठिरा, ह्या कर्णाविषयीं शोक करणें तुला योग्य नाहीं. हे महाप्राज्ञा, शोकाचा त्याग कर आणि हें माझें भाषण श्रवण कर! त्यानें तुला आपलें बंधुत्व जाणावें, म्हणून पूर्वीं मीं त्याची अनेक प्रकारें विनवणी केली, इतकेंच नव्हे, तर त्याचा पिता सूर्य देव यानेंहि हितबुद्धि मनुष्यानें सुहृदाचें हित व्हावें या इच्छेनें जें सांगायाचें होतें तें सर्व माझ्या समक्ष त्याला स्वप्नांत सांगितलें, परंतु स्नेहानें त्याचा क्रोध शमविण्याविषयीं अथवा तुझ्याशीं त्याचें सख्य करण्याविषयीं तो किंवा मीहि समर्थ झालें नाहीं. नंतर मृत्यूला वश होऊन, शत्रूचा नाश व तेणेंकरून वैराचें उन्मूलन करावें या उद्देशानें तो तुमच्या विरुद्ध वागत आहे, असें पाहून मीं त्याची उपेक्षा केली. "

( २ ) याप्रमाणें मातेचें भाषण श्रवण केल्यावर धर्मराजाचे डोळे अश्रूंनीं भरून आले. तो धर्मात्मा शोकानें व्याप्त होऊन गेला आणि तिला म्हणाला, " तुझ्या ह्या गोपनबुद्धीमुळें मी अत्यंत दुःखी झालों आहें. नंतर त्या महातेजस्वी धर्मराजानें अत्यंत दुःखग्रस्त होऊन ' स्त्रियांना कोणतीहि गोष्ट गुप्त राखतां येणें शक्य नाहीं, ' असा शाप सर्व स्त्रियांना दिला. नंतर आपले पुत्र, पौत्र, संबंधी आणि सुहृज्जन यांचें स्मरण होऊन त्याचें अंतःकरण अति उद्विग्न झालें आणि धूमयुक्त अग्नीप्रमाणें शोकानें व्याप्त व संतापानें पीडित होऊन तो ज्ञानी राजा युधिष्ठिर अत्यंत कष्टी झाला. १२. १. ६.

---

## अध्याय ७ वा.

[ १ युधिष्ठिराचा शोक व पश्चात्ताप. २ दुर्योधन–धृतराष्ट्रादिकांच्या दुष्कृत्यांचें स्मरण. ३ समस्त परिवाराचा त्याग करून वनाला जाण्याची धर्माची इच्छा. ]

( १ ) **वैशंपायन**—धर्मात्मा युधिष्ठिर शोकसंतप्त होऊन दुःखाकुल अंतः-करणानें महारथ कर्णाची आठवण काढून शोक करूं लागला. दुःख-शोकांनीं व्याप्त होऊन त्यानें वरचेवर सुस्कारे टाकीत अर्जुनाकडे पाहिलें आणि शोका-कुल होऊन तो बोलला.

**युधिष्ठिर**—आम्ही जर वृष्णि आणि अंधक यांच्या पुरामध्यें भिक्षा मागून राहिलों असतों तर ज्ञातिवधानें प्राप्त झालेली ही दुर्गति आम्हांला खरोखर आली नसती. आमचे शत्रु युद्धभूमीवर मरून स्वर्गास गेल्यामुळें धन्य झाले आहेत. आम्हीं त्यांचा वध केल्यानें स्वतःचाच वध केला आहे. असें करण्यांत आम्हांला धर्मफल तरी काय मिळणार ? त्या क्षत्रियाचाराला, बलाला, पौरु-षाला आणि क्रोधाला धिक्कार असो, कीं ज्यांच्या योगानें आम्ही एवढ्या आप-त्तींत पडलों. वनचारी लोकांच्या नित्य अंगचे क्षमा, दम, शौचाचार, वैराग्य, निर्मत्सरता, अहिंसा आणि सत्यभाषण हे गुण फार उत्तम होत. आम्ही लोभ आणि मोह यांच्यामुळें राज्यलोभाकृष्ट होऊन दंभ आणि मान यांचा आश्रय करून या स्थितीला पोंचलों आहों. पृथ्वीवरील आमच्या विजयेच्छु आप्तांचा नाश केल्याचें पाहून आतां त्रैलोक्याचेंहि राज्य देऊन आम्हांला कोणी आनंदित करील असें नाहीं. आम्ही हीनबुद्धि धरून व आपल्या बांधवांचा वध करून पृथ्वीची प्राप्ति व्हावी, या हेतूनें अवध्य अशा पृथ्वीपतींचा त्याग केला आणि जीवंत राहिलों आहों. मांसाची इच्छा करणाऱ्या श्वानाप्रमाणें आम्हांला तें राज्यरूपी आमिष इष्ट वाटलें, परंतु आम्हीं त्याचा त्यागच केला पाहिजे होता. सकल पृथ्वी, सुवर्णाच्या राशी, पृथ्वीवरील सर्व धेनु व अश्व ह्यांची प्राप्ति झाली तरी ज्यांचा आम्हीं वध केला, त्यांचा त्याग करणें आम्हांला योग्य नव्हतें.

अर्थाभिलाष आणि दैन्य, त्याचप्रमाणें क्रोध आणि हर्ष यांनीं युक्त आमचे शत्रु मृत्युरूप वाहनांवर बसून यमसदनाला गेले आहेत. तप, ब्रह्मचर्य, सत्य आणि तितिक्षा यांचे योगानें आपणाला कल्याणकर्ते पुत्र व्हावे, अशी पितर इच्छा करीत असतात; तसेंच माताहि उपवास, पूजन, व्रतें, उत्सव हीं कृत्यें करून गर्भ वाहतात व त्याला दहा महिनेपर्यंत धारण करितात. आपणाला उत्तम प्रका-

रची संतति होईल, ती होऊन जगेल आणि तिचें पालन केलें असतां ती आम्हांला इहलोकीं व परलोकींहि सुख देईल, अशी त्यांचे दीन पितर फलाशा मनांत धरून वागतात. परंतु हा त्यांचा उद्योग आतां अगदीं निष्फल झाला आहे. कारण, त्यांच्या कुंडलधारी तरुण पुत्रांचा वध आम्हीं केला आहे. ते भूपतींला योग्य विषयांचा उपभोग न घेतां आणि पितर व देव यांचें ऋण न फेडतां यमलोकीं गेले आहेत.

(२) आई, जेव्हां आमच्या शत्रूंचे मातापितर अर्थात् गांधारी व धृतराष्ट्र यांना द्रव्य आणि रत्नें यांचा अभिलाष झाला, तेव्हांच त्यांचा अंत झाला आहे. द्रव्याची इच्छा, त्याची प्राप्ति न झाल्यामुळें उत्पन्न झालेलें दैन्य, इष्ट वस्तु संपादनाचे कामीं अडथळा झाला असतां संताप आणि तिचा लाभ झाला असतां आनंद इत्यादि गोष्टींनीं असमंजस लोकांस कधींहि विजयोपभोग घ्यावयास मिळत नाहीं. जे पांचाल आणि कुरु मारले गेले, ते मरून गेले आहेत. नाहींतर ते सर्व आपापलीं कर्मे करीत असतां लोकांच्या दृष्टीस पडले असते. या सर्व लोकांच्या नाशास खरोखर आम्ही कारण झालों आहों व याचा सर्व दोष धृतराष्ट्राच्या दुर्योधन पुत्राकडे आहे. तो सर्वदा शाठ्यानें वागत असून व मायेचा आश्रय करून आमचा द्वेष करीत असे व आमच्या अपराधावांचून आमच्यांशीं उद्धट-पणानें वागत असे. ह्या युद्धांत आमचे मनोरथ पूर्ण झाले नाहींत व त्यांचेहि झाले नाहींत. आमचाहि जय झाला नाहीं, तसाच त्यांचाहि झाला नाहीं. त्यांना या पृथ्वीचा उपभोग घेतां आला नाहीं, गीतवाद्यादिकांचा अथवा स्त्रियांचा सुखलाभ त्यांस प्राप्त झाला नाहीं. अमात्य किंवा मित्र यांचीं वाक्यें अथवा शास्त्रसंपन्न लोकांच्या तोंडचीं वचनेंहि त्या आमच्या शत्रूनें कधीं ऐकिलीं नाहींत. त्याला मोलवान् रत्नें प्राप्त झालीं नाहींत, पृथ्वी किंवा द्रव्य यांचीहि प्राप्ति झाली नाहीं. आमच्या द्वेषानें सर्वदा संतप्त असल्यामुळें त्याला या लोकीं सुखाचा लाभ म्हणून झाला नाहीं. आमचा उत्कर्ष पाहून तो पांडुर व कृश झाला. त्याचा पिता धृतराष्ट्र हा शकुनीच्या सांगण्याप्रमाणें वागून अनीतीचा आश्रय करून पुत्रलोभानें त्याच्या प्रत्येक कृत्यास अनुमति देत असे. अशा वेळीं दुर्योधनानें आपल्या पितृसमान भीष्माच्या अथवा विदुराच्या उपदेशाचीहि पर्वा केली नाहीं. म्हणून माझ्याप्रमाणें त्याचाहि निःसंशय नाश झाला आहे. त्यानें आपल्या लोभी, अशुचि व कामवश पुत्राचें नियमन केलें नाहीं, त्यामुळें तो आपल्या बंधूंचा घात करून आपल्या उज्ज्वल कीर्तीपासून

च्युत झाला आहे. या सुयोधनानें आपल्या दोघां वृद्ध मातापितरांना शोकाग्नींत टाकिलें आहे.

तो पापबुद्धि दुर्योधन सर्वदा आमचा द्वेष करीत असे. नाहींतर युद्ध करण्याच्या इच्छेनें कृष्णासंनिध आपल्या सुहृज्जनांजवळ ज्याप्रमाणें शब्द उच्चारिले त्याप्रमाणें कोणत्या कुलीन बंधूनें उच्चारिले असते? आपल्या तेजानें सर्व दिशांना दग्ध करून टाकणाऱ्या आम्हीं आमच्याच दोषानें आपला कायमचा नाश करून घेतला आहे. आमच्यांशीं द्वेष करून त्या दुरात्म्यानें आपणाला दृढबंधनच करून घेतलें आहे. आम्ही केवळ दुर्योधनाच्याच करितां या सर्व कुलाचा नाश केला आहे. त्याचप्रमाणें अवध्यांचा वध करून लोकनिंदेस पात्र झालों आहों. कुलाचा अंत करणाऱ्या त्या दुर्मति पापपुरुषाला राष्ट्राधिपति केल्यामुळें आज धृतराष्ट्राला शोक करणें प्राप्त झालें आहे. आम्हीं शूरांचा वध केला, पापाचरण केलें आणि आपल्याच प्रिय वस्तूंचा नाश करून घेतला. त्यांच्या वधानें आमचा क्रोध नाहींसा झाला आहे. परंतु ह्या शोकानें मला आतां बोलणेंहि शक्य नाहींसें झालें आहे.

( ३ ) धनंजया, आपण जें पापकर्म केलें असेल, तें शुभकर्में केल्यानें नष्ट होतें. तसेंच तें उघडपणें सांगून, पश्चात्ताप करून, दानें देऊन, तपश्चर्या आचरून, निवृत्तिमार्ग पत्करून, तीर्थयात्रा आदरून किंवा श्रुति-स्मृतींचा जप करूनहि नाश पावतें. त्याग-संन्यास-केल्यानें मनुष्य पुनः पापकर्म करण्यास योग्य होत नाहीं, अशी श्रुति आहे. आणि संन्यासी ज्याअर्थी जन्ममरण पावत नाहीं, असें श्रुति सांगते, त्याअर्थी श्रवण-मननादिक गोष्टींनीं ‘अहं ब्रह्मास्मि’ असा निश्चय करणाऱ्यास योगमार्गाची प्राप्ति होऊन तो ब्रह्मस्वरूपी बनून जातो. म्हणून अर्जुना, मी सुखदुःखादि द्वंद्वांचा त्याग करून व ध्याननिष्ठ होऊन ज्ञानप्राप्तीकरितां तुम्हां सर्वांचा निरोप घेऊन वनाला जातों. हे परंतपा, परिवारांत पडून राहिलेल्या मनुष्याच्या हातून पूर्णपणानें धर्माचरण होणें शक्य नाहीं, असें श्रुतिवचन आहे आणि अरिसूदना, हें माझ्या प्रत्यक्ष अनुभवालाहि आलें आहे. मी परिग्रहाची इच्छा केल्यामुळेंच माझ्या हातून हें पाप झालें आहे. जन्मक्षय होण्याचें कारण जें परमात्मज्ञान तेंहि प्राप्त होणें शक्य आहे, असें श्रुति सांगते. म्हणून हा समस्त परिवार, सकल राज्य आणि सर्व सुख हीं टाकून बंधमुक्त होऊन व शोक आणि ममत्व यांचा त्याग करून मी निघून जाणार ! आतां

या निष्कंटक आणि पुण्यकारक पृथ्वीचें पालन तूंच कर ! हे कुरुनंदना, मला आतां राज्याची किंवा भोगांची कांहींच इच्छा उरली नाहीं.

राजा, इतकें बोलून त्या कुरुराज युधिष्ठिरानें आपलें भाषण संपविलें. त्यावर त्याचा कनिष्ठ बंधु अर्जुन बोलला. १२. १. ७.

## अध्याय ८ वा.

[ १ अर्जुनाचें भाषण. २ धनाची महती. ]

( १ ) वैशंपायन—युधिष्ठिराच्या भाषणानें आपला धिक्कार झाल्यासारखें अर्जुनाला वाटलें. भाषणांत युक्तिवान् आणि पराक्रमांत सामर्थ्यवान् अशा त्या उग्रपराक्रमी व महातेजस्वी इंद्रपुत्र अर्जुनानें जिह्वेनें ओष्ठ चाटीत व किंचित् हंसत न्याय्य भाषण केलें.

अर्जुन—युधिष्ठिरा, अमानुष पराक्रम करून, शत्रूचा वध करून आणि पृथ्वी संपादून धर्मानें मिळविलेलें उत्तम वैभव तूं सोडून देण्यास तयार झाला आहेस, ही मोठ्या दुःखाची आणि परम संकटाची गोष्ट आहे. तुझी बुद्धि मंद असल्यामुळें या सर्व वैभवाचा त्याग करण्यास तूं सिद्ध झाला आहेस ! क्लीब आणि सर्वदा दीर्घसूत्री मनुष्याला राज्यलाभ कोठून होणार ? तूं क्रोधमूर्च्छित होऊन त्या महीपालांचा वध तरी कशाकरितां म्हणून केलास ? कल्याणाला मुकलेला, दरिद्री, लोकांमध्यें अप्रसिद्ध, पुत्र-पशु इत्यादि परिवाररहित जो असेल, तो भिक्षा मागूनहि उदरनिर्वाह करील, शौर्यानें कोणाच्याहि अर्थाचा अपहार करण्याची इच्छा करणार नाहीं. हे राजा, तूं भिक्षेकऱ्याची वृत्ति धारण करून व राज्य सोडून निर्वाह करूं लागलास, म्हणजे हे लोक तुला काय म्हणतील ?

( २ ) धर्मादिक सर्व गोष्टींचा त्याग करून आणि कल्याणरहित व दरिद्री होऊन एखाद्या मूढ मनुष्याप्रमाणें भैक्ष्यवृत्तीचा स्वीकार करण्याची इच्छा तुला कां बरें व्हावी ? या राजकुलांत तुझा जन्म झाला असून तूं सर्व पृथ्वी जिंकिली आहेस. तरी धर्मार्थांना टाकून तूं वनाला जाऊं पहात आहेस, हा केवळ मूर्खपणा होय. तूं वनाला गेल्यावर दुष्ट लोक हविर्द्रव्यांचा नाश करून टाकतील आणि मग त्याचें सर्व पाप तुला लागेल. द्रव्य हें धर्मादिकांचें साधन

असल्यामुळें त्याचा त्याग करणें योग्य नव्हे. नहुष राजानें ‘ ऋषि दरिद्री झाले आहेत ’ असें म्हणून दारिद्र्याचा धिक्कार केला आहे. तसेंच द्रव्याभावीं, अगस्त्याचा शाप होऊन, सर्पस्थितींत मनुष्यांना खाणें हें क्रूर कर्म केल्यावरून पापहेतूस्तव त्यानें निर्धनतेची निंदा केली आहे. शिवाय ऋषींजवळ दुसऱ्या दिवसाचें असें कांहींहि नसतें, ही गोष्ट तुला माहीत आहेच. ज्याला लोक धर्म म्हणतात, त्याची उत्पत्ति धनापासूनच आहे. म्हणून जो धनाचें हरण करितो, तो त्याच्या धर्माचाहि नाश करितो. हे राजा, आमच्या धनाचें असें हरण झाल्यास आम्हीं कोणाला क्षमा करणार ? जवळ उभा असलेल्या दरिद्री मनुष्याकडे लोक पापी मनुष्याप्रमाणें पाहतात. दारिद्र्य हें लोकांतील एक पाप आहे. म्हणून त्याची प्रशंसा करणें योग्य नव्हे. राजा, पापी मनुष्यांप्रमाणेंच निर्धन मनुष्याबद्दलहि लोक दुःख करितात. पतित आणि निर्धन यांमध्यें मला तर कांहींच फरक दिसत नाहीं. पर्वतांपासून नद्या उत्पन्न होतात, त्याचप्रमाणें संपादन करून वृद्धि पावलेल्या द्रव्यापासून सर्व क्रिया होतात. हे राजा, द्रव्यापासूनच धर्म, काम आणि स्वर्ग यांची प्राप्ति होते. लोकांची प्राणयात्राहि द्रव्यावांचून चालत नाहीं. ग्रीष्मऋतूंतील लहान लहान ओढ्यांप्रमाणें द्रव्यहीन व अल्पबुद्धि मनुष्याच्या क्रिया नाश पावतात. ज्याजवळ द्रव्य आहे, त्याला मित्र असतात, ज्याजवळ द्रव्य, त्यालाच बांधव असतात. ज्याला द्रव्य असतें, तोच जनांत मनुष्य आणि ज्याला द्रव्य तोच पंडित होय. दरिद्री मनुष्यानें द्रव्याची इच्छा केल्यास त्याला तें मिळविणें शक्य नाहीं. ज्याप्रमाणें गजांच्या योगानें महागज धरिले जातात, त्याचप्रमाणें द्रव्ययोगानें द्रव्याची प्राप्ति होत असते.

हे राजा, धर्म, काम, स्वर्ग, हर्ष, क्रोध, शास्त्र, इंद्रियदमन हीं सर्व द्रव्यापासून प्रवृत्त होत असतात. धनापासून कुलवृद्धि होते, तशी धनापासून धर्माची वृद्धि होते. हे पुरुषश्रेष्ठा, दरिद्री मनुष्याला हा लोक नाहीं व परलोकहि नाहीं. दरिद्री मनुष्याच्या हातून यथाशास्त्र धर्मकृत्यें होत नसतात. ज्याप्रमाणें पर्वतांतून नदीचा प्रादुर्भाव होतो, त्याप्रमाणें धनापासूनच धर्माचा उगम होतो. ज्याचें धन क्षीण झालें आहे, ज्याचे धेनु, भृत्य आणि अतिथि हे क्षीण झाले आहेत, तोच खरा कृश होय. केवळ शरीरानें कृश तो कृश नव्हे.

राजा, देव आणि दैत्य यांच्या स्थितीकडे जरा न्यायदृष्टीनें पहा. देवांनीं तरी दुसऱ्यांच्या ज्ञातीच्या वधाची इच्छा कां म्हणून करावी? दुसऱ्याच्या धनाचा अपहार करूं नये, तर धर्म तरी कसा करतां येणार? वेदांमध्यें ज्ञानी लोकांनीं हेंच सांगितलें आहे कीं, तीनहि वेदांचें अध्ययन करावें, ज्ञाननिष्ठ व्हावें, वाटेल त्या रीतीनें द्रव्यसंपादन करावें आणि यज्ञ करावे. देवांनीं सर्व स्वर्गांतील स्थानें द्रोहानेंच मिळविलीं. देवांनीं ज्ञातींचा द्रोह कां करावा? देवांनीं अशाच प्रकारें वर्तन ठेवलें असून शाश्वत वेदवाक्यांचेंहि हेंच म्हणणें आहे. अध्ययन, अध्यापन, यजन आणि याजन हे सर्व पुण्यकारक मार्ग असून दुसऱ्यापासून द्रव्य संपादणें हाहि तितकाच श्रेयस्कर पंथ आहे. कोठेंहि दुसऱ्याला अपकार केल्यावांचून धन मिळालें आहे असें आम्हांला दिसत नाहीं. अशाच रीतीनें राजेलोकहि पृथ्वी जिंकितात आणि पित्याचें धन त्याच्या मागें पुत्रानें आपलें आहे असें म्हणावें, त्याप्रमाणें ती पृथ्वी आपली आहे, असें म्हणतात. अशा रीतीनें ते राजर्षि स्वर्गाला पात्र होत असतात. पृथ्वी जिंकणें हा त्यांचा धर्मच सांगितला आहे. ज्याप्रमाणें पूर्ण भरलेल्या समुद्रांतून दाही दिशांना उदक वाहतें, त्याप्रमाणें पृथ्वीवरील सर्व द्रव्याचा उगम राजकुलापासून आहे. ह्याच न्यायानें ही पृथ्वी दिलीपाची, नृगाची, नहुषाची, अंबरीषाची, मांधात्याची आणि आतां तुझी झाली आहे. सर्व दक्षिणांनीं युक्त असा हा द्रव्यमय यज्ञ आज तुला प्राप्त झाला आहे. तो यज्ञ जर तूं केला नाहींस, तर तुला पातक लागेल. ज्यांचा राजा मोठमोठ्या दक्षिणांनीं अश्वमेध यज्ञ करितो, त्याच्या अवभृथामध्यें सर्व लोक स्नानानें पवित्र होतात. त्या विश्वरूप महादेवानें सर्वमेधनामक महायज्ञामध्यें सर्व भूतांच्या आहुति दिल्या आणि नंतर आपण होऊन आपल्याहि शरीराचा होम केला! हा कल्याणाचा शाश्वत मार्ग आहे, असें आम्ही ऐकतों. दहा रथ जाऊं शकतील, एवढा मोठा हा मार्ग आहे. तो टाकून तूं वाईट मार्गाकडे जाऊं नकोस! १२. १. ८.

---

## अध्याय ९ वा.

[ १ धर्मराजाचें निवृत्तिपर भाषण. ]

( १ ) **युधिष्ठिर**—अर्जुना, तूंहि माझे निवृत्तिपर भाषणाचा क्षणभर एकाग्र होऊन विचार कर, म्हणजे तें तुला आवडेल. तीं ग्राम्य सुखें टाकून साधु लोक

ज्या मार्गानें गेले, त्याच मार्गानें मी आतां जाणार. तुझ्याकरितां देखील हें राज्य मी स्वीकारणार नाहीं. आतां एकाच मनुष्यानें स्वीकारण्यासारखा क्षेमकारक मार्ग कोणता असें मला विचार; तुला विचारण्याची इच्छा नसल्यास विचारूं नकोस! तूं न विचारतांहि मी तुला सांगतों, ऐक! मी आतां ग्राम्यसुखाचा त्याग करून मोठी तपश्चर्या करीत अरण्यामध्यें फलमूलें भक्षण करून; पशूंबरोबर फिरत राहीन; यथाकाल अग्नीला आहुति देईन; दोन्ही काल स्नान करीन; परिमित आहार करून कृश होईन; मृगचर्म, वल्कलें परिधान करीन आणि जटा वाढवीन; शीत, वायु आणि ऊन हीं सहन करीन; क्षुधा, तृषा आणि श्रम हीं सोसण्याला समर्थ होईन; यथाशास्त्र तपानें शरीर कृश करून घेईन; मन आणि कर्ण यांना आनंदित करणारे वनवासी पशुपक्ष्यांचे उच्चनीच उच्चारलेले शब्द सदा ऐकत राहीन; प्रफुल्लित वृक्ष आणि लता यांचे रुचिर गंधांचा वास घेईन; नानारूपधारी आणि रमणीय असे वनवासी प्राणी मी वनांत पाहीन आणि तेथील वानप्रस्थ जनांचेंहि दर्शन मी घेईन. अरण्यवासी प्राण्यांचें कोणतेंहि अप्रिय माझ्या हातून होणार नाहीं. मग ग्रामवासी प्राण्यांचें तरी अप्रिय माझ्या हातून कसें होईल? मी एकांतवास पत्करून विचार करीत राहीन, पक्वापक्व अन्नावर उपजीविका करीन आणि पितरांना आणि देवांना वाणीनें, वन्य फलांनीं अथवा जलानें संतृप्त करीन.

अशाप्रकारें आरण्यशास्त्रांतील अत्यंत कडक विधींचें आचरण करून देहसमाप्तीची मार्गप्रतीक्षा करीत मी राहीन. किंवा मी एकटाच मस्तक मुंडन करून व प्रत्येक दिवशीं एकेक वनस्पतीकडे भिक्षा मागून ध्यान करीत बसेन आणि शरीर क्षीण करून घेईन. धूलीनें आच्छादित होऊन, ओस गृहाचा आश्रय करून, वृक्षाखालीं राहून, सर्व प्रिय आणि अप्रिय वस्तू टाकून, शोक, आनंद यांचा त्याग करून, निंदा किंवा स्तुति या दोहोंना सारखें मानून, आशा आणि ममत्व सोडून, सुखदुःखादि द्वंद्वें आणि परिवार यांविरहित योगानें आत्माराम होऊन मी प्रसन्नात्मस्थितींत राहीन. मी जड, अंध किंवा बधिऱ्यासारखें रूप धारण करून दुसऱ्या कोणाशीं कोणत्याहि प्रकारें भाषण करणार नाहीं. जंगमाजंगम चार[1] प्रकारच्या प्राण्यांची हिंसा कधीं करणार नाहीं; आपापल्या धर्माप्रमाणें वागणाऱ्या सर्व लोकांविषयीं समबुद्धि ठेवीन; कोणाचाहि उपहास

१ जरायुज, उद्भिज, अंडज आणि स्वेदज असे प्राण्यांचे चार भेद आहेत.

करणार नाहीं; कोणाकडेहि रागीट मुद्रेनें पाहणार नाहीं; सर्वदा प्रसन्नमुख राहीन; इंद्रियांचें उत्तमप्रकारें संयमन करीन; कोणालाहि मार्ग न विचारतां कोणत्यातरी मार्गानें जाईन; कोणत्याहि एका देशाकडे अगर दिशेकडे जाण्याची इच्छा करणार नाहीं; निरपेक्षपणें वाटेल तिकडे जाईन; मागें कधींहि पाहणार नाहीं; सर्वांशीं सरळ भावानें वागेन; अंतर्मुख होऊन स्थूलसूक्ष्म शरीराभिमान-शून्य होईन; असें झालें असतां माझी देहयात्रा कशी चालेल, अशी शंका कोणी घेईल, त्यास प्राण्यांचे पूर्वसंस्कार पुढें जात असतात; त्यामुळें सहजच त्याच्या अशनादिकांची सोय होते; परस्परविरुद्ध सुखदुःखादि द्वंद्वांकडे मी किमपिहि लक्ष देणार नाहीं; भक्ष्य अल्प असो, किंवा पुष्कळ असो, स्वादु असो अथवा नसो, जें कांहीं मिळेल, तें भिक्षावृत्तीनें मिळवीन. पूर्वींच्या घरीं भिक्षा न मिळाल्यास दुसऱ्या गृहीं जाईन व तेथेंहि न मिळाल्यास सात घरें मागत फिरेन. जेथील धूर नाहींसा झाला आहे, रिकामें मुसळ बाजूला ठेवून दिलें आहे, जेथील अग्नि विझून गेला आहे, लोकांचें भोजन होऊन गेलें आहे, पात्रें ठेवण्याचें काम आटोपलें आहे, जेथून भिक्षेकरी गेले आहेत, अशा समयीं भिक्षा मागत दोन, तीन किंवा पांच गृहीं फिरेन. अशा रीतीनें स्नेहपाश तोडून सर्व पृथ्वीभर मी संचार करीन. लाभ किंवा अलाभ झाला तरी त्याची पर्वा मला वाटणार नाहीं; मी महातपस्वी होईन. जीवंत राहूं इच्छिणाऱ्या मनुष्याप्रमाणें मी धनादिकांचा संग्रह करणार नाहीं किंवा मरणोन्मुखाप्रमाणें अन्नादिकांचा त्यागहि करणार नाहीं.

मी जीवित किंवा मरण यांचें अभिनंदन किंवा द्वेष करणार नाहीं. माझा एक बाहु कोणी तासूं लागला आणि दुसऱ्या बाहूला कोणी चंदनाची उटी लावूं लागला तरी पहिल्याचें अकल्याण व दुसऱ्याचें कल्याण करण्याची इच्छा मी कधीं करणार नाहीं. आपल्या अभ्युदयासाठीं जीवंत मनुष्यानें ज्या कांहीं क्रिया करणें अवश्य आहे, त्या सर्वांचा त्याग करीन आणि निमिषोन्मिषनादि निसर्ग-प्राप्त क्रियाच तेवढ्या मी करीत राहीन. त्या निसर्गसिद्ध कर्मांमध्येंहि मी कधीं आसक्त होणार नाहीं, तर सर्व इंद्रियक्रियांचा त्याग करून सर्वदा मनःक्रिया ताब्यांत ठेवीन. आपल्या बुद्धीचा मल दूर झुगारून देईन. मी सर्वसंगांपासून मुक्त होईन. सर्व प्रकारचे स्नेहपाश दूर करीन. कोणालाहि वश होऊन राहणार नाहीं व वायुसमान सर्वगामी होईन.

अशा रीतीनें रागादिकांचा त्याग करून संचार करूं लागलों असतां शाश्वत

संतोष मला प्राप्त होईल. अज्ञानामुळें लोभवश होऊन माझ्या हातून मोठें पातक घडलें आहे. कित्येक मनुष्यें सुखदुःखकारक कर्में करून आपल्या सुखाला निमित्तभूत झालेल्या स्वजनांचें ( भार्यादिकांचें ) पोषण करितात. आयुष्याचे शेवटीं क्षीण झालेल्या या कलेवराचा त्याग केल्यावरहि तें स्वजनपोषणार्थ केलेलें पातक त्याला सोडीत नाहीं. अशाप्रकारें संसारचक्र हें रथचक्राप्रमाणें फिरूं लागलें असतां एका प्राण्याचा दुसऱ्या प्राण्याशीं समागम होतो.

एकंदरींत जन्म, मृत्यु, जरा, व्याधि आणि वेदना यांनीं युक्त अशा अपार आणि अस्वास्थ्यकारक संसाराचा त्याग करणारालाच सुखाची प्राप्ति होत असते. देव स्वर्गापासून व महर्षिहि आपापल्या स्थानापासून भ्रष्ट होतात, तर मग कोणता कारणतत्त्ववेत्ता असल्या प्रकारच्या ऐश्वर्याची अगदीं स्वल्प कारणावरून इच्छा करील ? क्षुद्र राजे नानाप्रकारच्या कपटादि साधनांनीं एखाद्या मोठ्या राजालाहि बद्ध करितात. चिरकालानें माझ्या ठिकाणीं उत्पन्न झालेल्या ज्ञानरूपी अमृताच्या योगानें मी आतां अव्यय, शाश्वत आणि ध्रुव अशा स्थानाची इच्छा करितों. अशा प्रकारचें धैर्य धरून व निर्भय मार्गाचा स्वीकार करून जन्म, मृत्यु, जरा, व्याधि आणि वेदना यांनीं युक्त अशा देहाचा अंत मी करीन ! १२. १. ९.

---

## अध्याय १० वा.

[१ भीमानें केलेला धर्माचा उपहास. २ संन्यास आचरिल्यानें धर्मव्यतिक्रम होतो.]

( १ ) **भीमसेन**—हे राजन्, वेदपठण करून एकाद्या अर्थज्ञानशून्य मंद वैदिकाची बुद्धि नष्ट होते, त्याप्रमाणें तुझी बुद्धि होऊन तत्त्वार्थाचें आकलन करण्यास ती असमर्थ आहे. हे भरतर्षभा, तुझे चित्तावर आलस्याचा पगडा बसल्यामुळें व तूं राजधर्माचा द्वेष करणारा असल्यामुळें धार्तराष्ट्रांच्या नाशापासून तुला फलप्राप्ति ती काय होणार ? क्षात्रधर्म योग्य रीतीनें आचरणाऱ्या त्वदितर क्षत्रियांमध्यें क्षमा, दया, कारुण्य आणि अक्रौर्य हीं वसत नसतात. अशा प्रकारची तुझी बुद्धि आम्हांला अगोदरच समजली असती, तर आम्हीं शस्त्रग्रहण कदापि केलें नसतें आणि कोणाचा वधहि केला नसता. हें शरीर असेपर्यंत भिक्षावृत्तीनें शरीरधारण केलें असतें व त्यामुळें राजांमध्यें हें घोर युद्धहि झालें नसतें. हें सर्व विश्व म्हणजे प्राणांचें अन्न होय असें विद्वान् लोक म्हणतात. हे स्थावर-

जंगम सर्व पदार्थ प्राणांचें भोजन आहे. त्याचप्रमाणें राज्यापहार करणाऱ्याला जे प्रतिबंध करितात, त्यांचा वध करावा, असें क्षात्रधर्मवेत्त्यांचें मत आहे म्हणून आमच्या राज्याला प्रतिबंध करणाऱ्या त्या अपराध्यांचा आम्हीं वध केला. हे युधिष्ठिरा, आतां प्राप्त झालेल्या ह्या पृथ्वीचा तूं धर्माला अनुसरून उपभोग घे. ज्याप्रमाणें एखादा पुरुष विहीर खणीत असतां उदक न मिळतां चिखल मात्र अंगाला लागून रिकामा मागें फिरतो, तद्वतच हें तुझें सांप्रतचें कर्म झालें आहे. ज्याप्रमाणें महावृक्षावर चढून एखाद्यानें मध काढावा, परंतु त्याचें प्राशन करण्यापूर्वींच त्याला मृत्यूनें ग्रासावें, त्याप्रमाणें आमची स्थिति झाली आहे. एखाद्यानें आशेनें मोठा मार्ग आक्रमण करावा आणि लगेच निराश होऊन त्याला मागें फिरण्याची पाळी यावी, तसेंच हें कृत्य आहे. हे कुरुनंदना, ज्याप्रमाणें एकाद्या पुरुषानें आपल्या शत्रूंचा नाश करून नंतर आपला स्वतः-चाहि घात करून घ्यावा, तशाच प्रकारची ही गोष्ट आहे. एखाद्या क्षुधापीडित मनुष्याला अन्न मिळूनहि ज्याप्रमाणें दैवयोगानें त्याचें सेवन त्याला करतां येत नाहीं, किंवा कोणा कामपीडित पुरुषाला कामिनी प्राप्त होऊनहि तिचा उपभोग घेतां येऊं नये, त्याचप्रमाणें आमचें हें कर्म झालें आहे.

( २ ) हे भारता, आतां तूं केवळ ज्येष्ठ आहेस, म्हणूनच तुझ्यासारख्या मंदबु-द्धीच्या अनुरोधानें वागत आल्यामुळें आम्हीच निंदेला पात्र झालों आहों. आम्ही बाहुबलसंपन्न, विद्यावान् आणि बुद्धिवंत असूनहि शक्तिहीन मनुष्याप्रमाणें तुझ्यासारख्या क्लीबाचे आज्ञेंत वागलों. अनाथांचें रक्षण करण्याइतके सामर्थ्यवान् आम्ही असूनहि आज नष्टार्थ झाल्याचें पाहून लोकांनीं आपल्या कार्यसिद्धीकरितां आमच्याकडे साशंक दृष्टीनें कां पाहूं नये ? हें माझें म्हणणें योग्य आहे किंवा अयोग्य आहे याचा तूंच विचार कर ! जरेनें व्याप्त झालेल्या किंवा शत्रूंकडून दुर्गतीला गेलेल्या मनुष्यांनीं आपत्कालीं संन्यास ग्रहण करावा, असें शास्त्रवचन आहे. म्हणून ज्ञाते लोक या लोकीं संन्यासाची प्रशंसा करीत नाहींत. इतकेंच नव्हे, तर तो आचरल्यानें धर्मव्यतिक्रम होतो असें तत्त्ववेत्त्या विद्वानांचें मत आहे. तर अशा क्षत्रिय धर्मांत उत्पन्न झालेल्या, त्यावर निष्ठा ठेवणाऱ्या व त्याचाच आश्रय करून राहणाऱ्या लोकांनीं त्या हिंस्र धर्माची निंदा करण्यास कसें प्रवृत्त व्हावें ? त्यांनीं त्या धर्माचा प्रवर्तक जो विधाता त्याची निंदा कां करूं नये ? वैभवहीन, धनहीन आणि नास्तिक लोकांनीं प्रसृत केलेलें हें वेदार्थ-वादज्ञान सत्याभासासारखें वाटलें, तरी तें मिथ्या आहे. धर्माचें ढोंग करून

मुनिवृत्तीनें आपला देह निश्चल स्थितींत धारण करणाऱ्या पुरुषानें मरून जाणें शक्य आहे, जगणें शक्य नाहीं. कदाचित् पुत्र, पौत्र, देव, ऋषि, अतिथि यांच्या पोषणाची काळजी सोडून अरण्यामध्यें एकटाच राहिला असतां तो सुखानें जगूं शकेल.

आतां एकट्या मनुष्याला फलप्रद असा दुसरा मार्गच नाहीं असें म्हटल्यास, ह्या वराहादि अरण्यवासी पशुपक्ष्यांना तरी स्वर्गप्राप्ति कोठें झाली आहे ? संन्यासामुळें जर एखाद्या राजाला कदाचित् फलसिद्धि प्राप्त झाली असती, तर हे पर्वत आणि वृक्ष ह्यांना देखील शीघ्र स्वर्गगति मिळाली असती. कारण, ते देखील नित्यसंन्यासी, निरुपद्रवी, परिवारशून्य आणि सर्वदा ब्रह्मचर्य पालन करणारे असेच आहेत. परंतु त्यांचें आयुष्य पूर्वकर्मानुसार असल्यामुळें इतरांचें कर्मार्जित फल त्यांना प्राप्त होत नाहीं. म्हणून कर्मांचा अवलंब करणें हेंच श्रेयस्कर होय. कर्मावांचून सिद्धि कदापि मिळणार नाहीं. मुमुक्षूंला देह-भरणाव्यतिरिक्त कर्मांची जरूर नाहीं असें असतें, मग ज्यांना देहधारणेशिवाय अन्य ध्येय नाहीं असे उदकवासी मत्स्यादिक प्राणी व वृक्षादि स्थावर प्राणी यांना सुद्धां मोक्ष मिळाला असता. आपापल्या कर्मानुसार चाललेलें हें जगत् तूं अवलोकन कर. कर्म करीत रहाणें हाच कर्तव्य मार्ग होय. त्याशिवाय सिद्धि मिळत नाहीं. १२. १. १०.

---

## अध्याय ११ वा.

[ १ इंद्र आणि ऋषि यांच्या संवादरूप अर्जुनाचें भाषण. ]

( १ ) अर्जुन—हे भरतश्रेष्ठा, ह्यासंबंधी इंद्र आणि ऋषि यांमध्यें झालेल्या संवादाच्या रूपानें एका प्राचीन इतिहासाचें उदाहरण देत असतात. पूर्वी कांहीं ब्राह्मणांनीं श्मश्रू दिसूं लागण्यापूर्वीच गृहाचा त्याग केला आणि तेथें त्या सत्कुलीन परंतु मंद पुरुषांनीं संन्यासाचा स्वीकार केला. संन्यास हाच धर्म होय, असें मानणाऱ्या त्या शक्तिसंपन्न ब्रह्मचाऱ्यांनीं आपल्या बंधूंचा आणि मातापितरांचा त्याग केला. तें पाहून इंद्राला त्यांची दया आली. सुवर्णमय पक्ष्याचें स्वरूप धारण करून इंद्र त्यांना म्हणाला, ' यज्ञावशिष्ट भक्षण करून केलेलें, मनुष्यांना दुष्कर असें कर्म अति पुण्यप्रद असून अशा मनुष्याचें जीवितहि अत्यंत प्रशंसनीय होय. अशा धर्मपरायण लोकांना, सर्व कामना परिपूर्ण होऊन, सर्वोत्कृष्ट गति प्राप्त होते. '

ऋषि—अहो, हा पक्षी विघसभेक्षकांची स्तुति करीत आहे, त्याअर्थी तो आमच्याच संबंधी निःसंशय बोलत आहे. आम्हीतर विघस सेवन करणारे आहों.

पक्षी—मी तुमची प्रशंसा करीत नाहीं. तुम्ही पापी, रजोगुणयुक्त, मंद आणि उच्छिष्टभक्षक आहां. मी प्रशंसा करीत होतों, ते विघसभक्षक निराळेच आहेत.

ऋषि—हे पक्ष्या, आम्ही ज्याचें आचरण करितों, तें अति श्रेष्ठ आहे, ह्या समजुतीनेंच आम्ही आचरितों. शकुने, याहूनहि अतिश्रेयस्कर असा दुसरा कांहीं मार्ग असेल, तर तो आम्हांला सांग. आमची तुजवर श्रद्धा जडली आहे.

पक्षी—जर आपण मजविषयीं द्विधाभाव ठेवून शंका घेणार नसाल, तर तुम्हांला खरोखर हितकारक असें कांहीं सांगेन.

ऋषि—शकुने, तुझें भाषण आम्ही ऐकूं. तुला सर्व कल्याणमार्गांचें ज्ञान आहे. हे धर्मात्मन्, तुझ्या आज्ञेंत रहावें अशी आमची इच्छा आहे. तरी तूं आतां आम्हांला धर्मासंबंधीं कांहीं सांग.

पक्षी—पशूंमध्यें धेनु, धातूंमध्यें सुवर्ण, शब्दांमध्यें मंत्र आणि मनुष्यांमध्यें ब्राह्मण हा श्रेष्ठ आहे. जीवंत ब्राह्मणाचे जातकर्मादि मंत्रोक्त संस्कार वेळचे वेळीं यथाकाल केले जातात, तसेच त्याचे मरणानंतरहि स्मशान आणि मरणसंबंधींहि वैदिक कर्मैं करण्यांत येतात. हाच सर्वोत्तम व स्वर्गप्रद असा मार्ग आहे. जर मंत्रसिद्ध कर्मैं स्वर्गाचीं साधनें नसतीं तर तीं स्वर्गाभिमानी प्राचीन ऋषींनीं मजसाठीं कशाकरितां केलीं असतीं ! याचें कारण तीं स्वर्गप्राप्तीला निमित्त होतात, हेंच होय. असा दृढनिश्चयी मनुष्य ज्या देवतेशीं आपल्या आत्म्याचें तादात्म्य करील, त्या देवतेनुरूप सिद्धींची त्याला प्राप्ति होईल. या सिद्धींपैकीं माघादिमास, शुक्लपक्षादि अर्धमास, शिशिरादि ऋतु यांच्या योगानें सूर्यमार्गप्राप्तिरूप एक सिद्धी असून क्रममुक्तिस्थानभूत ब्रह्मलोकाची प्राप्ति हें तिचें फल होय. दुसरी सिद्धि म्हणजे श्रावणादिमास, कृष्णपक्षादि अर्धमास आणि वर्षादिऋतु यांच्या योगानें प्राप्त होणारी चंद्रमार्गप्राप्तिरूपही होय. येथें वास्तव्य केल्यानें पुनर्जन्मदायक स्वर्गलोकाची प्राप्ति, हें फल प्राप्त होतें. तसेंच ज्यामध्यें हे दोन्ही

१ भुक्तशेष खाऊन राहणाऱ्यांची.

मार्ग अनवश्यक आहेत, अशी देहविसर्जनाच्या वेळीं प्राप्त होणारी तारक ब्रह्मप्राप्ति ही तिसरी सिद्धि होय. हिचें फल तत्काल मुक्ति मिळणें हें होय. कर्म अशी ज्यांना संज्ञा आहे, त्या ह्या तीन सिद्धींची सर्व जीव अपेक्षा करितात. ह्या सिद्धींचें अधिकृतस्थान असा जो गृहस्थाश्रम तो अत्यंत पुण्यप्रद आहे. म्हणून कर्मांची निंदा करणारे जे लोक त्यागमार्गाचा अवलंब करितात, ते मूढ केवळ पातकाचे धनी होतात आणि त्यांचे मनोरथहि नष्ट होतात.

देवयानमार्ग, पितृयानमार्ग आणि ब्रह्मावाप्ति या तीनहि शाश्वत मार्गांचा त्याग करून जे मूढ वर्तन करितात, त्यांना क्षुद्रयोनि प्राप्त होते. म्हणून हें वेदमंत्रांत सांगितलेलें उपासनायुक्त कर्म मी तुम्हांला देतों, तें तुमचें होवो! त्या त्या कर्मांची निष्ठापूर्वक स्थिति लावणें हेंच तपस्वी लोकांचें तप होय. केवळ शरीरशोषण करणें हें तप नव्हे. देवयान, पितृयान आणि ब्रह्मप्राप्ति ह्या शाश्वत मार्गांच्या प्रापक अशा उपासना आणि गुरूची उपचर्या ह्या गोष्टी अविरुद्धपणें करणें हें अत्यंत दुष्कर कर्म होय असें सांगितलें आहे. अशा प्रकारचें दुष्कर कर्म करूनच देव परम ऐश्वर्याला पोंचले आणि म्हणूनच ह्या दुष्कर गृहस्थाश्रमाचा स्वीकार करण्याविषयीं मी तुम्हांला सांगत आहें. मूलतः कर्म हेंच प्रजांना श्रेष्ठ आहे, यांत संशय नाहीं व तें गृहस्थाश्रमांत कुटुंबविधीच्या योगानें प्रतिष्ठित झालें आहे. सुखदुःखातीत व निर्मत्सर ब्राह्मण ह्याच आश्रमाला तप असें म्हणतात. लोक ज्याला तप असें समजतात, तें ब्रह्मचर्ययुक्त अध्ययन याहून मध्यम प्रतीचें आहे. दुसरें तप म्हणजे यज्ञिय तप होय. यांत विघसभक्षक लोक दुष्प्राप पदाला पोंचतात. प्रातःकालीं व सायंकाळीं कुटुंबामध्यें अन्नाचे योग्य विभाग करून अतिथि, देव, पितर व स्वजन यांना अर्पण करून अवशिष्ट राहिलेलें जे भक्षण करितात, त्यांना विघसभक्षक म्हणतात. म्हणून सुव्रत व सत्यवादी लोक स्वधर्माचें आचरण करून लोकांच्या गुरुपदाला पात्र होतात व त्यांना कोणत्याहि गोष्टींत संदेह राहत नाहीं. दुष्कर कर्म करणारे असे ते निर्मत्सर लोक इंद्राच्या स्वर्गाला जातात व तेथें चिरकाल वास करितात.

अर्जुन—असें धर्मार्थयुक्त व हितकारक भाषण श्रवण करून ते ब्राह्मण गृहस्थाश्रमाशिवाय सिद्धि नाहीं, असें जाणून निघून गेले व त्यांनीं गार्हस्थ्याचा स्वीकार केला. म्हणून हे सर्वज्ञा नरश्रेष्ठा, तूंहि शाश्वत धैर्याचा अवलंब करून या सर्व शत्रुरहित पृथ्वीचें शासन कर! १२. १. ११.

## अध्याय १२ वा.

[ १ नकुलानें धर्माला वर्णन करून सांगितलेलें गृहस्थाश्रममाहात्म्य. २ तिन्ही आश्रम एकीकडे व गृहस्थाश्रम एकीकडे. ]

( १ ) **वैशंपायन**—हे अरिंदमा जनमेजया, अर्जुनाचें भाषण ऐकून विशाल वक्षःस्थलाचा, महाबाहु, बुद्धिमान्, दुःखोद्विग्न व मितभाषी नकुल, आपल्या बंधूच्या मनोवृत्तीला अनुसरून सर्व धार्मिकांमध्यें श्रेष्ठ अशा युधिष्ठिराकडे पाहून बोलला.

(२) **नकुल**—हे महाराजा, विशाखयूपनामक क्षेत्रामध्यें अग्निस्थापनार्थ सर्व देवांनीं रचलेलीं स्थंडिलें अजूनहि दिसतात. त्यांवरून देव देखील कर्मफला-विषयीं उत्कंठित आहेत, हें जाण. राजा, आस्तिक व नास्तिक लोकांलाहि वृष्टि-द्वारा अन्न देणारे पितर अग्नीला तृप्त करण्याकरितां कर्म करीत असतात. ज्यांनीं ह्या वेदविधीचा अनादर केला आहे, ते अत्यंत नास्तिक होत असें समज. हे भारता, वेदविहित कर्में सोडून जरी इतर कर्में केलीं, तरी देवयानमार्गानें विप्र स्वर्गाला जाऊं शकत नाहीं. म्हणूनच वेदवेत्ते लोक गृहस्थाश्रमाला इतर आश्रमांहून श्रेष्ठ समजतात. म्हणून हे राजा, त्या वेदपारंगत ब्राह्मणांकडे जाऊन त्यांचा विचार घे. हे महाराजा, न्यायानें प्राप्त झालेली संपत्ति जो श्रेष्ठ अशा यज्ञांत अर्पण करितो, तोच जितचित्त व त्यागी होय, असें सांगि-तलें आहे. गृहस्थाश्रमांतील सुखोपभोगांकडे दुर्लक्ष करून जो वनवासादिक निष्ठापूर्वक स्वीकारतो व देहत्याग करितो, तो त्यागी तामस होय. हे पार्था, जो गृहहीन, भिक्षेकरितां फिरत राहणारा, वृक्षमूलाचा आश्रय करणारा, अन्न न शिजविणारा असा योगाभ्यासी भिक्षुक त्यागी होय. क्रोध, हर्ष व विशेषेंकरून पिशुनवृत्ति यांपासून अलिप्त राहून जो द्विज वेदाध्ययन करितो, तो सुद्धां त्यागी म्हणून समजला जातो. सर्व आश्रमांचें तुलनात्मक दृष्टीनें निरीक्षण केलें असतां तीन आश्रम एकीकडे आणि गृहस्थाश्रम एकटा एकीकडे असें विद्वान् लोक म्हणतात.

हे भारता, तिन्ही आश्रमांचें तुलनेनें परीक्षण केलें असतां असें आढळून येतें कीं ह्या गृहस्थाश्रमामध्यें विषयोपभोग आणि स्वर्ग ह्या दोहोंचीहि प्राप्ति आहे. महर्षींचा हाच स्वीकृत मार्ग आहे आणि लोकवेत्त्यांची हीच गति आहे. हे भरतश्रेष्ठा, याप्रमाणें ज्याची श्रद्धा आहे, तोच त्यागी होय.

गृहत्याग करून मूर्खांप्रमाणें वनाला गमन करितो तो त्यागी नव्हे. तेथें असतां त्या धर्मध्वजी मनुष्याला विषयांचें जर स्मरण झालें, तर यमराज आपल्या मृत्युपाशानें त्याला बद्ध करितो. हे महाराजा, अभिमानानें केलेलें कोणतेंहि कर्म कधीं फलदायक होत नाहीं. निरपेक्षतेनें केलेल्या कर्माला सर्वत्र महाफल मिळतें. शम, दम, तसेंच धैर्य, सत्य, पावित्र्य, नम्रता, यज्ञ, दृढनिश्चय व धर्म हा विधि ऋषींना हितकारक म्हणून सांगितला आहे. ह्या गृहस्थाश्रमांतच देव, पितर व अतिथि ह्यांसंबंधीं केलें जाणारें कर्म प्रशंसनीय म्हणून सांगितलें आहे व ह्याच आश्रमांत हे महाराजा, धर्म, अर्थ आणि काम हे त्रिवर्ग फलदायक होत असतात. ह्याच आश्रमांत स्थित असलेल्या अनिषिद्ध कर्मांवर निष्ठा ठेवून वागणाऱ्या त्यागी मनुष्याचा कधींहि नाश होत नाहीं.

राजा, विविध दक्षिणांनीं युक्त असे यज्ञ करून आपल्याला अर्पण करितील, ह्या उद्देशानें धर्मात्म्या व निष्पाप ब्रह्मदेवानें प्रजा उत्पन्न केल्या. तद्वतच यज्ञार्थ लता, ओषधि, वृक्ष, मेध्य पशु आणि होमद्रव्यें त्यानें निर्माण केलीं आहेत. गृहस्थाश्रम पालन करून राहणाऱ्याला हें यज्ञकर्म करतांना अडचणी येत असल्यामुळें ह्या आश्रमाचें योग्य आचरण अति दुष्कर व दुर्लभ आहे. हे महाराजा, गृहस्थाश्रमी असून व पशु-धन-धान्यसंपन्न असूनहि जे यज्ञ करीत नाहींत, त्यांना निरंतर पाप लागतें. ऋषिलोक अध्ययनमार्गानें यज्ञ करितात, दुसरे कांहीं ज्ञानयोगानें यज्ञ करतात आणि दुसरे कांहीं अंतःकरणमार्गानेंच महायज्ञाची उपासना करितात. ह्याप्रमाणें हे नृपा, मनःशांति प्राप्त करून देणाऱ्या मार्गाचें अवलंबन करणाऱ्या व ब्रह्मामध्यें लीन झालेल्या द्विजाचा देव सुद्धां हेवा करितात. यज्ञांमध्यें निरनिराळया देशांतून हरण केलेल्या आश्चर्यभूत रत्नांचें दान करण्याचें सोडून देऊन तूं नास्तिक्याच्या वल्गना करीत आहेस. हे नराधिपा, कौटुंबिक पुरुषाला त्याग करतां येतो, असें मला वाटत नाहीं. म्हणून राजसूय, अश्वमेध तसेच दुसरेहि कित्येक ब्राह्मणांना पूजार्ह असे यज्ञयाग देवाधिपति इंद्राप्रमाणें तूं कर! राजाच्या प्रमाददोषानें चोर प्रजेला लुटित असतां जो राजा प्रजाजनांचें संरक्षण करूं शकत नाहीं, त्याला कलि असें म्हटलें आहे.

हे नृपते, मात्सर्ययुक्त मतानें आमच्या हातून जर अश्व, धेनु, दासी, अलंकारभूषित हत्तिणी, ग्राम, देश, शेतें आणि गृहें यांचें ब्राह्मणांस दान

होणार नाहीं, तर आम्ही राजकलि होऊं आणि दान न करणारे व प्रजारक्षण करण्यास असमर्थ असल्यामुळें राजाचे सर्व पातकांचे धनी होऊं व सुखोपभोग न घेतां दोषांचे मात्र अधिकारी होऊं. हे प्रभो, महायज्ञ न करतां, पितरांना स्वधा न देतां, तीर्थस्नान न करतां जर तूं संन्यास घेशील, तर वाऱ्यामुळें छिन्नविच्छिन्न झालेल्या मेघाप्रमाणें तुझा नाश होऊन जाईल व दोन्ही लोकांपासून च्युत होऊन तूं पिशाचयोनीप्रत जाशील. मनाच्या आंतबाहेर बंधनास कारण-भूत–मोह उत्पन्न करणारें–जें असेल, त्याचा त्याग करून त्यागी व्हावें. तुला वाटतें त्याप्रमाणें बंधुबांधवांचा त्याग करून अरण्यांत गेल्यानें कोणी त्यागी होत नाहीं. हे महाराजा, गृहस्थाश्रमामध्यें राहून अनिषिद्ध कर्म करून राह-णाऱ्या ब्राह्मणाचा उच्छेद कधीं होत नाहीं. इंद्रानें दैत्यांचा युद्धामध्यें नाश करावा, त्याप्रमाणें समृद्ध शत्रूंचा वेगानें निःपात केल्यावर श्रेष्ठ नृपतींनीं आच-रित व स्मृतीमध्यें सांगितलेल्या धर्मामध्यें रत असा कोण क्षत्रिय शोक करीत बसेल ? हे नरेंद्रा, क्षात्रधर्मयोग्य पराक्रमानें संपादन केलेली ही पृथ्वी मंत्र-वेत्त्या पुरुषांना जर तूं अर्पण केलीस, तर तूं स्वर्गाला जाशील. यास्तव हे पार्था, तुला हा शोक करणें योग्य नव्हे. १२. १. १२.

## अध्याय १३ वा.

[ १ सहदेवाचें भाषण. ]

**सहदेव**—हे भारता, केवळ बाह्य वस्तूंचा त्याग करून सिद्धि मिळणें शक्य नाहीं. शरीरवासनांचा त्याग केल्यानेंहि सिद्धि मिळेल किंवा नाहीं ही गोष्ट शंकास्पद आहे. कारण, एकदां त्याग केल्यावर मनश्चांचल्यामुळें पुनः वासनांचा आश्रय करणें शक्य आहे. बाह्य उपाधीपासून मुक्त पण शरीरवासनारत अशा मनुष्याला जो धर्म व जें सुख प्राप्त होईल, तें आमच्या शत्रूंना मिळावें आणि शारीरिक वासनांचा त्याग करून पृथ्वीचें अनुशासन करणाऱ्याला ज्या धर्माचा आणि सुखाचा लाभ मिळेल, तें आमच्या हितचिंतकांना मिळावें. मम ( माझें ) म्हणजे शारीरिक वासनांचा स्वीकार हा दोन अक्षरी साक्षात् मृत्यु असून न मम ( माझें नाहीं ) म्हणजे त्यांचा परित्याग हें तीनअक्षरी शाश्वत ब्रह्म आहे. हे राजा, म्हणून ब्रह्म आणि मृत्यु यांचें दोहोंचें वसतिस्थान आमच्या शरीरांतच आहे. ते अदृश्य स्थितींत राहून प्राण्यांचें परस्परांशीं युद्ध

करवीत आहेत, यांत संशय नाहीं. हे भरतकुलोत्पन्ना, प्राण हा अमर आहे, हें जर निश्चित आहे, तर प्राण्यांचें शरीर नष्ट केल्यानें कांहीं हिंसा होणार नाहीं. आतां शरीराच्या उत्पत्ति व नाश यांबरोबर जर प्राण उत्पन्न होतो व नाश पावतो, तर शरीर नाश होतांच प्राणहि नष्ट होईल व तो न राहिल्यामुळें कर्ममार्ग व्यर्थ आहे असें होईल. म्हणून अरण्यांत जाऊन एकांतवासाचा विचार सोडून जो मार्ग पुरातन लोकांनीं व त्यांहूनहि प्राचीन अशा आमच्या पूर्वजांनीं अवलंबिला त्याच मार्गाचा स्वीकार करणें सुज्ञांना श्रेयस्कर आहे. सर्व स्थावर-जंगमात्मक पृथ्वीचा लाभ होऊनहि जो राजा तिचा योग्य रीतीनें उपभोग घेत नाहीं, त्याचें जीवित निष्फल होय. किंवा हे राजा, अरण्यामध्यें वास करून व कंदमूलादि वन्य वस्तूंवर उपजीविका करून जो शरीरांतभूंत विषयांचा अभिलाष करितो, तो मृत्युमुखांतच राहत असतो.

हे भारता, प्राण्यांचे बाह्य व आभ्यंतर स्वभाव तूं अवलोकन कर म्हणजे ते दोन्ही स्वस्वरूपीच आहेत, असें तुला आढळून येईल. जे नित्यसिद्ध असें आत्मरूप जाणतात, ते संसारभयापासून मुक्त होतात. माझा पिता, माता, बंधु व गुरु ह्या सर्वांच्या ठिकाणीं तूंच आहेस; म्हणून दुःखपीडित होऊन शोकानें केलेल्या भाषणाबद्दल मला क्षमा कर. हे भारतश्रेष्ठा, मीं भक्तीनें केलेलें भाषण सत्य आहे किंवा असत्य आहे, याचा तूंच विचार कर! १२. १. १३.

## अध्याय १४ वा.

[ १ द्रौपदीचें सामोपचाराचें भाषण. २ द्रौपदी युधिष्ठिराला त्याच्या पूर्वीच्या भाषणाची आठवण देते. ३ द्रौपदीचें राज्याचा उपभोग घेणें, हाच क्षत्रियाचा धर्म असें प्रतिपादन. ]

( १ ) **वैशंपायन**—हे जनमेजया, ह्याप्रमाणें ते ते विविध वेदसिद्धांत बंधूंनीं सांगितले, तरी कुंतीपुत्र धर्मराज युधिष्ठिरानें कांहींहि भाषण केलें नाहीं. तेव्हां महाकुलवती, यशस्विनी व सर्व स्त्रियांमध्यें श्रेष्ठ अशा द्रौपदीनें बोलण्यास प्रारंभ केला. आपल्या कळपांतील गजनायकाच्या सभोंवतीं ज्याप्रमाणें इतर गज बसतात, त्याप्रमाणें सिंह-शार्दूलांसमान बंधूंनीं वेष्टित अशा त्या नृपश्रेष्ठ युधिष्ठिराची अनुज्ञा घेऊन ती धर्मज्ञ व धर्मदर्शिनी द्रौपदी बोलली. तिला युधिष्ठिराचा मोठा अभिमान होता व तिजवर त्याचेंहि तसेंच प्रेम

होतें. तिनें त्याजकडे प्रथम अवलोकन केलें आणि नंतर अत्यंत मनोवेधक व सामोपचाराचें भाषण केलें.

( २ ) द्रौपदी—हे पार्था, हे तुझे बंधु चातकाप्रमाणें क्षीण होऊन अत्यंत आक्रोश करीत आहेत. तरीहि तूं त्यांचें अभिनंदन करीत नाहींस. हे महाराजा, उन्मत्त गजांप्रमाणें ज्यांची थोर योग्यता, परंतु सतत दुःख पावलेल्या बंधूंना योग्य शब्दांनीं आनंदित कर ! राजा, पूर्वी द्वैतवनामध्यें थंडी, वारा आणि ऊन यांनीं पीडित झाले असतां या बंधूंना तूं म्हटलें होतेंस कीं ' विजयाच्या इच्छेनें आम्हीं दुर्योधनाचा रणांत वध करून संपूर्ण पृथ्वीचा उपभोग घेऊं; शत्रूंचे रथ भग्न करून टाकूं; त्यांच्या महागजांचा वध करूं आणि शत्रूंचे रथ आणि सादी यांचें भूमीवर अंथरूण पसरूं ! पुढें मोठमोठ्या दक्षिणांनीं युक्त असे विविध व समृद्ध यज्ञ करून वनवासाच्या योगानें होणारें दुःख तुम्हांला सुखकारक होईल.' हे धार्मिकश्रेष्ठा, तशा प्रकारचें त्यावेळीं भाषण करून आज तूं उलट प्रकारच्या भाषणानें आमचीं मनें कां व्यथित करीत आहेस ? अधीर मनुष्य पृथ्वीच्या तसाच द्रव्याच्याहि उपभोगाला योग्य नाहीं. ज्याप्रमाणें चिखलांत मासे राहत नाहींत, त्याप्रमाणें त्याच्या गृहांत त्याचे पुत्रहि राहत नाहींत.

( ३ ) हे भारता, ज्याच्या हातांत शासनदंड नाहीं, तो क्षत्रिय शोभत नाहीं. तो भूमीचा उपभोग घेण्यासहि समर्थ होत नाहीं; शासनदंडविरहित राजाच्या प्रजांना सुख कधींहि मिळत नाहीं. हे राजसत्तमा, सर्व भूतांच्या ठिकाणीं मित्रता, दान, अध्ययन आणि तप हा ब्राह्मणांचा धर्म आहे, तो क्षत्रियाचा धर्म नव्हे. दुष्टांना दंड करणें, सज्जनांचें पालन करणें आणि समरांतून पळून न जाणें हा राजांचा श्रेष्ठ धर्म आहे. ज्याच्या ठिकाणीं क्षमा आणि क्रोध, दान देणें व घेणें, भय आणि अभय, निग्रह व अनुग्रह हे गुण असतात, त्यालाच धर्मवेत्ता म्हणतात. तूं अध्ययन, दान, साम, यज्ञ किंवा याचना यांच्या योगानें ही पृथ्वी मिळविली नाहींस. तूं गज, अश्व आणि रथ या तीन अंगांनीं युक्त; द्रोण, कर्ण, अश्वत्थामा आणि कृपाचार्य यांनीं रक्षित; प्रभुशक्ति, मंत्रशक्ति आणि उत्साहशक्ति या तीन शक्तींनीं संपन्न आणि शौर्यानें युद्धोत्सुक अशा शत्रुसैन्याचा पराजय केला आहेस. त्याअर्थीं हे वीरा, तूं ह्या पृथ्वीचा उपभोग घे ! प्रभो, अनेक देशांनीं युक्त असें हें जंबुद्वीप तूं आपल्या दंडशक्तीनें जिंकून

घेतलें आहेस. त्याचप्रमाणें तूं आपल्या दंडशक्तीनें जंबुद्वीपासारखें मेरुपर्वताच्या पश्चिमेस असलेलें क्रौंचद्वीप संपादन केलें आहेस. शिवाय हे नराधिपा, त्या क्रौंचद्वीपासमान मेरूचे पूर्वेकडील शाकद्वीप तूं त्याच दंडशक्तीच्या बलावर मिळविलें आहेस. त्या महामेरूच्या उत्तरेस असलेलें व शाकद्वीपाच्या तोडीचें भद्राश्व द्वीप तूं आपल्या पराक्रमानेंच पादाक्रांत केलें आहेस. हे वीरा, तसेंच समुद्रमार्गानें प्रवास करून अनेक देशांनीं युक्त हीं व त्यांच्या मध्यवर्ती असलेलीं दुसरींहि द्वीपें तूं आपल्या वीर्यानें मिळविलीं आहेस.

हे भारता, अशा प्रकारचीं अप्रतिम कार्यें केल्यावर ब्राह्मणांच्या सन्मानास तूं पात्र झालास, तरी ती गोष्ट तुझ्या मनाला प्रिय झाली नाहीं. आतां तूं ह्या आपल्या बंधूंकडे पहा आणि त्यांना संतुष्ट कर. शत्रूंचा मार सोसणारे, त्यांना ताप देणारे, देवांसमान ते आहेत. तसेच ते मदोन्मत्त ऋषभांप्रमाणें किंवा ऊर्जित गजेंद्राप्रमाणें सामर्थ्यवान् आहेत. ह्यांपैकीं कोणाहि एकाचा पराक्रम मला सुखदायक होईल, असें वाटतें. मग हे पुरुषव्याघ्रा, शरीराच्या व्यापारांस कारणभूत होणाऱ्या समस्त इंद्रियांप्रमाणें हे माझे नरश्रेष्ठ पति एकत्र झाल्यास माझ्या सुखाची योग्यता काय वर्णावी ? माझी सर्वज्ञ, आणि सर्वदर्शी सासूबाई हिनें ‘ पांचालि, युधिष्ठिर तुला उत्कृष्ट सुखामध्यें सर्वदा ठेवील, असें सांगितलें होतें,’ तें कधीं खोटें होणारें नाहीं.

हे जनाधिपा, सहस्रावधि राजांचा आम्हीं ज्या सुखाकरितां वध केला, तो सर्व ह्या तुझ्या मोहामुळें व्यर्थ होत आहे, असें मला वाटतें. जेथें वडील बंधूच उन्मत्त झाला आहे, तेथें इतर सर्व त्याचेंच अनुकरण करणारे होतात. यास्तव हे महाराजा, तुझ्या ह्या उन्मादामुळें इतर सर्व पांडव वेडे झाले आहेत. हे राजा, जर हे तुझे बंधु तुझ्यासारखे उन्मत्त झाले नसते, तर त्यांनीं इतर नास्तिकांसह तुला बांधून ठेवून पृथ्वीचें शासन केलें असतें. जो मूढ अशा-प्रकारचें वर्तन करितो, त्याचें कल्याण कधींहि होत नसतें. जो मनुष्य उन्मार्गानें जातो, त्याला धूप, अंजनें, अथवा नाकांत घालण्याचें नस्य, अशा प्रकारचे औषधोपचारांनीं चिकित्सा केली पाहिजे. हे भरतसत्तमा, माझे पुत्र मला फसवून स्वर्गाला गेले असतांहि मी जगण्याची इच्छा करीत आहें, त्याअर्थीं सर्व स्त्रियांमध्यें मी अधम आहें. हे तुझे बंधु तुझी समजूत घालण्याच्या कामीं प्रयत्न करीत असतां त्यांचा अनादर करून आज मीं जें कांहीं सांगितलें तें

खोटें नाहीं. हे राजसत्तमा, तूं सर्व पृथ्वीचा त्याग करून आपण स्वतःच आपणाला विपत्तींत घालीत आहेस. हे राजन्, पृथ्वीवर राजांमध्यें जसे मांधाता आणि अंबरीष हे सर्वमान्य राजे होऊन गेले, त्याप्रमाणें तूंहि शोभिवंत हो ! धर्मानें प्रजेचें पालन करून पर्वत, वनें आणि द्वीपें यांसह सर्व पृथ्वीचें शासन कर. राजा, तूं विमनस्क होऊं नकोस. हे नृपोत्तमा, विविध यज्ञ कर, शत्रूंशीं युद्ध कर आणि ब्राह्मणांना विपुल धन, भोग आणि वस्त्रें यांचें दान दे. १२. १. १४.

---

## अध्याय १५ वा.

[ १ शासनदंड हाच धर्मार्थकामांचें संरक्षण करणारा आहे असें अर्जुनाचें भाषण. २ हिंसेशिवाय कोणाचीहि उपजीविका चालत नाहीं. ३ उत्कृष्ट चालविलेला दंड प्रजेचें रक्षण करितो. ४ दंड निर्माण करण्याचें कारण.]

( १ ) वैशंपायन—द्रौपदीचें हें भाषण ऐकून अर्जुन आपल्या महाबाहु ज्येष्ठ बंधूच्या अनुमतीनें पुनरपि त्याला बोलला.

अर्जुन—दंड हाच सर्व प्रजांचें शासन करितो. दंड हाच सर्वांचें रक्षण करितो. लोक जरी निद्रित असले, तरी ही दंडरूपी शासनपद्धति जागृत असते. शहाणे लोक दंडालाच धर्म म्हणतात. हे जनाधिपा, दंड हा धर्माचें तसेंच अर्थाचें संरक्षण करितो, दंड हा कामाचेंहि संरक्षण करितो; म्हणून दंडाला त्रिवर्ग म्हणतात. धान्याचें रक्षण दंडानें होतें. धनाचें रक्षण दंडानें होतें. म्हणून तूं या दंडाचा स्वीकार कर आणि लोकव्यवहाराकडे दृष्टि दे. कित्येक पापी राजदंडाच्या भीतीनें पाप करीत नाहींत. कित्येक यमदंडाच्या भीतीनें, तर कित्येक परलोकभयानें पाप करीत नाहींत. तसेंच कित्येक पापी परस्परांच्या भीतीमुळें पापकर्म करीत नसतात. असें निसर्गसिद्ध असल्यामुळें सर्व गोष्टी दंडाच्या स्वाधीन असतात. दंडाच्या भीतीमुळें कांहीं प्राणी परस्परांस भक्षण करीत नाहींत. जर दंडाच्या योगानें लोकांचें संरक्षण झालें नाहीं, तर ते गाढ अंधकारांत निमग्न होऊन जातील. दंड हा उद्धट लोकांचें दमन करितो व नीच लोकांना शिक्षा करितो. दमन आणि दंडण या दोन गुणांमुळेंच शहाणे लोक ह्याला दंड म्हणत असतात. वाचा हा ब्राह्मणांचा, बाहुवीर्य हा क्षत्रियांचा आणि दान हा वैश्यांचा दंड आहे. शूद्र हा निर्दंड म्हणून सांगितला आहे. मर्त्यांना मोह होऊं नये व धनादिकांचें रक्षण

व्हावें, म्हणून हे राजा, दंड नांवाची मर्यादा घालून ठेविली आहे. ब्रह्मचारी, गृहस्थ, वानप्रस्थ आणि भिक्षुक (संन्यासी) हे दंडाच्या भीतीनें आपापल्या मार्गांत राहतात. हे राजन्, जो भित्रा असेल, त्याच्या हातून यज्ञ कधीं घडावयाचे नाहींत, त्याला कधीं दान देण्याची इच्छा होणार नाहीं. शत्रूचीं मर्मस्थळें भिन्न केल्यावांचून, दुष्कर कर्म केल्यावांचून आणि मत्स्यघाती कोळ्याप्रमाणें अनपकारी लोकांच्या वधावांचून मोठी संपत्ति कधीं मिळत नाहीं.

(२) जो शत्रुघात करीत नाहीं, त्याला कीर्ति, द्रव्य आणि संततिहि प्राप्त होत नाहीं. वृत्रवधानेंच इंद्र महेंद्रपद पावला. ज्या देवांनीं शत्रुवध केला, त्यांचीच लोक विशेष पूजा करितात. हे भारता, रुद्र, स्कंद, शक्र, अग्नि, वरुण, यम, काल, वायु, मृत्यु, कुबेर, रवि, वसु, मरुत्, साध्य आणि विश्वेदेव ह्या सर्व देवांना लोक नमस्कार करितात; कारण ह्यांच्या पराक्रमानेंच लोक त्यापुढें नम्र होतात. लोक ब्रह्मा, धाता अथवा पूषा यांची केव्हांहि आराधना करीत नसतात. सर्व कर्मांमध्यें प्रशांत लोक सर्व प्राण्यांसंबंधानें तटस्थ, इंद्रियदमन करून राहणारे आणि शांतिपरायण अशा लोकांचा सहज पराजय करितात. हिंसा न करितां कोणीहि आपली उपजीविका करीत आहे, असें मला वाटत नाहीं. प्राणी प्राण्यांवर उपजीविका करितात, बलिष्ठ दुर्बलांवर आपला निर्वाह चालवितात. हे राजा, नकुल उंदराला खातो, मांजर नकुलाला, कुत्रा मांजराला खातो, तसाच चित्ता कुत्र्याचें भक्षण करितो. ह्या सर्वांवर आपला निर्वाह मनुष्यें करितात. पूर्वीं निघून गेलेल्या काळाकडे जरा नजर टाक पाहूं! हें जें सर्व स्थावरजंगमात्मक दिसत आहे, तें सर्व प्राण्यांचें अन्न आहे. कर्म हें दैवनिर्मितच असल्यामुळें विद्वान् लोक त्यासंबंधी भ्रमांत कधीं पडत नाहींत.

हे राजेंद्रा, ज्याप्रमाणें तुझा जन्म झाला आहे, त्याप्रमाणेंच तुला वागलें पाहिजे. क्रोध आणि हर्ष यांना दूर लोटून ज्या मंद क्षत्रियांनीं वनाचा आश्रय केला त्यांनाहि हिंसेवांचून प्राणयात्रा चालवितां आली नाहीं. उदकामध्यें, भूमीमध्यें आणि फलांमध्यें पुष्कळ प्राणी असतात, त्यांना कोणी मारीत नाहीं, असें नाहीं. हा वध प्राणयात्रेशिवाय दुसऱ्या कशाकरितां बरें होत असतो? कांहीं प्राणी इतके सूक्ष्म असतात कीं, ते केवळ तर्कगम्य असतात. डोळ्याचें पातें हालविल्यानें देखील त्यांच्या शरीराचा नाश होतो. ज्यांचा क्रोध आणि मत्सर नष्ट

झाला आहे, असे मुनि गांवांतून निघून वनांत राहण्याला जातात, तथापि तेथेंहि मोहवश होऊन ते पुनः कुटुंबधर्मी होतात, असें आढळून येतें. भूमि नांगरून व वनस्पतींचा छेद करून, वृक्षादिकांना, पक्ष्यादिकांना आणि पशु इत्यादिकांना मारून मनुष्यें यज्ञ करितात व त्यायोगानें स्वर्गाला जातात. हे कुंतीपुत्रा, दंडनीति एकदां अमलांत आली असतां प्राण्यांचे सर्व उपक्रम सिद्धीला जातात, ह्याविषयीं मला संशय नाहीं. लोकांत जर दंड नसता, तर ह्या सर्व प्रजांचा नाश झाला असता आणि जलांतील मत्स्यांप्रमाणें बलवत्तर प्राण्यांनीं दुर्बल प्राण्यांचें भक्षण केलें असतें.

( ३ ) पूर्वी ब्रह्मदेवानें सांगितलें आहे कीं, उत्कृष्ट पद्धतीनें चालविलेला दंड हा प्रजेचें संरक्षण करण्यास समर्थ होतो, तें सत्य आहे. अग्नि शांत झाले असतां फूत्कार घालून त्यांची निर्भर्त्सना केली असतां दंडभयानेंच ते प्रज्वलित होतात पहा! चांगलें आणि वाईट ह्या दोहोंची निवड करणारा दंड जर लोकांत नसता, तर हें सर्व जग अंधकारमय होऊन कांहींहि ओळखतां आलें नसतें. जे वेदनिंदक नास्तिक मर्यादा सोडून वागतात, ते दंडाचा मार होऊं लागला असतां मर्यादा पालन करूं लागतात. एकंदरींत दंडाच्याच योगानें सर्व लोक मर्यादेंत राहतात. शुचि मनुष्य ह्या लोकांत दुर्लभ आहे. तो केवळ दंडाच्या भीतीनें मर्यादेचें उल्लंघन करीत नाहीं.

( ४ ) चातुर्वर्णाच्या आनंदाकरितां, सुनीतीच्या प्रवृत्तीकरितां आणि धर्मार्थांचे रक्षणाकरितां विधात्यानें दंड निर्माण केला आहे. जर पक्षी आणि श्वापदें यांना दंडाची भीति नसती, तर त्यांनीं पशु, मनुष्यें आणि यज्ञार्थ योजलेलीं हविर्द्रव्यें यांचें भक्षण केलें असतें. लोकांचें संरक्षण करण्यास दंड नसता, तर ब्रह्मचाऱ्यानें अध्ययन केलें नसतें, दुभत्या धेनूचें दूध कोणीं काढलें नसतें व कन्याहि विवाह करून घेण्याला तयार झाल्या नसत्या. जर दंड नसता, तर चोहोंकडे सर्वांचा लोप झाला असता, मर्यादांचा भंग झाला असता आणि ममत्वाची ओळखहि कोणाला राहिली नसती. जर लोकांत दंड नसता, तर ब्राह्मणांनीं कोणाचीहि भीति न ठेवितां बारा महिने चालणारे असे मोठमोठे दक्षिणायुक्त यज्ञ केले नसते. विधीप्रमाणें यथाशास्त्र कोणी आश्रमधर्म पाळले नसते. कोणीं विद्याहि संपादन केली नसती. जर दंडाचें बंधारण नसतें तर उंट, बैल, अश्व, खेंचरें आणि गर्दभ यांना वाहनांस जोडलें असतांहि त्यांनीं तीं वाहिलीं नसतीं.

सेवकांनीं आपल्या धन्याच्या आज्ञा पाळल्या नसत्या व बालकांनींहि वडिलांचा आज्ञाभंग केला असता. दंडाची भीति नसती तर स्त्रियांनीं धर्माचरण केलें नसतें. सर्व प्रजा दंडानें आपापल्या धर्मांत राहतात. विद्वान् लोक दंडाच्या भीतीनें सर्वदा वागतात. ह्या दंडाच्या योगानें स्वर्गलोक किंवा इहलोक या ठिकाणीं सुप्रतिष्ठा प्राप्त होत्ये. जेथें शत्रुविनाशक दंडाची क्रिया चालू आहे, तेथें असत्य, पाप किंवा वंचना यांचा मागमूसहि नसतो. दंड जर उगारला नाहीं, तर कुत्रा हविर्द्रव्याला चाटीत राहील आणि कावळाहि पुरोडाश दूर पळवून नेईल.

हें राज्य, धर्मानें मिळविलेलें असो अथवा अधर्मानें प्राप्त झालेलें असो, त्याविषयीं किमपिहि शोक करूं नकोस. भोगांचा उपभोग घे आणि यज्ञ कर! श्रीमंत लोक सुखानें उत्तम अन्न भक्षण करितात, धर्म करितात आणि शुचिवस्त्रें धारण करितात. सर्व गोष्टी द्रव्याच्या स्वाधीन आहेत, ह्यांत संशय नाहीं. आणि तें द्रव्य दंडाच्या आधीन आहे. तेव्हां दंडाचें गौरव किती आहे, तें पहा. या जगांत लोकयात्रा उत्तमप्रकारें चालावी म्हणून धर्मप्रवचन केलें जातें. कारण अहिंसा कधीं कधीं हिंसा होत असते. उदाहरणार्थ, गाईच्या गोठ्यांत शिरलेल्या वाघाची हिंसा केली नाहीं, तर धेनुहत्या होऊन हिंसादोष लागेल. म्हणून अशा समयीं अनाथांचे संरक्षणार्थ धर्माचें अवलंबन करणें अवश्य आहे. जगामध्यें अत्यंत असें गुणवत् कांहीं नाहीं किंवा अत्यंत निर्गुण असेंहि कांहीं नाहीं. सर्व कार्यांमध्यें चांगलें वाईट हीं उभयहि असल्याचें दिसून येतें. कोणी पशूंचा वृषण छिन्न करितात, नंतर शृंगांची वाढ होऊं नये म्हणून त्यांचें मस्तक ठेंचतात, कित्येक त्यांजवर ओझीं लादतात, त्यांना बांधतात, आणि त्यांना आपल्या आज्ञेंत ठेवतात. ह्याप्रमाणें ह्या जगतांत असत्य लोकांनीं अन्याय चालविल्यामुळें धर्मन्यायाचा तूं स्वीकार कर; सनातन धर्माचें आचरण कर; यज्ञ कर, दानें दे; प्रजा रक्षण कर, धर्माचें पालन कर; शत्रूंचा वध कर आणि मित्रांचें पोषण कर. हे पार्थिवा, शत्रूंचा वध करतेवेळीं तुला दैन्य उत्पन्न होऊं नये. हे भारता, तसें करण्यांत कर्त्याला पातक लागत नसतें. हातीं शस्त्र घेऊन आपल्यावर आलेल्यावर तुटून पडून त्याचा वध केल्यास त्या वधाचें आपणाला पातक लागत नाहीं. कारण, तेथें एकाचा क्रोध दुसऱ्याच्या क्रोधाला चेतवणारा असतो. वस्तुतः आत्मा हा अवध्य आहे; यांत संशय नाहीं. आत्मा अवध्य असतां तो एखाद्याला वध्य कसा होईल? ज्याप्रमाणें एका गृहांतून निघून मनुष्य दुसऱ्या गृहांत जातो, त्याप्रमाणें जीव

हा त्या त्या शरीरामध्यें प्रवेश करितो. जुन्या जीर्ण देहांना टाकून तो नवीन शरीरांमध्यें प्रवेश करितो. अशा रीतीनें तत्त्ववेत्ते लोक शरीराला मृत्युमुख म्हणत असतात. १२. १. १५.

---

## अध्याय १६ वा.

[ १ भीमसेनाचें भाषण. ]

( १ ) वैशंपायन—अर्जुनाचें हें भाषण ऐकल्यावर तो असहिष्णु व तेजस्वी भीमसेन धैर्याचा अवलंब करून आपल्या ज्येष्ठ बंधूस म्हणाला, ' हे राजा, तुला सर्व धर्मांचें ज्ञान आहे. तुला माहीत नाहीं, असें कांहींच नाहीं. म्हणून तुझ्या चरित्रापासून आम्ही शिक्षण घेत आहों; परंतु त्याप्रमाणें सर्वदा वागणें आम्हांला शक्य नाहीं. बोलूं नये, बोलूं नये, असें माझ्या मनांत होतें; परंतु हे जनाधिपा, अतिदुःखामुळें अंतःकरणांत ठेवलेले माझे विचार मी आतां तुला सांगतों, ते ऐक. तुझ्या मोहामुळें आम्हीं केलेलें सर्व संशयास्पद होऊन आम्ही व्याकुलता व दौर्बल्य यांना मात्र पात्र झालों आहों. सर्वशास्त्रपारंगत असा तूं लोकांचा राजा असूनहि दैन्यामुळें मोह पावलेल्या एकाद्या सामान्य माणसाप्रमाणें मोहांत कां सांपडत आहेस ? हे प्रभो, लोकांना सन्मार्ग कोणता आणि दुर्मार्ग कोणता हें तुला माहीत आहे. वर्तमानकाल आणि भविष्यकाल ह्यांपैकींहि अज्ञात असें तुला कांहीं नाहीं. हे राजा, अशा परिस्थितींत राज्य करण्याची युक्ति तुला मी सांगतों, ती एकाग्र चित्तानें ऐक.

व्याधि ही शारीरिक व मानसिक अशा दोन प्रकारची असते. त्यांची उत्पत्ति परस्परांपासून होत असते. त्यामुळें हे एकाकी कधीं आढळून येत नाहींत. शारीर व्याधीपासून मानस व्याधीचा जन्म होतो, यांत संशय नाहीं व मानस-व्याधीपासून शारीरव्याधीची उत्पत्ति होते हेंहि सत्य आहे. होऊन गेलेल्या शारीर आणि मानस दुःखाबद्दल जो शोक करितो, त्याला एका दुःखानें दुसरें दुःख होतें व त्याच्यावर दोन अनर्थ ओढवतात. कफ, पित्त आणि वायु हे तीन शरीरांत उत्पन्न होणारे धर्म असून ते समान प्रमाणांत असणें हें स्वास्थ्याचें चिह्न समजलें जातें. त्यांपैकीं एकाचा अतिरेक झाला असतां त्याची चिकित्सा सांगतों. उष्णानें शीताचें निवारण होतें व शीतानें उष्णाचा नाश होतो. सत्त्व,

रज आणि तम हे तीन मानस धर्म आहेत. त्यांचें समप्रमाणांत अस्तित्व हें मानस स्वास्थ्याचें लक्षण आहे. त्यांपैकीं एकाचें प्रमाण वाढल्यास त्यावर कोणती उपाययोजना करावी तें सांगतों. हर्षानें शोकाचा नाश होतो व हर्ष शोकानें नष्ट होतो. कोणी एखादा सुखांत असला म्हणजे त्याला दुःखाचें स्मरण होतें व दुःखी मनुष्याला सुखाची आशा उत्पन्न होते.

युधिष्ठिरा, तूं दुःखी नाहींस किंवा सुखीहि नाहींस. मग सुखामुळें दुःखाची व दुःखामुळें सुखाची इच्छा होणें तुला योग्य नाहीं. असें असून जर तुला सुखजन्य दुःख व दुःखजन्य सुख ह्यांचें स्मरण होत असेल, तर दैवच बलवत्तर होय, असें म्हटलें पाहिजे. अथवा हे राजा, दुःखांचें स्मरण करून त्रास करून घेण्याचा तुझा स्वभावच असेल, तर आम्हीं पांडुपुत्रांनीं डोळे मिटले असतां एकवस्त्रा व रजस्वलावस्थेंत असलेल्या अशा द्रौपदीस सभेंत नेलेलें पाहिल्याचें तुला कसें स्मरत नाहीं ? आम्हांला नगराचा त्याग करावा लागला, आम्हांला मृगाजिन परिधान करावें लागलें आणि मोठ्या अरण्यांत जाऊन वास्तव्य करणें भाग झालें, हें तुला आठवत नाहीं काय ? जटासुरापासून सहन केलेले त्रास, चित्रसेनाबरोबर केलेलें युद्ध आणि जयद्रथापासून झालेले उपद्रव ह्यांचें विस्मरण तुला कसें होतें ? तसेंच पुनः अज्ञातवासामध्यें राजकन्या द्रौपदीचा कीचकानें लत्ताप्रहारानें केलेला मरणप्राय अपमान तूं कसा विसरलास ?

हे अरिंदमा, भीष्मद्रोणांबरोबर ज्या तऱ्हेचें युद्ध केलेंस, त्याच प्रकारचें पण अंतःकरणामध्यें करावयाचें असें युद्ध आज तुझ्या पुढें उपस्थित झालें आहे. तेथें शरांचा, मित्रांचा व बंधूंचा कांहीं उपयोग नाहीं. तें युद्ध एकट्या अंतःकरणानेंच करावयाचें आहे. अशाप्रकारचें युद्ध आज तुझ्या पुढें उभें राहिलें आहे. ह्या युद्धामध्यें पराजित होऊन तूं जर प्राणत्याग करशील, तर अन्य देह घेऊन सुद्धां तेंच युद्ध करावें लागेल. हे भरतश्रेष्ठा, आपल्या कर्मांनीं व्यक्त असलेल्या स्थूल शरीराचा त्याग करून अव्यक्तरूप असें मन जिंकण्याकरितां तूं आजच सिद्ध हो. हें युद्ध न जिंकल्यास तुझी काय अवस्था होईल बरें ? पण तें जिंकून तूं धन्य होशील, अशा प्रकारचा बुद्धीचा निश्चय करून, प्राण्यांची जननमरणगति जाणून आपल्या पितृ-पितामहादि पूर्वजांनीं आचरिलेल्या मार्गानें राज्याचें शासन कर. पापी दुर्योधनाचा आणि त्याच्या

अनुचरांचा युद्धामध्यें नाश झाला, हें द्रौपदीच्या केशपाशाचें सुदैवच होय आणि म्हणूनच तुला ह्या पदाची प्राप्ति झाली आहे. आतां तूं निरनिराळया दक्षिणांनीं युक्त असा अश्वमेध यज्ञ कर. हे पार्था, वीर्यवान् वासुदेव आणि आम्ही ह्या कामीं तुझे किंकर आहों. १२. १. १६.

## अध्याय १७ वा.

[ १ युधिष्ठिरसंभाषण-आशात्याग हेंच मुक्तीचें कारण होय. ]

(१) **युधिष्ठिर**—असंतोष, प्रमाद, मद, राग, बल, मोह, अभिमान आणि उद्वेग ह्या पापांचा तुझ्यामध्यें प्रवेश झाला असल्यामुळें तूं राज्याची इच्छा करीत आहेस. ह्या आमिषांचा त्याग करून व राज्यलोभ सोडून शांत व सुखी हो. जो ह्या सर्व पृथ्वीचें पालन करितो, त्याला देखील एकच उदर असतें. मग तूं राज्याची एवढी प्रशंसा कशासाठीं करीत आहेस ? हे भरतर्षभा, आशेची तृप्ति एका दिवसानें, अनेक महिन्यांनीं किंवा सर्व आयुष्यानें देखील तृप्त होणें शक्य नाहीं. ज्याप्रमाणें इद्ध अग्नि प्रजलित होतो आणि तींच इंधनें कमी केलीं असतां शांत होतो, त्याप्रमाणें तूं अल्प आहारानें जठराग्नि शांत कर. अज्ञ मनुष्य जसा आपल्या एकट्याच्या उदरपूर्ततेसाठीं पुष्कळ आहार मिळवितो, तसें शहाणे लोक करीत नाहींत. म्हणून तूं प्रथम आपल्या उदराला जिंक. तूं पृथ्वीला जिंकलेंस, परंतु त्या निर्जित पृथ्वीनें तुझें श्रेय जिंकून घेतलें आहे. मनुष्याला आवडणाऱ्या कामभोगांची आणि ऐश्वर्यांची तूं स्तुति करीत आहेस, परंतु त्या कामभोगांची इच्छा न करणाऱ्या व तपःकृश अशा लोकांनाच उत्कृष्ट स्थानाची प्राप्ति होते. तूं राज्यभार माथीं घेतलास, तर राष्ट्राचा योगक्षेम आणि धर्माधर्म यांचा विचार तुजवर पडेल, म्हणून ह्या मोठ्या भारापासून मुक्त हो आणि त्यागाचा-संन्यासाचा-आश्रय कर.

व्याघ्र आपल्या एका उदरपूर्तीकरितां पुष्कळ अन्न मिळवितो. दुसरे लोभवश मंद पशुहि त्याजवर आपला निर्वाह करितात. त्या व्याघ्राप्रमाणें स्वार्थपर राजा सर्वदा बद्ध होतो. त्यामुळें त्याची मुक्ति होत नाहीं. विषयांचा त्याग करून संन्यासी झालेल्याची मात्र होते. संन्यासामध्यें राजे लोकांना संतोष कधींहि होत नाहीं. राजे आणि संन्याशी यांच्या बुद्धींतील अंतर कसें आहे तें

यावरून पहा! वृक्षाचीं पानें भक्षण करून, तसेंच कुटलेले भक्ष्य पदार्थ खाऊन, अथवा केवळ दांतांनीं भक्ष्य चावून रहाणारे जलभक्षी किंवा वायुभक्षी असे जे संन्याशी त्यांनींच हा नरक जिंकिला आहे. जो राजा या अखिल पृथ्वीचें पालन करितो आणि जो पुरुष पाषाण आणि कांचन यांना सारखेंच समजतो, त्या दोहोंमध्यें सुवर्णपाषाणांना समदृष्टीनें पाहणारा पुरुषच धन्य होय, राजा नव्हे. म्हणून तूं मनांतील संकल्प सोडून दे, निराश हो, ममत्व टाकून दे, म्हणजे इह-परलोकीं तूं शोकरहित अशा अविनाशी स्थानीं जाशील. ज्यांनीं आशात्याग केला आहे, ते शोक करीत नाहींत, मग तुला कोणत्या गोष्टीबद्दल शोक वाटत आहे? सर्व आशापाश सोडून टाक म्हणजे तूं असत्यवादी ह्या दोषापासून मुक्त होशील.

पितृयान आणि देवयान हे दोन मार्ग प्रसिद्ध असून यज्ञ करणारे पितृयान-मार्गानें आणि मोक्षाची इच्छा करणारे देवयानमार्गानें जातात. तप, ब्रह्मचर्य, आणि अध्ययन करणारे महर्षि हे देहत्यागानंतर मृत्यूला अगोचर अशा मोक्षस्थानीं जातात. आमिष हें लोकांमध्यें एक बंधन असून, कर्म देखील आमिषासारखेंच एक बंधन आहे, असें सांगितलें आहे. या दोन्ही प्रकारच्या पापकारक वस्तूंचा संबंध ज्याला जडत नाहीं, तोच मनुष्य श्रेष्ठ ब्रह्मपदाला जातो. याविषयीं निर्द्वंद्व, मुक्त आणि मोक्षाचें सर्वदा चिंतन करणाऱ्या जन-कानें गाइलेली गाथा लोक सांगतात. ती ही कीं 'ज्या मजजवळ आज कोणतीहि लौकिक वस्तु नाहीं, त्या माझें द्रव्य विपुल आहे. ही मिथिला नगरी प्रदीप्त झाली तरी माझें कांहींहि दग्ध व्हावयाचें नाहीं.' प्रज्ञाप्रासादावर चढलेल्या ज्ञानवंत मनुष्यानें स्वर्गास गेलेल्या ( दुर्योधनादिकां ) करितां शोक करूं नये; त्यासाठीं शोक करणाराची स्थिति पर्वतावर चढून खालचा प्रदेश दिसत नाहीं असें म्हणणाऱ्या मंदबुद्धि मनुष्यासारखी आहे.

ज्याला कर्तव्याकर्तव्य बरोबर समजतें, तोच खरा डोळस आणि तोच बुद्धिमान् होय. अशा गोष्टीचें ज्ञान करून जी देते आणि त्या गोष्टीचें कर्तव्या-कर्तव्य बरोबर जिच्या योगानें समजतें तिला बुद्धि म्हणतात. त्या ब्रह्मरूप झालेल्या व शुद्ध अंतःकरणाच्या भवरोग वैद्याच्या यथार्थ वाणीचें ज्याला आकलन झालें आहे, तो बहुमानाला पावतो. पंच महाभूतें आत्म्याहून वेगळीं आहेत, तीं आत्म्यांत लीन होतात व त्यांचा विस्तार पुनः त्याचपासून होतो असें

ज्याला समजतें तोच ब्रह्मरूपी होतो. असेच लोक त्या प्रकारच्या गतीला जातात. अविद्वान्, विचारहीन, निर्बुद्ध आणि तपोहीन, अशांना ती मिळत नाहीं. सर्व कांहीं बुद्धीच्या ठिकाणीं प्रतिष्ठित आहे. १२. १. १७.

## अध्याय १८ वा.

[ १ जनक राजा व त्याची पत्नी यांचा संवाद. ]

( १ ) वैशंपायन--युधिष्ठिर राजा स्तब्ध राहिलासें पाहून शोक व दुःख यांनीं संतप्त झालेला अर्जुन युधिष्ठिराच्या भाषणानें मनांत खोंचून म्हणाला.

अर्जुन—राजा, विदेहाधिपति जनक राज्य सोडून भिक्षाटणाला निघाला असतांना त्याला त्याच्या पत्नीनें बोध केल्याची कथा लोक सांगतात, ती मी तुला सांगतों, ऐक. धन, मुलेंबाळें, स्त्रिया, नानाप्रकारचीं रत्नें, गृहस्थाश्रम, अग्निहोत्र, इत्यादि सर्व गोष्टींचा त्याग करून जनक राजा मूर्खासारखा स्तब्ध बसला. निरिच्छ, निर्मत्सर, मूठभर धान्यावर उपजीविका करून रहाणाऱ्या, अकिंचन व भिक्षावृत्ति स्वीकारणाऱ्या आपल्या नवऱ्याला पाहून जनकाच्या पत्नीनें त्याला एकांतांत गांठलें व मोठ्या युक्तीनें ती त्याला म्हणाली, “धन-धान्यानें युक्त असें आपलें राज्य टाकून देऊन व कपाल घेऊन भिक्षा मागण्याची वृत्ति आपण स्वीकारिलीत व मूठभर धान्यावर उपजीविका करण्याचें पतकरलेंत हें आपणांला शोभत नाहीं. आपलें एवढें मोठें राज्य टाकून देऊन अल्पसंतोषीपणा आपण अंगीकारलात, यांत, महाराज, आपण प्रतिज्ञा केलीत एक व हातानें करतां भलतेंच, असें होत नाहीं काय ? आपल्या अशा करण्यानें आपल्याला अतिथि, देव, ऋषि, पितर यांपैकीं कोणालाच संतुष्ट करतां येणार नाहीं; तेव्हां महाराज, आपला हा परिश्रम व्यर्थ आहे. देवता, अतिथि, पितर यांनीं ज्यांना सोडलें असे आपण आज सर्वसंगपरित्याग करून संन्यास घेऊं इच्छितां, याचा अर्थ काय, याची आपणांस कल्पना आहे काय ? महाराज, वेदत्रयाचें अध्ययन करून ज्ञानवृद्ध बनलेल्या हजारों ब्राह्मणांना आपण आजवर आश्रय दिला, सर्व लोकांवर आजवर आपण प्रभुत्व गाजविलें, तेच आपण आज त्याच लोकांवर उपजीविकेसाठीं अवलंबून राहणार काय ? आपली सर्व ओजस्वी संपत्ति टाकून देऊन, महाराज, आपण कुत्र्याप्रमाणें दीन

झालेले दिसत आहां. आपण जीवंत असूनहि आपली जननी आज निपुत्रिक झाली आहे. आपण हयात असतांहि आपली पत्नी आज विधवेसारखी दिसते. स्वतःच्या क्षात्रधर्माचें चीज करण्याच्या इच्छेनें हे इतके दीन क्षत्रिय आपली सेवा करीत असून त्यांची सर्व भिस्त आपल्यावर आहे. यांचे मनोरथ भग्न करून महाराज, आपण कोणत्या नरकाचें साधन करून ठेवणार?

महाराज, दुसऱ्याच्या तंत्रानें चालणाऱ्या परतंत्र जीवांना मोक्ष मिळण्याची वानवाच असल्यामुळें, धर्मपत्नीचा त्याग करून आयुष्य कंठूं इच्छिणारे जे पापकर्मे आपण, त्या आपणांला, धड परलोक नाहीं व अपरलोकहि नाहीं, अशी स्थिति होणार आहे. फुलांच्या माळा, नाना प्रकारचीं सुगंधि द्रव्यें, भूषणें, वस्त्रें, इत्यादिकांचा त्याग करून निष्क्रिय असे आपण संन्यस्तवृत्ति कां पतकरतां? सर्वांची तृष्णा भागविणाऱ्या पवित्र तीर्थांची व आपली योग्यता एक असतांना, इतरांना आसरा देणाऱ्या महान् समृद्ध वृक्षाची उपमा आपल्याला साजत असतां, आपण दुसऱ्याच्या तोंडाकडे पाहून त्यांची हांजी हांजी करावी हें आपणांस शोभतें काय? हत्तीसारखीं मोठमोठीं जनावरें सुद्धां निष्क्रिय राहिलीं तर त्यांनासुद्धां मांसभक्षक प्राणी व किडेहि खातात; मग स्वस्थ असे जे आपण त्यांना ते खातील यांत नवल तें काय? आपल्या हातांतील कमंडलु व हा त्रिदंड जो हरण करील, त्याच्याबद्दल आपल्या मनांत काय विचार येतील बरें? त्या माणसाचा आपणांस राग येणार नाहीं काय? आपण, सर्वस्वाचा त्याग करून मूठभर धान्याचा जो स्वीकार केला आहे त्या धान्यमुष्टीची व राज्यादिकांची किंमत आपल्या दृष्टीनें सारखीच आहे असें आपणांस वाटतें काय? इहलोकींची यात्रा चालविण्यासाठीं मूठभर धान्याची कां होईना, पण आपणांस जरूर आहे असें मानलें तर आपली सर्वसंगपरित्यागाची प्रतिज्ञा व्यर्थ होते. आपल्या दृष्टीनें वास्तविक मी आपली कोण, आपण माझे कोण, आपण मजबद्दल आपुलकी बाळगण्याची जरूर काय? माझ्याबद्दल आपल्याला जर आपलेपणा वाटत असेल तर महाराज, आपण या पृथ्वीचें पालन करा.

राजवाडा, शय्या, नानाप्रकारचीं वाहनें, वस्त्रें, अलंकार, इत्यादि सर्व वस्तूंचा संग्रह, ऐश्वर्यानें विहीन असलेले, दरिद्री, ज्यांना कोणी मित्र नाहीं, ज्यांच्याजवळ द्रव्य नाहीं, असे सुखाभिलाषी लोक सुद्धां करितात; मग त्यांचा त्याग करण्यांत

काय अर्थ आहे ? ममत्व कायम ठेवून दारिद्र्यांत किंवा ऐश्वर्यांत लोळलें तरी मोक्षदृष्ट्या त्याची किंमत एकच आहे. जो सदोदित दुसऱ्याला दानें देत राहतो व जो नेहमींच दुसऱ्यापासून प्रतिग्रह घेत राहतो, या दोघांत फरक काय तो आपण ओळखण्यास शिका आणि त्यांच्या मध्यें श्रेष्ठ कोण तें जाणून घ्या. सदासर्वदा दुसऱ्याजवळ याचना करीत बसणाऱ्या दांभिक लोकांना दान देणें म्हणजे पेटलेल्या वणव्यांत वृथा आहुति टाकणें होय. महाराज, अग्नि ज्याप्रमाणें इंधनाला जाळून टाकल्यानंतर प्रशांत होतो, तद्वत् सदा याचना करणाराची तृप्ति दात्याला खाऊन टाकल्यावरच होते. या जगामध्यें अन्नदान करणाऱ्या संतांचें जीवन शाश्वत होय. महाराज, राजानें दान केलें नाहीं, तर मोक्षाभिलाषी लोक तरी कोठून येतील ? पृथ्वीतलावरचे गृहस्थ काय किंवा याचकवृत्तीनें जगणारे लोक काय, सर्वच अन्नावर जगणारे आहेत. प्राण अन्नावरच अवलंबून असल्यानें, अन्नदाता हाच प्राणदाता होय. गार्हस्थ्याचा त्याग करणारे लोक गृहस्थांच्यावरच अवलंबून असतात. म्हणून, गृहस्थाश्रम हेंच सर्व आश्रमांचें उत्पत्तिस्थान व जीवनाधार होय. केवळ एकाद्या गोष्टीचा त्याग केल्यामुळें, अगर केवळ याचकवृत्तीनेंच राहिल्यामुळें भिक्षुक हा संन्यासी होतो, असें नव्हे. सरळमार्गाचा अवलंब करूनहि जो अर्थाचा त्याग करितो, तो खरा संन्यासी नव्हे.

राजन्, कोणत्याहि गोष्टींत आसक्ति न ठेवतां त्यांत आपला संग आहे, असें जो दाखवितो असा अनासक्त, बंधनरहित, शत्रु व मित्र यांच्या ठिकाणीं सारखी वृत्ति ठेवणारा पुरुषच मुक्त होय. भगवीं वस्त्रें धारण करून, मस्तकाचें मुंडन करून घेऊन, नानाप्रकारच्या पाशांनीं बद्ध होऊन लोक संन्यास घेतात, त्यांची इच्छा मठ, शिष्य, पुस्तकसंभार इत्यादिकांनीं स्वतःची प्रतिष्ठा वाढविण्याची असते. वेदविद्या, वृत्तीचें साधन, धन, पुत्रादिक इत्यादि सर्व गोष्टींचा त्याग करून दंड व भगवीं वस्त्रें यांचा प्रतिग्रह करणारे मूर्ख होत. अंतःकरणांतील वासनांचा त्याग केल्यावांचून नुसतेंच भगवें होणें हें या जगांतील जीवनाचें साधनच होय असें समजावें. या साधनांचा उपयोग, संन्यस्तवृत्तीनें राहणारे व धर्माच्या नांवावर मिरवणारे हे लोक, स्वतःच्या उपजीविकेसाठीं करितात. तेव्हां, महाराज, शिरोवपन करून दिगंबरवृत्ति स्वीकारणाऱ्या किंवा जटा वाढवून राहणाऱ्या या लोकांना भगवीं वस्त्रें व हरणाचीं कातडीं पुरवून, वस्त्रें देऊन, इंद्रियदमन करून, उत्तम लोक आपण जिंका.

अग्नीमध्यें हविर्भाग अर्पण करणें, गुरूंच्या साठीं पुष्कळ दक्षिणेनें युक्त असे मोठमोठे यज्ञ करणें वगैरे प्रकारांनीं जो रोज दान करतो, त्याच्याहून पुण्यशील असा जगांत कोण आहे ?

**अर्जुन**—जनकराजा महातत्त्वज्ञ होता, अशी या जगांत त्याची ख्याति आहे. धर्मराजा, त्यालाहि मोह उत्पन्न झाला. तेव्हां, तूं मोहवश होऊं नकोस. अशाप्रकारें धर्माचें अनुसरण करून, सर्वकाळ दान व तपश्चर्या यांत मग्न राहून, कामक्रोधांचा त्याग करून, दुष्टपणा सोडून व प्रजांचें उत्तम प्रकारें पालन करूनच आपल्याला इष्ट लोकांची प्राप्ति होईल. आपले गुरु व आपल्याहून वयानें वृद्ध अशांची उपासना केल्यानें इष्टलोक मिळत असतात. देव, अतिथि व इतर प्राणिमात्र, यांची यथाविधि संभावना करून सत्यवादित्वानें व ब्राह्मण्याचा आदर ठेविल्यानेंच आपणांला अभीष्टलोकप्राप्ति व्हावयाची आहे. १२. १. १८.

---

## अध्याय १९ वा.

[ १ युधिष्ठिराचें भाषण–त्यागानेंच सुख मिळतें. ]

( १ ) **युधिष्ठिर**—धर्मशास्त्र, अध्यात्मशास्त्र वगैरे अनेकविध शास्त्रें मला अवगत आहेत. कर्में करावीं व करूं नयेत अशासंबंधी अनेक वचनेंहि माझ्या परिचयाचीं आहेत. अनेक प्रकारचे हेतु देऊन सजविलेलीं नानाविध शास्त्रें व त्यांचे अखेरचे सिद्धांत मी जाणतों. अर्जुना, तूं नुसता अस्त्रज्ञ वीर, तुझें ज्ञान केवळ अस्त्रांपुरतेंच आहे. तुझ्या बुद्धीला शास्त्रार्थ यथार्थ रीतीनें जाणण्याचें सामर्थ्य नाहीं. शास्त्रांचा अर्थ मार्मिकपणानें जाणणाऱ्या व या धर्मतत्त्वाची सूक्ष्मपणें ओळख असणाऱ्या मनुष्यांना देखील माझ्यांत दोष काढतां येणार नाहीं. खरा धर्म तुला समजेल तर तुलाहि हें पटेल. माझ्यावरच्या तुझ्या बंधुप्रेमामुळें जें न्यायघटित व योग्य असें वाक्य तूं बोललास, त्यामुळें हे कौंतेया, माझें मन संतुष्ट झालें आहे. युद्धकौशल्यामध्यें व सर्व क्रियांच्या नैपुण्यामध्यें तुझा हात धरणारा या त्रैलोक्यांत कोणी नाहीं. परंतु, धर्मशास्त्र हें अत्यंत सूक्ष्म असल्यानें त्यांत तुझी मति चालणें कठीण आहे. तेव्हां, हे धनंजया, या बाबतींत माझ्या कृतींवर तूं आक्षेप घेऊं नये. तूं नुसताच युद्ध-

शास्त्रज्ञ आहेस. वृद्ध माणसांची उपासना तूं कधीं केली नाहींस, कोणत्या गोष्टीचा कोठें विस्तार करावा व कोठें संक्षेप घ्यावा, हें वृद्धांचें ज्ञान तुला नाहीं. तपस्विवृत्तीचा त्याग करणें हा त्यांच्या मतें निश्चयानें अविधि होय. कारण, ज्यांची बुद्धि मोक्षमार्गाकडे वळलेली असते, त्यांना तप हेंच परम श्रेष्ठ वाटतें. पार्था, या जगतांत धनापेक्षां कांहीं श्रेष्ठ नाहीं, असें तुला वाटतें, पण धन हेंच काय तें श्रेष्ठ असें मानून चालण्याची आमची प्रवृत्ति नसल्यानें आम्ही असे वागतों, तें कां तें सांगतों.

तपश्चर्या व स्वाध्याय यांच्यामध्यें धार्मिक लोक व तपस्वी ऋषि हे नेहमीं गर्क असतात व त्यांनाच सनातन लोकांची प्राप्ति होते. ज्यांनीं आजन्मांत कोणाचाहि द्रोह केला नाहीं, असे दुसरे अनेक वनवासी लोक वनांत स्वाध्यायाचें अध्ययन करीत राहून स्वर्गलोकाला गेले. विषयांचा निग्रह केल्यामुळें व अज्ञानजन्य मोहाचा त्याग केल्यानें आर्य लोक उत्तरायणमार्गानें त्यागी लोकांच्या लोकास जाऊन पोंचतात. क्रियाकर्मांतच लोलुप झालेल्या लोकांना दक्षिणेच्या दिशेचे जे लोक, त्यांत जाऊन पडावें लागतें. त्यांच्या मागची जन्ममरणाची यातायात सुटत नाहीं. मोक्षेच्छु लोकांची गति ही अनिर्देश्य व न समजणारी अशी आहे. तेव्हां, येथें चित्तवृत्तिनिरोधरूपी योगाची प्राधान्यानें जरूरी असून हा योगच समजण्यास अत्यंत कठिण असा आहे. शास्त्रांचा विचार करीत करीत त्याच्या अनुरोधानें योग असा असेल काय, तसा असेल काय, असला सारासारविचार करण्याची पुष्कळ धडपड करून शहाण्या लोकांनीं योगाबद्दल निश्चित अनुमानें काढिलीं आहेत. संहिता, ब्राह्मण ग्रंथ, नानाप्रकारचीं शास्त्रें, आरण्यकें वगैरे ग्रंथ पालथे घालून सुद्धां, केळीचा खांब चिरल्यानें त्यांतून जसें कांहीं प्रत्यक्ष सार हातीं लागत नाहीं, तसें यांच्या हातीं कांहीं लागलें नाहीं. कित्येक एकांताचा त्याग करून बाह्य लक्षणांवरून देहांत असणाऱ्या आत्म्यावर पंचभौतिक शरीरद्वारा प्रकट होणाऱ्या इच्छाद्वेष इत्यादिकांचा आरोप करतात. डोळ्यांना न दिसणारा, अत्यंत सूक्ष्म, दाखवून न दिसणारा, असा जो आत्मा त्याला हे लोक प्राणिमात्रांच्या ठिकाणीं कर्मप्रवृत्ति उत्पन्न करणारा असें समजतात–आत्मा कर्ता करविता असें मानतात. तेव्हां, शहाण्या माणसानें दृष्टि आत्मोन्मुख करून, मनाची वासना झाडून, कर्मांच्या प्रवाहाचा–पसाऱ्याचा–त्याग करून, सर्वबंधविनिर्मुक्त व्हावें व सुखी व्हावें.

अशा प्रकारचा अत्यंत सूक्ष्म व शहाण्यांनीं अवलंबिलेला हा मार्ग आहे. अर्जुना, अशा ठिकाणीं अनर्थावह अशा द्रव्याची प्रशंसा तूं करतोस? पूर्वींच्या शास्त्रवेत्त्यांचा सिद्धांतहि पण असाच आहे. यज्ञक्रिया, दान, वगैरेमध्यें निमग्न असलेले हे लोक सुद्धां द्रव्याला अनर्थावह मानतात, मग ज्ञानी लोकांची गोष्ट कशाला हवी? ज्यांच्या मनावरचे पूर्वसंस्कार दृढ झालेले आहेत, अशा मोठमोठ्या विचारी पंडितांच्या डोक्यांत सुद्धां अध्यात्मसिद्धांत शिरकविणें अशक्य आहे. आत्मा नाहीं असें पूर्वसंस्कारानें म्हणणारे लोक मूर्खांच्या कोटींतील होत. खोट्याचा तिरस्कार करणारे बहुश्रुत असे वाक्पंडित लोक मोठमोठ्या जनसमूहांत भाषणें करीत सर्व पृथ्वीभर हिंडतात. पार्था, ज्या ठिकाणीं साध्यासुध्या गोष्टीहि आपणांला समजण्याची मारामार पडते, तेथें या पंडितांचें ज्ञान आपणांस कसें होईल? आपल्याला अज्ञात अशीं महाज्ञानी माणसें अनेक असतील. बुद्धीनें तपाची प्राप्ति होते, तपश्चर्येनें परब्रह्मप्राप्ति होते; पण, ज्या शहाण्या माणसाला सुखाची इच्छा असेल, त्यानें त्याग करावा. धर्मवेत्त्याला त्यागानेंच सुख मिळतें. १२. १. १९.

---

## अध्याय २० वा.

[ १ देवस्थान ऋषीचा युधिष्ठिराला उपदेश—सर्व द्रव्याचा यज्ञाकडे उपयोग करावा. ]

( १ ) **वैशंपायन**—युधिष्ठिराचें हें वाक्य संपतांच देवस्थान नांवाचा महातपस्वी पुरुष नानाप्रकारच्या युक्तिवादानें भरलेलें असें समयानुसार भाषण करिता झाला.

**देवस्थान**—हे युधिष्ठिरा, द्रव्यापेक्षां या जगांत अधिक श्रेयस्कर असें कांहीं नाहीं, असें जें अर्जुन आतां म्हणाला, त्याबद्दल मी तुला सांगतों तें एकाग्रमनानें ऐक. हे अजातशत्रो, ही सर्व पृथ्वी तूं धर्मानें जिंकिली आहेस. तेव्हां धर्मानें जिंकिलेली ही पृथ्वी आतां निष्कारण टाकून देणें तुला शोभत नाहीं. चारी आश्रमांतून जाण्याचा जो आश्रमधर्म त्याच्या आचरणानें अखेर मोक्षच मिळतो. हे राजा, ही आश्रमधर्मरूप चतुष्पदी शिडी तूं क्रमानें जिंक. हे पार्था, ज्यामध्यें पुष्कळ दक्षिणा द्यावी लागते, असे मोठमोठाले यज्ञ तूं कर.

कांहीं ऋषि स्वाध्यायाच्या अध्ययनानेंच यज्ञकर्म संपादितात, तर कांहीं ज्ञानरूप यज्ञानेंच देवतांचें भजन करितात. हे पार्थिवा, कांहीं ऋषि कर्मनिष्ठ असतात, तर कांहीं तपोनिष्ठ असतात. हे कुंतीपुत्रा, जे वैखानस मुनि, त्यांचें वचन म्हणून जें सांगितलें आहे तें असें आहे. द्रव्यलोभानें जे यज्ञादिकर्मांची इच्छा धरितात त्यांनीं निरिच्छ रहाणें हेंच उत्तम. असल्या प्रकारच्या धर्माचें अनुष्ठान जो करील, त्याला पुण्य लागण्याऐवजीं पापच लागेल. सर्व लोक यज्ञाचें आचरण करण्यासाठींच द्रव्यसंचय करीत असतात. अयोग्य माणसाला दान देणें किंवा योग्य माणसाला तें न देणें यामुळें एक प्रकारचा आत्मद्रोह होतो व त्याचें पाप भ्रूणहत्येइतकेंच आहे.

पात्रापात्रविचाराचा योग्य विवेक न झाल्यामुळें दानधर्महि दुष्करच ठरतो. विधात्यानें सर्व द्रव्य यज्ञाकरितां निर्माण केलें आहे. धनाचें रक्षण करण्याचें काम त्यानें पुरुषांकडे दिलें, तेंहि यज्ञाच्या उद्देशानेंच होय. तेव्हां, सर्व धनाचा उपयोग प्रथम यज्ञाकडे करावयाचा व नंतर मग बाकीच्या गोष्टींकरितां. नानाप्रकारच्या रत्नांनीं युक्त असे अनेक यज्ञ इंद्रानें केले, त्यामुळेंच तो तेजस्वी होत्साता सर्व देवांवर राज्य करूं शकला. त्यायोगानेंच त्याला इंद्रत्व प्राप्त झालें व तो तेजानें शोभूं लागला. म्हणून सर्व द्रव्याचा विनियोग यज्ञाकडेच करावा. महात्म्या महादेवानें आपलें सर्वस्व यज्ञांत टाकिलें–सर्वस्वाचा यज्ञ केला. म्हणूनच तो देवदेव म्हणजे देवांचा राजा झाला. सगळ्या विश्वाला व्यापून व सर्व लोक कीर्तीनें भरून टाकून शंकर जो भरून उरला आहे, त्याचें कारण हेंच.

ज्याच्या यज्ञामध्यें लक्ष्मी स्वतः वावरत असे व ज्याचीं यज्ञोपकरणें सर्व सोन्याचीं होतीं, अशा आविक्षित राजानें या कर्मांनींच मरुतांवर स्वामित्व मिळविलें व आपल्या ऐश्वर्यानें इंद्रालाहि जिंकिलें. हरिश्चंद्र राजा तुला ऐकून माहीत आहे. त्यानेंहि यज्ञकर्माच्या जोरावरच आपलें पाप नाहींसें करून पुण्याई संपादन केली. तो मनुष्य असूनहि त्यानें इंद्रास जिंकिलें, तें यज्ञाच्या बळावरच. म्हणून सर्व द्रव्याचा विनियोग यज्ञाकडेच करावा. १२. १. २०.

## अध्याय २१ वा.

[ १ देवस्थानाकडून इंद्राच्या प्रश्नाला बृहस्पतीनें दिलेल्या उत्तराचा उल्लेख. ]

( १ ) **देवस्थान**—या संबंधांत पूर्वीं घडलेली एक कथा सांगत असतात ती अशी. क्षत्रियांनीं वैखानस धर्माचें अवलंबन करावें कीं नाहीं असा विषय निघाला असतां इंद्रानें प्रश्न केल्यावरून बृहस्पति म्हणाला, " समाधानवृत्ति ही मोक्षफलदायक असून त्यापासून अत्युच्च प्रकारचें सुख मिळतें. समाधानवृत्तीपेक्षां श्रेष्ठतर असें कांहींच नसून त्यामुळें शाश्वत स्थिति प्राप्त होते. कांसव ज्याप्रमाणें आपलीं सर्व इंद्रियें सर्व बाजूंनीं आंत ओढून घेतो, त्याप्रमाणें विषयेच्छा सर्व बाजूंनीं जो आंवरून घेतो, त्याच्या अंतःकरणांत आत्मतेजाचा प्रकाश लवकरच फांकतो. ज्यावेळीं मनुष्यप्राणी कोणासहि भीत नाहीं, ज्याच्यापासून कोणाला त्रास होत नाहीं व जो काम व द्वेष यांना जिंकतो, त्याला त्या वेळेस आत्मस्वरूपाची प्रतीति येते. ज्या वेळेस मनुष्य कायेनें, वाचेनें व विचारानें कोणत्याहि भूतांचा द्वेष करीत नाहीं, त्या वेळेस तो स्वतःच ब्रह्मरूप होतो. याप्रमाणें प्राणिमात्र जेव्हां आपापल्या धर्माचें आचरण करतात, तेव्हां त्या धर्माच्या आचरणानें त्यांना मोक्षप्राप्ति मिळते; म्हणून हे राजा, तूं युद्ध कर. कोणी सामाची ( नीलकंठाच्या मतें प्रेमाची ) प्रशंसा करितात; कोणी यत्नाचें महत्त्व वर्णन करतात; तर कोणी साम व यत्न या दोहोंचाहि अवलंब करावा असें म्हणतात. कोणी यज्ञाची प्रशंसा करतात, तर कोणी संन्यास श्रेष्ठ म्हणतात.

कोणी दान हें पुण्यकारक म्हणतात, तर कोणाला प्रतिग्रह बरा वाटतो. कांहींकांहीं तर सर्वसंगपरित्याग करून स्वस्थ चित्तानें ध्यान करीत राहतात. कोणी प्रजांचें पालन करून राज्य संभाळणें हेंच महत्त्वाचें होय असें समजतात. या सर्वांचें पर्यालोचन करून शहाण्या माणसांनीं सिद्धांत बांधला तो असा कीं कोणत्याहि प्राण्याचा द्रोह न करितां जो साधतां येतो तोच धर्म, असा हा सर्व सज्जनांचा अभिप्राय आहे. अद्रोह, खरें बोलणें, दया, इंद्रियदमन, स्वस्त्रीच्या ठिकाणींच अपत्योत्पादन, मऊपणाची वृत्ति, स्थिरता, हाच सर्वतोपरि इष्ट असा धर्म होय, असें स्वायंभुव मनूचें मत आहे." तेव्हां देवस्थान म्हणतो, हे कौंतेया, या धर्माचें परिपालन

कर. राज्यपदावर स्थिर राहून सुद्धां जो इंद्रियें आपल्या ताब्यांत ठेवितो, ज्याला वाईट व चांगलें हीं सारखींच असें मानतां येतें, असाधूंचा निग्रह व साधूंचा संग्रह करण्यांत कुशल असणारा, शास्त्रार्थवेत्ता, यज्ञ करून यज्ञांत देऊन टाकून शिल्लक राहील तें खाणारा, असा क्षत्रिय राजा असतो. प्रजेला धर्ममार्गाला लावून राजानें स्वतः धर्माचें आचरण करावें. वृद्धपणीं पुत्राच्या माथ्यावर राज्यभार सोंपवून देऊन, वनामध्यें वन्य आहारावर उपजीविका करून रहावें व नुसत्या श्रवणभक्तीनें निरलसपणें कर्मे करीत रहावें. हे राजा, जो अशाप्रकारची वागणूक ठेवितो तो राजा खरा असें धर्मवेत्ते म्हणतात. अशा राजाला इहलोकीं व परलोकीं इष्टफलप्राप्ति होते. मोक्षप्राप्ति ही अत्यंत दुर्लभ असून तिच्या वाटेंत अनेक विघ्नें आहेत.

अशा तऱ्हेनें धर्माचें पालन करून, दान, तपश्चर्या, सत्य यांच्यांत सदा निरत राहून अनृशंस्यादि गुणांनीं युक्त, कामक्रोध ज्यांच्या ठिकाणीं नाहींत, जे प्रजेचें पालन करण्यांत निरत, उत्तम प्रकारच्या धर्माचें परिपालन करणारे, गाई, ब्राह्मण यांच्याकरितां युद्ध करणारे, असे राजे उत्तम गति मिळविते झाले. हे परंतपा, रुद्रांनीं, वसूनीं, आदित्यांनीं, साध्यांनीं, निरनिराळ्या राजर्षिसंघांनीं याच धर्माचें अवलंबन करून स्वर्गप्राप्ति करून घेतली. १२. १.`२१.

## अध्याय २२ वा.

[ १ दैवगति अलंघनीय, असें अर्जुनाचें भाषण. ]

( १ ) वैशंपायन—असें देवस्थानाचें भाषण चालू असतां, खिन्नपणें बसलेल्या आपल्या धर्मशील बंधूस अर्जुन पुनः म्हणाला, " हे धर्मज्ञ राजन्, क्षात्रधर्मानें युद्ध करून राज्य मिळविल्यावर व शत्रूंचा वध केल्यावर, आतां आपणांस संताप कशाचा होतो ? तपश्चर्या, त्याग वगैरे ब्राह्मणांचा धर्म होय ! क्षत्रियाचा धर्म म्हणजे त्यानें संग्रामांतच मरावयास हवें. सदा हातांत शस्त्र घेऊन सज्ज असणाऱ्या क्षत्रियाचा क्षात्रधर्म महाभयंकर आहे. हे भरतश्रेष्ठा, क्षत्रियांचें मरण, त्याच्या आयुष्याच्या कोणत्याहि भागांत घडो, तें शस्त्रानें आणि समरभूमीवरच झालें पाहिजे. ब्राह्मणालाहि क्षत्रियधर्माचें अवलंबन करावेंसें वाटल्यास त्याचें जीवनहि प्रशस्तच ठरतें; कारण, क्षात्रधर्म तरी ब्राह्मण-

धर्मापासूनच उत्पन्न झालेला आहे. महाराज, क्षत्रियाला त्याग, यज्ञ, तपश्चर्या, दुसऱ्याच्या कष्टावर उपजीविका करणें ह्या गोष्टी विहित नाहींत. आपण धर्मशील आहां, सर्व धर्म आपणांस ठाऊक आहेत. राजा, हा मानी, महत्त्वाकांक्षी, सर्व गोष्टींत निपुण, असा असतो. त्यानें संतापापासून उत्पन्न होणारा खेद टाकून देऊन कार्यव्यग्र रहावयाचें असतें. क्षत्रियांचें हृदय इतरांपेक्षां कठीण वज्रासारखें असतें. महाराज, आपण जें पृथ्वीचें निष्कंटक राज्य मिळविलें तें शत्रूंना जिंकून, क्षात्रधर्माचें आचरण करून, संयमी होऊन, राखा आणि यज्ञ व दान या व्रतांचें आचरण करा. इंद्र हा पूर्वी ब्राह्मणाचा मुलगा होता; पण, त्यानें क्षात्रधर्माचें आचरण करून क्षत्रियांचीं कर्मे केलीं. त्यानें पापाचरण करणाऱ्या आठशें दहा ज्ञातींचा संहार केला. राजन्, तें इंद्राचें कर्म पूज्य आणि प्रशंसनीय होय. या कर्मामुळेंच त्याला इंद्रत्व प्राप्त झालें व तो देवांचा राजा होऊं शकला, असें आमच्या ऐकिवांत आहे.

महाराज, आपण पुष्कळ दक्षिणेनें युक्त असे अनेक यज्ञ करावे व ज्यामुळें इंद्र हा शोकरहित होऊन त्यानें चित्त स्थिर ठेविलें, त्याप्रमाणेंच आपणहि आतां शोक टाकून द्यावा. आपले बांधव, ज्यांबद्दल आपण शोक करतां, ते सर्व क्षत्रियांच्या पवित्र मृत्यूनें परमपदाला पोंहोचले आहेत. मागें होऊन गेलेल्या गोष्टी व पुढें होणाऱ्या गोष्टी या कोणालाच बदलतां येत नाहींत. भूतकाळ व भविष्यकाळ जसा असेल, तसाच घेऊन चालावें लागतें, त्याच्यावर मात करणें अशक्य आहे. १२. १. २१.

---

## अध्याय २३ वा.

[ १ व्यासकृत गृहस्थाश्रमाची प्रशंसा· २ शंख-लिखितवृत्तांत. ]

( १ ) **वैशंपायन**—याप्रमाणें अर्जुनाचें भाषण ऐकून धर्मराज कांहीं न बोलतां उगाच बसला. तें पाहून द्वैपायन व्यास बोलण्यास पुढें सरसावला. व्यास म्हणाला—

**व्यास**—युधिष्ठिरा, अर्जुन म्हणतो तें खरें आहे. शास्त्रानें घालून दिलेला अत्युत्कृष्ट धर्म हा गार्हस्थ्यावरच अवलंबून असतो. हे धर्मज्ञा, शास्त्रानें सांगितलेल्या धर्माचें विधीला अनुसरून आचरण कर. गार्हस्थ्यधर्म टाकून अरण्यांत जाणें

तुला योग्य नाहीं. संन्यास तुझ्याकरितां नाहीं. देव, पितर, अतिथि, सेवक, वगैरे सर्व गृहस्थांवर अवलंबून असतात. तेव्हां, हे राजा, यांचें पोषण कर. ही जबाबदारी तुझी आहे. पांखरें, पशू, सर्व प्रकारचे प्राणिमात्र गृहस्थामुळेंच जगूं शकतात, म्हणून गृहस्थाश्रम हा सर्वश्रेष्ठ होय. चारी आश्रमांत आचरण्यास कठिण असा कोणता आश्रम असेल तर तो गृहस्थाश्रमच होय. त्या गृहस्थाश्रमाच्या विधीचें, हे राजा, तूं आचरण कर. हा गार्हस्थधर्म दुबळ्यांच्यानें साध्य होणारा नाहीं. राजा, तुला सगळ्या वेदांचें ज्ञान आहे. तूं तपश्चर्याहि फार मोठी केली आहेस. तुझ्या वाडवडिलांचें राज्य तूं व्यवस्थितपणें संभाळावें व त्याला तूं योग्यहि आहेस. तपश्चर्या, यज्ञ, अध्ययन, भिक्षावृत्ति, इंद्रियनिग्रह, ध्यान, विजनवास, समाधान, ज्ञान, हे ब्राह्मणाचे धर्म होत. क्षत्रियांचा धर्म मी आतां तुला सांगतों. तुलाहि तो माहीत आहेच. राजा, यज्ञ, विद्या, उद्युक्तता, पैशासंबंधीचा असंतोष, दंडधारण, तेजस्विता, प्रजापालन, सर्व वेदांचें ज्ञान, तपश्चर्या, सदाचरण, द्रव्यार्जन व त्याचें सत्पात्रीं दान करणें हीं क्षत्रियाचीं कर्में होत. या कर्मांनीं क्षत्रियांना इहलोकाची व परलोकाची सिद्धि होते. याबद्दल बृहस्पतीचें म्हणून म्हटलें जाणारें एक वचन प्रसिद्ध आहे, तें असें. ‘साप ज्याप्रमाणें बिळांतल्या प्राण्यांना खाऊन टाकतो, त्याप्रमाणें दुसऱ्यांशीं विरोध न करणाऱ्या राजाला व प्रवास न करतां एके जागीं बसून रहाणाऱ्या ब्राह्मणाला भूमि गिळून टाकते. क्षत्रियांच्या सर्व धर्मांमध्यें दंडधारण हेंच श्रेष्ठ मानलें आहे. क्षत्रियांना सामर्थ्य अवश्य पाहिजे आहे. दंड हा क्षत्रियाच्या सामर्थ्यावरच अवलंबून असतो. दंडधारणामुळेंच सुद्युम्न नांवाच्या राजर्षीला प्राचेतस वरुणाचा मुलगा दक्ष याच्या प्रमाणेंच परम गति प्राप्त झाली असें सांगतात.’

युधिष्ठिर—महाराज, सुद्युम्नराजाला कोणत्या कामामुळें परम सिद्धि मिळाली ? त्या राजाची हकीगत ऐकण्याची माझी इच्छा आहे.

(२) व्यास—हे राजन्, या बाबतींत पूर्वींचा असा एक इतिहास सांगत असतात. फार पूर्वीं शंख व लिखित नांवांचे दोन ब्राह्मण व्रतनियमांचें पालन करून रहात होते. त्या दोघांचे आश्रम पृथक् पृथक् असून ते रमणीय होते. दोघांहि भावांचे हे आश्रम नित्य पुष्पांनीं व फळांनीं समृद्ध असे असून ते बाहुदा नांवाच्या नदीच्या कांठीं होते. कांहीं काळानें लिखित हा एकदां सहज

शंखाच्या आश्रमाला आला. त्यावेळेस शंख हा आकस्मिक रीत्या बाहेर गेला होता. लिखितानें शंखाच्या आश्रमांत प्रवेश करून तेथील झाडावरचीं पूर्ण पिकलेलीं फळें अभावितपणें पाडलीं व तीं तो मजेनें खाऊं लागला. झाडांचीं फळें काढून लिखित तीं खात आहे, इतक्यांत शंख तेथें आला व लिखिताला फळें खातांना पाहून म्हणाला, 'तूं हीं फळें कोठून आणलींस? हीं इथें काय म्हणून खात बसला आहेस ?'

लिखित आपल्या वडील भावाजवळ जाऊन व रीतीप्रमाणें त्याला वंदन करून हंसत हंसत म्हणाला, 'हीं फळें मी येथूनच घेतलीं.' त्यावेळीं अत्यंत क्रोधयुक्त होऊन शंख त्याला म्हणतो, "मीं तुला देऊं केलीं नसतांना हीं फळें तूं आपण आपल्या हातांनीं घेतलींस ही चोरी होय. तेव्हां, तूं असाच राजाकडे जा व त्याच्या पुढें केलेलें कर्म सांग व त्याला म्हण 'मला न दिलेली गोष्ट स्वतःच्या हातांनीं घेण्याचें पाप मीं केलें आहे. मी चोर आहें, असें समजून मला शिक्षा कर व स्वधर्माचें पालन कर.' शंखाच्या आज्ञेवरून लिखित सुद्युम्न राजाकडे गेला. लिखित आल्याची बातमी द्वारपालां-कडून मिळतांच राजा प्रधानांसह पायींपायींच त्याला सामोरा आला व मोठ्या विनयानें म्हणाला, 'महाराज, आपलें आगमन कशासाठीं झालें तें कृपा करून सांगावें. लिखित त्यावर बोलला, 'मीं सांगितलेलें करीन असें वचन देऊन त्याप्रमाणें खरोखरच करणार असशील, तर सांगतों.'

'हे राजा, वडील भावाच्या बागेंतील फळें त्यानें दिलीं नसतां मीं हातानें घेऊन खाल्लीं, याबद्दल मला काय तें शासन कर.' सुद्युम्न म्हणाला, 'हे विप्रर्षे, राजा जसा शासन करण्याचा अधिकारी आहे, तसाच तो अनुज्ञेचा अर्थात् क्षमे-चाहि अधिकारी आहे. हें जर तुला मान्य असेल तर माझ्या अनुज्ञेनें तुझ्या दोषाचें क्षालन झालें असें समजून या गोष्टीव्यतिरिक्त–तुला शासन करण्या-खेरीज–दुसरी कोणतीहि गोष्ट तूं मजजवळ माग.' अशाप्रकारें तो सुद्युम्न राजा त्या ब्राह्मणाला सोडून देत असतांना त्या लिखितानें त्या राजापासून शासना-खेरीज कोणतीहि गोष्ट घेण्याचें नाकारिलें. तेव्हां निरुपाय होऊन त्या दंडधारी सुद्युम्नानें लिखिताचे दोन्ही हात तोडले. मग तो लिखित तेथून निघून गेला. लिखित शंखाकडे जाऊन त्याला दीनपणानें म्हणाला, 'शासनधर्म पाळण्या-साठीं सुद्युम्नाला जें करणें योग्य होतें तें त्यानें केलें, आतां मला क्षमा कर.'

शंख म्हणाला, ' तूं धर्मज्ञ आहेस, तसेंच तूं मला कोणत्याहि प्रकारें दुखविलें नाहींस. तूं आपला धर्म सोडलास, त्याचें प्रायश्चित्त तुला मिळालें. आतां, बाहुदा नदीमध्यें जाऊन लवकर स्नान कर व तेथें देव, ऋषि व पितर यांचें तर्पण कर; धर्मावरची बुद्धि ढळूं देऊं नकोस.' शंखाचें हें भाषण ऐकून लिखितानें बाहुदेंत जाऊन स्नान केलें व ओंजळींत पाणी घेण्यासाठीं त्यानें हात पुढें करतांच त्याला कमलासारखे सुंदर हात फिरून फुटले. तेव्हां आश्चर्यानें ते हात लिखितानें शंखाला नेऊन दाखविले. त्यावर शंख त्याला म्हणाला कीं, ' मीं हें तपश्चर्येच्या बलावर केलें आहे. तूं मनांत कोणतीहि शंका आणूं नकोस. हा दैवाचा खेळ आहे.' लिखित म्हणाला, 'हे बंधो, आपल्या तपस्तेजाचें सामर्थ्य एवढें दिव्य होतें तर आपण मला यापूर्वींच पावन कां करून घेतलें नाहीं.' शंख म्हणाला, 'पापाबद्दल प्रायश्चित्त देण्याचें काम राजाचें आहे, माझें नव्हे, मी तुझा शास्ता नाहीं. आपला धर्म पाळल्यानें राजाहि पावन झाला. तूंहि आपल्या पितरांसह उत्तम गतीला जाशील.'

शंखलिखितांची व सुद्युम्नाची अशी गोष्ट सांगून व्यास म्हणतात, ' हे राजा, याप्रमाणें त्या कर्मानें सुद्युम्न श्रेष्ठ ठरला व प्राचेतस दक्षाला ज्याप्रमाणें सिद्धि मिळाली, तशीच ती सुद्युम्नालाहि मिळाली. प्रजांचें परिपालन करणें हाच क्षत्रियांचा धर्म होय. एतद्व्यतिरिक्त सर्व गोष्टी उन्मार्गाच्या आहेत. या तुझ्या भावाचें हितकारक वचन ऐक. राजाचा दंड हाच त्याचा धर्म होय. मुंडन हा राजधर्म नव्हे.' १२. १. २३.

---

## अध्याय २४ वा.

[ १ व्यासकृत राजधर्मोपदेश. २ हयग्रीवकथा. ]

( १ ) **वैशंपायन**—महर्षि वेदव्यास त्या धर्मराजाला पुनः म्हणतात, ' हे युधिष्ठिरा, वनवासाच्या काळांत तुझ्या भावांनीं जे मनोरथ केले होते, ते आतां पूर्ण होऊं देत. नहुषराजाचा पुत्र ययाति यानें ज्याप्रमाणें पृथ्वीचें राज्य केलें तसें तूं कर. या बिचाऱ्यांनीं वनवासांत आजपर्यंत पुष्कळ हाल काढले आहेत. हे नरव्याघ्रा, यांना एकदां दुःखाअंतीं सुख भोगूं दे. धर्म, अर्थ व काम या तीन्ही पुरुषार्थांचा बंधुवर्गासह उपभोग घेतल्यानंतर हे राजा, तूं

वानप्रस्थाश्रम स्वीकारण्यास मोकळा होशील. याचक, पितर व देव या सर्वांचें ऋण फेड. सर्वमेध व अश्वमेध या यज्ञांनीं देवतांचें भजन कर. मग तुला परमगति प्राप्त होईल. युधिष्ठिरा, सर्व भावांच्याकडून पुष्कळ दक्षिणेनें युक्त असे यज्ञ करीव म्हणजे तुला उत्कट प्रकारचा कीर्तिलाभ होईल. राजा, क्षात्रधर्माचें आचरण न करण्याची तुझी इच्छा मला ठाऊक आहे. क्षात्रधर्माचें आचरण करूनहि तुला पाप कसें लागणार नाहीं, तें सांगतों ऐक. राजाला—युद्धाचा अंगीकार करणाऱ्याला—तंटा करावाच लागतो. विजय हा मिळवावाच लागतो. धर्मशास्त्रकारांनीं राजांच्या मागें या गोष्टी लावून दिलेल्या आहेत. परंतु जो राजा कालदेशवर्तमानाचा विचार करून शत्रूलाहि क्षमा करितो—त्याला मारीत नाहीं—अशा राजाला त्याची बुद्धि शास्त्रशुद्ध असल्यानें पातक लागत नाहीं. प्रजेच्या उत्पन्नाचा षष्ठांश घेऊनहि जो प्रजेचें रक्षण करीत नाहीं, अशा राजाला प्रजेच्या पापाचा चतुर्थांश भोगावा लागतो.

कशाप्रकारचें आचरण केलें असतां राजा धर्मापासून च्युत होत नाहीं, तें मी तुला सांगतों ऐक. धर्मशास्त्राच्या आज्ञेनुसार निर्भयपणें राजानें वागावें. कामक्रोधांच्या आधीन न होतां प्रजेकडे पितृवात्सल्यानें व समदृष्टीनें पहावें व शास्त्रानें घालून दिलेल्या मार्गानें जावें म्हणजे राजाला कोणतेंहि पातक लागत नाहीं. दैवगतीनें नाइलाज झाल्यामुळें योग्य कालीं योग्य कर्म राजाच्या हातून घडलें नाहीं, तर असल्या कर्मातिक्रमाचा दोष त्याला लागत नाहीं. साहसानें असो किंवा विचारपूर्वक असो, शत्रूचा निग्रह हा केलाच पाहिजे. पापी शत्रूबरोबर सहवास कधींच करूं नये. राज्यामध्यें प्रजेंत पुण्यांश वाढेल, असें करावें. शूर, सज्जन व विद्वान् यांचा नेहमीं सत्कार करीत असावें. विद्वान्, तत्त्वज्ञ, श्रीमान्, सावकार यांचें पालनपोषण विशेष यत्नानें करावें. व्यवहारांत, धर्मकार्यांत बहुश्रुत माणसांची योजना करावी. गुणयुक्त मनुष्य झाला तरी सर्वदा त्याच्या एकट्यावरच विश्वासून राहूं नये. जो राजा आपल्या प्रजेचें रक्षण करीत नाहीं, ज्याला कोणताहि संस्कार नाहीं, नेहमीं जो ताठरवृत्तीनें वागतो, निष्क्रिय रहातो, दुसऱ्याचा मत्सर करतो, त्या राजाला पाप लागतें व लोक त्याला दुर्दान्त असें म्हणतात. राजा प्रजेचें संरक्षण करीत असतांना प्रजांवर जर दैवी आपत्ति कोसळूं लागल्या किंवा चोरांनीं त्यांच्या द्रव्याचें हरण केलें तर त्याचाहि दोष राजाच्या माथीं येतो. राज्यामध्यें मंत्री चांगला असेल, नीतिविद्या चांगली असेल व राजाच्या पराक्रमाला यांची

जोड असेल तर अशा पराक्रमी राजाच्या राज्यांत, हे युधिष्ठिरा, अधर्म रहातच नाहीं. हातीं घेतलेलें कार्य प्रामाणिकपणानें करीत राहून सुद्धां कित्येक वेळां दैवगतीनें तें फसतें व कित्येक वेळां सिद्धीसहि जातें. नीट शास्त्रशुद्ध मार्गानें जाऊन पराक्रम करणाऱ्या राजाला पाप लागत नाहीं.

( २ ) हे राजसिंहा, या संबंधांत पूर्वीं घडलेलें हयग्रीव राजाचें एक कथानक आहे, तें तुला सांगतों ऐक. शत्रूला जिंकिल्यानंतर सुद्धां या राजाच्या शत्रूंनीं याला फिरून जिंकलें. हा शूर होता, तरी सुद्धां संग्रामांत जिंकला गेला व मारला गेला. शत्रूंचा निग्रह करण्यासाठीं व मनुष्यांचें पालन करण्यासाठीं जीं जीं कर्में करावीं लागतात, तीं सर्व त्यानें केलीं. समरांगणावर कीर्ति मिळवून अहंकार टाकून देणारा, धीट पुरुषाप्रमाणें अचाट पराक्रम करणारा, शस्त्राचे घाव खाणारा, हा राजा शत्रूंकडून मारला गेला. असा हयग्रीव राजा स्वर्गांत आज स्वर्गसुख भोगीत आहे. धनुष्य हाच ज्यांतील पशु बांधण्याचा खांब; धनुष्याची दोरी हीच ज्यांतील रशना; बाण हीच ज्यांतील स्रुक्; खड्ग हीच स्रुवा; रुधिर हेंच ज्यांतील तूप; रथ हीच वेदि-अग्निकुंड; रथाचे चार अश्व हेच ज्याचे चार ऋत्विज; अशा तऱ्हेच्या त्या रणयज्ञांत शत्रूंचें हवन करून पापापासून विनिर्मुक्त होत्साता सगळया लोकांत आपल्या कीर्तीचा प्रसार करून स्वतःच्या प्राणाची पूर्णाहुति रणयज्ञांत घालून अवभृथस्नान करून तो हयग्रीव राजा आनंदानें देवलोकांत राहत आहे. दैवी सिद्धि, मानवी दंडनीति, निरभिमानपणा, इत्यादिकांनीं पृथ्वीचें पालन करून हा बुद्धिमंतांमधला श्रेष्ठ असा राजा देवलोकीं सुखानें नांदत आहे. विद्वान्, त्यागी, श्रद्धाळू, कृतज्ञ, असा हा हयग्रीव स्वतःच्या धर्माचें आचरण करून इहलोकाचा त्याग करून, देवलोकांत राहत आहे. या राजानें वेदांचें योग्य अध्ययन केलें, शास्त्राध्ययन केलें, उत्तमप्रकारें प्रजापालन केलें, या महात्म्यानें चारी वर्णांना आपापल्या धर्माचें आचरण करावयास लाविलें; त्यानें पुष्कळ युद्धें जिंकिलीं; यानें यज्ञ करून सोमपान केलें; ब्राह्मणश्रेष्ठांचें संतर्पण केलें; प्रजेवर योग्य तऱ्हेनें अधिकार गाजवून हा हयग्रीव राजा आतां देवलोकांत सुखानें आनंदांत आहे. ज्याचें वर्तन याप्रमाणें श्लाघ्य, तसेंच ज्याचा आदर, संत आणि विद्वान् मंडळी योग्य तऱ्हेनें ठेवतात, तो राजा वीरलोक जिंकून स्वर्गलोकालाहि जिंकितो व त्यामुळें त्याला सिद्धि प्राप्त होते. १२. १. २४.

## अध्याय २५ वा.

[ १ व्यास–युधिष्ठिर–संवाद. ]

( १ ) **वैशंपायन**—व्यासाचें हें वचन ऐकून व अर्जुनाला राग आलेला पाहून व्यासमहर्षींची अनुज्ञा घेऊन युधिष्ठिर म्हणतो 'या सगळया पृथ्वीचें राज्य व नानाप्रकारचे सुखोपभोग, यांच्यापासून माझ्या चित्ताला समाधान नाहीं. शोक माझ्या मनाला एकसारखा जाळीत आहे. रणांगणावर ज्यांचे नवरे मरून पडले, अशा अनेक विधवांचे विलाप ऐकून मला शांति कशी ती मिळत नाहीं.' युधिष्ठिराचें हें वचन ऐकून योगवेत्त्यांमध्यें श्रेष्ठ असे व्यासमहर्षि त्याला म्हणाले.

**व्यास**—युधिष्ठिरा, या जगांत मनुष्याला जें जें कांहीं मिळतें, तें तें विधात्यानें नेमून ठेवलें असेल, त्यावेळीं पाळीप्रमाणें मिळतें. येथें कर्मानें व यज्ञानें कांहीं मिळत नाहीं व कोणी कोणाला कांहीं देत नाहीं. मोठमोठ्या शास्त्रांच्या अध्ययनांत बुद्धि खर्च करून सुद्धां वेळ आली नसेल तर मनुष्याला या जगांत कांहींच मिळणें शक्य नाहीं. पण तीच वेळ आली असेल, तर मूर्खाला देखील द्रव्य मिळून जातें. तेव्हां, कोणतीहि गोष्ट मिळण्याची वेळच यावी लागते. तशी वेळ आल्यावर कठिण म्हणून मानलेली गोष्टसुद्धां सहजगत्या सफल होते. शिल्प, मंत्र, औषधि इत्यादिकांचें फल सुद्धां त्या त्या कलांचा व गोष्टींचा समृद्धिकाल आल्यावांचून मिळत नाहीं. या कला, औषधि वगैरे योग्य कालींच फलद्रूप होतात व समृद्धीच्या कालांतच वाढतात. कालाच्या अनुकूलतेनेंच वारा वाहतो. पर्जन्य जलसमृद्धि करतो, तो काल अनुकूल असल्यानेंच. पाण्यांत कमळें व फुलें उत्पन्न होतात तींहि काल अनिकूल असेल तेव्हांच व रानांत वृक्षहि पण वेळ योग्य असेल त्याच वेळेस वाढतात. कालाच्या अनुकूल-प्रतिकूलतेमुळेंच शुक्ल व कृष्णपक्ष होतात. वेळ योग्य असते, त्याच वेळेस चंद्राचें बिंब परिपूर्ण होतें. झाडांना फळें व पुष्पें योग्य कालींच येतात. नदीप्रवाहांना योग्य वेळींच गति मिळते. पक्षी, सर्प, रानटी हत्ती, हरिण, डोंगराळ प्रदेशांतील पशु यांना अकालीं मद उत्पन्न होत नाहीं. स्त्रियांना गर्भधारणाहि अकालीं होत नाहीं. थंडी, उन्हाळा, पावसाळा हींहि अकालीं येत नाहींत. बालकें अयोग्य वेळीं जन्मास येत नाहींत, तशींच अयोग्य वेळीं मरतहि नाहींत. त्यांना वाचा फुटते, तीहि पण योग्य कालींच फुटते. मनुष्याला अकालीं तारुण्य येत

नाहीं. वेळेशिवाय पेरलेलें बीं अंकुर धरीत नाहीं. सूर्य अकालीं उगवत नाहीं, तसाच अयोग्य वेळीं अस्तासहि जात नाहीं. समुद्राला भरती व ओहोटी येते, तीही पण अकालीं येत नाहीं.

युधिष्ठिरा, या बाबतींत सेनजितानें सांगितलेला असा पुरातन दाखला सांगतात, तो असा—"काल हा सर्व प्राणिमात्राच्या मार्गे आहे. सगळे राजे लोक काल आल्यानंतर मरण पावतात. लोक यांना मारतात व हे लोकांना मारतात अशी लौकिक व्यवहाराची भाषा आहे खरी, पण वास्तविक कोणी कोणाला मारीत नाहीं, कालच सगळ्यांना मारतो. 'मारतो' व 'मारीत नाहीं' ही नुसती लौकिकाची भाषा होय. प्राणिमात्रांची उत्पत्ति व त्यांचा लय हीं दोन्ही परमेश्वराच्या येथून ठरून आलेलीं असतात. पैसा, स्त्रिया, मुलें, किंवा पितर यांचा नाश झाला असतां 'स्त्रीपुत्रादिक हीं खरोखरच दुःखमूल होत,' असा विवेक करून दुःखाचा प्रतिकार करावा. हे राजा, मूर्खांसारखा शोक कशाचा करतोस? आधींच शोकाक्रांत झालेलीं हीं माणसें, यांच्याबरोबर तूंहि शोक कां करतोस? राजा, तुझ्या सुखदुःखावर या सगळ्यांचें सुखदुःख अवलंबून आहे. राजा सुखी तर प्रजा सुखी, राजा दुःखी तर प्रजा दुःखी. वस्तुतः देह हा माझा नव्हे, तशीच पृथ्वी ही माझी नव्हे आणि असलीच तर ती जितकी व जशी माझी तितकी व तशी दुसऱ्यांचीहि आहे, अशी साम्य बुद्धि ठेवणाऱ्यांना शोक बाधूं शकत नाहीं.

शोक करण्याचीं कारणें व हर्ष होण्याचीं कारणें जगांत अनेकविध आहेत; पण त्यांचा पगडा मूर्खांवर चालतो, इतका शहाण्यावर चालत नाहीं. अशा प्रकारें या जगांत आवडत्या नावडत्या गोष्टी मनुष्यांना क्रमाक्रमानें चक्रनेमिक्रमानें प्राप्त होतात व जीवांच्या ठिकाणीं सुखदुःखांचें परिवर्तन काल करीत असतो. जगामध्यें सर्व दुःखच आहे व सुख हें त्यांतूनच निर्माण होतें. वासना अत्यंत वाढल्या म्हणजे मनांत जी एक अस्थिरता उत्पन्न होते तेंच दुःख व दुःखाचा नाश हेंच सुख. सुखानंतर दुःख व दुःखाअंतीं सुख हा नियम ठरलेला आहे. कोणी कधीं कायमचा दुःखी किंवा कायमचा सुखी इहलोकीं सांपडणें शक्य नाहीं. तेव्हां दुःखांतून निघणारें सुख व सुखसापेक्ष दुःख अशी जी ही परस्परांवर अवलंबून असणारी सुखदुःखांची जोडी तिच्या पलीकडे परस्परसापेक्ष असणाऱ्या या सुखदुखांच्या द्वंद्वापलीकडे जाऊन शाश्वतसुखाची इच्छा धरावी.

"सुखाचा अंत म्हणजे दुःख व दुःखाचा अंत म्हणजे सुख. ज्याच्यापासून आपल्याला शोक व संताप होतो, तो जरी शरीराचा एक अवयव असला तरी साप चावलेलें बोट तोडून टाकतात त्याप्रमाणें त्याचा त्याग करावा. कोणतीहि गोष्ट आपल्याला सुखदायक असो, दुःखदायक असो, आवडणारी असो किंवा न आवडणारी असो, ज्या वेळेस जी गोष्ट येईल त्या वेळेस त्या गोष्टीस अंतःकरण खचूं न देतां तोंड द्यावें. स्त्रीपुत्रादिकांचें थोडेंसें हित करूं लागलास म्हणजे त्यापासूनच तुला कोण कोणाचें, कशासाठीं व कसें हित करतो हें दिसून येईल. या जगांत मूर्खपणाची किंवा शहाणपणाची कोणती तरी एक तड पोंचविणाऱ्या माणसालाच सुख लाभतें. मध्यम स्थितींतील लोकांचे अत्यंत हाल होतात."

त्या सेनजित् राजानें याप्रकारचें भाषण केलें. अमुक एका कारणानें मनुष्य एकदां दुःखी बनला म्हणजे त्याला सुख कधींच मिळत नाहीं. कारण, दुःखपरंपरेला कधींच अंत नाहीं. एका दुःखांतून दुसरें दुःख निर्माण होऊन दुःखांची एक मालिकाच सुरू होते. सुख व दुःख, ऐश्वर्य व दारिद्र्य, लाभ व हानि, मरणें व जगणें, या गोष्टी मनुष्याला कालानुरोधानें प्राप्त होतात. तेव्हां त्याबद्दल त्यानें हर्षविषाद मानूं नये. रणांगणावर युद्ध खेळणें ही क्षत्रियांची यज्ञदीक्षा; राज्यांत व न्यायदानाच्या कामांत समता हाच त्यांचा योग; यज्ञामध्यें दक्षिणेसाठीं द्रव्याचा व्यय हा त्याग; योग्य प्रकारचें दान हीं क्षत्रियांचीं पुण्यकर्मे. राज्याचें रक्षण विचारपूर्वक व न्यायनीतीनें करणारा, त्यागशील वृत्तीचा, सर्व लोकांत धर्मदृष्टीनें वागणारा, असा तो राजा देहत्यागानंतर आनंदानें स्वर्गलोकांत रहातो. अनेक युद्धें जिंकणारा, राष्ट्रांचें यथान्याय पालन करणारा, अनेक यज्ञ करून त्यांमध्यें सोमपान करून प्रजांचें संवर्धन करणारा, न्याय अधिकारयुक्तीनें व समतेनें चालविणारा, असा राजा समरभूमीवर देहत्याग करून आनंदानें स्वर्गलोकाला जातो. वेदांचें अध्ययन गुर्वनुग्रहानें यथास्थित करून, शास्त्रावलोकन करून, राज्याचें यथान्याय पालन करून, चातुर्वर्ण्याची व्यवस्था नीट लावून स्वधर्माचरणानें पावन झालेला राजा, देवलोकांत आनंदानें रहातो. हे राजा, ज्याची कीर्ति त्याच्या पाठीमागें सुद्धां मनुष्यें गात रहातात, तोच सर्वश्रेष्ठ राजा होय. १२. १. २५.

## अध्याय २६ वा.

[ १ युधिष्ठिरार्जुनसंवाद. ]

( १) **वैशंपायन**—अशा तऱ्हेनें हें भाषण चालू असतां युधिष्ठिरानें अर्जुनास उद्देशून मोठें न्याययुक्त असें भाषण केलें.

**युधिष्ठिर**—हे अर्जुना, या जगांत धनापेक्षां श्रेष्ठ कांहीं नाहीं. निर्धनाला स्वर्गसुख नाहीं, निर्धनाला पुरुषार्थप्राप्ति नाहीं, असें जें तुझें म्हणणें आहे तें निभ्रांत खोटें आहे. कारण स्वाध्यायाचें अध्ययन करून परमपदाला पोहोंचलेलीं पुष्कळ माणसें या जगांत आहेत. तसेंच तपश्चर्येच्या योगानें ज्यांनीं उत्तम लोक प्राप्त करून घेतले असे मुनिहि पण आपणांला माहित आहेत. ऋषींची अध्ययनपरंपरा जे ब्रह्मचारी कायम राखतात, त्यांनाच देवलोकांत ब्राह्मण ही संज्ञा मिळते. स्वाध्यायरत व ज्ञानांत गढून गेलेले असे जे अनेक ऋषि तेच धर्मनिष्ठ ऋषि होत. अर्जुना, ज्ञाननिष्ठ माणसें जीं असतात त्यांच्यावर कार्याचा भार सोंपवावा असें वैखानसांचें वचन आम्हांस माहीत आहे, तें मी तुला सांगतों. अज, पृश्नि, सिक्थ, अरुण, केतु, इत्यादि निरनिराळीं ऋषिकुलें स्वाध्यायाच्या योगानेंच स्वर्गलोकाप्रत पोंचलीं. हीं वर सांगितलेलीं कर्में, तसेंच दान, यज्ञ, अध्ययन आणि दुष्कर असा इंद्रियनिग्रह या गोष्टी या ऋषिकुलांनीं केलेल्या होत्या. हे राजा, दक्षिणायनमार्गानें जाणाऱ्या लोकांचीं कर्में व ते ज्या लोकांत जातात, ते लोक मीं तुला यापूर्वींच सांगितलेले आहेत. तूं स्वतः नियम पाळले असल्यामुळें तुला जो उत्तरायणाचा मार्ग दिसत आहे तेच यज्ञयाग करून पावन होणाऱ्या जनांचे लोक होत. दक्षिणायन व उत्तरायण या दोहोंपैकीं उत्तरायणाची गति चांगली आहे असें जुनीं माणसें म्हणतात.

समाधानवृत्ति ही स्वर्गापेक्षांहि श्रेष्ठ होय. त्यांतच खरें सुख आहे. समाधानापरतें या जगांत कांहीं नाहीं. जगांत योग्य स्थान त्यानेंच मिळतें. ज्यानें क्रोध व हर्ष हे दोन्ही जिंकिले, त्याला उत्तम प्रकारची सिद्धि प्राप्त होते. या संबंधांत ययातीची म्हणून एक गाथा सांगतात ती अशीः विषयोपभोगांचें सेवन करीत असतांहि, सर्व बाजूंनीं पाठीखालीं अवयव आंखडून जसें कांसव घेतें त्याप्रमाणें, इंद्रियें विषयांपासून परावृत्त करण्याचें सामर्थ्य ज्याच्याजवळ आहे, जो दुसऱ्यांना भीत नाहीं व दुसरे ज्याला भीत नाहींत, इच्छा व द्वेष हीं

ज्याच्याजवळ राहिलीं नाहींत, तोच पुरुष कैवल्यपदाला पोंचतो. कायेनें, मनानें, वाचेनें जो कोणत्याहि प्राण्याबद्दल पापविचार मनांतहि आणीत नाहीं, त्याला ब्रह्मपदप्राप्ति होते. अभिमान व मोह हीं ज्यानें टाकिलीं, नानाप्रकारच्या विषयांचा संग ज्यानें सोडला, ज्याच्या अंतःकरणांत आत्मतेजाचा प्रकाश पडला, त्याला मोक्षप्राप्ति हटकून होते.

हे पार्था, तूं इंद्रियनिग्रहवान् आहेस, मी काय सांगतों इकडे लक्ष दे. या जगांत कोणी धर्माची इच्छा करितात, कोणी व्रताचरणाची वासना करितात तर कोणाला द्रव्याचा हव्यास असतो. द्रव्यार्जनाचीच नुसती हांव बाळगणारे जे असतात त्यांच्या त्या हव्यासापेक्षां निरिच्छपणा फार चांगला. द्रव्याच्या ठिकाणीं अनेक दोष आहेत व वित्ताच्या साहाय्यानें जें धर्मसाधन केलें जातें त्यांतहि अनेक दोष आहेत. धनलोभी माणसाला वर्जनीय गोष्टींचा त्याग करणें हें अत्यंत कठिण जातें हें मला दिसतें. तसेंच तुलाहि पण तें माहित आहे. जीं माणसें द्रव्याच्या मागें असतात त्यांच्या बुद्धींत साम्य असूं शकत नाहीं. सत्कर्मांचा द्रोह करणाऱ्याकडेच द्रव्य नेहमीं धांव घेतें. जरीं द्रव्यप्राप्ति झाली तरी द्रव्यवंतांना नानाप्रकारचें भय असल्यामुळें ती एकंदर दुःखकारकच होय. ज्याचा स्वभाव धरसोडीचा बनला आहे, शोक आणि भय हीं ज्याला सोडून गेलीं व जो थोडक्याकरतां हपापलेला असतो, त्याला अशा करण्यानें आपणांस भ्रूणहत्येचें पातक लागेल याची जाणीव नसते.

द्रव्यापहारी माणसापासून द्रव्य घेणारे त्याचे सेवकहि त्याच्या दोषांचे अंशभागी होतात व नित्य चोरांचें भय जसें लोकांना वाटतें, तसें यांना भय वाटत असतें. दुर्लभ अशा प्रकारचें धन मिळविल्यानंतर जरी तें सेवकांना वगैरे दिलें तरी त्याच्यापासून एकंदरीनें क्लेशप्राप्तिच होते. अधनाला कोण काय बोलणार ? तो सर्व गोष्टीपासून अलिप्त असतो व म्हणूनच सर्वदा सुखी असतो. देवस्थानच्या—देवतोद्देशानें बाजूस ठेविलेल्या—धनाचा अपहार करण्यानें माणसाला सुख होत नाहीं. यज्ञामध्यें गाइली जाणारी अशी एक गाथा प्राचीन इतिहासवेत्ते सांगतात. ही गाथा वेदांमध्यें असून यज्ञाचा प्रसार करणारी आहे. 'परमेश्वरानें द्रव्य यज्ञाकरितां उत्पन्न केलेलें आहे. तसेंच पुरुषाची उत्पत्तिहि त्याच्या हातून यज्ञ व्हावा, यज्ञाचें संरक्षण व्हावें, याकरितांच आहे. तेव्हां सर्व धनाचा विनियोग यज्ञाकडेच करावा. स्वार्थ साधण्या-

कडे द्रव्याचा विनियोग करणें हें केव्हांहि प्रशस्त नाहीं.' परमेश्वर धनवंतांना जें द्रव्य देतो, तें स्वार्थ व परमार्थ साधण्यासाठीं देतो. म्हणून धन हें नाशिवंत आहे. तें ध्रुव नाहीं असें लोक म्हणतात आणि याच कारणासाठीं मनुष्यानें दान व यज्ञ हीं श्रद्धायुक्त अंतःकरणानें करावीं. मिळविलेल्या धनाचा त्याग करणें हेंच सर्वोत्कृष्ट होय. स्वतः त्याचा उपभोग घेणें, किंवा त्याचा नाश करणें हीं दोन्ही कनिष्ठ प्रतीचीं होत. त्यागासारखें श्रेष्ठ ध्येय डोळ्यांपुढें असतां पैसा सांचवून ठेवणें यांत काय पुरुषार्थ आहे बरें? स्वधर्माचा त्याग करणाऱ्यांना धन देणारे जे मूढ असतात, त्यांना हा लोक सोडल्यावर शंभर वर्षें पुरीष भक्षण करावें लागतें. अयोग्य माणसांना दान देणारे व पात्र असणारांना तें न देणारे, हे दोघेहि पात्रापात्रविचार न करणारे असतात. पात्रापात्रविवेक करणें कठिण असल्यामुळें दानरूप धर्माचें आचरणहि कठिण आहे. द्रव्य जरी मिळालें, तरी अयोग्य माणसांना तें देणें व योग्य माणसांना न देणें ह्या दोन्ही प्रकारांत त्याचा दुरुपयोगच होतो. १२. १. २६.

---

## अध्याय २७ वा.

[ १ व्यासयुधिष्ठिरसंवाद. ]

( १ ) **युधिष्ठिर**—माझा अभिमन्यु बाळ, द्रौपदीचे पुत्र, धृष्टद्युम्न, विराट राजा, द्रुपद, कर्ण, धृष्टकेतु व इतर नाना देशचे नाना राजे यांचा या युद्धांत क्षय झालेला पाहून माझा शोक अनावर झाला आहे. मीं राज्यलोभानें स्वतःच्या वंशाचा घात केला आहे. ज्याच्या मांडीवर खेळून मीं आपलें बालपण घालविलें तो भीष्म पितामह माझ्यासारख्या राज्यलुब्धाकडून मारविला गेला. अर्जुनाचे बाण अंगांत घुसल्यामुळें, वज्राच्या आघातांनीं पर्वत जसा वर्तुलाकार डोलतो तद्वत् भीष्मांना डोलतांना पाहून, त्या नरश्रेष्ठ पितामहाला—वृद्ध सिंहाप्रमाणें शोभणाऱ्या त्या भीष्माला—बाणांनीं विद्ध झालेला पाहून माझें मन अतिशय व्यथित झालें. रथामध्यें समोर तोंड करून बसलेल्या, दुसऱ्या अनेक रथींना त्रासवून सोडणाऱ्या, त्या भीष्माला वेदनांनीं पर्वताप्रमाणें डोलतांना पाहून माझ्या मनाला मोह उत्पन्न झाला. ज्या भीष्मानें हातांत धनुष्यबाण घेऊन पुष्कळ दिवसपर्यंत परशुरामासारख्याला लढविलें; वाराणसीमध्यें कन्यांचें

हरण करण्यासाठीं जमलेल्या अनेक क्षत्रियांना ज्यानें एकट्यानें युद्धार्थ आव्हान केलें; ज्या प्रतापी पुरुषानें उग्रायुध नांवाच्या चक्रवर्ती राजाला स्वतःच्या अस्त्रप्रतापानें जाळून टाकलें, तो भीष्माचार्य आज माझ्या हातून युद्धांत मारविला गेला. पांचालदेशचा शिखंडी आपल्याला मारण्यासाठीं म्हणून जन्मास आला आहे, हें माहीत असून सुद्धां हा आपला स्वतःचा काळ आहे हें ओळखून त्याचें रक्षण करून ज्यानें त्याच्यावर बाण टाकले नाहींत, त्याला आज अर्जुनानें युद्धांत मारलें. रक्तानें न्हालेला भीष्माचार्य ज्या वेळेला जमिनीवर पडलेला मीं पाहिला, त्या वेळेस माझें अंतःकरण शोकानें विदीर्ण होऊन गेलें. लहानपणापासून ज्यानें आमचें संवर्धन व रक्षण केलें, त्या भीष्माला मीं गुरुघातक्यानें राज्यलोभानें मारलें.

राज्य हें क्षणभंगुर आहे. हें माहीत असून असल्या राज्याकरितां म्यां मूर्खानें भीष्माचा घात केला. तसेंच, मोठें उग्र धनुष्य हातीं धारण करणारा गुरु द्रोणाचार्य, सर्व राजेलोकांकडून पूजा घेण्याची ज्याची योग्यता, त्याच्या कानाशीं जाऊन रणांगणावर मीं खोटें बोललों व त्याचा मुलगा मेला असें त्याला खोटेंच भासविलें. त्यावेळेस द्रोणाचार्यांनें जें भाषण केलें तें माझ्या काळजाला लागून राहिलें आहे. 'राजा, माझा मुलगा जीवंत आहे कीं नाहीं, खरें सांग.' खरें काय तें समजून घेण्याच्या उद्देशानें द्रोणाचार्यांनीं मला प्रश्न विचारला. परंतु, अश्वत्थामा नांवाच्या हत्तीचें नांव मध्यें घालून मीं खोटें भाषण केलें. गुरुघातकी पापी असा जो मी त्यानें सत्याच्या पांघरुणाखालीं हत्ती मेला असतांना अश्वत्थामा मेला असें खोटेंच भाषण केलें. असल्या तऱ्हेचें अघोर कर्म करणारांसाठीं परमेश्वरानें कोणते लोक राखून ठेविले आहेत कोण जाणे! समरामध्यें शत्रूला पाठ न दाखविणारा, अतितेजस्वी, असा माझा वडील भाऊ जो कर्ण त्याला मीं समरांत मारविलें. तेव्हां माझ्यापेक्षां अधिक पापी या जगांत कोण आहे? नुकत्याच जन्मलेल्या सिंहाच्या छाव्याला ज्याप्रमाणें पर्वताच्या गुहेंत कोंडावें, तसें अभिमन्यु बाळाला मी कौरवांच्या सेनासमुद्रांत राज्यलोभानें लोटलें. त्या दिवसापासून अर्जुनाकडे सरळ नजरेनें मला पाहवत नाहीं. भ्रूणहत्या करणारा पापी जसा निर्भय नजरेनें जगाकडे पाहूं शकत नाहीं, त्याप्रमाणें अर्जुनाकडे वर डोळा करून पाहण्याचें धाडस माझ्यानें होत नाहीं. द्रौपदीचीं पांची बाळें मजकरितां मेलीं; तिच्या नजरेला नजर देण्याची मला ओशाळगत वाटते. पृथ्वी-

वर पर्वताप्रमाणें शोभणाऱ्या त्या पांची पुत्रांचा नाश झालेला पाहून मला पृथ्वी ओस पडल्यासारखी वाटते. तेव्हां, असें मोठें पाप मीं केलें त्याचें प्रायश्चित्त म्हणून बसल्या जागीं येथच्या येथेंच हें शरीर वाळवून प्रायोपवेशनानें मी प्राणत्याग करीन. मीं गुरुहत्येचें पाप केलें आहे, असला पापी इतर जातींत सुद्धां सांपडणें कठीण आहे. कुलाचा घात करणारा असा मी पाणी पिणार नाहीं, कीं कांहीं खाणार नाहीं. हे तपस्वि जनहो, या ठिकाणीं असाच बसून हें माझें जीवित मला कितीहि प्रिय वाटलें, तरी तें मी नाहींसें करीन. येथेंच बसून मी आपला जीव वाळवीन. आपणांला इष्ट असेल, तिकडे आपण खुशाल जावें, माझी आपणांस अनुज्ञा आहे. मी या नाशिवंत कलेवराचा त्याग करितों. हे तपस्वि जनहो, आपणहि मला अनुज्ञा द्या, एवढेंच माझें आपणांपाशीं मागणें आहे.

वैशंपायन—भावांच्या व आप्तांच्या शोकानें याप्रमाणें विह्वल झालेल्या त्या धर्मराजाचा निषेध करून मुनिश्रेष्ठ व्यासऋषि त्याला म्हणाले—

व्यास—राजा, तूं आतांपर्यंत बराच वेळ शोक केलास. बाबा, मीं आतांपर्यंत तुला सांगितलेंच. पण, पुन्हां एकवार सांगतों कीं हें काळाचें कृत्य होय. संगम, वियोग किंवा मरण हीं जन्मास आलेल्या प्रत्येक प्राण्याच्या मागें निश्चयानें लागलेलींच आहेत. बुडबुडे ज्याप्रमाणें पाण्यावर येतात व पुन्हां त्यांतच विलीन होतात तसेंच हें आहे. आळशीपणांत जें सुख वाटतें, त्याचें पर्यवसान दुःखांतच होतें. उद्योगीपणांत प्रथम कष्ट वाटले, तरी त्याचा शेवट सुखांतच होत असतो. आळशी मनुष्याच्या ठिकाणीं ऐश्वर्य, धन, नम्रता, धैर्य, कीर्ति इत्यादि गुण वास करीत नाहींत; ते दक्ष माणसांतच सांपडतात. आपले सुहृद आपल्या सुखाला पुरे पडत नाहींत किंवा दुःख देण्याच्या कामांत शत्रूहि समर्थ होऊं शकत नाहींत. द्रव्य पुरविण्याच्या कामीं प्रजा पुऱ्या पडतात असें नाहीं; तसेंच जवळ असलेला पैसा सुख देण्याच्या कामीं समर्थ होतोच असें नाहीं. हे कौंतेया, ज्या कर्मासाठीं परमेश्वरानें तुला उत्पन्न केलें आहे, तें कर्म, तूं कर. तें कर्म करूनच तुला सिद्धि मिळेल. तूं कर्मांचा शास्ता नाहींस हें ध्यानांत ठेव. १२. १. २७.

## अध्याय २८ वा.

[ १ अश्म–जनकसंवाद. ]

( १ ) वैशंपायन—ज्ञातिबांधवांच्या शोकानें संतप्त झालेल्या युधिष्ठिराचा शोक श्रीव्यासानें याप्रकारें नाहींसा केला.

व्यास—युधिष्ठिरा, या संबंधांत अश्म नांवाच्या ब्राह्मणाचा एक जुना दाखला सांगतात तो मीं तुला सांगतों ऐक. एकदां जनक राजानें अश्म नांवाच्या महाबुद्धिमान् ब्राह्मणाला एक शंका विचारली. जनक म्हणाला, 'कल्याणेच्छु पुरुषानें द्रव्य किंवा ज्ञातिबांधव यांचा वियोग झाला असतां किंवा ऐश्वर्य प्राप्त झालें असतां कसें वर्तन करावें, तें मला सांग.'

अश्म—मनुष्य जगांत जन्मास आला म्हणजे कालवशानुरोधानें त्याला क्रमानें सुख किंवा दुःख प्राप्त होतें. त्यांच्यापैकीं ज्या वेळेला जें प्राप्त होतें त्यावेळेस त्या तेवढ्याच गोष्टीनें त्याचें मन हरण केलेलें असल्यामुळें वाऱ्याबरोबर भटकणाऱ्या ढगासारखी त्याची स्थिति होते. मी अभिजात आहें, मी सिद्ध आहें, अतिमानुष आहें, इत्यादि प्रकारच्या विविध हेतूंनीं त्याचें चित्त व्याप्त होतें व मग वाडवडिलांनीं मिळविलेली उपभोग्य अशी सर्व संपत्ति वगैरे उडवून टाकतो व परस्वाचा अपहार करण्याची इच्छा धरतो. परस्वाचा अपहार करण्याच्या कामीं त्यानें मर्यादा सोडली म्हणजे पारधी पशूला ज्याप्रमाणें चोहोंकडून बाणांनीं घेरतात तद्वत् राजे लोक त्याचा निषेध करतात.

जे लोक आज वीस किंवा तीस वर्षांचे आहेत ते यापुढें शंभर वर्षांनीं नाहींसेच होणारे आहेत; तेव्हां त्यांचीं जीं आत्यंतिक दुःखें असतील, त्यांचा विचारपूर्वक परिहार केला पाहिजे. जगांत प्राणिमात्राचे जीवनव्यवहार जे चाललेले आहेत त्यांचें सर्व बाजूंनीं परीक्षण करावयास पाहिजे. मनुष्याला जीं जीं मानसिक दुःखें उत्पन्न होतात, त्यांचें एक कारण चित्तविभ्रम व दुसरें कारण म्हणजे वारंवार येणाऱ्या संकटांनीं झालेली निराशा हें होय. या दोहोंखेरीज तिसरें कारण या बाबतींत असणें शक्य नाहीं. एवंच, मनुष्यमात्राला तीं तीं सुखें अगर दुःखें नानाप्रकारच्या विषयांच्या संगतीनें प्राप्त होतात. म्हातारपण आणि मरण हीं प्राण्याला खाण्यासाठीं लांडग्याप्रमाणें टपून बसलेलीं आहेत. मग, ते बलवान् असोत, दुर्बल असोत, लहान असोत, वा मोठे असोत. सागरानें वेढलेली सर्व पृथ्वी जरी एखाद्या राजानें

जेंकलेली असली तरी म्हातारपण व मरण ही जोडी अशी जबरदस्त आहे, कीं ती अशा राजालाहि कधीं सोडीत नाहीं. ज्या वेळीं जें सुख अगर दुःख मनुष्याला प्राप्त होईल, त्या वेळीं तें सुख अगर दुःख त्यानें भोगलेंच पाहिजे. त्यांतून सुटका नाहीं. बालपणांत काय, तारुण्यांत काय किंवा म्हातारपणांत काय, जी जी गोष्ट आपणांपुढें येईल ती ती आपल्या इच्छेच्या विरुद्ध असली तरी ती आपल्याला टाळतां येत नाहीं. अनिष्टाची संगती व इष्ट असलेल्याचा वियोग, अर्थ व अनर्थ, सुख किंवा दुःख या गोष्टी दैवावर–अदृष्टावर–अवलंबून आहेत. प्राणिमात्रांचें जन्ममरण, लाभ अलाभ किंवा श्रम या सर्व गोष्टी दैवाच्या आधीन आहेत.

फलांच्या ठिकाणचा गंध, त्यांचा वर्ण, रस, स्पर्श हीं सर्व ज्याप्रमाणें दैवयोगानें निर्माण होऊन आलेलीं असतात, त्याप्रमाणें सुख व दुःख हीं कालावर अवलंबून असतात. मनुष्याचें आसन, शयन, वाहन, उत्थान, खाणेंपिणें हीं सर्व कालच निश्चित करीत असतो. वैद्यांना सुद्धां रोग होतात, बलिष्ठ माणसें सुद्धां कालानें दुर्बल होतात, ऐश्वर्यवान् माणसें षंढ बनतात, असा हा काल मोठा विचित्र आहे. चांगल्या कुळांत जन्म, शौर्य, आरोग्य, रूप, ऐश्वर्याचा उपभोग, हीं सर्व नशिबानें मिळतात. दरिद्र्यांची इच्छा नसली तरी त्यांना खंडीभर पोरें होतात व मुलांसाठीं आशा धरणाऱ्या श्रीमंतांना तीं होत नाहींत ही विधिचेष्टा विचित्रच नव्हे काय? रोगानें, अग्नींत जळून, पाण्यांत बुडून, भुकेनें तडफडून, अपघातानें, विषानें, तापानें किंवा उंचावरून पडून, कोणत्याहि प्रकारें मनुष्यावर आपत्ति येवो, या सर्व आपत्ति व मरण जन्माआधींच परमेश्वरानें ठरवून ठेवलेल्या मार्गानें येतात. दैवगतीचें उल्लंघन कोणीहि करूं शकत नाहीं, किंवा तिच्या तडाख्यांतून कोणीहि सुटला नाहीं व जो कोणी एखादा सुटला असेल तो त्याच्या तडाख्यांत फिरून सांपडला नाहीं, असें नाहीं. या जगांत श्रीमान् माणसें तारुण्यांत मरतांना दिसतात व कित्येक दरिद्री शंभर शंभर वर्षेंहि जगतात. अकिंचन माणसें या जगांत दीर्घकालपर्यंत जगलेलीं दिसतात व संपन्न कुळांत जन्मास आलेलीं माणसें पतंगाप्रमाणें क्षणार्धांत नाहींशीं होतात.

श्रीमंत लोकांना खाऊन पचविण्याची शक्ति नसते. दरिद्र्यांना लांकडेंहि पचवितां येतात. काल कर्ता करविता आहे, हें न जाणून, मी हें करतों, मी तें करतों असें मनुष्य म्हणत असतो. हव्यासामुळें दुष्ट मनुष्य जीं जीं

पापें करीत असतो तीं तीं कालप्रचोदित होत. मृगया, अक्षक्रीडा, स्त्रियांबद्दलची आसक्ती व मद्यप्राशन हीं कर्में शहाण्यांनीं निंद्य मानिलीं आहेत. परंतु मोठेमोठे बहुश्रुत म्हणविणारे पुरुषसुद्धां यांच्या जाळ्यांत सांपडलेले दिसतात. मनुष्याला आवडो न आवडो, काल हा त्या त्या वेळीं त्या त्या गोष्टी त्याच्या हातून घडवीत असतो. वायु, आकाश, अग्नि, सूर्य, चंद्र, दिवस, रात्र, नक्षत्रें, नद्या, पर्वत हीं सर्व कोण उत्पन्न करितें व यांचें धारणपोषण कोण करतें बरें ? थंडी, पाऊस, वारा, इत्यादि गोष्टी जशा कालकृत आहेत, तसेंच सुख किंवा दुःख हींहि कालवशच होत. हे नरश्रेष्ठा, मृत्यु किंवा मरण यांनीं ज्याला ग्रासलें त्याची सुटका औषधें, मंत्र, होम किंवा जप यांनीं होत नाहीं.

महासागरामध्यें ज्याप्रमाणें दोन लांकडें एकत्र येऊन पुन्हां वियुक्त होतात, तद्वत् प्राण्याप्राण्यांच्या संयोगवियोगांची स्थिति आहे. जे पुरुष स्त्रियांच्या संगतींत नाचण्यागाण्यांत काळ घालवितात, किंवा जे अनाथ असून दुसऱ्यानें दिलेल्या तुकड्यांवर पोट भरतात, अशा सर्वांच्या ठिकाणीं कालाची दृष्टि सारखी असते. मनुष्यानें घेतलेल्या हजारों जन्मांत, हजारों आईबाप, हजारों स्त्रिया, हजारों पुत्र, त्याच्या संगतींत असतात; पण, परिणामीं तीं त्याचीं कोण व तो त्यांचा कोण ? हा मनुष्य त्यांचा कोणी लागत नाहीं व तींहि त्याचीं कोणी लागत नाहींत. मार्गामध्यें रस्त्यांत माणसें भेटलीं तर त्यांच्यांशीं दोन शब्द बोलून आपण ज्याप्रमाणें पुढें चालूं लागतों, तद्वतच यांची स्थिति होय. मीं कोठें बसूं, कोठें जाऊं, मी कोण, येथें कां आलों, कोणाचा व कशासाठीं मीं शोक करूं, इत्यादि गोष्टींच्या विचारांकडे मनुष्यानें आपलें मन लावावें. संसार हा अनित्य क्षणभंगुर आहे, पण प्राणिमात्राला त्यांत रहावेंसें वाटतें. आई, बाप, भाऊ, मित्र हीं सर्व रस्त्यांवर भेटलेल्या माणसांसारखीं होत. परलोक म्हणजे कसा असतो, हें पूर्वीं कोणीं पाहिलें नाहीं व ऐकलें नाहीं. तेव्हां, वेदांच्या म्हणण्याचा अतिक्रम न करितां शहाण्या माणसान त्याच्या वचनावर विश्वास ठेवून चालावें तें बरें. शहाण्या माणसानें पितृकार्य, देवकार्य व धर्मकृत्यें हीं सर्व विधिवत् करावीं. यज्ञादि कर्में यथावत् करावीं, तीर्थसाधनहि पण यथास्थित करावें. ज्या या गंभीर कालसागरामध्यें म्हातारपण आणि मरण या दोन मोठाल्या मगरी आहेत त्यांत सांपडलेला कोणीहि प्राणी सुटत नाहीं, व हें असें होणार हें कोणालाहि कळून येत नाहीं.

आयुर्वेदाचें अथांग अध्ययन करणारे वैद्य सुद्धां आपापल्या परिवारासह व्याधींनीं पीडित झालेले दिसतात. नानाप्रकारचे काढे, तुपांतील औषधें, वगैरे खाऊन पिऊन सुद्धां त्यांना मृत्यूचे पाश तोडतां येत नाहींत. महासागराला जशी आपली मर्यादा ओलांडितां येत नाहीं, तशीच त्यांची स्थिति होते. नानाप्रकारचीं रसायनें जाणणारा माणूस रसायनाचा योग्य उपयोग करून सुद्धां म्हातारपणाच्या तडाख्यांतून सुटत नाहीं. बलिष्ठ गज जसा कनिष्ठ गजाला खातो, तद्वत् त्याचा प्रकार होतो. तसेंच तपश्चर्येंत रत असलेले, स्वाध्यायांत निमग्न होत्साते, दानशील, यज्ञकर्मांची आवड असणारे, कसेंहि पुरुष असोत, जरा व अंतक यांच्या हातून त्यांची सुटका होणें, केवळ अशक्य होय. जो दिवस, जो महिना, जें वर्ष, जो पक्ष किंवा जी रात्र एकदां गेली, ती पुनः परत येत नाहीं. हा विनाशी प्राणी या खडतर संसारमार्गानें काळ नेईल, तसा जात असतो. सर्व प्राणिमात्रांनीं चोखाळलेल्या या मार्गानें मनुष्याला अवश होऊन जावें लागतें. देह व जीव यांचा संबंध परस्परसापेक्ष आहे. स्त्रियादिक व इतर बांधव यांचा समागम रस्त्यावरच्या ओळखीप्रमाणें होय. यांचा कायमचा सहवास कोणालाच लाभणें शक्य नाहीं. यांच्याच काय, पण प्रत्यक्ष आपल्या शरीराच्या सहवासाचीहि वाट तीच होय. राजा, तुझा पिता आज कोठें आहे? तुझ्या पितामहाची वाट काय? ते तुला आज दिसत नाहींत व त्यांनाहि तूं दिसत नाहींस. लोकांच्या डोळ्यांना स्वर्ग व नरक हे दोन्हीहि दिसत नाहींत. याकरितां वेदालाच प्रमाण मानलें पाहिजे. तोच या सर्व प्राणिमात्रांना स्वर्ग व नरक यांसंबंधीं सांगतो.

ब्रह्मचर्याश्रमाचें यथाशास्त्र पालन करून, शास्त्रोक्त धर्मानें संतत्युत्पादन करावें, ज्ञान संपादावें, पितर, देव, मनुष्यें, यांच्या ऋणांतून पितृयज्ञादिकांनीं मुक्त व्हावें. प्रथम ब्रह्मचर्य अवलंबून, नंतर यज्ञकर्में करून इहलोकाची व स्वर्गलोकाची इच्छा करावी. पण मनानें त्यांपासून अलिप्त रहावें. असा साम्यबुद्धीचा धर्म जो राजा आचरितो, जो यथाविधि द्रव्य मिळवितो, अशा राजाला आपल्या धर्माचरणानें यशःप्राप्ति होते व त्याची कीर्ति त्रैलोक्यभर पसरते. अशा प्रकारचें अश्म नांवाच्या ब्राह्मणाचें भाषण ऐकून घेऊन जनक राजानें त्याचा निरोप घेतला व शांत चित्तानें तो आपल्या घरीं गेला. हे युधिष्ठिरा, या जनकाप्रमाणें तूंहि शोक टाकून दे; ऊठ; महेंद्राप्रमाणें आनं-

दाच्या शिखरावर चढ. राजा, क्षात्रधर्माचें आचरण करून तूं ही सर्व पृथ्वी जिंकिली आहेस. या राजैश्वर्याचा तूं पूर्णपणें उपभोग घे. १२. १. २८.

## अध्याय २९ वा.

[ १ षोडशराजोपाख्यान. ]

( १ ) **वैशंपायन**—धर्मराजाचा पुत्र युधिष्ठिर पुढें कांहींच बोलत नाहीं, असें पाहून, अर्जुन श्रीकृष्णाला म्हणाला.

**अर्जुन**—ज्ञातिक्षयाच्या योगानें शोकाकुल झालेला हा परंतप धर्मराज कशानेंहि शांत होत नाहीं. गोविंदा, याचें शांतवन तूं कर! युधिष्ठिर शोकाकुल झाल्यामुळें बाकीचे सगळे विस्मयांत पडले आहेत. तेव्हां, याचा शोक तूं आतां नाहींसा कर!

**वैशंपायन**—महात्म्या अर्जुनानें श्रीकृष्णाला अशी विनंति केल्यावर त्या कमलाक्ष श्रीकृष्णानें युधिष्ठिराकडे आपलें तोंड वळविलें. त्या वेळेला श्रीकृष्णाचें तोंड सूर्य उगवल्यावर विकसित झालेलें कमळ जसें शोभतें, तसें शोभत होतें. लहानपणापासून श्रीकृष्ण हा युधिष्ठिराला अर्जुनापेक्षांहि आवडत असे. चंदनानें विभूषित केलेले त्याचे दोन्ही बाहू आपल्या हातीं घेऊन श्रीकृष्ण भगवान् युधिष्ठिराला म्हणाला.

**श्रीकृष्ण**—हे पुरुषव्याघ्रा, सर्व शरीर शुष्क करून टाकणारा हा शोक आतां पुरे कर. या समरांगणांत जे जे लोक मारले गेले आहेत, त्यांतील कोणीहि आतां परत येणें शक्य नाहीं. स्वप्नांत झालेला लाभ जसा जागेपणीं निष्फल ठरतो, तसेच हे रणांगणावर मरण पावलेले क्षत्रिय वीर होत. हे सगळे वीर समोरासमोर युद्ध करीत असतां जिंकले गेले आहेत. यांच्यापैकीं एकालाहि पाठीवर घाव झालेला नाहीं व कोणालाहि पळून जात असतां वधिलेलें नाहीं. या समरांगणांत सर्व वीरांनीं युद्ध करीत करीतच प्राण सोडले आहेत व क्षत्रियोचित अशा शस्त्राघातानें पवित्र होऊन ते स्वर्गाला गेले आहेत. वेद व वेदांगें यांमध्यें पारंगत असलेले, शूर, क्षात्रधर्माचें पालन करणारे, असे हे वीर यांना पुण्यगति प्राप्त झालेली आहे. यांच्याबद्दल शोक करणें तुला योग्य नव्हे. हे मरण पावले, एवढेंच ऐकून त्यांबद्दल शोक करणें तुला उचित नाहीं. ते वीराच्या मरणानें मेले आहेत, म्हणून ते अशोच्य होत. युधिष्ठिरा, पुत्र-

शोकानें व्याप्त झालेल्या सृंजय राजाला नारदानें एक पूर्वीचा इतिहास सांगितला होता, तो मी तुला आतां सांगतों, ऐक.

नारद्—हे सृंजया, सुख व दुःख सर्वांच्याच मागें लागलें आहे. यांच्या तडाख्यांतून न सुटतां तूं काय, मी काय, किंवा या प्रजा काय, या सर्वांचा नाश होऊन आपण एक दिवस मृत्युमुखीं पडणार आहों. पूर्वींच्या क्षत्रिय राजांचें महाभाग्य कसें होतें हें तुझ्या कानावर आलें असेल. नसल्यास मी सांगतों ऐक, म्हणजे तुझ्या शोकाचा तुला विसर पडेल. हे मोठमोठे राजे कसकसे प्रभावशाली होते व त्यांचा अंत कसा झाला, हें मी तुला सांगणार आहें. यांच्या हकीकतीनेंच तुझा शोक नाहींसा होईल. आपला संताप आंवरता घे व मी काय सांगतों, इकडे लक्ष दे. क्रूर ग्रहांची शांति करणें, हें आयुष्याला हितकारक आहे. राजा, जे मोठमोठे पराक्रमी राजे होऊन गेले, त्यांचीं चरित्रें ऐकण्यालायक असतात. ज्या महात्म्यानें केलेल्या यज्ञांत सर्व देव, इंद्र, वरुण, बृहस्पति येत व हविर्भाग घेत, ज्यानें ईर्ष्येनें देवराज पुरंदर इंद्र याला जिंकिलें, शक्राचें प्रिय करण्याच्या इच्छेनें भगवान् बृहस्पतीला ज्याला यज्ञविन्मुख करावें लागलें, बृहस्पतीचा धाकटा भाऊ संवर्त यानें ज्याच्याकडून यज्ञ करविले, ज्याच्या राज्यांत पृथ्वी नांगरल्यावांचून पीक देत होती, ज्याच्या यज्ञांत विश्वेदेव हे सभासद असून सर्व मरुद्गण व साध्य हे वाढपी होते, ज्याच्या यज्ञांत मरुद्गणांनीं सोमपान केलें व देव, मनुष्यें व गंधर्व यांना नको होईपर्यंत दक्षिणा दिल्या गेल्या, ज्यानें धर्म, वैराग्य व ऐश्वर्य अशीं चारीं भद्रें ( कल्याण ) संपादन केलीं, असा तुझा पुत्रापेक्षांहि पुण्यशील आविक्षित मरुत्त मरण पावला, तेव्हां तुझ्या पुत्राकरितां तूं शोक करूं नकोस !

हे सृंजया, ज्याच्या राज्यांत इंद्र दरवर्षीं सोन्याची वृष्टि करीत असे; ज्या राजाच्या राज्यांत पृथ्वीचें वसुमती हें नांव यथार्थ झालें; ज्याच्या राज्यांत सोन्याच्या नद्या वहात; ज्याच्या राज्यांत नद्यांमध्यें इंद्रानें सोन्यांच्या कांसवांचा, खेंकड्यांचा, नक्रांचा, मगरींचा, पाऊस पाडला; सोन्याचे मासे, मगरी इत्यादिकांचा वर्षाव झालेला पाहून त्या अतिथिपुत्र सुहोत्र राजाला आनंद झाला; ज्याच्या यज्ञांत कुरुजांगल देशांत अमर्याद पडलेलें तें सोनें पाहून त्यानें त्या यज्ञांतच तें सोनें ब्राह्मणांना आनंदानें अर्पण केलें, तो सर्व प्रकारची तुझ्या पुत्रापेक्षांहि अतिशय पुण्याई संपादन केलेला पुण्यशील असा अतिथि-

पुत्र सुहोत्र देखील मरण पावला. तेव्हां तूं पुत्रासाठीं शोक करूं नकोस. तुझ्या पुत्रानें यज्ञ केले नाहींत, किंवा दक्षिणाहि दिल्या नाहींत; तेव्हां आतां तूं जागा हो व पुत्रशोक सोड !

हे सृंजया, अंगदेशचा राजा बृहद्रथ हाहि असाच मरण पावला. त्यानें दहा लक्ष शुभ्र घोडे यज्ञांत दिले व तितक्याच म्हणजे दहा लक्ष कन्या सुवर्णालंकारांनीं विभूषित करून दक्षिणा दिल्या. अत्यंत सुशोभित असे दहा लक्ष गज त्यानें यज्ञांत दिले. तसेंच आणखी त्यानें यज्ञांत एक लक्ष वृषभ सुवर्णभूषणांनीं अलंकृत करून ब्राह्मणांना दान दिले. त्यानें एक हजार गाई व त्यांचे अनुचर हीं दक्षिणा म्हणून दिलीं. विष्णुपद पर्वताच्या ठिकाणीं अंगदेशाधिपानें केलेल्या यज्ञांत सोमपान करून प्रत्यक्ष इंद्र धुंद झाला होता व दक्षिणा घेऊन ब्राह्मणहि मस्त झाले होते. हे राजा, बृहद्रथानें केलेल्या शंभर यज्ञांत देव, मनुष्यें व गंधर्व यांना नको नको होईपर्यंत दक्षिणा मिळाली. राजा, याच्या सारखा दाता मागें कोणी झाला नाहीं व पुढेंहि कोणी होणार नाहीं. अग्निष्टोम, अत्यग्निष्टोम, उक्थ्य, षोडशी, वाजपेय, अतिरात्र व आप्तोर्याम या ज्या सप्त सोमसंस्था—सात प्रकारचे सोमयज्ञ—त्यांमध्यें या अंगराजानें दान दिलें आहे. तुझ्या पुत्रापेक्षां अधिक पुण्यशील, चारी प्रकारचें कल्याण साधणारा, असा अंगराज बृहद्रथ मरण पावला. तेव्हां सृंजया, हें ऐकून तूंहि पुत्रशोक सोडून दे !

हे सृंजया, उशीनराचा पुत्र शिबि हाहि मरण पावल्याचें आम्हीं ऐकिलें आहे. या राजानें सर्व पृथ्वी ढालीप्रमाणें आपल्या भोंवतीं फिरविली व ज्यानें आपल्या रथांच्या चाकांचा घडघडाट सर्व पृथ्वीभर पसरला, आपल्या विजयी रथांत बसून त्यानें सर्व पृथ्वीवर एकछत्री राज्य केलें. त्याच्या जवळ जेवढे बैल, गाई, अश्व आणि रानटी पशु होते, तितक्या धेनु ज्यानें यज्ञांत दक्षिणा दिल्या, त्याची राज्यधुरा वहाण्यास दुसरा कोणीहि समर्थ नाहीं, असें प्रजापतीला वाटलें. हे सृंजया, त्या औशिनरी शिबीवांचून जगांत दुसरा पराक्रमी राजाच झाला नाहीं. असा तो शिबिहि मरण पावला. त्याच्यापुढें ज्यानें कांहीं दक्षिणा दिली नाहीं, ज्यानें कोणताहि यज्ञ केला नाहीं, अशा तुझ्या पुत्राची ती काय कथा ? तेव्हां तूं पुत्रशोक टाक !

हे सृंजया, दुष्यंत आणि शकुंतला यांचा मुलगा भरत हाहि असाच मरण पावल्याचें आम्ही ऐकितों. यानें देवांच्यासाठीं यमुनेच्या तटावर तीनशें अश्व

आणि सरस्वती नदीच्या तीरावर वीस व गंगानदीच्या कांठावर चौदा अश्व बांधले. या राजाच्या हातून हजार अश्वमेध व शंभर राजसूय यज्ञ झाले. भरतानें केलेल्या या महत्कृत्याचें अनुकरण करणें कोणालाच शक्य झालें नाहीं. आकाशाला हात पोंचविण्याचें कार्य याच्यासारखें कोणाच्यानें होणार आहे ? त्यानें हजारांहून हजारों अश्व यज्ञांत बांधिले व त्यानें अनेक यज्ञकुंडें केलीं. त्यानें एक हजार पद्में इतके अश्व कण्वाला दिले. असला हा भरत सुद्धां मृत्यूच्या आधीन झाला. तेथें हे सृंजया, तुझ्या पुत्राची ती कथा काय ? तेव्हां हा पुत्रशोक तूं टाक !

हे सृंजया, दशरथ राजाचा पुत्र श्रीरामचंद्र हाहि मृत झाल्याचें आम्ही ऐकिलें आहे. रामचंद्राचें आपल्या प्रजेवर पोटच्या लेंकरांइतकें प्रेम होतें. त्याच्या राज्यांत सहसा कोणी विधवा स्त्री सांपडत नसे व कोणीहि अनाथ नसे. रामाचें राज्य प्रजांना समदृष्टि बापासारखें वाटत असे. पर्जन्याची वृष्टि यथाकाल होऊन पिकें वेळच्यावेळीं येत. रामराज्यांत सदासर्वदा सुकाळ असे. पाण्यांत बुडून मृत्यु, आगींत भाजणें, कोठल्याहि प्रकारच्या रोगाचें भय हीं रामराज्यांतील प्रजेला माहीत नव्हतीं. रामराज्यामध्यें स्त्रीपुरुषांचें आयुष्य एक एक हजार वर्षांचें असे. त्यांना रोगराई कशी ती माहीत नव्हती. त्यांचे सर्व मनोरथ सिद्धीला जात असत. रामराज्यामध्यें स्त्रिया सुद्धां आपआपसांत भांडत नसत, मग पुरुषांचें भांडण कोठलें ? रामराज्यांत प्रजा नित्य धर्मनिष्ठ राहत असत. ज्यांचे मनोरथ पूर्ण झालेले, जे नेहमीं संतुष्ट, निर्भय, स्वैरसंचारी, सत्यव्रताचरणी असे पुरुष रामराज्यांत होते. त्याच्या राज्यांत झाडें फलांफलांनीं सदा भरलेलीं असत. रामाच्या राज्यांत गाई द्रोणद्रोण दूध देत असत. चौदा वर्षें वनवासांत राहून, प्रशंसनीय असे दहा अश्वमेध करून, त्या श्यामकर्ण, आजानुबाहु, सिंहस्कंध, आरक्तनेत्र, विशालभुज रामानें अकरा हजार वर्षें अयोध्येचें राज्य केलें. हे सृंजया, असला रामराजा सुद्धां कालवश झाला. तेथें तुझ्या पुत्राची काय कथा ? तस्मात् तूं पुत्रशोक सोड !

हे सृंजया, भगीरथ राजाहि असाच कालवश झाला. या भगीरथ राजाच्या यज्ञांत सोमरसाचें पान करून इंद्र धुंद झाला होता. शेंकडों सहस्र असुर या इंद्रानें जिंकिले. यानें सुवर्णालंकारांनीं भूषित करून दहा लक्ष कन्या यज्ञांत दान दिल्या व पुष्कळ दक्षिणाहि वांटली. प्रत्येक कन्येला रथांत बसवून सर्वांच्या रथाला चार चार अश्व जुंपले होते. प्रत्येक रथाबरोबर गळ्यांत सोन्याच्या माळा

घातलेले शंभर सुंदर गज, प्रत्येक गजामागें हजार अश्व, प्रत्येक अश्वामागें हजार धेनु व प्रत्येक धेनूमागें एक हजार अजा होत्या. याप्रमाणें त्यानें दान दिलें. भागीरथी गंगा ही एकांतांत याच्या मांडीवर बसली असतां त्या योगानें ऊर्वशी ही अप्सरा उत्पन्न झाली. इक्ष्वाकुवंशांतील पुष्कळ दक्षिणेनें युक्त असा हा भगीरथ राजा यज्ञ करीत असतांना गंगेनें त्याची कन्या होण्याची इच्छा मनांत धरिली. असला हा भगीरथ राजा सुद्धां मरण पावला. राजा तुझा पुत्र याच्यापुढें कोणत्या झाडाचा पाला? तस्मात् हे सर्व कालवश होणारच, हें जाणून तूंहि पुत्रशोक टाक !

सृंजया, दिलीप राजा असाच मृत्युवश झाला, असें आम्ही ऐकितों. या राजानें अनेक प्रकारचीं कर्में केलीं, असें ब्राह्मण सांगतात. या राजानें द्रव्यानें परिपूर्ण अशा सगळ्या पृथ्वीचें दान ब्राह्मणांना यज्ञांत केलें होतें. हा राजा या पृथ्वीवर यज्ञ करीत असतां पुरोहितांस हजार हजार सोन्याचे गज दक्षिणा म्हणून देत असे. याच्या यज्ञामध्यें पशुबंधाचे स्तंभ मोठाले सोन्याचे असत. इंद्रासहित सर्व देव त्याच्या येथें येत. तेथें सुवर्णाच्या स्तंभाजवळील सोन्याच्या कटकावर सहा हजार देवगंधर्वांनीं सात वेळां नृत्य केलें. त्या सर्वांच्या मध्यें विश्वावसु हा स्वतः वीणा वाजवीत होता, तें पाहून प्रत्येकाला वाटे कीं हा मजसाठींच व माझ्याकडे तोंड करून वाजवीत आहे. दिलीप राजाच्या या आश्चर्यकारक कृत्याचें अनुकरण एकाच्यानेंहि झालें नाहीं. याच्या राज्यांत सोन्याच्या अलंकारांनीं आच्छादित गज रस्त्यांत मदोन्मत्त होऊन लोळत असत. त्या शतधन्वी, सत्यवादी अशा दिलीप राजाला ज्यांनीं डोळाभर पाहिलें, ते सुद्धां पावन होऊन स्वर्गाला गेले. दिलीपाच्या घरीं तीन प्रकारचा शब्द नेहमीं ऐकूं येई. स्वाध्यायाचा घोष, धनुष्याच्या प्रत्यंचेचा घोष, आणि 'मला द्या' असा याचकांचा घोष, हे ते तीन प्रकारचे शब्द होत. सृंजया, असला दिलीपहि कालवश झाला. तेथें तुझ्या पुत्राची काय किंमत? म्हणून तूं शोक टाक !

सृंजया, युवनाश्वाचा पुत्र मांधाता हाहि असाच कालवश झाला. याला मरुद्गणांनीं बापाच्या कुशींतून गर्भरूपानें बाहेर काढलें होतें. यज्ञांतील पुत्रप्राप्तिकारक असें दधिमिश्रित तूप या यवनाश्वानें खाल्यामुळें त्याच्या विशाल उदरांत हा मांधाता वाढत होता. बापाच्या मांडीवर हा मांधाता सुखानें निजलेला आहे, असें पाहून देव आपसांत म्हणूं लागले कीं, हा आतां कोणाचें दुग्ध प्राशन

करील? तेव्हां हा माझें दूध प्राशन करील असें म्हणून इंद्र पुढें झाला व इंद्रानें त्याचें नांव मांधाता असें ठेविलें. या मांधात्याचें संवर्धन करण्यासाठीं इंद्राचे हातून दुधाची धार त्याच्या तोंडांत गळूं लागली. इंद्राच्या हातचें पान करतांच तो मांधाता एका दिवसांत शंभर पलें वाढला व बारा दिवसांत त्याची वाढ बारा वर्षांइतकी झाली. त्यानें सर्व पृथ्वी एकाच दिवसांत पालथी घातली. हा महात्मा इंद्रासारखा पराक्रमी होता. या मांधात्यानें अंगार, मरुत्त, असित, गय, अंग देशचा राजा बृहद्रथ, इतक्यांना युद्धांत जिंकिलें. मांधाता व अंगार यांच्या युद्धांत तर मांधात्याच्या धनुष्याचा टणत्कार आकाशाला भेदून जातो कीं काय असें देवांना भय वाटलें. सूर्याचा उदय जेथें होतो व सूर्याचें प्रतिष्ठान ज्या ज्या भागांत आहे ते ते सर्व भाग यौवनाश्व मांधात्याच्या अंमलाखालचे होत. मांधात्यानें शंभर अश्वमेध यज्ञ व शंभर राजसूय यज्ञ करून देवांना संतुष्ट केलें. या यज्ञांतून राजानें एक योजन उंच व दहा योजनें लांब असे सुवर्णमय रोहित मत्स्य तयार करून ते ब्राह्मणांना दिले. वांटून जास्त राहिलेलेहि पण इतरांना देऊन टाकिले. सृंजया, असला मांधाता राजा जर कालवश झाला, तर इतरांची काय कथा? तेव्हां तूं पुत्रशोक सोड!

हे सृंजया, नहुषाचा मुलगा ययाति हाहि मरण पावल्याचें आम्हीं ऐकिलें आहे. समुद्रानें वेढिलेली ही सर्व पृथ्वी या ययातीनें जिंकिली होती. शम्या —मुळांत जाड असलेलें मुद्गलासारखें काष्ठ—घेऊन तें फेंकलें असतां जेथें तें पडेल तेथें टप्याटप्यांनीं यज्ञवेदी स्थापीत हा ययाति राजा समुद्र-तीरापर्यंत गेला. त्यानें हजार यज्ञ केले, तसेंच शंभर वाजपेय यज्ञहि केले. पर्वतासारखे सोन्याचे तीन ढीग करून ते ब्राह्मणांना वांटून देऊन ययातीनें त्यांना संतुष्ट केलें. असुरांशीं युद्ध करून दैत्य आणि जे दानव यांचा संहार करून नहुषपुत्र ययातीनें सगळी पृथ्वी विभागून शेवटच्या विभा-गांत यदु, द्रुह्य, अनु, तुर्वसु, ह्या आपल्या पुत्रांमध्यें ती वांटून दिली व पुरुला राज्याभिषेक करून आपण पत्नीसह वनांत गेला. हे सृंजया, असा तो ययाति राजा मरण मरण पावला, तर तेथें इतरांचा काय पाड? तेव्हां तूं पुत्रशोक सोड!

हे सृंजया, नाभागपुत्र अंबरीष हाहि असाच मरण पावला. याच्यावर प्रजांचें प्रेम इतकें होतें कीं हाच आपला राजा असावा, म्हणून प्रजा देवाची प्रार्थना

करीत. यज्ञकर्म चालू असतांना अंबरीषानें अनेक यज्ञकर्त्या राजांची ब्राह्मणांच्या शुश्रूषेकडे योजना केली होती. यज्ञकर्त्या राजांना ब्राह्मणांची शुश्रूषा सांगण्याचें काम आजपर्यंत कोणींहि केलें नाहीं व यापुढें कोणी करणार नाहीं. अंबरीष राजानें केलेलें कार्य असेंच अभूतपूर्व होतें, म्हणून विद्वान् लोक त्याला मान देत. अश्वमेध यज्ञ करणारे ते सहस्रावधी राजे–विप्रदास्य केल्यामुळें करीत असलेल्या अश्वमेधाच्या पुण्याईंत भागीदार झालेले असे–उत्तम लोकाला गेले. सृंजया, अशाप्रकारचा ययाति राजाहि मरण पावला. तेथें तुझ्या पुत्राची किंमत ती किती ? तेव्हां, तूं पुत्रशोकाचा त्याग कर !

हे सृंजया, चित्ररथाचा मुलगा शशबिंदु हाहि मरण पावला ! या राजाला एक लक्ष बायका असून दहा लक्ष मुलगे होते. सर्वांना सोन्याचीं चिलखतें होतीं व त्यांच्या जवळ उत्तम प्रकारचीं धनुष्येंहि असत. या प्रत्येक राजपुत्राबरोबर शंभर शंभर कन्या, एका कन्येबरोबर शंभर शंभर गज, एकेक गजाबरोबर शंभर शंभर रथ, एकेक रथाबरोबर उत्तम जातिवंत असे शंभर शंभर सुवर्णालंकृत अश्व, प्रत्येक अश्वामागें शंभर शंभर गाई, प्रत्येक गाईमागें शंभर शंभर मेंढ्या असल्या प्रकारचें अमर्याद धन अश्वमेधासारख्या महायज्ञांत या राजानें ब्राह्मणांना दिलें. हे राजा, असला शशबिंदु राजा मेला. तस्मात् तूं पुत्रशोक टाक !

सृंजया, अमूर्तरयाचा मुलगा गय हाहि मृत्युवश झाला. या राजानें शंभर वर्षेपर्यंत यज्ञशिष्ट अन्न खाल्लें. प्रसन्न झालेला अग्नि या राजाला वरदान देऊं लागला असतां यानें त्याच्यापासून दान देण्याला अक्षय धन, धर्मावर अढळ श्रद्धा, सत्यावर अढळ विश्वास, असे तीन वर मागून घेतले व अग्नीच्या कृपेनें ते त्याला मिळाले. दर्श, पूर्णमास व चातुर्मास्य हे यज्ञ व अश्वमेध यज्ञ एक हजार वर्षेपर्यंत त्यानें केले. यानें सहस्र वर्षेपर्यंत एक लक्ष गाई, एक लक्ष खेचरें, हीं उठतां बसतां दान दिलीं. यानें सामरसानें देवांचें, स्वधाकारांनीं पितरांचें, द्रव्यदानानें ब्राह्मणांचें तर्पण केलें व सर्व कामना पूर्ण करून स्त्रियांनाहि संतोष दिला. या राजानें पन्नास हात रुंदीची व शंभर हात लांबीची अशी सुवर्णमय पृथ्वी करून ती ब्राह्मणांना यज्ञांत दान दिली. हे पुरुषश्रेष्ठा, गंगेमध्यें वाळूचे जितके कण असूं शकतील तितक्या गाई अमूर्तरयाचा पुत्र जो गय यानें दान दिल्या. राजा, असला गय जेथें मरण पावला तेथें तदितर लोकांचा पाड किती ? तस्मात् तूं पुत्रशोक सोड !

संजया, संकृतीचा पुत्र रंतिदेव हाहि असाच कालवश झाला. यानें इंद्राची योग्य आराधना करून त्याच्यापासून वर मागून घेतले होते. 'आमच्या राज्यांत अन्नाची समृद्धि पुष्कळ असावी, याचक आमच्याकडे पुष्कळ यावे, आम्हांला कोणाकडे याचना करण्याचा प्रसंग येऊं नये, आमच्या मनांतील आस्तिक्य-बुद्धि सर्वदा कायम रहावी.' अशाप्रकारचे ते वर होते. पाळींव अगर रानटी पशू हे आपण होऊन त्या व्रतदीक्षा घेणाऱ्या रंतिदेवाकडे येत. त्यांच्या चर्मराशींच्या घामांतून जी महानदी उत्पन्न झाली, तिला चर्मण्वती असें नांव देण्यांत आलें. या राजानें ब्राह्मणांना शेंकडो निष्कांचें दान दिलें. तेव्हां, ते ब्राह्मण 'आम्हाला ओझें झालें, हे शंभर निष्क तुम्ही घ्या,' असें इतरांना म्हणत. असें विपुल दान त्या राजानें दिलें. 'हे घ्या आपणाला निष्क' असा संकल्प उच्चारतांच ते ब्राह्मणांना पोंचत असत. रंतिदेवाचीं सर्व यज्ञो-पकरणें, घट, भांडीं, कटाह, स्थाली, पिठर, इत्यादि सर्व पात्रें सोन्याची होतीं. संकृतीचा पुत्र रंतिदेव याच्या घरीं ज्या ज्या रात्रीं ब्राह्मण राहत, त्या त्या रात्रीं त्यांना वीस हजार व शंभर गाई देत असे. कानांत सुंदर कुंडलें धारण करणारे आचारी या ब्राह्मणांना सांगत 'महाराज, आज पूर्वीप्रमाणें मांस नाहीं. नुसता सूपच आज यथेच्छ आनंदानें भक्षण करा.' असला हा रंतिदेव सुद्धां मरण पावला. तेव्हां तूं पुत्राकरितां शोक करूं नकोस !

हे संजया, इक्ष्वाकुवंशांतील राजा सगर हाहि असाच मृत्युवश झाला. ह्या पुरुषव्याघ्राचा पराक्रम अमानुष होता. हा सगर राजा बाहेर निघाला असतां त्याचे साठ हजार पुत्र त्याच्याबरोबर निघत. पावसाळा संपल्यावर नक्षत्रराजा जो चंद्र त्याच्याभोंवतीं ज्याप्रमाणें नक्षत्रें फिरतात व तीं शोभिवंत दिसतात, तशीच शोभा येथें दिसे. याच्या प्रतापानें सर्व पृथ्वीवर एकछत्री राज्य झालें व यानें हजार अश्वमेध करून देवतांना संतुष्ट केलें. या राजानें सर्व सोन्यानें मढविलेला, सोन्याचा तयार केलेला, ज्याला सोन्याचे खांब आहेत, असा राजवाडा ब्राह्मणांना दिला. यानें कमलनेत्रा अनेक सुंदर स्त्रिया योग्य ब्राह्मणांना दिल्या व त्यांच्या इच्छा यानें पूर्ण केल्या. याच्याच आज्ञेवरून ब्राह्म-णांनीं तें सर्व द्रव्य आपसांत वांटून घेतलें. समुद्रवलयांकित पृथ्वी या राजानें रागानें खणून काढली. याच्या नांवावरून समुद्राला सागर हें नांव पडलें. असला हा सगर राजा सुद्धां मृत्युवश झाला. तेव्हां हे संजया, मृतपुत्राबद्दल तूं शोक करूं नकोस !

हे सृंजया, वेनाचा पुत्र पृथु हाहि याचप्रमाणें कालवश झाला. मोठमोठ्या ऋषींनीं महारण्यांत जमून याला अभिषेक केला होता. लोकांमध्यें हा सुखाची वाढ करील, म्हणून लोकांनीं त्याचें नांव पृथु ठेविलें. क्षतापासून-संकटापासून रक्षण करतो, तो क्षत्रिय ही व्युत्पत्तिहि त्याच्या ठिकाणीं सार्थ होती. वेनपुत्र पृथुराजाला पाहून त्याच्या प्रजा आम्ही तुझ्या ठिकाणीं अनुरक्त आहों, असें म्हणत, म्हणून त्यांच्या अनुरागावरून त्याला राजा हें नांव पडलें. जमीन न नांगरतांच तींतून आपोआप पीक निघे. वृक्षांतून प्रत्येक पानांतून मध गळत असे. गाई द्रोणद्रोण दूध देत, अशी याच्या राज्याची स्थिति होती. त्याच्या राज्यांत रोगराई नव्हती. सर्व माणसांचे सर्व मनोरथ परिपूर्ण होत असत. प्रजा निर्भय होती. शेतावर व घरांत माणसें निर्भयपणें मन मानेल, तशीं राहत. समुद्रांतून याला जावयाचें असेल त्या वेळेस पाणी शांत असे. त्याच्या राज्यांत नद्यांना महापूर येऊन त्या अमर्याद रीतीनें कधींच वाहिल्या नाहींत. रथांचे ध्वज कधींच मोडून पडले नाहींत. या राजानें अश्वमेध यज्ञांत चारशें हात उंच असे एकवीस सोन्याचे पर्वत करून ते ब्राह्मणांना दान दिले. सृंजया, असला पृथुराजाहि जेथें मरण पावला, तेथें तुझ्या पुत्राचा कोण पाड? तेव्हां तूं पुत्रशोकाचा त्याग कर!

**नारद**—संजया, माझें भाषण तुला नीट ऐकूं येत नाहीं काय? तूं असा स्तब्ध कां राहिला आहेस? विचार कसला करीत आहेस? मरणाच्या दारीं पडलेल्या माणसाला पथ्य सांगून सुद्धां तें जसें व्यर्थ होतें तसें हे सृंजया, माझें भाषण म्हणजे तुझ्या दृष्टीनें विप्रलाप तर ठरणार नाहीं ना?

**सृंजय**—हे नारदऋषे, उत्तम सुवासिक फुलांची एखादी माळ जशी गुंफावी, तशी सुंदर शब्दांनीं युक्त असलेली तुझी अर्थवती वाणी मीं ऐकिली. तुझी वाणी राजर्षींच्या परमपावन कथांनीं युक्त शोकाचा नाश करणारी अशी आहे. हे महर्षे, तुझी वाणी व्यर्थ नाहीं. आपणाला पाहिल्याबरोबर माझा सर्व शोक हरण झाला. हे ब्रह्मवादिन्, आपल्या भाषणानें, मनुष्य जसा अमृतपानानें तृप्त होतो, तद्वत् मी तृप्त झालों. भगवन्, आपण मजवर प्रसाद करणार असाल, तर आपण माझ्या पुत्राला जीवंत करून त्याची माझी भेट घडवून आणा!

**नारद**—पर्वतानें तुला दिलेला हा पुत्र नाश पावला. आतां मी तुला हजार वर्षांचें आयुष्य असलेला हिरण्यनाभ नांवाचा पुत्र देतों. १२. १. २९.

## अध्याय ३० वा.

[ १ नारद-पर्वतोपाख्यान ]

( १ ) युधिष्ठिर—सृंजयाचा मुलगा सुवर्णष्ठीवी झाला हें कसें ? हा मुलगा पर्वतापासून त्याला मिळाला कसा व त्याला मृत्यु कशानें आला ? त्यावेळेस मनुष्याचें आयुष्य हजार वर्षांचें होतें असें सांगतात; मग, हा सृंजयपुत्र कुमारावस्था प्राप्त होण्यापूर्वींच मेला हें कसें ? हा मुलगा नुसता नांवाचा सुवर्णष्ठीवी होता कीं खरोखरच याच्या थुंकीबरोबर सोनें पडत होतें ? खरोखर याच्या थुंकीबरोबर सोनें पडत असेल तर तें कसें हें मला सांग !

श्रीकृष्ण—युधिष्ठिरा, हें कसें झालें, तें मी तुला सांगतों ऐक. पूर्वी नारद व पर्वत नांवाचे दोन ऋषि होऊन गेले. हे दोघे मामाभाचे होते. नारद हा मामा व पर्वत हा भाचा. हे दोघे मनुष्य लोकांत विहार करण्याच्या इच्छेनें आले. मनुष्यलोकांत भोगावयास मिळणारे नानाविध उपभोग घेत घेत हे दोघे तपस्वी ऋषि पृथ्वीवर पर्यटन करीत होते. त्या दोघांनीं पृथ्वीवर हिंडतां हिंडतां एकमेकांशीं असा करार केला कीं, ज्याच्या मनांत ज्या वेळेस जो विचार येईल, त्यानें तो दुसऱ्यापासून लपवून न ठेवितां जसाच्या तसा सांगितला पाहिजे. मग, तो विचार शुभाशुभ कसाहि असो. असें जर न झालें तर मनांतला विचार दुसऱ्याला न सांगणारा शापार्ह ठरेल. हा करार दोघांनाहि मान्य झाला.

नंतर, ते दोघे सृंजय राजाकडे येऊन त्याला म्हणाले 'राजा, आम्ही तुझ्याच कल्याणासाठीं तुझ्या घरीं कांहीं दिवस रहाणार आहों. तर आम्हांला अनुमति दे.' राजानें बरें म्हणून सत्कारपूर्वक त्यांना अनुमति दिली. पुढें एके दिवशीं हा राजा त्या दोघांना मोठ्या प्रेमानें म्हणाला, 'ही माझी एकुलती एक कन्या आपल्या दोघांची सेवा करील. ती सुंदर असून तिचीं गात्रें अव्यंग आहेत. ती शीलवती आहे. ती माझी कन्या सुकुमारी कमलांतील केसराप्रमाणें सुंदर कांतीची असून आपल्या सेवेंत सर्वदा हजर राहील. त्या दोघांना असें सांगून राजानें आपल्या कन्येला त्यांची सेवा देवांप्रमाणें आणि पित्यांप्रमाणें मानून तिला करावयास सांगितलें. आज्ञा प्रमाण, म्हणून राजकन्येनें बापाच्या आज्ञेप्रमाणें त्या नारद-पर्वतांची सेवा आरंभिली. त्या सृंजयकन्येचें रूप पाहून व तिनें केलेल्या सेवेला लुब्ध होऊन नारद

मोहवश झाला व त्याच्या अंतःकरणांत मदनानें प्रवेश केला व क्रमानें तो वाढत जाऊन त्याचें अंतःकरण कामवश झालें. शुक्लपक्षांत चंद्रमा ज्याप्रमाणें वाढतो, तद्वत् अंतःकरणांत पेट घेणारा काम नारदानें आपला भाचा जो पर्वत त्याजपाशीं प्रकट केला नाहीं.

नारदाच्या नानाविध चेष्टांवरून व स्वतःच्या तपोबलानें पर्वतानें नारदाची चलबिचल ओळखिली व कामविह्वल नारदाला त्या पर्वतानें शाप दिला. 'आमच्यांपैकीं कोणाच्याहि मनांत कांहींहि विचार येवो, तो त्यानें दुसऱ्याला सांगितला पाहिजे, असा जो आपण एकमेकांशीं करार केला. तो करार, नारदा, तूं आज मोडलास. त्या सुकुमारी कुमारीच्या ठिकाणीं आपलें मन गेलें, तें तूं मला सांगितलें नाहींस, ब्रह्मचारी, वडील, तपस्वी, ब्राह्मण असा तूं असूनहि प्रतिज्ञाभंग केलास, म्हणून मी तुला शाप देत आहें, तो शाप ऐक. ही सुकुमारी तुझी पत्नी होईल, यांत संशय नाहीं; परंतु, हिच्याशीं विवाह होतांच तुझें रूप वानरासारखें होईल. सर्व लोकांना तूं मात्र मूर्तिमंत यमासारखा दिसशील.' पर्वताचें हें वाक्य ऐकून नारद उलट पर्वताला म्हणाला कीं, 'तप, ब्रह्मचर्य, सत्य, इंद्रियदमन, इत्यादिकांनीं जरी तूं युक्त आहेस, तरी तुला स्वर्गप्राप्ति होणार नाहीं.' अशाप्रकारें एकमेकांना शाप देऊन ते नारद-पर्वत दोघेहि निघून गेले. पर्वतानें सबंध पृथ्वी पालथी घातली. इकडे नारदालाहि कालांतरानें ती सृंजयकन्या मिळाली. त्या विप्रवर्यानें सुकुमारीशीं लग्न लावितांच त्याचें रूप पालटलें आणि पाणिग्रहणाच्या मंत्रांचा उच्चार करतांच त्या सुकुमारीला तो देवर्षि नारद वानरासारखा दिसूं लागला. तरी पण त्या सुकुमारीनें त्याच्याच ठिकाणीं निष्ठा ठेविली व मनानेंहि अन्य पुरुषाचें चिंतन केलें नाहीं. नंतर कांहीं दिवसांनीं पर्वत एका ओसाड रानांत शिरला असतां त्याला नारद दिसला. तेव्हां, त्याला नमस्कार करून तो नारदाला म्हणाला, 'भगवन्, मला स्वर्गप्राप्ति होईल, अशा तऱ्हेचा आपण मजवर प्रसाद करा.' दीन झालेल्या, हात जोडून शरण आलेल्या, पर्वताला, नारद म्हणतो 'बाबारे, प्रथम तूंच मला शाप दिलास. नंतर मींहि तुला स्वर्गप्राप्ति होणार नाहीं, असा मत्सरानें शाप दिला. आतां तूं जो माझी क्षमा मागावयास आलास, हें योग्यच होय. कारण तूं मला पुत्राच्या ठिकाणीं आहेस.' इतकें परस्परांचें भाषण झाल्यावर दोघांनींहि आपापले शाप मागें घेतले. तेव्हां देवर्षि नारद हा रूपसंपन्न झाला. नारदाचें स्वरूप पालटलेलें

पाहतांच सुकुमारी त्याला परपुरुष समजून भीतीनें दूर पळूं लागली. तिला पळतांना पाहून पर्वतानें हा तुझा नवरा आहे, अशी तिची खात्री करून दिली. हा धर्मात्मा नारदऋषि आहे, अशी तिची परोपरीनें समजूत घातल्यावर, आपल्या नवऱ्याला शाप झाला होता, अशी तिची एकदांची खात्री पटून ती ताळ्यावर आली. पुढें पर्वतऋषि स्वर्गाला गेला आणि नारद आपल्या घरीं गेला.

**वासुदेव**—सर्व गोष्टी प्रत्यक्ष डोळ्यांनीं पाहणारा नारद पुढें आहे, तरी काय झालें तें त्याला विचार. तो आपल्या तोंडानें सांगेल. १२. १. ३०.

---

## अध्याय ३१ वा.

[ १ सुवर्णष्ठीवीचा वृत्तांत. ]

( १ ) **वैशंपायन**—हें भाषण ऐकून पांडुपुत्र युधिष्ठिर नारदाला विचारतो, 'हे नारदा, सुवर्णष्ठीवीच्या जन्माची कथा ऐकावयाची माझी इच्छा आहे.' धर्मराज असें बोलतांच नारदानें सुवर्णष्ठीवीच्या जन्माची हकिकत जशी घडली, तशी सांगितली.

**नारद**—हे महाबाहो, तुला आतां श्रीकृष्णानें सांगितल्याप्रमाणें आम्हीं परस्परांचे शाप परत घेतले व पर्वत स्वर्गाला गेला. आतां जो कथाभाग उरला, तोहि मी तुला सांगतों ऐक. मी आणि माझ्या बहिणीचा मुलगा पर्वत असे दोघे सृंजयाच्या घरीं रहाण्याच्या इराद्यानें त्याच्या घरीं जाऊन राहिलों. त्या ठिकाणीं त्यानें आमचें विधिवत् पूजन केलें. आमच्या सर्व इच्छा त्याच्याकडून पुरविल्या जात होत्या व आम्ही सुखानें त्याच्या घरीं रहात होतों. पुढें पावसाळा संपल्यावर आमची जाण्याची वेळ आली. तेव्हां पर्वत म्हणाला, 'या राजाच्या घरांत आपण दोघे राहिलों व यानें आमचा सन्मानहि केला. पावसाळ्याचा काळहि आपण याच्या वाड्यांत घालविला, तेव्हां आपण यावेळीं काय करणें उचित आहे, तें सांग.' त्यावर मीं म्हटलें, 'हे भागिनेया, तुझ्या ठिकाणीं हें सर्व उपपन्न आहे. या राजाला जो जो हवा असेल, तो तो वर देऊन टाक. तुझ्या मनांत असेल, तर आपल्या तपश्चर्येच्या बळावर त्याला सिद्धी प्राप्त होऊं दे.' नंतर पर्वत त्या सृंजय राजाला म्हणाला, 'हे राजा, तूं मोठ्या आर्जवानें जो आमचा सत्कार केलास, त्या-

योगानें आम्ही संतुष्ट झालों आहोंत, तर आतां वर माग. देवांची किंवा मनुष्यांची ज्यांत हिंसा होणार नाहीं, असा वर तूं मागून घे, कारण आमचा तूं सत्कार केला आहेस.'

**सृंजय**—आपण दोघे संतुष्ट झालां, यांतच मला सर्व पावलें व मला माझे वर मिळाले असें मी समजतों. हें त्याचें भाषण ऐकून पर्वत फिरून त्याला म्हणतो.

**पर्वत**—हे राजा, आज पुष्कळ दिवसपर्यंत मनांत बाळगून ठेविलेला तुझा एकादा संकल्प असला तर तो सांगून टाक.

**सृंजय**—हे ऋषिसत्तमा, दृढनिश्चयी, शूर, बलिष्ठ असा पुत्र माझ्या पोटीं जन्मास यावा, अशी माझी इच्छा आहे.

**पर्वत**—राजा, हा तुझा संकल्प पूर्ण होईल. पण, तुझा मुलगा आयुष्मान् मात्र होणार नाहीं. तुझा मुलगा सुवर्णष्ठीवी नांवाचा होईल. त्याचें तेज इंद्रासारखें असेल, पण इंद्रापासून त्याचें तुला रक्षण करावयाला पाहिजे.

पर्वताचें वाक्य ऐकून, असें होऊं नये, अशाबद्दल सृंजयानें त्याची परोपरीनें विनवणी केली व आपल्या तपाच्या योगानें माझा मुलगा आयुष्मान् व्हावा, अशी त्यानें त्याला विनंति केली. परंतु इंद्राचें हित मनांत आणून पर्वत कांहींच बोलला नाहीं. तेव्हां त्या दीन नृपतीला मीं म्हटलें, 'महाराज, तूं त्यावेळीं माझें स्मरण करशील, तर मी तुझ्या पुत्राचें तुला दर्शन करवीन. तुझ्या प्रिय पुत्राला यमराजानें नेलें, तरी देखील मी त्याला त्याच्या स्वरूपांत तुला पुनः देईन. राजा, तूं शोक करूं नकोस.' असें त्या राजाला सांगून आम्ही आमच्या इष्ट प्रदेशीं गेलों आणि सृंजयहि इच्छेनुरूप आपल्या मंदिरांत गेला.

पुढें कांहीं काल गेल्यावर त्या राजर्षि सृंजयाला अत्यंत तेजस्वी व महावीर्यवान् असा पुत्र झाला. सरोवरामध्यें ज्याप्रमाणें महाकमल कालक्रमानें वाढत जातें, त्याप्रमाणें तो राजपुत्र हळूहळू वाढूं लागला. त्याचें सुवर्णष्ठीवी नांव अगदीं यथार्थ होतें. पुढें, हे लोकसत्तमा, तो त्याचा अद्भुत सुवर्णष्ठीवनरूप वृत्तांत सर्वच लोकांत प्रसृत झाला. तेव्हां महर्षि पर्वतानें सृंजयाला वरदान केल्याचें इंद्राला समजून आलें. त्यावर हा कुमार आपला पराभव करील, ही भीति इंद्राला उत्पन्न झाली आणि तो बृहस्पतीच्या मतानें

त्या कुमाराला गांठून घेण्याची वाट पाहत राहिला. त्यानें एकदां आपल्यापुढें मूर्तिमंत स्थित असलेल्या दिव्य अस्त्राला–वज्राला–सांगितलें कीं, ‘ तूं व्याघ्राचें रूप धारण करून ह्या कुमाराचा वध कर ! कारण, हा राजपुत्र मोठा झाल्यावर आपल्या वीर्यानें माझा पराभव करील. ’

इंद्राला असें सांगितल्यावर शत्रूंच्या नगरांचा निःपात करणारें तें वज्र कुमाराच्या भेटीच्या इच्छेनें नित्य त्याजकडे जाऊं लागलें. इकडे आपणाला देवराज इंद्रासारखाच कांतिमान् पुत्र लाभल्यामुळें राजा सृंजयहि आनंदित होऊन आपल्या स्त्रियांस घेऊन वनांत जाऊन राहिला. नंतर त्या भागीरथीतीरावरील निर्जन वनांत कोणी एके प्रसंगीं तो बालक आपल्या धात्रीस बरोबर घेऊन क्रीडा करण्याकरितां धांवत गेला. तो नागेंद्रपराक्रमी पांच वर्षांचा कुमार तेथें जातो, तों एक महाबलवान् व्याघ्र उड्डाण करून त्याजवर आला. तो राजपुत्र त्याला पाहतांच थरथरां कांपूं लागला. व्याघ्रानें त्याचा वध केला आणि तो गतप्राण राजपुत्र तेथें मृत होऊन पडला ! तेव्हां ती दाई मोठ्यानें आक्रोश करूं लागली. इकडे तो व्याघ्र राजपुत्राचा प्राण घेऊन देवराज इंद्राच्या मायेनें तेथेंच अंतर्धान पावला. त्या धात्रीचा मोठा आक्रोश ऐकून राजा सृंजय त्या ठिकाणीं स्वतः धांवून आला. व्याघ्रानें रक्तप्राशन करून मृत होऊन पडलेला तो कुमार पाहून आकाशांतून च्युत झालेला चंद्रच आपण पाहत आहों, असें त्यास वाटलें. अत्यंत दुःखाकुल होऊन राजानें त्या रक्तदिग्ध कुमाराला मांडीवर घेतलें आणि मोठ्यानें विलाप केला. इतक्यांत त्याच्या शोकसंतप्त माताहि जेथें तो सृंजय राजा होता, त्या ठिकाणीं रडत आल्या. तेव्हां त्या दुःखी राजानें माझें स्मरण केलें आणि मीहि त्याला दर्शन दिलें आणि हे राजा, जीं वाक्यें तुला यदुवीर श्रीकृष्णानें ऐकविलीं होतीं, तींच वाक्यें त्या शोकाकुल राजाला मीं सांगितलीं. इंद्राच्या अनुमतानें मीं त्याला पुनर्जीवित केलें. त्याचें भवितव्यच तसें होतें.

अशा रीतीनें तो महायशस्वी वीर्यवान् कुमार स्वर्णष्ठीवी आपल्या मातापितरांस आनंदवीत सुखांत राहूं लागला. हे राजा, त्यानें पित्याचे मागें एक हजार एकशें वर्षें राज्य केलें, मोठमोठ्या दक्षिणा देऊन महायज्ञ केले, तेणेंकरून देवतांना आणि पितरांना संतुष्ट केलें आणि वंशवृद्धि करणारे अनेक पुत्रांना जन्म दिला. अशा स्थितींत बराच काळ लोटल्यावर तो निधन पावला.

हे राजेंद्रा, तूंहि आतां हा शोक टाकून दे आणि तुला श्रीकृष्ण आणि तपस्वी व्यास यांनीं सांगितल्याप्रमाणें पितृपितामहांपासून चालत आलेल्या ह्या राज्यावर आरूढ हो आणि सर्व भार शिरावर घे. मोठेमोठे पुण्यदायक यज्ञ कर, म्हणजे तुला इष्ट लोकाची प्राप्ति होईल. १२. १. ३१.